श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीकुलदेवतायै नमः ॥ श्रीपाद-
वल्लभाय नमः ॥ श्रीनृसिंहसरस्वत्यै नमः ॥ ओं नमो जी विघ्नहरा ॥ गजानना
गिरिजाकुमरा ॥ जय जय लंबोदरा ॥ एकदंता शूर्पकर्णा ॥ १ ॥ हाल-
विशी कर्णयुगुलें ॥ तेथूनि जो कां वारा उसळे ॥ त्याचेनि वातें विघ्न पळे ॥
विघ्नांतक म्हणती तुज ॥ २ ॥ तुझें शोभे आननँ ॥ जैसें तप्त कांचन ॥
किंवा उँदित प्रभारमणें ॥ तैसें तेज फांकतसे ॥ ३ ॥ विघ्नकाननच्छेदनासी ॥
हातीं फरँश धरिलासी ॥ नागँबंद कटीसी ॥ उरंग यज्ञोपवित ॥ ४ ॥ चतुर्भुज
दिससी निका ॥ विशालाक्षा विनायका ॥ प्रतिपाळिसी विश्वलोकां ॥
निर्विघ्नें करूनियां ॥ ५ ॥ तुझें चिंतन जे करिती ॥ तयां विघ्नें न बाधती ॥
सकळाभीष्टें साधती ॥ अंविलंबेंसीं ॥ ६ ॥ सकळ मंगल कार्यासी ॥ प्रथम

---

१ कान. २ विघ्नांचा नाश करणारा. ३ मुख. ४ उदय पावलेला. ५ सूर्य. ६ विघ्नरूप अरण्य तोडण्याकरितां. ७ कुऱ्हाड. ८ नागाचा कमरपट्टा. ९ सर्प. १० लवकर.

वंदिजे तुम्हांसी ॥ चतुर्दश विद्यांसी ॥ स्वामी तूंचि लंबोदरा ॥ ७ ॥ वेद शास्त्रें पुराणें ॥ तुझेंचि असेल बोलणें ॥ ब्रह्मादिकीं या कारणें ॥ स्तविला असे सुरवरीं ॥ ८ ॥ त्रिपुर साधन करावयासी ॥ ईश्वरें अर्चिलें तुम्हांसी ॥ संहारावया दैत्यांसी ॥ पहिलें तुम्हांसी स्तविलें ॥ ९ ॥ हरिहर ब्रह्मादिक गणपती ॥ कार्यारंभीं तुज वंदिती ॥ सकळाभीष्टें साधती ॥ तुझेनि प्रसादें ॥ १० ॥ कृपानिधी गणनाथा ॥ सुरवरादिकां विघ्नहर्ता ॥ विनायका अभयदाता ॥ मतिप्रकाश करीं मज ॥ ११ ॥ समस्त गणांचा नायक ॥ तूंचि विघ्नांचा अंतक ॥ तूंतें वंदिती जे लोक ॥ कार्य साधे तयांचें ॥ १२ ॥ सकळ कार्यां आधारू ॥ तूंचि कृपेचा सागरू ॥ करुणानिधि गौरीकुमरू ॥ मतिप्रकाश करीं मज ॥ १३ ॥ माझे मनींची वासना ॥ तुवां पुरवावी गजानना ॥ साष्टांग करितों नमना ॥ विद्या देईं मज आतां ॥ १४ ॥

१ जिंकण्यासाठीं. २ बुद्धि. ३ नाश करणारा. ४ इच्छा.

नेणता होतों मतिहीन ॥ म्हणोनि धरिले तुझे चरण ॥ चौदा विद्यांचें निधान ॥ शरणागतवरप्रदा[2] ॥ १५ ॥ माझिया अंतःकरणींचें व्हावें ॥ गुरुचरित्र कथन करावें ॥ पूर्णदृष्टीनें पहावें ॥ ग्रंथसिद्धि पाववीं दातारा ॥१६॥ आतां वंदूं ब्रह्मकुमारी[3] ॥ जिचें नाम वागीश्वरी ॥ पुस्तक वीणा जिचे करीं ॥ हंसवाहिनी[4] असे देखा ॥ १७ ॥ म्हणोनि नमतों तुझे चरणीं ॥ प्रसन्न व्हावें मज स्वामिणी ॥ राहोनियां माझिये वाणीं ॥ ग्रंथीं रिघू[5] करीं आतां ॥ १८ ॥ विद्या वेद शास्त्रांसी ॥ अधिकार जाणा शारदेसी ॥ तिये वंदितां विश्वासी ॥ ज्ञान होय अवधारा ॥ १९ ॥ ऐक माझी विनंति ॥ द्यावी आतां अवलीला मती ॥ विस्तार करावया गुरुचरित्रीं ॥ मतिप्रकाश करीं मज ॥ २० ॥ जय जय जगन्माते ॥ तूंचि विश्वीं वाग्देवते ॥ वेदशास्त्रें तुझीं लिखितें ॥ नांदविशी येणेंपरी ॥ २१ ॥ माते तुझिया वाग्बाणीं ॥

१ ठेवा. २ शरणागतास इच्छित वर देणाऱ्या. ३ सरस्वती. ४ हंसावर बसलेली. ५ रिघाव.

उत्पत्ति वेदशास्त्रपुराणीं ॥ वदतां साही दर्शनीं[1] ॥ त्यांतें अशक्य परियेसा ॥ २२ ॥ गुरुचे नामीं तुझी स्थिति ॥ म्हणती नृसिंहसरस्वती ॥ याकारणें मजवरी प्रीति ॥ नाम आपुलें म्हणुनी ॥ २३ ॥ खांबसूत्रींचीं[2] बाहुलीं जैसीं ॥ खेळती तया सूत्रासरसीं ॥ स्वतंत्रबुद्धि नाहीं त्यांसी ॥ वर्तती आणिकां[3]चेनि मतें ॥ २४ ॥ तैसें तुझेनि अनुमतें ॥ माझे जिव्हे प्रेरीं माते ॥ कृपानिधि वाग्देवते ॥ म्हणोनि विनवी तुझा बाळ ॥ २५ ॥ म्हणोनि नमिले तुझे चरण ॥ व्हावें स्वामिणी प्रसन्न ॥ द्यावें मातें वरदान ॥ ग्रंथीं रिघू[4] करवीं आतां ॥ २६ ॥ आतां वंदूं त्रिमूर्तीसी ॥ ब्रह्माविष्णुशिवांसी ॥ विद्या मागें मी तयांसी ॥ अनुक्रमेंकरोनि ॥ २७ ॥ चतुर्मुखें असती ज्यासी ॥ कर्ता जो कां सृष्टीसी ॥ वेद झाले बोलते ज्यासीं ॥ त्याचे चरणीं नमन माझें ॥ २८ ॥ आतां वंदूं हृषीकेशी[5] ॥ जो नायक या विश्वासी ॥ लक्ष्मी-

१ शास्त्रें. २ कळसूत्रांचीं. ३ दुसऱ्याच्या. ४ प्रवेश. ५ इंद्रियांचा स्वामी विष्णु.

सहित अहर्निशीं ॥ क्षीरसागरीं असे जाणा ॥ २९ ॥ चतुर्बाहु नरहरी ॥ शंख चक्र गदा करीं ॥ पद्महस्त मुरारी ॥ पद्मनाभ परियेसा ॥ ३० ॥ पीतांबर असे कसियेला ॥ वैजयंती माळा गळां ॥ शरणागतां अभीष्ट सकळां ॥ देता होय कृपाळू ॥ ३१ ॥ नमन समस्त सुरवरां ॥ सिद्धसाध्यां अवधारा ॥ गंधर्वयक्षकिन्नरां ॥ ऋषीश्वरां नमन माझें ॥ ३२ ॥ वंदूं आतां कविकुळासी ॥ पाराशरादि व्यासांसी ॥ वाल्मीकादि सकळिकांसी ॥ नमन माझें परियेसा ॥ ३३ ॥ नेणें कवित्व असे कैसें ॥ म्हणोनि तुम्हां विनवितसें ॥ ज्ञान द्यावें जी भरंवसें ॥ आपुला दास म्हणोनि ॥ ३४ ॥ न कळे ग्रंथप्रकार ॥ नेणें शास्त्रांचा विचार ॥ भाषा नये महाराष्ट्र ॥ म्हणोनि विनवीं तुम्हांसी ॥ ३५ ॥ समस्त तुम्हीं कृपा करणें ॥ माझिया वचना साह्य होणें ॥ शब्दव्युत्पत्तीही नेणें ॥ कविकुळ तुम्ही प्रतिपाळा ॥ ३६ ॥ ऐसें सकळिकां

१ रात्रंदिवस. २ ज्याच्या नाभीपासून कमळ उत्पन्न झालें आहे असा. ३ नेसला. ४ इच्छित. ५ शब्दार्थज्ञान.

विनवोनि ॥ मग ध्याइले पूर्वज मनीं ॥ उभयपक्ष जनकजननी ॥ माहात्म्य पुण्यपुरुषांचें ॥ ३७ ॥ आपस्तंबशाखेसीं ॥ गोत्र कौंडिण्य महाऋषि ॥ साखरे नाम ख्यातीसी ॥ सायंदेवापासाव[1] ॥ ३८ ॥ त्यापासूनि नागनाथ ॥ देवराव तयाचा सुत ॥ सदा श्रीसद्गुरुचरण ध्यात ॥ गंगाधर जनक माझा ॥ ३९ ॥ नमन करितां जनकचरणीं ॥ मातापूर्वज[2] ध्यातों मनीं ॥ जो कां पूर्वज नामधारणीं ॥ अश्वलायन शाखेचा ॥ ४० ॥ काश्यपाचे गोत्रीं ॥ चौंडेश्वरनामधारी ॥ वागे जैसा जन्हु[3] अवधारीं ॥ अथवा जनक गंगेचा ॥ ४१ ॥ त्याची कन्या माझी जननी ॥ निश्चयें जैशी भवानी ॥ चंपा नामें पुण्यखाणी ॥ स्वामिणी माझी परियेसा ॥ ४२ ॥ नमितां जनकजननींसी ॥ नंतर नमूं श्रीगुरूसी ॥ घाली मति प्रकाशीं ॥ गुरुचरण स्मरावया ॥ ४३ ॥ गंगाधराचे कुशीं ॥ जन्म झाला परियेसीं ॥ सदा ध्यायं[4] श्रीगुरूसी ॥ एका

१ पासून. २ आईचे पूर्वज. ३ या नांवाचा एक राजा. ४ ध्यान करी.

भावें निरंतर ॥ ४४ ॥ म्हणोनि सरस्वतीगंगाधर ॥ करी संतांसी नमस्कार ॥ श्रोतयां विनवी वारंवार ॥ क्षमा करणें बाळकासी ॥ ४५ ॥ वेदाभ्यासी संन्यासी ॥ यती योगेश्वर तापसी ॥ सदा ध्याती श्रीगुरूसी ॥ तयांसी माझा नमस्कार ॥४६॥ विनवितसें समस्तांसी ॥ अल्पमती[1] आपणासी ॥ माझे बोबडे बोलांसी ॥ सकळ तुम्हीं अंगिकारा ॥ ४७ ॥ तावन्मात्र माझी मति ॥ नेणें काव्यव्युत्पत्ति ॥ जैसें श्रीगुरु निरोपिती[2] ॥ तेणें परी सांगत ॥ ४८ ॥ पूर्वापार आमुचे वंशीं ॥ गुरु प्रसन्न अहर्निशीं ॥ निरोप देती मातें परियेसीं ॥ चरित्र आपुलें विस्तारावया ॥ ४९ ॥ म्हणे ग्रंथ कथन करीं ॥ अमृतघट[3] स्वीकारीं ॥ तुझे वंशीं परंपरीं ॥ लाधती चारी पुरुषार्थ[4] ॥ ५० ॥ गुरुवाक्य मज कामधेनु ॥ मनीं नाहीं अनुमानू ॥ सिद्धि पावविणार आपणू ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥ ५१ ॥ त्रैमूर्तींचा अवतार ॥ झाला नृसिंहसरस्वती नर ॥

१ अल्प. २ साक्षात्कारानें सांगितलें. ३ अमृताचा कलश. ४ धर्म. अर्थ, काम व मोक्ष.

कवण जाणे याचा पार ॥ चरित्र कवणा न वर्णवे ॥ ५२ ॥ चरित्र ऐसें श्रीगुरूचें ॥ वर्णूं न शकें मी वाचे ॥ आज्ञापन असे श्रीगुरूचें ॥ म्हणोनि वांचें बोलतसें ॥ ५३ ॥ ज्यास पुत्रपौत्रीं असे चाड ॥ त्यासी कथा हे असे गोड ॥ लक्ष्मी वसे अखंड ॥ तया भुवनीं परियेसा ॥ ५४ ॥ ऐशी कथा जयाचे घरीं ॥ वाचिती नित्य प्रेमभरीं ॥ श्रियायुक्त निरंतरीं ॥ नांदती पुत्रकलत्रयुक्त ॥ ५५ ॥ रोग नाहीं तया भुवनीं ॥ सदा संतुष्ट गुरुकृपेंकरोनि ॥ निःसंदेह सातां दिनीं ॥ ऐकतां बंधन तुटे जाणा ॥ ५६ ॥ ऐसी पुण्य पावन कथा ॥ सांगेन ऐक विस्तारता ॥ सायासाविण होय साध्यता ॥ सद्यः फल प्राप्त होय ॥ ५७ ॥ निधान लाधे अप्रयासीं ॥ तरि कष्ट कां सायासी ॥ विश्वास माझिया बोलासी ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ५८ ॥ आम्हां साक्षी ऐसें घडलें ॥ म्हणोनि विनवितसें

१ आज्ञा. २ इच्छा. ३ लक्ष्मीयुक्त. ४ मुलें व स्त्री यांसह. ५ प्रयत्न केल्यावांचून. ६ तत्क्षणीं. ७ श्रमावांचून. ८ साक्षात्कार.

बळें ॥ श्रीगुरुस्मरण असे भलें ॥ अनुभवा हो सकळिक ॥ ५९ ॥ तृप्ति झालि-यावरि ढेंकर ॥ देती जैसे जेवणार ॥ गुरुमहिमेचा उद्गार ॥ बोलतसें अनु-भवोनि ॥ ६० ॥ मी सामान्य म्हणोनि ॥ उदास व्हाल माझे वचनीं ॥ मक्षिकेच्या[1] मुखांतुनी ॥ मधु केवीं ग्राह्य होय ॥ ६१ ॥ जैसें शिंपल्यांत मुक्ता-फळ ॥ अथवा कर्पूर कर्दळ ॥ विचारीं पां अश्वत्थमूळें[2] ॥ कवणापासाव उ-त्पत्ति ॥ ६२ ॥ ग्रंथ कराल उदास ॥ वांकुडा कृष्णं[3] दिसे ऊस ॥ अमृतवत् निघे त्याचा रस ॥ दृष्टि द्यावी तयावरी ॥ ६३ ॥ तैसें माझें बोलणें ॥ ज्यासी चाडॅ[4] गुरुस्मरणें ॥ अंगिकार करणार शहाणे ॥ अनुभविती एकचित्तें ॥ ६४ ॥ ब्रह्मरसाची[5] गोडी ॥ अनुभवितां फळें रोकडीं ॥ या बोलाची आवडी ॥ ज्यासी संभवे अनुभव ॥ ६५ ॥ गुरुचरित्र कामधेनु ॥ ऐकतां होय महाज्ञानु ॥ श्रोतीं करोनियां सावध मनु ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६६ ॥ श्रीगुरु नृसिंह-

१ मधमाशीच्या. २ कावळ्याचे विष्ठेपासून पिंपळ उत्पन्न होतो. ३ काळा. ४ गरज. ५ ब्रह्मानंदाची.

सरस्वती ॥ होते गाणगापुरीं ख्याति ॥ महिमा त्यांचा अत्यद्भुती ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ६७ ॥ तया ग्रामीं वसती गुरु ॥ म्हणोनि महिमा असे थोरू ॥ जाणती लोक चहूं राष्ट्रूं[1] ॥ समस्त जाती यात्रेसी ॥ ६८ ॥ तेथें राहोनि आराधिती ॥ त्वरित होय फलप्राप्ति ॥ पुत्र दारा[2] धन संपत्ति ॥ जें जें इच्छिलें होय जनां ॥६९॥ लाधोनियां संतानें ॥ नामें ठेविती नामकरणें ॥ संतोषरूपें येऊन ॥ पावती चारी पुरुषार्थ ॥७०॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ भक्त एक नामकरणी ॥ कष्टतसे अति गहनीं ॥ सदा ध्याय श्रीगुरूसी ॥ ॥ ७१ ॥ ऐसा मनीं व्याकुळित ॥ चिंतेनें वेष्टिला बहुत ॥ गुरुदर्शना जाऊं म्हणत ॥ निर्वाणमानसें[3] निघाला ॥७२॥ अति निर्वाण अंतःकरणीं ॥ लय लावोनि गुरुचरणीं ॥ जातो शिष्यशिरोमणी ॥ विसरोनियां क्षुधातृषा ॥ ७३ ॥ निर्धार करोनि मानसीं ॥ म्हणे पाहीन श्रीगुरूसी ॥

१ चारी राष्ट्रांतील ( दिशांतील ). २ स्त्री. ३ एकनिष्ठ.

अथवा सांडीन देहासी ॥ जडस्वरूपें काय काज ॥७४॥ ज्याचें नामस्मरण करितां ॥ दैन्यहानि होय त्वरिता ॥ आपण तैसा नामांकिता ॥ किंकर म्हणतसे ॥ ७५ ॥ दैव असे आपुलें उणें ॥ तरी कां भजावें श्रीगुरुचरण ॥ परिस लागतां लोहा जाण ॥ सुवर्ण केवीं होतसे ॥ ७६ ॥ तैसें तुझें नाम परिसें ॥ माझे हृदयीं सदा वसे ॥ मातें कष्टी सायासें ॥ ठेवितां लाज कवणासी ॥ ७७ ॥ या बोलाचिया हेवा ॥ मनीं धरोनि पहावा ॥ गुरुमूर्तीसी दाखवा ॥ कृपाळू बा सर्वभूतीं ॥७८॥ अतिव्याकुळ अंतःकरणीं ॥ निंदास्तुति आपुली वाणी ॥ कष्टला भक्त नामकरणी ॥ करितां होय परियेसा ॥ ७९ ॥ राग[2] स्वेच्छा ओंवीबद्ध म्हणावे ॥ आजि पाहुणे पंढरीचे रावे ॥ वंदूं विघ्नहरा[3] भावें ॥ नमूं ते सुंदरा शारदेसी ॥ ८० ॥ गुरूची त्रैमूर्ति ॥ म्हणाति वेदश्रुति ॥ सांगति दृष्टांतीं ॥ कलियुगांत ॥ ८१ ॥ कलियुगांत

१ उद्देश. २ गायनांतलि राग व रागिण्या. ३ विघ्नांचें हरण करणारा ( गणपती ).

ख्याति ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥ भक्तांसी सारथी ॥ कृपासिंधु ॥८२॥ कृपासिंधु भक्ता ॥ वेद वाखाणिता ॥ त्रयमूर्ति गुरुनाथा ॥ म्हणोनियां ॥ ८३ ॥ त्रयमूर्तीचे गुण ॥ तूं एक निधान ॥ भक्तांसी रक्षण ॥ दयानिधि ॥ ८४ ॥ दयानिधि यती ॥ विनवितों मी श्रीपती ॥ नेणें भावभक्ति ॥ अंतःकरणीं ॥८५॥ अंतःकरणीं स्थिरु ॥ नव्हे बा श्रीगुरु ॥ तूं कृपासागरु ॥ पाव वेगीं ॥८६॥ पाव वेगीं आतां ॥ नरहरी अनंता ॥ बाळालागीं माता ॥ केवीं टाकी ॥ ८७ ॥ तूं माता तूं पिता ॥ तूंचि सखा भ्राता ॥ तूंचि कुळदेवता ॥ परंपरीं ॥ ८८ ॥ वंशपरंपरीं ॥ धरूनि निर्धारीं ॥ भजतों मी नरहरी ॥ सरस्वतीसी ॥८९॥ सरस्वती नरहरी ॥ दैन्य माझें हरी ॥ म्हणूनि मी निरंतरी ॥ सदा कष्टें ॥ ९० ॥ सदा कष्ट चित्ता ॥ कां हो देशी आतां ॥ कृपासिंधु भक्ता ॥ केवीं होसी ॥९१॥ कृपासिंधु भक्ता ॥ कृपाळू अनंता ॥ त्रयमूर्ति जगन्नाथा ॥ दयानिधि ॥९२॥ त्रयमूर्ति तूं होसी ॥ पाळिसी विश्वासी ॥ समस्त देवांसी ॥

तूंचि दाता ॥९३॥ समस्तां देवांसी ॥ तूंचि दाता होसी ॥ मागों मी कवणासी ॥ तुजवांचोनि ॥ ९४ ॥ तुजवांचोनि आतां ॥ असे कवण दाता ॥ विश्वासी पोषिता ॥ सर्वज्ञ तूं ॥ ९५ ॥ सर्वज्ञाची खूण ॥ असे हें लक्षण ॥ समस्तांतें जाणे ॥ कवण ऐसा ॥९६॥ सर्वज्ञ म्हणोनि ॥ वानिती पुराणीं ॥ माझें अंतःकरणीं ॥ न ये साक्षी ॥९७॥ कवण कैशापरी ॥ असती भूमीवरी ॥ जाणिजेचि तरी ॥ सर्वज्ञ तो ॥ ९८ ॥ बाळक तान्हयें ॥ नेणे बापमाये ॥ कृपा केवीं होय ॥ मातापित्या ॥ ९९ ॥ दिलियावांचोनि ॥ न देववे म्हणोनि ॥ असेल तुझे मनीं ॥ सांग मज ॥ १०० ॥ समस्त महीतळी ॥ तुम्हां दिल्हें बळीं ॥ त्यातें हो पाताळीं ॥ बैसविलें ॥१॥ सुवर्णाची लंका ॥ तुवां दिल्ही एकां ॥ तेणें पूर्वीं लंका ॥ कवणा दिल्ही ॥२॥ अढळ ध्रुवासी ॥ दिल्हें हृषीकेशी ॥ त्यानें हो तुम्हांसी ॥ काय दिल्हें ॥३॥ निःक्षत्र करुनी ॥

१ प्रशंसा करितात. २ अनुभव. ३ पृथ्वीतल. ४ बली नांवाच्या दैत्यराजानें. ५ बिभीषणास. ६ अचलपद.

विप्रातें मेदिनी ॥ देतां तुम्हां कोणीं ॥ काय दिल्हें ॥४॥ सृष्टीचा पोषक ॥ तूंचि देव एक ॥ तूंतें मी मशक ॥ काय देऊं ॥ ५ ॥ नाहीं तुम्हां जरी ॥ श्रीमंत नरहरी ॥ लक्ष्मी तुझे घरीं ॥ नांदतसे ॥ ६ ॥ याहोनी आम्हांसी ॥ तूं काय मागसी ॥ सांग हृषीकेशी ॥ काय देऊं ॥ ७ ॥ मातेचे वोसंगीं ॥ बैसोनियां बाळ वेगीं ॥ पसरी मुखसुरंगी ॥ स्तनकांक्षेसी ॥८॥ बाळापासीं माता ॥ काय मागे ताता ॥ ऐक श्रीगुरुनाथा ॥ काय देऊं ॥९॥ घेऊनियां देतां ॥ नाम नाहीं दाता ॥ दयानिधि म्हणतां ॥ बोल दिसे ॥१०॥ देऊं न शकसी ॥ म्हणें मी मानसीं ॥ चौदाही भुवनांसी ॥ तूंचि दाता ॥११॥ तुझे मनीं पाहीं ॥ वसे आणिक कांहीं ॥ सेवा केली नाहीं ॥ म्हणोनियां ॥ ॥१२॥ सेवा घेवोनियां ॥ देणें हें सामान्य ॥ नाम नसे जाण ॥ दातृत्वासी ॥ १३ ॥ तळीं बावी विहिरी ॥ असती भूमीवरी ॥ मेघ तो अंबरीं ॥ वर्ष-

१ मांडीवर. २ मुखरूप झारी. ३ यश.

तसे ॥ १४ ॥ मेघाची ही सेवा ॥ न करितां स्वभावा ॥ उदकपूर्ण सर्वां ॥ केवीं करी ॥१५॥ सेवा अपेक्षितां¹ ॥ बोलें असे दाता ॥ दयानिधि म्हणतां ॥ केवीं साजे ॥ १६ ॥ नेणें सेवा कैसी ॥ स्थिर होय मानसीं ॥ माझे वंशोवंशीं ॥ तुझे दास ॥ १७ ॥ माझे पूर्वजवंशीं ॥ सेविलें तुम्हांसी ॥ संग्रह बहूवसी ॥ तुझे चरणीं ॥ १८ ॥ बापाचे सेवेसी ॥ पाळिती पुत्रासी ॥ तेवीं त्वां आम्हांसी ॥ प्रतिपाळावें ॥ १९ ॥ माझें पूर्वधनें³ ॥ तुम्हीं द्यावें ऋण ॥ कां बा नये करुणा ॥ कृपासिंधु ॥२०॥ आमुचें आम्हीं घेतां ॥ कां बा नये चित्ता ॥ मागेन मी सत्ता ॥ घेईन आतां ॥ २१ ॥ आतां मज जरी ॥ न देसी नरहरी ॥ जिंतोनि वेव्हारीं⁴ ॥ घेईन जाणा ॥२२॥ दिसतसे आतां ॥ कठिणता गुरुनाथा ॥ दास मी अंकिता ॥ सनातन ॥२३॥ आपुले समान ॥ असेल कवण ॥ तयासवें मन ॥ कठिण कीजे ॥२४॥ कठिण कीजे हरी ॥

१ इच्छा केली असतां. २ दोष. ३ वडिलार्जित द्रव्य. ४ पंचाईत करून.

तुवां दैत्यांवरी ॥ प्रल्हाद कैवारी ॥ सेवकांसी ॥ २५ ॥ सेवकां बाळकांसी ॥ करूं नये ऐसी ॥ कठिणता परियेसीं ॥ बरवें न दिसे ॥२६॥ माझिया अपराधीं ॥ धरोनियां बुद्धि ॥ अंतःकरण क्रोधी ॥ पहासी जरी ॥२७॥ बाळक मातेसी ॥ बोले निष्ठुरेंसीं ॥ अज्ञानें मायेसी ॥ मारी जरी ॥२८॥ माता त्या कुमारासी ॥ कोप न धरी कैशी ॥ आलिंगोनि हर्षी ॥ संबोखी¹ पां ॥२९॥ कवण्या अपराधेंसीं ॥ न घालिसी आम्हांसी ॥ अहो हृषीकेशी ॥ सांगा मज ॥३०॥ माता हो कोपासी ॥ बोले बाळकासी ॥ जावोनि पितयासी ॥ सांगे बाळ ॥३१॥ माता कोपे जरी ॥ एकादे अवसरीं ॥ पिता कृपा करी ॥ संबोखूनि ॥३२॥ तूं माता तूं पिता ॥ कोपसी गुरुनाथा ॥ सांगों कवणा आतां ॥ क्षमा करीं ॥३३॥ तूंचि स्वामी ऐसा ॥ जगीं झाला ठसा ॥ दास तुझा भलतसा² ॥ प्रतिपाळावा ॥३४॥ अनाथरक्षक ॥ म्हणती तुज लोक ॥

१ गोड शब्दांनीं समजाविते. २ अज्ञान.

मी तुझा बाळक ॥ प्रतिपाळावें ॥३५॥ कृपाळू म्हणोनि ॥ वानिती पुराणीं ॥ माझे बोल कानीं ॥ न घालिसीच ॥ ३६ ॥ नायकसी गुरुराणा ॥ माझे करुणावचना ॥ काय दुश्चितपणा[1] ॥ तुझा असे ॥३७॥ माझें करुणावचन ॥ न ऐकती तुझे कान ॥ ऐकोनि पाषाण ॥ विखुरतैसे[2] ॥३८॥ करुणा करीं ऐसें ॥ वानितें[3] तुज पिसें[4] ॥ अजुनि तरी कैसे ॥ कृपा न ये ॥ ३९ ॥ ऐसें नामांकित ॥ विनवितां त्वरित ॥ कृपाळू श्रीगुरुनाथ ॥ आले वेगीं ॥१४०॥ वत्सालागीं धेनु ॥ जैशी ये धांवोनु ॥ तैसे श्रीगुरु आपणु ॥ आले जवळी ॥ ॥४१॥ येतांचि गुरु मुनि ॥ वंदी नामकरणी ॥ मस्तक ठेवोनि ॥ चरणयुग्मीं ॥ ४२ ॥ केश तो मोकळी ॥ झाडी चरणधूळी ॥ आनंदाश्रुजळीं ॥ अंघ्रि क्षाळी ॥ ४३ ॥ हृदयमंदिरांत ॥ बैसवोनि व्यक्त ॥ पूजा उपचारित ॥ षोडशाविधि ॥४४॥ आनंदभरित ॥ झाला नामांकित ॥ हृदयीं श्रीगुरुनाथ ॥

१ द्वेष. २ फुटतात. ३ प्रार्थना करितें. ४ वेडा मनुष्य.

स्थिरावला ॥४५॥ भक्तांच्या हृदयांत ॥ राहे श्रीगुरुनाथ ॥ संतोष बहुत ॥ सरस्वतीसी ॥१४६॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे प्रथमोऽध्यायः ॥१॥ ओंवीसंख्या १४६ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ त्रैमूर्तिराजा गुरु तूंचि माझा ॥ कृष्णातिरीं वास करोनी वोजा ॥ सुभक्त तेथें करिती आनंदा ॥ ते सुर स्वर्गीं पहाती विनोदा ॥ १ ॥ ऐसे श्रीगुरुचरण ध्यात ॥ जातां विष्णुनामांकित ॥ अति श्रमला चालत ॥ राहिला एका वृक्षातळीं ॥२॥ क्षण एक निद्रिस्त ॥ मनीं श्रीगुरु चिंतित ॥ कृपानिधि अनंत ॥ दिसे स्वप्नीं परियेसा ॥ ३ ॥ रूप दिसे सुषु¹प्तींत ॥ जटाधारी भस्मांकित ॥ व्याघ्रचर्म³ परिधानित⁴ ॥ पीतांबर कांसे⁵ देखा ॥४॥ येऊनि योगीश्वर जवळी ॥ भस्म लाविलें कपाळीं ॥ आश्वासूनि तया वेळीं ॥ अभयकर⁶ देतसे ॥५॥ इतुकें देखोनि सुषुप्तींत ॥ चेतन⁷ झाला नामांकित ॥ चारी दिशा अवलोकित ॥ विस्मय करी तया वेळीं ॥ ६ ॥ मूर्ति देखिली सुषुप्तींत ॥ तेचि ध्यातसे मनांत ॥ पुढें निघाला मार्ग क्रमित ॥ प्रत्यक्ष देखे तैसाचि ॥७॥ देखोनियां योगीशातें ॥ करिता झाला दंडवतें॥

१ सुरेख. २ झोंपेंत. ३ वाघाचें कातडें. ४ पांघरलेला. ५ कमरेला. ६ अभयहस्त. ७ जागृत.

कृपा भाकी[1] करुणवाक्यें[2] ॥ माता पिता तूं म्हणतसे ॥ ८ ॥ जय जयाजी योगाधीशा ॥ अज्ञानतमविनाशा[3] ॥ तूं ज्योतिःप्रकाशा[4] ॥ कृपानिधि सिद्धमुनी ॥९॥ तुझे दर्शनें निःशेषें[5] ॥ गेले माझे दुरितदोषें[6] ॥ तूं तारक आम्हास ॥ म्हणोनि आलासि स्वामिया ॥१०॥ कृपेनें भक्तालागुनी ॥ येणें झालें कोठोनि ॥ तुमचें नाम कवण मुनि ॥ कवणे स्थानीं वास तुम्हां ॥११॥ सिद्ध म्हणे आपण योगी ॥ हिंडों तीर्थं भूमिस्वर्गीं ॥ प्रसिद्ध आमुचा गुरु जगीं ॥ नृसिंहसरस्वती विख्यात ॥ १२ ॥ त्याचें स्थान गाणगापूर ॥ अमरजासंगम भीमातीर ॥ त्रयमूर्तींचा अवतार ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥१३॥ भक्त तारावयालागीं ॥ अवतार त्रयमूर्ति जगीं ॥ सदा ध्याती अभ्यासयोगी ॥ भवसागर तरावया ॥ १४ ॥ ऐसा श्रीगुरु कृपासिंधु ॥ भक्तजनां सदा वरदू ॥

---

१ मागे. २ दीन अशा वाणीनें. ३ अज्ञानरूप अंधकाराचा नाश करणाऱ्या. ४ सूर्यरूप. ५ सर्व. ६ पापसंबंधीं दोष.

अखिल सौख्य श्रियानंदू ॥ देता होय शिष्यवर्गा ॥१५॥ त्याचे भक्तां कैचें दैन्य ॥ अखंड लक्ष्मी परिपूर्ण ॥ धनधान्यादि गोधन ॥ अष्टैश्वर्यें नांदती ॥ ॥ १६ ॥ ऐसें म्हणे सिद्ध मुनि ॥ ऐकोनि विनवी नामकरणी ॥ आम्ही असतों सदा ध्यानीं ॥ तया श्रीगुरुयतीचे ॥१७॥ ऐशी कीर्ति ब्रीदं ख्याति ॥ सांगतसे सिद्ध यति ॥ वंशोवंशीं करितो भक्ति ॥ कष्ट आम्हां केविं पाहें ॥ १८ ॥ तूं तारक आम्हांसी ॥ म्हणोनि मातें भेटलासी ॥ संहार करोनि संशयासी ॥ निरोपावें स्वामिया ॥ १९ ॥ सिद्ध म्हणे तये वेळीं ॥ ऐक शिष्या स्तोमैमौळी ॥ गुरुकृपा सूक्ष्मस्थूळीं ॥ भक्तवत्सल परियेसा ॥२०॥ गुरुकृपा होय ज्यासी ॥ दैन्य दिसे कैचें त्यासी ॥ समस्त देव त्याचे वंशीं ॥ कळिकाळांसी जिंके नर ॥ २१ ॥ ऐसी वस्तू पूजुनी ॥ दैन्यवृत्ति सांगसी

लक्ष्मी आणि आनंद. २ बाणा. ३ जटा आहेत मस्तकीं ज्याच्या अशा. ४ लहानथोरांवर. ५ कालि व काळ यांस.

झणी ॥ नसेल तुझे निश्चय मनीं ॥ म्हणोनि कष्ट भोगितोसी ॥२२॥ त्रय-मूर्ति श्रीगुरु ॥ म्हणोनि जाणिजे निर्धारू ॥ देऊं शकेल अखिल वरू ॥ एका भावें भजावें ॥२३॥ एखादे समयीं श्रीहरि ॥ अथवा कोपे त्रिपुरारि² ॥ रक्षील श्रीगुरु निर्धारीं ॥ आपुले भक्तजनांसी ॥२४॥ आपण कोपे एखाद्यासी ॥ रक्षूं न शके व्योमकेशी ॥ अथवा विष्णु परियेसीं ॥ रक्षूं न शके अवँधारीं³ ॥ २५ ॥ ऐसें ऐकोनि नामकरणी ॥ लागे सिद्धाचिया चरणीं ॥ विनवीतसे कर जोडुनी ॥ भक्तभावेंकरोनियां ॥ २६ ॥ स्वामी ऐसा निरोप देती ॥ संदेह होता माझे चित्तीं ॥ गुरु केवीं झाले त्रिमूर्ति ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥२७॥ आणीक तुम्ही निरोपिलेंती ॥ विष्णु रुद्र जरी कोपती ॥ राखों शके गुरु निश्चिती ॥ गुरु कोपलिया न रक्षी कोणी ॥२८॥ हा बोल असे कवणाचा ॥ कवण शास्त्रपुराणींचा ॥ संदेहँ⁴ फेडीं गा मनाचा ॥ जेणें

१ लवकर. २ त्रिपुरासुराचा शत्रु—शंकर. ३ निश्चय ठेव. ४ संशय.

मन दृढ होय ॥२९॥ येणेंपरीं नामकरणी ॥ सिद्धासी पुसे वंदोनि ॥ कृपा-
निधि संतोषोनि ॥ सांगतसे परियेसा ॥३०॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ तुवां
पुसिलें आम्हांसी ॥ वेदवाक्य साक्षीसी ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ३१ ॥
वेद चारी उत्पन्न ॥ झाले ब्रह्मयाचे मुखेंकरून ॥ त्यापासाव पुराण ॥ अष्टा-
दश विख्यात ॥ ३२ ॥ तया अष्टादशांत ॥ ब्रह्मवाक्य असे ख्यात ॥ पुराण
ब्रह्मवैवर्त ॥ प्रख्यात असे त्रिभुवनीं ॥ ३३ ॥ नारायण विष्णुमूर्ति ॥ व्यास
झाला द्वापारांतीं ॥ प्रकाश केला या क्षितीं ॥ ब्रह्मवाक्यविस्तारें ॥ ३४ ॥
तया व्यासापासुनी ॥ ऐकिलें समस्त ऋषिजनीं ॥ तेचि कथा विस्तारोनि ॥
सांगेन ऐका एकचित्तें ॥ ३५ ॥ चतुर्मुख ब्रह्मयासी ॥ कलियुग पुसे हर्षी ॥
गुरुमहिमा विस्तारेंसीं ॥ ब्रह्मदेवें निरूपिला ॥३६॥ ऐसें म्हणतां नामकरणी ॥
पुनरपि सिद्धासी नमुनी ॥ विनवीतसे करद्वय जोडोनि ॥ भावभक्तींकरो-

१ समुद्र. २ ब्रह्मसूत्रादिकांच्या विस्तारानें.

नियां ॥३७॥ म्हणे सिद्धा योगीश्वरा ॥ अज्ञानतिमिरभास्करा[1] ॥ तूं तारक भवसागरा ॥ भेटलासी कृपासिंधु ॥ ३८ ॥ ब्रह्मदेवें कलियुगासी ॥ सांगितलें केविं कार्यासी ॥ आद्यंत विस्तारेंसीं ॥ निरोपीजे स्वामिया ॥ ३९ ॥ ऐक शिष्या एकचित्ता ॥ जेधीं[2] प्रळय झाला होता ॥ आदिमूर्ति[3] निश्चिंतीं[4] ॥ होते वटपत्रेंशयनीं[5] ॥४०॥ अव्यक्तमूर्ति[6] नारायण ॥ होते वटपत्रीं शयन ॥ बुद्धि संभवे चेतन ॥ आणिक सृष्टि रचावया ॥ ४१ ॥ प्रपंच म्हणजे सृष्टिरचना ॥ करणें म्हणोनि आलें मना ॥ जागृत होय या कारणा ॥ आदिपुरुष तये वेळीं ॥ ४२ ॥ जागृत होवोनि नारायण ॥ बुद्धि संभवे चेतन ॥ कमळ उपजवी नाभीहून ॥ त्रैलोक्याचें रचनाघर ॥४३॥ तया कमळामधून ॥ उदय झाला ब्रह्मा आपण ॥ चारी दिशा पाहोन ॥ चतुर्मुख झाला देखा ॥४४॥

१ अज्ञानरूप अंधकारास सूर्याप्रमाणें नाहींसा करणारा. २ जेव्हां. ३ नारायण. ४ अचल, स्वस्थ. ५ वडाच्या पानावर. ६ अस्पष्ट आहे देह ज्याचा असा.

म्हणे ब्रह्मा तये वेळीं ॥ समस्तांहुनि आपण बळी ॥ मजहून आणिक बळी ॥
कवण नाहीं म्हणतसे ॥४५॥ हांसोनियां नारायणू ॥ बोले वाचें शब्दवचनू ॥
आपण असे महाविष्णु ॥ भजा म्हणे तया वेळीं ॥४६॥ देखोनियां श्रीविष्णू-
सी ॥ नमस्कारी ब्रह्मा हर्षीं ॥ स्तुति केली बहुंवसीं[1] ॥ अनेक काळ परियेसा ॥
॥४७॥ संतोषोनि नारायण ॥ निरोप दिधला अतिगहनें[2] ॥ सृष्टि रचीं गा
म्हणून ॥ आज्ञा दिधली तये वेळीं ॥ ४८ ॥ ब्रह्मा म्हणे विष्णूसी ॥ नेणें[3]
सृष्टि रचावयासी ॥ देखिली नाहीं कैसी ॥ केविं रचूं म्हणतसे ॥ ४९ ॥
ऐकोनि ब्रह्मयाचें वचन ॥ निरोपि त्यासी महाविष्णु आपण ॥ वेद असती
हे घे म्हणोन ॥ देता झाला तये वेळीं ॥ ५० ॥ सृष्टि रचावयाचा विचार ॥
असे वेदांत सविस्तर ॥ तेणेंचि परीं रचुनि स्थिर ॥ प्रकाश करीं म्हणि-
तलें ॥ ५१ ॥ अनादि वेद असती जाण ॥ असे सृष्टीचें लक्षण ॥ जैसा

१ अनेक प्रकारांनीं. २ आतिशय कठीण. ३ जाणीत नाहीं.

आरसा असे खूण ॥ सृष्टि रचावी तयापरी ॥५२॥ या वेदमार्गें सृष्टीसी ॥ रचीं गा ब्रह्मा अहर्निशीं ॥ म्हणोनि सांगे हृषीकेशी ॥ ब्रह्मा रची सृष्टि तेथें ॥ ५३ ॥ सृष्टीं प्रजा अनुक्रमें ॥ विविध स्थावरजंगमें ॥ स्वेदज[1] अंडजे[2] नामें ॥ जारज[3] उद्भिजें[4] उपजविले ॥ ५४ ॥ श्रीविष्णूचे निरोपानें ॥ त्रिजग रचिलें ब्रह्मयानें ॥ ज्यापरी सृष्टीक्रमणें ॥ व्यासें ऐसीं कथियेलीं ॥ ५५ ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ नारायण वेदव्यास ऋषि ॥ विस्तार केला पुराणांसी ॥ अष्टादश विख्यात ॥५६॥तया अष्टादशांत ॥ पुराण ब्रह्मवैवर्त ॥ ऋषेश्वरासी सांगे सूत ॥ तेचि परीं सांगतसें ॥ ५७॥ सनकादिकांतें उपजवोनि ॥ ब्रह्मनिष्ठ निर्गुणी ॥ मरीचादि ब्रह्म सगुणी ॥ उपजवी ब्रह्मा तये वेळीं ॥५८॥ तेथोनि देवदैत्यांसी ॥ उपजवी ब्रह्मा परियेसीं ॥ सांगतों कथा

---

१ घामापासून उत्पन्न झालेले—ढेंकूण, पिसवा, चिलटें इत्यादि. २ अंड्यांपासून जन्मास येणारे—पक्षी. ३ गर्भाशयांतून प्रसवणारे—मनुष्य वगैरे. ४ वनस्पति, वृक्ष वगैरे.

विस्तारेंसीं ॥ ऐक आतां शिष्योत्तमा ॥५९॥ कृत त्रेता द्वापार युग ॥ उपजवी मग कलियुग ॥ एकेकातें निरोपी मग ॥ भूमीवरी प्रवृत्त करी ॥६०॥ बोलावूनि कृतयुगासी ॥ निरोपी ब्रह्मा परियेसीं ॥ तुवां जावोनि भूमीसी ॥ प्रकाश करीं आपणातें ॥ ६१ ॥ ऐकोनि ब्रह्मयाचें वचन ॥ कृतयुग आलें संतोषोन ॥ सांगेन त्याचें लक्षण ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ६२ ॥ असत्य नेणे कधीं वाचे ॥ वैराग्यपूर्ण ज्ञानी साचें ॥ यज्ञोपवीत आभरण[1] त्याचें ॥ रुद्राक्षमाळा करीं कंकणें ॥६३॥ येणें रूपें युग कृत ॥ ब्रह्मयासी असे विनवित ॥ मातें तुम्ही निरोप देत ॥ केविं जाऊं भूमीवरी ॥ ६४ ॥ भूमीवरी मनुष्य लोक ॥ असत्य निंदा अपवादक[2] ॥ मातें न सांहवे[3] तें ऐक ॥ कवणें परीं वर्तावें ॥ ६५ ॥ ऐकोनि सत्ययुगाचें वचन ॥ निरोपि तो ब्रह्मा आपण ॥ तुवां वर्तावें सत्त्वगुण ॥ क्वचित्काळ येणेंपरीं ॥ ६६ ॥ न करीं

१ अलंकार. २ दोषी. ३ सोसवे.

जड तूंतें जाण ॥ आणिक युग पाठवीन ॥ तुवां रहावें सावध होऊन ॥ म्हणूनि पाठवी भूमीवरी ॥ ६७ ॥ वर्ततां येणेंपरीं ऐका ॥ झाली अवधि सत्याधिका ॥ बोलावूनि त्रेतायुगा देखा ॥ निरोपी ब्रह्मा परियेसा ॥६८॥ त्रेतायुगाचें लक्षण ॥ ऐक शिष्या सांगेन ॥ असे त्याची स्थूल तनं[1] ॥ हातीं असे यज्ञसामग्री ॥ ६९ ॥ त्रेतायुगाचें कारण ॥ यज्ञ करिती सकळ जन ॥ धर्मशास्त्रप्रवर्तन ॥ कर्ममार्ग ब्राह्मणांसी ॥ ७० ॥ हातीं असे कुश समिधा ऐसें ॥ धर्मप्रवर्तक सदा वसे ॥ ऐसें युग गेलें हर्षें ॥ निरोप घेऊनि भूमी-वरी ॥७१॥ बोलावूनि ब्रह्मा हर्षी ॥ निरोप देत द्वापरासी ॥ सांगेन तयाचे रूपासी ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥७२॥ खड्ग[2] खट्वांग[3] धरोनि हातीं ॥ धनुष्य बाण एके हातीं ॥ लक्ष उग्र असे शांति ॥ निष्ठुर दया दोनी असे ॥७३॥ पुण्य पाप समान देखा ॥ स्वरूपें व्यापार असे निका ॥ निरोप घेऊनि

१ देह. २ तरवार. ३ एक आयुध.

कौतुका ॥ आला आपण भूमीवरी ॥ ७४ ॥ त्याचे दिवस पुरल्यावरी ॥ कलियुगातें पाचारी ॥ जावें त्वरित भूमीवरी ॥ म्हणोनि सांगे ब्रह्मा देखा ॥ ७५ ॥ ऐसें कलियुग देखा ॥ सांगेन लक्षणें ऐका ॥ ब्रह्मयाचे सन्मुखां ॥ केवीं गेलें परियेसा ॥७६॥ विचारहीन अंतःकरण ॥ पिशाचासारखें वदन ॥ तोंड खालतें करून ॥ ठायीं ठायीं पडतसे ॥७७॥ वृद्ध आपण विरागहीन॥ कलह द्वेष संगें घेऊन ॥ वाम हातीं धरोनि शिश्न ॥ येत ब्रह्मयासन्मुख ॥ ७८ ॥ जिव्हा धरोनी उजवे हातीं ॥ नाचे कली अतिप्रीतीं ॥ दोषोत्तरें करी स्तुति ॥ पुण्यपापसंमिश्रित ॥ ७९ ॥ हांसे रड वांकुल्या दावी ॥ वांकुडें तोंड मुखीं शिवी ॥ ब्रह्मयापुढें उभा राही ॥ काय निरोप म्हणोनियां ॥ ८० ॥ देखोनि तयाचें लक्षण ॥ ब्रह्मा हांसे अतिगहन ॥ पुसतसे अतिविनयानं ॥ लिंग जिव्हा कां धरिली ॥ ८१ ॥ कलियुग म्हणे ब्रह्मयासी ॥

१ वैराग्यशून्य. २ डावा. ३ वेडावणें.

जिंकीन समस्त लोकांसी ॥ लिंग जिव्हा रक्षणारांसी ॥ हारी असे आपणातें ॥ ८२ ॥ याकारणें लिंग जिव्हा ॥ धरोनि नाचें ब्रह्मदेवा ॥ जेथें मी जाईन स्वभावा ॥ आपण न भियें कवणातें ॥८३॥ ऐकोन कलीचें वचन॥ निरोप देत ब्रह्मा आपण ॥ भूमीवरी जाऊन ॥ प्रकाश करीं आपुले गुणें ॥ ८४ ॥ कलि म्हणे ब्रह्मयासी ॥ मज पाठवितां भूमीसी ॥ आपुले गुण तुम्हांसी ॥ सांगेन ऐका स्वामिया ॥८५॥ उच्छेद करीन धर्मासी ॥ आपण असें निरंकुशी[1] ॥ निरानंद परियेसीं ॥ निंदा कलह माझेंनी ॥ ८६ ॥ परद्रव्यहारक परस्त्रीरत ॥ हे दोघे माझे भ्रात ॥ प्रपंच मत्सर[3] दंभकें[4] ॥ प्राणसखे माझे असती ॥ ८७ ॥ बकासारिखे संन्यासी ॥ तेचि माझे प्राण परियेसीं ॥ छळण करोनि उदासी ॥ मिळविती पोषणार्थ ॥ ८८ ॥ तेचि माझे सखे जाण ॥ आणीक असतील पुण्यजन ॥ तेचि माझे वैरी जाण ॥

१ स्वच्छंदी. २ पक्षपाती. ३ हेवा करणारे. ४ ढोंगी.

म्हणोनि विनवी ब्रह्मयासी ॥ ८९ ॥ ब्रह्मा म्हणे कलियुगासी ॥ सांगें तुज उपदेशीं ॥ कलियुगीं आयुष्य नरासी ॥ स्वल्प असे एक शत ॥९०॥ पूर्व युगांतरीं देखा ॥ आयुष्य बहु मनुष्यलोकां ॥ तप अनुष्ठान ऐका ॥ करिती अनेक दिवसवरी ॥ ९१ ॥ मग होय तयांसी मति ॥ आयुष्य असे अखंडिती ॥ याकारणें क्षितीं कष्टती ॥ बहु दिवसपर्यंत ॥ ९२ ॥ तैसें नव्हेचि कलियुग जाण ॥ स्वल्प आयुष्य मनुष्यपण ॥ करिती तप अनुष्ठान ॥ शीघ्र पावती परमार्था ॥९३॥ जे जन असती ब्रह्मज्ञानी ॥ पुण्य करितील जाणोनि ॥ त्यांस तुवां साह्य होऊनि ॥ वर्तत असें म्हणे ब्रह्मा ॥९४॥ ऐकोनी ब्रह्मयाचें वचन ॥ कली म्हणतसे नमोन ॥ स्वामींनीं निरोपिले जे जन ॥ तेचि माझे वैरी असती ॥ ९५ ॥ ऐसे वैरी जेथें असती ॥ केवीं जाऊं तया क्षितीं ॥ ऐकतां होय मज भीति ॥ केवीं पाहूं तयांसी ॥ ९६ ॥ पंचशत भूमंडळांत ॥ भरतखंडीं पुण्य बहुत ॥ मज मारितील देखत ॥ कैसा जाऊं म्हणतसे॥९७॥

ऐकोनि कलीचें वचन ॥ ब्रह्मा निरोपी हांसोन ॥ काळात्म्यातें मिळोन ॥ तुवां जावें भूमीसी ॥ ९८ ॥ काळात्म्याचें ऐसे गुण ॥ धर्मवासना करील छेदन ॥ पुण्यात्म्याचें अंतःकरण ॥ उपजेल बुद्धि पापाविषयीं ॥९९॥ कली म्हणे ब्रह्मयासी ॥ वैरी माझे परियेसीं ॥ वसतात भूमंडळासी ॥ सांगेन स्वामी ऐकावें ॥१००॥ उपद्रविती मातें बहुत ॥ कृपा न ये मज देखत ॥ जे जन शिवहरी ध्यात ॥ धर्मरत मनुष्य देखा ॥१॥ आणिक असती माझे वैरी ॥ वास करिती गंगातीरीं ॥ आणिक वाराणशीपुरीं ॥ जाऊनि धर्म करिती देखा ॥२॥ तीर्थें हिंडती जे चरणें ॥ आणिक ऐकती पुराणें ॥ जे जन करिती सदा दानें ॥ तेचि माझे वैरी जाण ॥ ३ ॥ ज्यांचे मनीं वसे शांति ॥ तेचि माझे वैरी ख्याति ॥ अदांभिकपणें पुण्य करिती ॥ त्यांसी देखतां भीतसें ॥ ४ ॥ नासाग्रीं दृष्टि ठेवुनी ॥ जप करिती अनुष्ठानीं ॥

१ दुर्बुद्धिकाल. २ नाकाच्या शेंड्यावर.

त्यांसि देखतांचि नयनीं ॥ प्राण माझा जातसे ॥५॥ स्त्रियापुत्रांवरी प्रीति ॥ मायाबापां अव्हेरितों ॥ त्यांवरी माझी बहु प्रीति ॥ परम इष्ट माझे जाणा ॥६॥ वेदशास्त्रांतें निंदिती ॥ हरिहरांतें भेद पाहती ॥ अथवा शिव विष्णु दूषिती ॥ ते परम आप्त माझे जाणा ॥ ७ ॥ जितेंद्रिय जे असती नर ॥ सदा भजती हरिहर ॥ रागद्वेषविवर्जित[1] धीर ॥ त्यांसि देखोनि मज भय ॥ ॥ ८ ॥ ब्रह्मा म्हणे कलियुगासी ॥ तुझा प्रकाश बहुवसीं ॥ तुवां जातांचि भूमीसी ॥ तुझे इच्छें रहाटतील[2] ॥ ९ ॥ एखादा विरळागत ॥ होईल नर पुण्यवंत ॥ त्यातें तुवां साह्य होत ॥ वर्तावें म्हणे ब्रह्मा ॥ ११० ॥ ऐकोनि ब्रह्मयाचें वचन ॥ कलियुग करीतसे नमन ॥ करसंपुट जोडोन ॥ विनवीतसे परियेसा ॥ ११ ॥ माझ्या दुष्ट स्वभावासी ॥ केवीं साह्य व्हावें धर्मासी ॥ सांगा स्वामी उपायासी ॥ कवणें परीं रहाटावें ॥१२॥ कलीचें वचन

१ प्रीति व द्वेष यांरहित. २ चालतील.

ऐकोनि ॥ ब्रह्मा हांसे अतिगहानि ॥ सांगतसे विस्तारोनि ॥ उपाय कलीसी रहाटावया ॥ १३ ॥ काळ वेळ असती दोनी ॥ तुज साह्य होउनी ॥ येत असती निर्गुणी ॥ तेचि दाविती तुज मार्ग ॥ १४ ॥ निर्मळ असती जे जन ॥ तेचि तुझे वैरी जाण ॥ मळमूत्रें जयांसी वेष्टन ॥ ते तुझे इष्ट परि-येसीं ॥ १५ ॥ याचि कारणें पापपुण्यासी ॥ विरोध असे परियेसीं ॥ जे अधिक पुण्यराशी ॥ तेचि जिंकिती तुज ॥ १६ ॥ या कारणें विरळागत ॥ होतील नर पुण्यवंत ॥ तेचि जिंकिती निश्चित ॥ बहुतेक तुज वश्य होती ॥१७॥ एखादा विवेकी[1] जाण ॥ राहे तुझे उपद्रव साहोन ॥ जे न साहती तुझे दारुण ॥ तेचि होती वश्य तुज ॥१८॥ या कारणें कलियुगाभीतरीं[2] ॥ जन्म होतील येणेंपरीं ॥ जे जन तुझेचि परी ॥ न होय त्यां ईश्वरप्राप्ति ॥१९॥ ऐकोनि ब्रह्मदेवाचें वचन ॥ कलियुग करितसे प्रश्न ॥ कैसें साधूचें

१ विचारवान्. २ मध्यें.

अंतःकरण ॥ कवण असे निरोपावें ॥१२०॥ ब्रह्मा म्हणे तये वेळीं ॥ एकचित्तें ऐक कली ॥ सांगेन ऐका श्रोते सकळी ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥२१॥ धैर्य धरोनि अंतःकरण ॥ शुद्ध बुद्ध[1] वर्तती जन ॥ दोष न लागती कधीं जाण ॥ लोभवर्जित नरांसी ॥ २२ ॥ जे नर भजती हरिहरांसी ॥ अथवा असती काशीनिवासी ॥ गुरु सेविती निरंतरेंसीं ॥ त्यांसी तुझा न लगे दोष ॥२३॥ मातापितासेवकांसी ॥ अथवा सेवी ब्राह्मणासी ॥ गायत्री कपिला धेनूसी ॥ भजणारांसी न लगे दोष ॥२४॥ वैष्णव अथवा शैवासी ॥ जे सेविती नित्य तुळसीसी ॥ आज्ञा माझी आहे ऐसी ॥ तयांसी बाधूं नको ॥२५॥ गुरुसेवक असती नर ॥ पुराण श्रवण करणार ॥ सर्वसाधनधर्मपर ॥ त्यांतें तुवां न बाधावें ॥२६॥ सुकृती[2] शास्त्रपरायणांसी ॥ गुरुतें सेविती वंशोवंशीं ॥ विवेकें धर्म करणारांसी ॥ त्यांतें तुवां न बाधावें ॥२७॥

---

१ ज्ञानी. २ पुण्यशील.

कलि म्हणे ब्रह्मयासी ॥ गुरुमहिमा आहे कैशी ॥ कवण गुरु स्वरूपें कैसीं ॥ विस्तारावें मजप्रति ॥२८॥ ऐकोनि कलीचें वचन ॥ ब्रह्मा सांगतसे आपण ॥ गुकार म्हणजे सिद्ध जाण ॥ रेफः[1] पापस्य[2] दाहकः[3] ॥२९॥ उकार विष्णुरव्यक्त[4] ॥ त्रितयात्मा श्रीगुरु सत्य ॥ परब्रह्म गुरु निश्चित ॥ म्हणोनि सांगे कलीसी ॥१३०॥ श्लोक ॥ *गणेशो वाऽग्निना युक्तो विष्णुनामसमन्वितः ॥ वर्णद्वयात्मको मंत्रश्चतुर्मुक्तिप्रदायकः[5] ॥ ३१ ॥ टीका ॥ गणेशातें म्हणती गुरु ॥ तैसाचि असे वैश्वानरु[6] ॥ ऐसाचि जाण शार्ङ्गधरु[7] ॥ गुरुशब्द वर्ते इतुके ठायीं ॥३२॥ श्लोक ॥ गुरुः पिता गुरुर्माता गुरुरेव परः शिवः ॥ शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥ ३३ ॥ टीका ॥ गुरु आपला मातापिता ॥ गुरु शंकरू निश्चिता ॥ ईश्वरू होय जरि कोपता ॥ गुरु रक्षील परियेसा ॥३४॥

१ रकार. २ पापांचा. ३ जाळणारा. ४ अस्पष्ट. *हा श्लोक 'गुरु' ह्या दोन अक्षरी मंत्राचा उद्धार आहे. ५ सायुज्यता, सलोकता, समीपता, सरूपता. ६ रकार. ७ उकार.

गुरु कोपेल एखाद्यासी ॥ ईश्वर न राखे परियेसीं ॥ ईश्वरू कोपेल ज्या नरासी ॥ श्रीगुरु रक्षी निश्चयें ॥३५॥ श्लोक ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुरेकः परं ब्रह्म तस्माद्गुरुमुपाश्रयेत् ॥ ३६ ॥ टीका ॥ गुरु ब्रह्मा सत्य जाण ॥ तोचि रुद्र नारायण ॥ गुरुंचि ब्रह्म कारण ॥ म्हणोनि गुरु आश्रावा ॥३७॥ श्लोक ॥ हरौ प्रसन्नेऽपि च वैष्णवा जनाः संप्रार्थयंतो गुरुभक्तिमव्ययाम् ॥ गुरौ प्रसन्ने जगदीश्वरः सदा जनार्दनस्तुष्याति सर्वसिद्धिदः ॥३८॥ टीका ॥ ईश्वर जरी प्रसन्न होता ॥ त्यासी गुरु होय ओळखविता ॥ गुरु आपण प्रसन्न होतां ॥ ईश्वर होय आधीन आपुल्या ॥३९॥ श्लोक ॥ गुरुः सदा दर्शयिता प्रवृत्तिं तीर्थं व्रतं योगतपादिधर्मान् ॥ आचारवर्णादिविवेकयज्ञान् ज्ञानं परं भक्तिविवेकयुक्तम् ॥ १४० ॥ टीका ॥ गुरु भजे शास्त्रमार्ग वर्तोनि ॥ तीर्थव्रतयोगतपादि मुनी ॥ आचारवर्णादि ज्ञानी ॥ ज्ञान परम भक्तिविवेकयुक्त ॥४१॥ या कारणें श्रीगुरूसी ॥ भजावें

शास्त्रमार्गेंसीं ॥ तीर्थव्रतयागतपासी ॥ ज्योतिःस्वरूप[1] असे जाणा ॥ ४२ ॥ आचारधर्मवर्णाश्रमांसी ॥ विवेकधर्ममार्गासी ॥ भक्तिवैराग्ययुक्तांसी ॥ गुरुचि मार्ग दाविणार ॥ ४३ ॥ इतुकें ऐकोनि कलि आपण ॥ विनवीतसे कर जोडून ॥ गुरु सर्व देवांसमान ॥ केवीं झाला सांग मज ॥ ४४ ॥ ब्रह्मा म्हणे कलीसी ॥ सांगेन तुज विस्तारेंसीं ॥ एकचित्तें परियेसीं ॥ गुरुवीण पार नाहीं ॥४५॥ श्लोक ॥ गुरुं विना न श्रवणं भवेत् कस्यापि कस्यचित् ॥ विना कर्णेन शास्त्रस्य श्रवणं तत्कुतो भवेत् ॥ ४६ ॥ टीका ॥ गुरुवीण समस्तांसी ॥ श्रवण[2] कैचें परियेसीं ॥ श्रवण[3] होतां मनुष्यांसी ॥ समस्त शास्त्रें ऐकती[4] ॥ ४७ ॥ शास्त्र ऐकतां परियेसीं॥ तरतील संसारासी ॥ या कारणें गुरुचि प्रकाशी ॥ ज्योतिःस्वरूप जाणावा ॥ ४८ ॥ गुरु सेवितां सर्व सिद्धि ॥ होती परियेसा त्रिशुद्धि[5] ॥ कथा वर्तली अनादि ॥ अपूर्व तुज

[1] तेजोरूप (ज्ञान देणारा. [2] ऐकणें. [3] कान. [4] श्रवण करितात. [5] कायिक, वाचिक, मानसिक) या तिन्ही प्रकारची शुद्धता.

सांगेन ॥४९॥ पूर्वी गोदावरीचे तीरीं ॥ आंगिरस ऋषीचा आश्रम थारा॥ वृक्ष असती नानापरी ॥ पुण्यनामें मृग वसती ॥ १५० ॥ ब्रह्मऋषि आदिकरोनी ॥ तप करिती तया स्थानीं ॥ तयांत वेदधर्म म्हणोनि ॥ पैलपुत्र होता द्विज ॥५१॥ तया शिष्य बहु असती ॥ वेदशास्त्र अभ्यासिती ॥ त्यांत दीपक म्हणोनि ख्याति ॥ शिष्य होता परियेसा ॥५२॥ होता शिष्य गुरुपरायण ॥ केला अभ्यास शास्त्रपुराण ॥ झाला असे अतिनिपुण ॥ सेवा करितां श्रीगुरूची ॥ ५३ ॥ वेदधर्म एके दिनीं ॥ समस्त शिष्यांसी बोलावुनी ॥ पुसतसे संतोषोनि ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ५४ ॥ बोलावूनि शिष्यांसी ॥ बोले गुरु परियेसीं ॥ प्रीति असेल जरी आम्हांसी ॥ तरी माझें वाक्य परियेसा ॥५५॥ शिष्य म्हणती गुरूसी ॥ जें जें स्वामी निरोपिसी ॥ तूं तारक आम्हांसी ॥ अंगिकारूं हा भरंवसा ॥ ५६ ॥ गुरूचें वाक्य जो न करी ॥ तोचि पडे रौरव घोरीं ॥ अविद्यामायासागरीं ॥ बुडोन जाय तो

नर ॥ ५७ ॥ मग तया कैंची गति ॥ नरकीं पडे तो सततीं ॥ गुरु तारक हे ख्याति ॥ वेदपुराणें बोलती ॥५८॥ ऐकोनि शिष्यांची वाणी ॥ तोषला वेदधर्म मुनी ॥ संदीपकातें बोलावुनी ॥ सांगतसे परियेसा ॥ ५९ ॥ ऐका शिष्य सकळीक ॥ आमचें पूर्वार्जित असे एक ॥ जन्मांतरीं सहस्राधिक ॥ केलीं होतीं महापातकें ॥१६०॥ आमुचें अनुष्ठान करितां ॥ बहुत गेले प्रक्षाळितां ॥ कांहीं शेष असे आतां ॥ भोगिल्यावांचून न सुटे जाणा ॥ ६१ ॥ तया सामर्थ्यें उपेक्षा करितों ॥ पापमोक्षा आड रिघतों ॥ याचि कारणें निष्कृति करितों ॥ तया पाप घोरासी ॥६२॥ न भोगितां आपुले देहीं ॥ आपले पापा निष्कृति नाहीं ॥ हा निश्चय जाणोनि पाहीं ॥ भोगावें आम्हीं परियेसा ॥ ६३ ॥ या पापाचे निष्कृतीसी ॥ जावें आम्हीं वाराणशीसी ॥ जाईल पाप शीघ्रेंसीं ॥ प्रख्यात असे अखिल शास्त्रीं ॥ ६४ ॥ या कारणें

१ पापापासून मुक्त होण्यासाठीं. २ दोषमुक्तता.

आम्हांसी ॥ न्यावें पुरी वाराणशीसीं ॥ पाप भोगीन स्वदेहासीं ॥ मातें तुम्हीं सांभाळावें ॥ ६५ ॥ या समस्त शिष्यांत ॥ कवण असे सामर्थ्यवंत ॥ अंगिकारावें त्वरित ॥ म्हणोनि पुसे शिष्यांसी ॥ ६६ ॥ तया शिष्यांमध्यें एक ॥ नाम असे संदीपक ॥ बोलतसे अतिविवेक ॥ तया गुरूप्रति देखा ॥ ६७ ॥ दीपक म्हणे गुरूस ॥ पाप करितां देहनाश ॥ न करावा संग्रहो दुःखास ॥ शीघ्र कां प्रतिकारूं॥ ६८ ॥ वेदधर्म म्हणे तयासी ॥ दृढ देह असतां मनुष्यासी ॥ क्षालन करावें पापांसी ॥ पुढतीं वाढे विषापरी ॥ ६९ ॥ अथवा तीर्थें प्रायश्चित्तें ॥ आपुले देहीं भोगोनि त्वरितें ॥ पापावेगळें न होतां निरुतें ॥ मुक्ति नव्हे आपणांसी ॥१७०॥ देव अथवा ऋषेश्वरांसी ॥ मनुष्यादि ज्ञानवंतांसी ॥ क्षालन न होय पापासी ॥ आपुलें आपण न भोगितां ॥७१॥ दीपक म्हणे गुरूसी ॥ स्वामी निरोपावें आप-

१ परिहार करणें. २ स्पष्ट. ३ मोक्ष.

णासी ॥ सेवा करीन स्वशक्तीसीं ॥ न करितां अनुमान सांगिजे ॥ ७२ ॥
ऐकोनि दीपकाचें वचन ॥ वेदधर्म म्हणे आपण ॥ कुष्ठें होईल अंग हीन ॥
अधक पांगुळ परियेसा ॥७३॥ संवत्सर एकेविंशत ॥ मातें सांभाळावें बहुत ॥
जरी असेल दृढ व्रतें ॥ अंगिकारावी तुम्हीं सेवा ॥ ७४ ॥ दीपक म्हणे
गुरूसी ॥ कुष्ठी होईन आपण हर्षीं ॥ अंध होईन एकवीस वर्षीं ॥ पाप-
निष्कृति करीन ॥७५॥ तुमचे पापाची निष्कृति ॥ मी करीन निश्चितीं ॥
स्वामी निरोपावें त्वरिती ॥ म्हणोनी चरणांसी लागला ॥ ७६ ॥ ऐकोनि
शिष्याची वाणी ॥ संतोषला वेदधर्म मुनी ॥ सांगतसे विस्तारोनि ॥ तया
पापलक्षणें ॥ ७७ ॥ आपुलें पाप आपणासी ॥ ग्राह्य नव्हे पुत्रशिष्यांसी ॥
न भोगितां स्वदेहासी ॥ न वेंचे पाप परियेसा ॥ ७८ ॥ या कारणें आपण
देखा ॥ भोगीन आपुले पापदुःखा ॥ सांभाळीं मज तूं संदीपका ॥ एकवीस

१ वर्षे. २ एकवीस. ३ नियम. ४ संपत नाहीं.

वर्षपर्यंत ॥७९॥ जे पीडिती रोगें देखा ॥ प्रतिपाळणारासी कष्ट अधिका ॥ मजहूनि संदीपका ॥ तूतें कष्ट अधिक जाण ॥१८०॥ या कारणें आपुले देहीं ॥ भोगीन पाप निश्चयीं ॥ तुवां प्रतिपाळावें पाहीं ॥ काशीपुरा नेऊ-नियां ॥८१॥ तया काशीपुरीं जाण ॥ पापावेगळा होईन ॥ आपण शाश्व-तपद[1] पावेन ॥ तुजकरितां शिष्योत्तमा ॥ ८२ ॥ दीपक म्हणे गुरूसी ॥ अवश्य नेईन पुरी काशी ॥ सेवा करीन एकवीस वर्षीं ॥ विश्वनाथासम तुमची ॥ ८३ ॥ ब्रह्मा म्हणे कलियुगासी ॥ कैसा होता शिष्य त्यासी ॥ कुष्ठ होतांची गुरूसी ॥ नेलें काशीपुरा ॥ ८४ ॥ मणिकर्णिका उत्तरदेशीं ॥ कंबळेश्वर सन्निधेसी ॥ राहिले तेथें परियेसीं ॥ गुरु शिष्य दोघेजण ॥८५॥ स्नान करूनि मणिकर्णिकेसी ॥ पूजा करिती विश्वनाथासी ॥ प्रारब्धभोग त्या गुरूसी ॥ भोगीत होता तया स्थानीं ॥ ८६ ॥ कुष्ठरोग झाला बहुत ॥

[1] अक्षय स्थान.

अक्षहीन अतिदुःखित ॥ संदीपक सेवा करित ॥ अतिभक्तींकरूनियां ॥८७॥ व्यापिला देह कुष्ठें बहुत ॥ पू कृमि पडे रक्त ॥ दुःखें व्यापला अत्यंत ॥ अंप-स्मारी झाला जाण ॥ ८८ ॥ भिक्षा मागोनि संदीपक ॥ गुरूसी आणोनि देत नित्यक ॥ करी पूजा भावें एक ॥ विश्वनाथस्वरूप म्हणतसे ॥ ८९ ॥ रोगेंकरूनि पीडितां नरू ॥ साधुजन होती क्रूरू ॥ तोचि देखा द्विजवरू ॥ होय क्रूर एखादे वेळीं ॥१९०॥ भिक्षा आणितां एखादे दिवशीं ॥ न जेवे श्रीगुरु कोपेंसीं ॥ स्वल्प आणिलें म्हणोनि क्लेशी ॥ सांडोनि देत भूमीवरी ॥ ९१ ॥ येरें दिवसीं जाऊनि शिष्य ॥ आणि अन्नें बहुवस ॥ मिष्टान्नें न आणी म्हणोनि क्लेश ॥ करिता झाला परियेसा ॥९२॥ परोपरीचें पक्वान्न ॥ कां नाणिशी म्हणे जाण ॥ कोपें मारूं येत आपण ॥ शाका परोपरी माग-तसे ॥ ९३ ॥ जितुकें आणी मागोनियां ॥ सर्वस्वें करीतसे वायां ॥ कोपें

१ आंधळा. २ ज्याला फेंपरें येत असतें असा. ३ रागीट. ४ ब्राह्मणश्रेष्ठ. ५ एकादे. ६ पुष्कळ.

देत शिविया ॥ परोपरी परियेसा ॥ ९४ ॥ एखादे समयीं शिष्यासी ॥ म्हणे ताता ज्ञानराशी ॥ मजानिमित्त कष्टलासी ॥ शिष्यराया शिखामणी ॥ ९५ ॥ सवेंचि म्हणत वचनें क्रूर ॥ मातें गांजिलें अपार ॥ तूं आमुचें विष्ठामूत्र ॥ क्षणक्षणां धूत नाहीं ॥ ९६ ॥ खाताती मज माक्षिका ॥ कां न निवारिसी संदीपका ॥ सेवा करितां म्हणे ऐका ॥ भिक्षा नाणिशी म्हणतसे ॥९७॥ या कारणें पापगुण ॥ ऐसेची असती जाण ॥ वोखटें वाक्य निर्गुण ॥ पाप म्हणोनि जाणावें ॥ ९८ ॥ पाप असे जेथें बहुत ॥ दैन्य मत्सर वसे तेथ ॥ शुभाशुभ नेणे क्वचित ॥ पापरूपें जाणावें ॥९९॥ एकादे दैन्यकाशी ॥ दुःखें प्राप्त होती कैसीं ॥ अपस्मार होय जयासी ॥ पापरूप तोचि जाणा ॥ २०० ॥ समस्त रोग असती देखा ॥ कुंष्ठ सोळा भाग नव्हे निका ॥

१ कठीण. २ वाईट. ३ विपत्ति. ४ सर्व रोग एक ठिकाणीं केले तर ते कुष्ठ रोगाच्या सोळाव्या हिश्याएवढेसुद्धां क्लेशकर होणार नाहींत.

वेदधर्म द्विज ऐका ॥ कष्टतसे येणेंपरीं ॥ १ ॥ ऐसे गुरूचे गुणदोष ॥ मनांत न आणि तोचि शिष्य ॥ सेवा करी एकमानस ॥ तोचि ईश्वर मानोनि ॥२॥ जैसें जैसें मागे अन्न ॥ आणूनि देतसे हरि पूर्ण ॥ जैसा विश्वेश्वर नारायण ॥ तैसा गुरु म्हणतसे ॥ ३ ॥ काशीक्षेत्र थोर असतां ॥ न करी कदा तीर्थयात्रा ॥ न जाय देवदर्शना सर्वथा ॥ गुरुसेवेवांचूनि ॥ ४ ॥ श्लोक ॥ न तीर्थयात्रा न च देवयात्रा न देहयात्रा न च गेहयात्रा ॥ अहर्निशं ब्रह्म हरिः सुबुद्धो गुरुः प्रसेव्यो नहि सेव्यमन्यत् ॥ ५ ॥ टीका ॥ आपुलें देहसंरक्षण ॥ कधीं न करी शिष्य जाण ॥ लय लावूनि श्रीगुरुचरण ॥ कवणासवें न बोलेची ॥ ६ ॥ अहोरात्र येणेंपरीं ॥ ब्रह्मा शिव म्हणे हरी ॥ गुरुचि होय निर्धारीं ॥ म्हणोनि सेवा करीतसे ॥ ७ ॥ गुरु बोले निष्ठुरेंसीं ॥ आपण मनीं संतोषी ॥ जें जें त्याचे मानसीं ॥ पाहिजे तैसें वर्ततसे ॥ ८ ॥ वर्ततां येणेंपरीं देख ॥ प्रसन्न होवोनि पिनाक ॥ उभा येवोनि



[अ० २] वर्ततां येणेपरी देख। प्रसन्न होवोनी पिनाकः। उभा येवोनी सन्मुख। वर माग म्हणतसे ॥ २०९ ॥

सन्मुख ॥ वर माग म्हणतसे ॥ ९ ॥ अहो गुरुभक्त दीपका ॥ महाज्ञानी कुलदीपका ॥ तुष्टलों तुझे भक्तींसीं ऐका ॥ प्रसन्न झालों माग आतां ॥ २१० ॥ दीपक म्हणे ईश्वरासी ॥ हे मृत्युंजय व्योमकेशी ॥ न पुसतां आम्ही गुरूसी ॥ वर न घें सर्वथा ॥११॥ म्हणोनि गेला गुरुपासीं ॥ विनवीतसे तयासी ॥ विश्वनाथ आम्हासी ॥ प्रसन्न होऊनि आलासे ॥ १२ ॥ निरोप झालिया स्वामीचा ॥ मागेन उपशमं व्याधीचा ॥ वर होतां सदाशिवाचा ॥ बरवें होईल म्हणतसे ॥ १३ ॥ ऐकोनियां शिष्याचें वचन ॥ बोले गुरु कोपायमान ॥ माझे व्याधिनिमित्त जाण ॥ नको प्रार्थूं ईश्वरासी ॥१४॥ भोगिल्यावांचोनि पातकासी ॥ निवृत्ति नव्हे गा परियेसीं ॥ जन्मांतरीं बाधिती निश्चयेंसीं ॥ धर्मशास्त्रीं असे जाण ॥ १५ ॥ मुक्ति-अपेक्षा ज्याचे मनीं ॥ तेणें करावी पापधुणी ॥ शेष राहतां निर्गुणीं ॥ विघ्न करि-

१ नाश. २ आराम. ३ नाश.

तील मोक्षासी ॥ १६ ॥ ऐशियापरी शिष्यासी ॥ गुरु सांगे परियेसीं ॥ निरोप मागोनि श्रीगुरूसी ॥ गेला ईश्वरासन्मुख ॥ १७ ॥ जाऊनि सांगे ईश्वरासी ॥ नलगे वर आपणासी ॥ नये गुरूचे मानसीं ॥ केवीं घेऊं म्हणतसे ॥१८॥ विस्मय करोनि व्योमकेशी ॥ गेला निर्वाणमठापासीं ॥ बोलावून समस्त देवांसी ॥ सांगे वृत्तांत विष्णूपुढें ॥ १९ ॥ श्रीविष्णु म्हणे शंकरास ॥ कैसा गुरु कैसा शिष्य ॥ कोठें त्यांचा रहिवास ॥ सांगावें मज निर्धारें ॥२२०॥ सांगे ईश्वर विष्णूसी ॥ आश्चर्य देखिलें परियेसीं ॥ दीपक शिष्य निश्चयेंसीं ॥ गुरुभक्त असे जाणा ॥२१॥ गोदावरीतीरवासी ॥ वेदधर्म म्हाणजे तापसी ॥ त्याचीं सेवा अहर्निशीं ॥ करितो भावें एकचित्तें ॥ २२ ॥ नाहीं त्रिलोकीं देखिला कोणीं ॥ गुरुभक्ति करणार निर्गुणी ॥ त्यातें देखोनि माझे मनीं ॥ अतिप्रीति वर्ततसे ॥ २३ ॥ वर देईन म्हणोनि

१ मोक्षाचें स्थान ( वैकुंठ ).

आपण ॥ गेलों होतों तयाजवळी जाण ॥ गुरूचा निरोप नाहीं म्हणोन ॥ न घे वर परियेसा ॥२४॥ अनेक दिव्यसहस्रवर्षीं ॥ तप करिती महाऋषि ॥ वर मागती अहर्निशीं ॥ नाना कष्ट करोनियां ॥२५॥ तैसा तापसी योगी यांसी ॥ नव्हे मज वर द्यावयासी ॥ बलात्कारें देतां तयासी ॥ वर न घे तो दीपक ॥ २६ ॥ तनमन अर्पूनि श्रीगुरूसी ॥ सेवा करितो संतोषी ॥ त्रयमूर्ति म्हणोनि गुरूसी ॥ निश्चयें भजतसे ॥२७॥ समस्त देव मातापिता ॥ गुरुचि असे तत्त्वतां ॥ निश्चय केला असे चित्ता ॥ गुरु परमात्मा म्हणोनि ॥ २८ ॥ किती म्हणोनि वर्णूं त्यासी ॥ अविद्या-अंधकारासी ॥ छेदिता दीपक परियेसीं ॥ कुलदीपक नाम सत्य ॥२९॥ धर्म ज्ञान सर्व एक ॥ गुरुचि म्हणे कुलदीपक ॥ चरणसेवा मनःपूरक ॥ करितो गुरूची भक्तीनें ॥२३०॥ इतुकें ऐकोनि शार्ङ्गधरू ॥ पहावया गेला शिष्यगुरु ॥ त्यांचा भक्तिप्रकारू ॥

१ देवांचीं हजार वर्षे. २ निश्चयेंकरून. ३ विष्णु.

पाहे तये वेळीं ॥३१॥ सांगितलें विश्वनाथें ॥ त्याहून दिसे आणिक तेथें ॥ संतोषोनि दीपकातें ॥ म्हणे विष्णु परियेसा ॥३२॥ बोलावूनि दीपकासी ॥ म्हणतसे हृषीकेशी ॥ तुष्टलों तुझे भक्तींसीं ॥ वर माग म्हणतसे ॥ ३३ ॥ दीपक म्हणे विष्णूसी ॥ काय भक्ति देखोनि आम्हांसी ॥ वर देतोसी परियेसीं ॥ कवण कार्या सांग मज ॥ ३४ ॥ लक्ष कोटी सहस्त्र वरुषीं ॥ तप करिती अरण्यवासी ॥ त्यांसी करितोसी उदासी ॥ वर न देसी नारायणा ॥३५॥ मी तरी तुज भजत नाहीं ॥ तुझें नाम स्मरत नाहीं ॥ बलात्कारें येवोनि पाहीं ॥ केवीं देशी वर मज ॥३६॥ ऐकोनि दीपकाचें वचन ॥ संतोषला नारायण ॥ सांगतसे विस्तारोन ॥ तया दीपकाप्रती देखा ॥ ३७ ॥ गुरुभक्ति करिती निर्वाणेंसीं ॥ म्हणोनि आम्ही जाहलों संतोषी ॥ जे भक्ति केली त्वां गुरुसी ॥ तेचि आम्हांसी पावली ॥३८॥ जो नर असेल गुरुभक्त

१ निराश. २ एकाग्रचित्तेंकरून.

जाण ॥ तोचि माझा जीवप्राण ॥ त्यासी वश्य झालों आपण ॥ जें मागेल तें देतों तया ॥ ३९ ॥ सेवा करी माता पिता ॥ ती पावे मज तत्त्वतां ॥ पतिसेवा स्त्रिया करितां ॥ तेंही मज पावतसे ॥२४०॥ एखाद्या भल्या ब्राह्मणासी ॥ यती योगेश्वर तापसी ॥ करिती नमन भक्तींसीं ॥ तेंचि मज पावे जाणा ॥४१॥ ऐसें ऐकोनि दीपक ॥ नमिता झाला आणिक ॥ विनवीतसे देख ॥ म्हणे सिद्ध नामधारका ॥४२॥ ऐक विष्णु हृषीकेशी ॥ निश्चय असो माझे मानसीं ॥ वेदशास्त्रमीमांसादिकांसी ॥ गुरु आम्हासी देणार ॥ ४३ ॥ गुरूपासूनि सर्व ज्ञान ॥ त्रयमूर्ति होती आम्हां आधीन[1] ॥ आमुचा गुरुचि देव जाण ॥ अन्यथा नाहीं जाण पां ॥ ४४ ॥ सर्व देव सर्व तीर्थ ॥ गुरुचि आम्हां असे सत्य ॥ गुरूवांचूनि आम्हां परमार्थ ॥ काय दूर असे सांगा ॥४५॥ समस्त योगी सिद्धजन ॥ गुरूवांचूनि न होती सज्ञान ॥ ज्ञान होतां

[1] स्वाधीन.

ईश्वर आपण ॥ केविं दूर असे सांगा ॥ ४६ ॥ जो वर द्याल तुम्ही मज ॥ श्रीगुरु दे तो काय चोज¹ ॥ याकारणें श्रीगुरुराज ॥ भजतसें परियेसा ॥४७॥ संतोषोनि नारायण ॥ म्हणे धन्य धन्य माझा प्राण ॥ तूं शिष्य-शिरोरत्न ॥ बाळक तूंचि आमुचा ॥४८॥ कांहीं तरी माग आतां ॥ वर देईन तत्त्वता ॥ विश्वनाथ आला होता ॥ दुसरेन² वर द्यावयासी मी आलों ॥ ४९ ॥ आमचेनी मन संतोषी ॥ वर माग जो तुझे मानसीं ॥ तुज वश्य झालों निर्धारेंसीं ॥ जें पाहिजे तें देईन आतां ॥२५०॥ दीपक म्हणे विष्णूसी ॥ जरी वर आम्हां देसी ॥ गुरुभक्ति होय अधिक मानसीं ॥ ऐसें मज ज्ञान द्यावें ॥५१॥ गुरूचें रूप आपण ओळखें ॥ ऐसें ज्ञान देई सुखें ॥ यापरतें न मागें निकें ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ५२ ॥ दिधला वर शार्ङ्गपाणी ॥ संतोषोनि बोले वाणी ॥ अरे दीपका शिरोमणी ॥ तूं माझा प्राणसखा होसी ॥५३॥

१ आश्चर्य. २ दुसऱ्यानें.

तुवां ओळखिलें गुरूसी ॥ देखिलें दृष्टीं परब्रह्मासी ॥ आणीक जरी आम्हां पुससी ॥ सांगेन ऐक एकचित्तें ॥ ५४ ॥ लौकिक सुबुद्धि होय जैशी ॥ धर्माधर्मसुमनें तैशीं ॥ उत्कृष्टाहूनि उत्कृष्टेसी ॥ स्तुति करीं गा अहर्निशीं ॥ ५५ ॥ जे जे समयीं श्रीगुरूसी ॥ तूं भक्तीनें स्तुति करिसी ॥ तेणें होऊं आम्ही संतोषी ॥ तेचि आमुची स्तुति जाण ॥५६॥ वेद वाचिती सांगेंसीं ॥ वेदान्त भाष्य अहर्निशीं ॥ वाचिती जन उत्कृष्टेंसीं ॥ आम्हां पावे निर्धारीं ॥ ५७ ॥ बोलती वेद सिद्धांत ॥ गुरुचि ब्रह्म असे म्हणत ॥ याचि कारणें गुरु भजतां सत्य ॥ सर्व देवता तुज वश्य ॥५८॥ गुरु म्हणजे अक्षरें दोन ॥ अमृताचा समुद्र जाण ॥ तयामध्यें बुडतां क्षण ॥ केविं होय परियेसा ॥५९॥ जयाचे हृदयीं गुरुस्मरण ॥ तोचि त्रिलोकीं पूज्य जाण ॥ अमृतपान सदा सगुण ॥ तोचि शिष्य अमर होय ॥२६०॥ श्लोक ॥ यदा मम

१ धर्म कोणता व अधर्म कोणता हें जाणून शुद्ध अंतःकरणानें.

शिवस्यापि ब्रह्मणो ब्राह्मणस्य हि ॥ अनुग्रहो भवेन्नृणां सेव्यते सद्गुरुस्तदा ॥ ६१ ॥ टीका ॥ आपण अथवा ईश्वरू ॥ ब्रह्मा जरी देता वरू ॥ तद्वत् फलदाता गुरु ॥ गुरु त्रैमूर्ति याचि कारणें ॥ ६२ ॥ ऐसा वर दीपकासी ॥ दिधला विष्णूनें परियेसीं ॥ ब्रह्मा सांगे कलीसी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६३ ॥ वर लाधोनि दीपक ॥ गेला गुरूचे सन्मुख ॥ पुसतसे गुरु ऐक ॥ तया शिष्या दीपकासी ॥ ६४ ॥ ऐक शिष्या कुळदीपका ॥ काय दीधलें वैकुंठनायका ॥ विस्तारोनि सांगें निका ॥ माझें मन स्थिर होय ॥ ६५ ॥ दीपक म्हणे गुरूसी ॥ वर दिधला हृषीकेशीं ॥ म्यां मागितलें तयासी ॥ गुरुभक्ति व्हावी म्हणोनियां ॥ ६६ ॥ गुरूची सेवा तत्परेंसीं ॥ अंतःकरण दृढेंसीं ॥ वर दिधला संतोषीं ॥ दृढभक्ति माझी तुमचे चरणीं ॥ ६७ ॥ संतोषोनि श्रीगुरु ॥ प्रसन्न झाला साक्षात्कारू ॥ जीवित्वें होय तूं स्थिरू ॥ काशीपुरीं वास करीं

१ स्वतः ( विष्णु ). २ महादेव.

॥६८॥ तुझें वाक्य सर्वसिद्धि ॥ तुझे घरीं नवनिधि[1] ॥ विश्वनाथ तुझे स्वाधीं[2] ॥ म्हणे गुरु संतोषोनि ॥६९॥ तुझें स्मरण जे करिती ॥ त्यांचे कष्ट निवारण होती ॥ श्रियायुक्त नांदती ॥ तुझे स्मरणमात्रेंसीं ॥ २७० ॥ येणेंपरी शिष्यासी ॥ प्रसन्न झाला परियेसीं ॥ दिव्यदेह[3] झाला तत्क्षणेंसीं ॥ झाला गुरु वेदधर्म ॥७१॥ शिष्याचा भाव पहावयास ॥ कुष्ठी झाला महाक्लेश ॥ तो तापसी अतिविशेष ॥ त्यासी कैंचें पाप राहे ॥७२॥ लोकानुग्रह करावयासी ॥ गेला होता पुरीं काशीं ॥ काशीक्षेत्रमहिमा ऐसी ॥ पाप जाय सहस्र जन्मींचें ॥७३॥ तया काशीनगरांत ॥ धर्म अथवा अधर्म-रत ॥ वास करिती क्वचित ॥ त्यांसि पुनर्जन्म नाहीं जाणा ॥ ७४ ॥ सूत म्हणे ऋषीश्वरासी ॥ येणें प्रकारें कलीसी ॥ सांगे ब्रह्मा परियेसीं ॥ शिष्यदीपक-

१ महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व असे कुबेराजवळचे संपत्तीचे ठेवे ते सर्व. २ वश. ३ तेजस्वी आहे देह-शरीर-ज्याचें असा.

आख्यान ॥७५॥ सिद्ध म्हणे नामकरणी ॥ दृढ मन असावें याचि गुणीं ॥ तरीच तरेल भवार्णीं ॥ गुरुभक्ति असे येणेंविधी ॥७६॥ श्लोक ॥ यत्र यत्र दृढा भक्तिर्यदा कस्य महात्मनः ॥ तत्र तत्र महादेवः प्रकाशमुपगच्छति ॥ ७७ ॥ टीका ॥ जरी भक्ति असे दृढेंसीं ॥ त्रिकरणेंसह मानसीं ॥ तोन्हि लाधे ईश्वरासी ॥ ईश्वर होय तया वश्य ॥७८॥ गंगाधराचा नंदन ॥ श्रोतयांसी करी नमन ॥ न म्हणावें न्यून पूर्ण ॥ माझे बोबडे बोलांसी ॥२७९॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे शिष्यदीपकाख्यानं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ २७९ ॥ ❀ ❀ ❀

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

१ संसारसमुद्रांतून. २ कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें व अंतःकरण.

श्रीगणेशाय नमः ॥ येणेंपरी सिद्ध मुनि ॥ सांगता झाला विस्तारोनि ॥ संतोषोनि नामकरणी ॥ विनवितसे मागुती ॥१॥ जय जयाजी सिद्ध मुनी ॥ तारक तूं आम्हांलागुनी ॥ संदेह होता माझे मनीं ॥ आजि तुवां फेडिला ॥२॥ तुझेनि सर्वस्व लांधलों ॥ आनंदजळीं बुडालों ॥ परम तत्त्व जोडलों ॥ आंजिचेनि दातारा ॥३॥ ऐसें श्रीगुरुमहिमान ॥ मज निरोपिलें त्वां ज्ञान ॥ आनंदमय माझें मन ॥ तुझेनि धर्मे स्वामिया ॥ ४ ॥ कवणे ठायीं तुमचा वास ॥ नित्य तुम्हां कोठें ग्रास ॥ होईन तुझा आतां दास ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥५॥ कृपानिधि सिद्ध मुनी ॥ तया शिष्या आलिंगोनि ॥ आशीर्वचन देऊनि ॥ सांगे आपुला वृत्तांत ॥६॥ जे जे स्थानीं होते गुरु ॥ तेथें असतो चमत्कारू ॥ पुससी जरी आम्हां आहारू ॥ गुरुस्मरणीं नित्य जाणा ॥ ७ ॥ श्रीगुरुचरित्रमहिमान ॥ तेंचि आम्हां अमृतपान ॥ सदा

१ पावलों. २ आजपासून. ३ आहार-आश्रम.

सेवितों याचे गुण ॥ म्हणोनि पुस्तक दाविलें ॥८॥ भुक्ति[1] मुक्ति[2] परमार्थ ॥ जें जें वांछिजे मनांत ॥ तें तें साध्य होय त्वरित ॥ गुरुचरित्र ऐकतां ॥९॥ धनार्थी यासी अक्षय धन ॥ पुत्रपौत्रादि गोधन ॥ कथा ऐकतां होय जाण ॥ ज्ञानसिद्धि तात्काळ ॥१०॥ जे भक्तीनें समस्त एक ॥ पढती ऐकती भक्त-लोक ॥ काम्य[3] होय तात्कालिक ॥ निपुत्रिकां पुत्र होती ॥ ११ ॥ ग्रहरो-गादिपीडन ॥ न होती व्याधि कधीं जाण ॥ जरी मनुष्यास असेल बंधन ॥ त्वरित सुटे ऐकतां ॥ १२ ॥ ज्ञानवंत शतायुषी ॥ ऐकतां होय भरंवसी ॥ ब्रह्महत्यापापें नाशी ॥ एकचित्तें ऐकतां ॥१३॥ इतुकें ऐकोनि त्या अवसरीं॥ नामधारक नमस्कारी ॥ स्वामी मातें तारीं तारीं ॥ कृपानिधि सिद्ध मुनी ॥ १४ ॥ साक्षात्कारें गुरुमूर्ति ॥ भेटलासी तूं जगज्ज्योती[4] ॥ होती वासना माझे चित्तीं ॥ गुरुचरित्र ऐकावें ॥ १५ ॥ एखादा तृषेनें पीडित ॥ जात

---

१ भोग. २ मोक्ष. ३ इच्छित कार्य. ४ जगामध्यें ज्योतीसारखा प्रकाशणारा.

असतां मार्गस्थ ॥ त्या आणूनि देती अमृत ॥ तयापरी तूं मज भेटलासी ॥१६॥ गुरूचा महिमा ऐकों कानीं ॥ सांगिजे स्वामी विस्तारोनि ॥ अंधकार असतां रजनी ॥ सूर्योदयापरी करीं ॥१७॥ इतुकिया अवसरीं ॥ सिद्ध योगी अभय[1] करी ॥ धरोनियां सव्य[2] करीं ॥ घेवोनि गेला स्वस्थाना ॥१८॥ असे ठाव ज्ञानपंथीं ॥ कल्पवृक्ष अश्वत्थीं[3] ॥ बैसोनि सांगे ज्ञानज्योती ॥ ऐक शिष्या नामधारका ॥१९॥ नेणती सोय गुरुदास्यका[4] ॥ याचि कारणें उपबाधका[5] ॥ होती तुज अनेका ॥ चिंता क्लेश घडती तुज ॥ २० ॥ ओळखावया गुरुमूर्तीसी ॥ आपुला आचार परियेसीं ॥ दृढ भक्ति धरोनि मानसीं ॥ ओळखिजे मग श्रीगुरु ॥२१॥ ऐकोनि सिद्धाचें वचन ॥ संतोषे नामधारक सगुण ॥ क्षणक्षणां करी नमन ॥ करुणावचनेंकरोनियां ॥ २२ ॥ तापत्रयाग्नींत पोळलों ॥ मी संसारसागरीं बुडालों ॥ क्रोधादि जलचरीं[6] वेष्टिलों ॥

१ अभयवचन देऊन. २ डाव्या. ३ पिंपळाचे वृक्षावर. ४ सेवा. ५ दुःख. ६ पाण्यांत राहणारे प्राणी.

अज्ञानजाळें वेष्टुनियां ॥२३॥ ज्ञाननौकीं बसवूनि ॥ कृपेचा वायु पालाणूनि॥ देहा तारक करूनि ॥ तारावें मातें स्वामिया ॥२४॥ ऐशिया करुणावचनीं ॥ विनवितसे नामकरणी ॥ मस्तक सिद्धाचिया चरणीं ॥ ठेविता झाला पुनः पुनः ॥२५॥ तंव बोलिला सिद्ध मुनि ॥ न धरीं चिंता अंतःकरणीं ॥ उठ-वीतसे आश्वासोनि ॥ सांकडें फेडीन तुझें आतां ॥२६॥ ज्यांसी नाहीं दृढ भक्ति ॥ सदा दैन्यें कष्टती ॥ श्रीगुरुवरी बोल ठेविती ॥ अविद्यामाया वेष्टूनि ॥ २७॥ संशय धरोनि मानसीं ॥ श्रीगुरु काय देईल म्हणसी ॥ तेणें गुणें हा भोग भोगिसी ॥ नाना कष्टें व्याकुळित ॥ २८ ॥ सांडोनि संशय निर्धार ॥ गुरुमूर्ति देईल अपार ॥ ऐसा देव कृपासागर ॥ तुज नुपेक्षी सर्वथा ॥ २९ ॥ गुरुमूर्ति कृपासिंधु ॥ प्रख्यात असे वेदां बोधू ॥ तुझे अंतःकरणीं वेधूं[3] ॥ असे तया चरणांवरी ॥ ३० ॥ तो दातार अखिल मही ॥ जैसा

१ वाहवून. २ संकट. ३ ओढ ( भक्ति ).

मेघाचा गुण पाहीं ॥ पर्जन्य पडतो सर्वां ठायीं ॥ कृपासिंधु ऐसा असे॥२१॥ त्यांतचि पात्रानुसार ॥ सांगेन साक्षी एक थोर ॥ सखोल भूमि उदक स्थिर ॥ उन्नतीं उदक नाहीं जाण ॥२२॥ दृढ भक्ति जाणा सखोल भूमि ॥ दांभिक ओळखा उन्नत तुम्ही ॥ याचिया कारणें मनोकर्मीं ॥ निश्चयावें श्रीगुरूसी ॥ २३ ॥ म्हणोनि श्रीगुरुउपमा ॥ ऐसा कवण असे महिमा ॥ प्रपंच होय परब्रह्म ॥ हस्त मस्तकीं ठेवोनियां ॥ २४ ॥ कल्पतरूची द्यावी उपमा ॥ कल्पिलें लाभे त्याचा महिमा ॥ न कल्पितां पुरवी कामा ॥ कामधेनु श्रीगुरु ॥ २५ ॥ ऐसा श्रीगुरु ब्रह्ममूर्ति ॥ ख्याति असे श्रुतिस्मृतीं ॥ संदेह सांडूनि एकचित्तीं ॥ ध्याय पदांबुज श्रीगुरूचें ॥२६॥ इतकें परिसोनि नामधारक ॥ नमन करूनि क्षणैक ॥ करसंपुट जोडोनि ऐक ॥ विनवितसे सिद्धासी ॥२७॥ श्रीगुरु सिद्ध योगेश्वरा ॥ कामधेनु कृपासागरा ॥ विन-

१ उंच जागेवर. २ इच्छित फलास. ३ दोन्ही हात.

वितसे अवधारा ॥ सेवक तुमचा स्वामिया ॥ ३८ ॥ स्वामींनीं निरोपिलें सकळ ॥ झालें माझें मन निर्मळ ॥ वेध लागला असे केवळ ॥ चरित्र श्री-गुरूचें ऐकावया ॥३९॥ गुरु त्रयमूर्ति ऐकों कानीं ॥ कां अवतरलें मनुष्य-योनीं ॥ सर्व सांगावें विस्तारोनि ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ४० ॥ मग काय बोले योगींद्र ॥ बा रे शिष्या तूं पूर्णचंद्र[1] ॥ माझा बोधसमुद्र ॥ कैसा तुवां उत्साहविला ॥ ४१ ॥ तूंतें महासुख लाधलें ॥ गुरुदास्यत्व फळलें ॥ परब्रह्म अनुभवलें ॥ आजिचेनि तुज आतां ॥ ४२ ॥ हिंडत आलों सकळ क्षिति ॥ कवणा नव्हे ऐशी मति ॥ गुरुचरित्र न पुसती ॥ तूंतें देखिलें आजि आम्हीं ॥ ४३ ॥ ज्यासी इहपरत्रींची चाड ॥ त्यासी ही कथा असे गोड ॥ त्रिकरणें[2] करोनियां दृढ ॥ एकचित्तें ऐकिजे ॥४४॥ तूं भक्त केवळ श्रीगुरूचा ॥ म्हणोनि भक्ति झाली उंचा[3] ॥ निश्चयो मानीं माझिया वाचा ॥

१ सोळाही कलांनीं युक्त चंद्र. २ ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व मन. ३ उत्तम.

लाधेसी चारी पुरुषार्थ ॥४५॥ धनधान्यादि संपत्ति ॥ पुत्रपौत्र श्रुतिस्मृति ॥
इह सौख्य आयुष्यगति ॥ अंतीं गति असे जाणा ॥४६॥ गुरुचरित्र काम-
धेनु ॥ वेदशास्त्रसंमत जाणू ॥ अवतरला त्रयमूर्ति आपणू ॥ धरोनि नरवेष
कलियुगीं ॥ ४७ ॥ कार्याकारण अवतार ॥ होऊनि येती हरिहर ॥ उतरा-
वया भूमिभार ॥ भक्तजनांतें तारावया ॥ ४८ ॥ ऐकोनि सिद्धाचे वचना ॥
प्रश्न करी शिष्यराणा ॥ त्रयमूर्ति अवतार किंकारणा ॥ देह धरोनि मानुषीं
॥४९॥ विस्तारोनि तें आम्हासी ॥ सांगा स्वामी कृपेंसीं ॥ म्हणोनि लागला
चरणासी ॥ करुणावचनें करोनियां ॥ ५० ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥
त्रयमूर्ति तीन गुण ऐका ॥ आदिवस्तु आपण एका ॥ प्रपंच वस्तु तीन
जाण ॥५१॥ ब्रह्मयाचा रजोगुण ॥ सत्त्वगुण विष्णु जाण ॥ तमोगुण उमा-
रमण ॥ मूर्ति एकचि अवधारा ॥ ५२ ॥ ब्रह्मा सृष्टिरचेनसी ॥ पोषक विष्णु

१ पावशील. २ मनुष्याचा अवतार. ३ महादेव.

परियेसीं ॥ रुद्रमूर्ति प्रळयासी ॥ त्रयमूर्तीचे तीन गुण ॥५३॥ एका वेगळे एक न होती ॥ कार्याकारण अवतार होती ॥ भूमीचा भार फेडिती ॥ प्रख्यात असे पुराणीं ॥५४॥ सांगेन साक्ष आतां तुज ॥ अंबरीष म्हणिजे द्विज ॥ एकादशीव्रताचिया काज ॥ विष्णूसी अवतार करविले ॥ ५५ ॥ अवतार व्हावया कारण ॥ सांगेन तुज विस्तारून ॥ मन करोनि सावधान ॥ एकचित्तें परियेसा ॥५६॥ द्विज करी एकादशीव्रत ॥ पूजा करी अभ्यागत ॥ निश्चयो करी दृढचित्त ॥ हरिचिंतन सर्वकाळ ॥ ५७ ॥ असो त्याचिया व्रतासी ॥ भंग करावया आला ऋषि ॥ अतिथि होऊनि हेंठेंसीं ॥ पावला मुनि दुर्वास ॥५८॥ ते दिवशीं साधनद्वादशी घडी एक ॥ आला अतिथि कारणिक ॥ अंबरीषास पडला धाक ॥ केवीं घडे म्हणोनियां ॥५९॥ ऋषि आले देखोनि ॥ अंबरीषानें अभिवंदोनि ॥ अर्घ्य पाद्य देवोनि ॥ पूजा

१ नांवाचा एक राजा. २ अतिथि. ३ मुद्दाम. ४ बुद्धिपुरःसर आलेला.

केली उपचारें ॥ ६० ॥ विनवितसे ऋषीश्वरासी ॥ शीघ्र जावें स्नानासी ॥ साधन आहे घटिका द्वादशी ॥ यावें अनुष्ठान सारोनियां ॥ ६१ ॥ ऋषि जाऊनि नदीसी ॥ अनुष्ठान करती विधींसीं ॥ विलंब लागतां तयासी ॥ आली साधन घटिका ॥६२॥ व्रतभंग होईल म्हणोनि ॥ पारणें केलें तीर्थ घेऊनि ॥ नानाप्रकार पक्वान्नीं ॥ पाक केला ऋषीतें ॥६३॥ तंव आले दुर्वास देखा ॥ पाहूनि अंबरीषाच्या मुखा ॥ म्हणे भोजन केलेंसि कां ॥ अतिथीविण दुरात्मया ॥६४॥ शाप देतां ऋषीश्वर ॥ राजें स्मरला शार्ङ्गधर ॥ करावया भक्ताचा कैवार ॥ टाकून आला वैकुंठा ॥६५॥ भक्तवत्सल नारायण ॥ शरणागताचें रक्षण ॥ बिरुद बोलती पुराणें जाण ॥ धांवे धेनु वत्सासि जैसी ॥ ६६ ॥ शापिलें ऋषीनें द्विजासी ॥ जन्मावें गा अखिल योनींसी ॥ तंव पावला हृषीकेशी ॥ येऊनि जवळी उभा ठेला ॥६७॥ मिथ्या

परियेसीं ॥ रुद्रमूर्ति प्रळयासी ॥ त्रयमूर्तीचे तीनि गुण ॥५३॥ एका वेगळे एक न होती ॥ कार्याकारण अवतार होती ॥ भूमीचा भार फेडिती ॥ प्रख्यात असे पुराणीं ॥५४॥ सांगेन साक्ष आतां तुज ॥ अंबरीष म्हणिजे द्विज ॥ एकादशीव्रताचिया काज ॥ विष्णूसी अवतार करविले ॥ ५५ ॥ अवतार व्हावया कारण ॥ सांगेन तुज विस्तारून ॥ मन करोनि सावधान ॥ एकचित्तें परियेसा ॥५६॥ द्विज करी एकादशीव्रत ॥ पूजा करी अभ्यागत ॥ निश्चयो करी दृढचित्त ॥ हरिचिंतन सर्वकाळ ॥ ५७ ॥ असो त्याचिया व्रतासी ॥ भंग करावया आला ऋषि ॥ अतिथि होऊनि हेंठेसीं ॥ पावला मुनि दुर्वास ॥५८॥ ते दिवशीं साधनद्वादशी घडी एक ॥ आला अतिथि कारणिक ॥ अंबरीषास पडला धाक ॥ केविं घडे म्हणोनियां ॥५९॥ ऋषि आले देखोनि ॥ अंबरीषानें अभिवंदोनि ॥ अर्घ्य पाद्य देवोनि ॥ पूजा

१ नांवाचा एक राजा. २ अतिथि. ३ मुद्दाम. ४ बुद्धिपुरःसर आलेला.

केली उपचारें ॥ ६० ॥ विनवितसे ऋषीश्वरासी ॥ शीघ्र जावें स्नानासी ॥ साधन आहे घटिका द्वादशी ॥ यावें अनुष्ठान सारोनियां ॥ ६१ ॥ ऋषि जाऊनि नदीसी ॥ अनुष्ठान करती विधींसीं ॥ विलंब लागतां तयासी ॥ आली साधन घटिका ॥६२॥ व्रतभंग होईल म्हणोनि ॥ पारणें केलें तीर्थ घेऊनि ॥ नानाप्रकार पक्वान्नीं ॥ पाक केला ऋषीतें ॥६३॥ तंव आले दुर्वास देखा ॥ पाहूनि अंबरीषाच्या मुखा ॥ म्हणे भोजन केलेंसि कां ॥ अतिथीविण दुरात्मया ॥६४॥ शाप देतां ऋषीश्वर ॥ राजें स्मरला शार्ङ्गधर ॥ करावया भक्ताचा कैवार ॥ टाकून आला वैकुंठा ॥६५॥ भक्तवत्सल नारायण ॥ शरणागताचें रक्षण ॥ बिरुद बोलती पुराणें जाण ॥ धांवे धेनु वत्सासि जैसी ॥ ६६ ॥ शापिलें ऋषीनें द्विजासी ॥ जन्मावें गा अखिल योनींसी ॥ तंव पावला हृषीकेशी ॥ येऊनि जवळी उभा ठेला ॥६७॥ मिथ्या

नव्हे ऋषीचें वचन ॥ द्विजें धरिले श्रीविष्णूचे चरण ॥ भक्तवत्सल ब्रीद जाण ॥ तया महाविष्णूचें ॥६८॥ विष्णु म्हणे दुर्वासासी ॥ तुवां शापिलें अंबरीषासी ॥ राखीन आपुल्या दासासी ॥ शाप आम्हांसी तुम्हीं द्यावा ॥६९॥ दुर्वास ज्ञानी ऋषीश्वर ॥ केवळ ईश्वर अवतार ॥ फेडावया भूमिभार ॥ कारण असे पुढें म्हणतसे ॥ ७० ॥ जाणोनि ज्ञानी-शिरोमणी ॥ म्हणे तप करितां युगें क्षोणीं ॥ भेटी नव्हे हरिचरणीं ॥ भूमीवरी दुर्लभ ॥ ७१ ॥ शापसंबंधें अवतरोनि ॥ येईल लक्ष्मी घेऊनि ॥ तारावयालागोनि ॥ भक्तजनां समस्तां ॥७२॥ परोपकारसंबंधेंसीं ॥ शाप द्यावा विष्णूसी ॥ भूमिभार फेडावयासी ॥ कारण असे म्हणोनियां ॥७३॥ ऐसें विचारोनि मानसीं॥ दुर्वास म्हणे विष्णूसी ॥ अवतरोनि भूमीसी ॥ नाना स्थानीं जन्मावें ॥७४॥ प्रसिद्ध होसी वेळ दहा ॥ उपरें अवतार पूर्ण पहा ॥ सहज तूं विश्वात्मा

१ बाणा. २ या भूलोकावर. ३ शिवाय.



[अ० ३ रा:] मिथ्या नव्हे ऋषींचें वचन । द्विजीं धरिले श्रीविष्णूचे चरण । भक्तवत्सल ब्रीद जाण । तया महाविष्णूचें ॥ ३८ ॥

महा ॥ स्थूळसूक्ष्मीं वससी तूं ॥ ७५ ॥ ऐसा कार्याकारणें शाप ॥ आंगि-
कारी जगाचा बाप ॥ दुष्टांवरी असे कोप ॥ सृष्टिप्रतिपाळ करावया ॥७६॥
ऐसे दहा अवतार झाले ॥ असें तुवां कर्णीं ऐकिलें ॥ महाभागवतीं विस्ता-
रिलें ॥ अनंतरूपी नारायण ॥७७॥ कार्यकारण अवतार होती ॥ क्वचित्प्र-
कट क्वचित् गुप्ती ॥ ते ब्रह्मज्ञानी जाणती ॥ मूढमति काय जाणे ॥ ७८ ॥
आणीक सांगेन तुज ॥ विनोद झालासे सहज ॥ अनसूया अत्रिऋषीची
भाज[१] ॥ पतिव्रताशिरोमणी[२] ॥ ७९ ॥ तिचे गृहीं जन्म जाहलें ॥ त्रयमूर्ति
अवतरले ॥ कपटवेष धरोनि आले ॥ पुत्र जाहले तियेचे ॥८०॥ नामधारक
पुसे सिद्धासी ॥ विनोद[३]कथा निरोपिलीसी ॥ देव अतिप्रकट वेषीं ॥ पुत्र
जाहले कवणें परीं ॥८१॥ अत्रि ऋषि पूर्वीं कवण ॥ कवणापासूनि उत्पन्न ॥
मूळ पुरुष होता कवण ॥ विस्तारोनि मज सांगावें ॥८२॥ म्हणे सरस्वती

१ बायको. २ सर्व पतिव्रता स्त्रियांत श्रेष्ठ. ३ मौजेची गोष्ट.

गंगाधर ॥ पुढील कथेचा विस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकलाभीष्टें साधतीं ॥ ८३ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे अंबरीषव्रतानिरूपणं नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥ ओंवीसंख्या ॥ ८३ ॥ ❁ ❁ ❁ ❁ ❁

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ऐशी शिष्याची विनंती ॥ ऐकोन सिद्ध काय बोलती ॥ साधु साधु तुझी भक्ति ॥ प्रीति पावो गुरुचरणीं ॥ १ ॥ ऐक शिष्यचूडा-मणी[1] ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ आठवतसे तुझ्या प्रश्नीं ॥ आदिमध्यांव-सानक[2] ॥ २ ॥ प्रश्न केला बरवा निका ॥ सांगेन आतां तुज विवेका ॥ अत्रि ऋषीचा पूर्वका[3] ॥ सृष्टीपासोनि सकळ ॥३॥ पूर्वीं सृष्टि नव्हती कांहीं ॥ जलमय होतें सर्वही ॥ आपोनारायण[4] म्हणोनि पाहीं ॥ वेद बोलती याची कारणें ॥ ४ ॥ उदक आपोनारायण ॥ सर्वां ठायीं वास पूर्ण ॥ बुद्धिसंभव-प्रपंचगुण[5] ॥ हिरण्यगर्भ अंड निर्मिलें ॥ ५ ॥ तेंचि ब्रह्मांड नाम जाहलें ॥ रजोगुणें ब्रह्मयासि निर्मिलें ॥ हिरण्यगर्भ नाम पावलें ॥ देवतावर्ष[6] एक होतें ॥ ६ ॥ तेंचि ब्रह्मांड देखा ॥ फुटोनि शकलें झालीं ऐका ॥ एक शकल

१ शिष्यांत श्रेष्ठ. २ आरंभापासून शेवटपर्यंत सर्व. ३ पूर्वज ( वंशवृक्ष ). ४ उदक हेंच नारायण. ५ महत्तत्त्वापासून झालेल्या प्रपंचगुणांनीं युक्त. ६ देवांचें.

भूमिका ॥ होऊनि ठेलीं शकलें दोनी ॥ ७ ॥ ब्रह्मा तेथें उपजोन ॥ रचिले चवदाही भुवन ॥ दाही दिशा मानसवचन ॥ काळ कामक्रोधादि सकळ ॥ ८ ॥ सृष्टि रचावयासी ॥ सप्त पुत्र उपजवी मानसीं[1] ॥ नामें सांगेन परियेसीं ॥ सात जण ब्रह्मपुत्र ॥९॥ मरीचि अत्रि आंगिरस ॥ पुलस्त्य पुलह क्रतु वसिष्ठ ॥ सप्त पुत्र जाहले श्रेष्ठ ॥ सृष्टिकर्ता ब्रह्मा जाण ॥ १० ॥ सप्त ब्रह्मपुत्रांमधील अत्रि ॥ तेथूनि पीठ[2] गुरुसंतति ॥ सांगेन ऐका एकचित्तीं ॥ सभाग्य नामधारका ॥११॥ ऋषि अत्रीची[3] भार्या ॥ नाम तिचें अनसूया[4] ॥ पतिव्रताशिरोमणिया ॥ जगदंबा तेचि जाणा ॥१२॥ तिचें सौंदर्यलक्षण ॥ वर्णूं शके ऐसा कोण ॥ जिचा पुत्र चंद्र आपण ॥ तिचें रूप काय सांगों ॥१३॥ पतिसेवा करी बहुत ॥ समस्त सुरवर भयाभीत ॥ स्वर्गैश्वर्य घेईल त्वरित ॥ म्हणोनि चिंतिती मानसीं ॥ १४ ॥ इंद्रादि सुरवर मिळुनी ॥

१ मनापासून. २ वंशवृक्षाचें मूळ. ३ एका ऋषींचें नांव. ४ द्वेषरहित अशी.

त्रयमूर्तींपासीं जाउनी ॥ विनवितातीं प्रकाशोनि ॥ आचार अत्रि ऋषीचा ॥ १५ ॥ इंद्र म्हणे स्वामिया ॥ पतिव्रता स्त्री अनसूया ॥ आचार तिचा सांगों काया ॥ तुम्हांप्रती विस्तारोनि ॥ १६ ॥ पतिसेवा करी भक्तींसीं ॥ मनोवाक्कायमानसीं ॥ अतिथिपूजा महाहर्षी ॥ विमुख नव्हे कवणे काळीं ॥ १७ ॥ तिचा आचार देखोनि ॥ सूर्य भीतसे गगनीं ॥ उष्ण तिजला होईल म्हणोनि ॥ मंद मंद तपतसे ॥१८॥ अग्नि झाला भयाभीत ॥ शीतळ असे वर्तत ॥ वायु झाला भयचकित ॥ मंद मंद वर्ततसे ॥ १९ ॥ भूमि आपण भिऊनि देखा ॥ नम्र जाहली पादुका ॥ शाप देईल म्हणोनि ऐका ॥ समस्त आम्ही भीतसों ॥ २० ॥ नेणों घेईल कवण स्थान ॥ कोण्या देवाचें हिरोन ॥ एखाद्यातें वर देतां जाण ॥ तोही आमुतें मारू शके ॥ २१ ॥ यासि करावा उपाय ॥ तूं जगदात्मा देवराय ॥ जाईल आमुचा स्वर्गठाय ॥

१ कायावाचामनेंकरून. २ पायांस.

म्हणोनि आलों तुम्हां सांगों ॥ २२ ॥ न कराल जरी उपाय यासी ॥ सेवा करूं आम्ही तिसीं ॥ तिचे द्वारीं अहर्निशीं ॥ राहूं चित्त धरोनियां ॥२३॥ ऐसें ऐकोनि त्रयमूर्ति ॥ महाक्रोधें कांपती ॥ चला जाऊं पाहूं कैसी सती ॥ म्हणती आहे पतिव्रता ॥२४॥ व्रतभंग करूनि तिसी ॥ ठेवूनि येऊं भूमीसी ॥ अथवा वैवस्वतालयासी ॥ पाठवूं म्हणोनि निघाले ॥ २५ ॥ सत्त्व पहावया सतीचें ॥ त्रयमूर्ति वेष भिक्षुकाचे ॥ आश्रमा आले अत्रीचे ॥ अभ्यागत होऊनियां ॥२६॥ ऋषि करूं गेला अनुष्ठान ॥ मागें आले त्रयमूर्ति आपण ॥ अनसूयेसी आश्वासून ॥ अतिथि आपण आलों म्हणती ॥ २७ ॥ क्षुधें बहु पीडोन ॥ आम्ही आलों ब्राह्मण ॥ त्वरित द्यावें सती अन्न ॥ अथवा जाऊं आणिका ठायां ॥ २८ ॥ सदा तुमचे आश्रमांत ॥ संतर्पण अभ्यागत ॥ ऐकों आली कीर्ति विख्यात ॥ म्हणोनि आलों अनसूये ॥ २९ ॥ इच्छा-

१ यमाचे नगरांत. २ बोलावून.

भोजनदान तुम्ही ॥ देतां म्हणोनि ऐकिलें आम्हीं ॥ ठाकोनि आलों याचि कामीं ॥ इच्छाभोजन मागावया ॥ ३० ॥ इतुकें ऐकोनि अनसूया ॥ नमन केलें तत्क्षणिया ॥ बैसकार[2] करूनियां ॥ क्षालन केले चरण त्यांचे ॥ ३१ ॥ अर्घ्य पाद्य देऊनि त्यांसी ॥ गंधाक्षतापुष्पेंसीं ॥ सर्वेच म्हणतसे हर्षी ॥ आरोगण[3] सारिजे ॥ ३२ ॥ अतिथी म्हणे तये वेळीं ॥ करोनि आलों आंघोळी ॥ ऋषि येती बहुतां वेळीं ॥ त्वरित आम्हां भोजन द्यावें ॥ ३३ ॥ वासना पाहोनि अतिथींतें ॥ काय केलें पतिव्रतें ॥ ठाय घातले त्वरितें ॥ बैसकार केला देखा ॥ ३४ ॥ बैसवोनियां पाटावरी ॥ घृतेंसीं पात्र अभिधारी ॥ घेवोनि आली आपण क्षीरी ॥ शाक पाक तये वेळीं ॥ ३५ ॥ तिसी म्हणती अहो नारी ॥ आम्ही अतिथी आलों दुरी ॥ देखोनि तुझें स्वरूप सुंदरी ॥ अभीष्ट मानसीं आणिक वसे ॥ ३६ ॥ नग्न होवोनि आम्हांसी ॥

१ मुद्दाम. २ या, बसा असा सत्कार. ३ नित्यकृत्यें. ४ पात्रें.

अन्न वाढावें परियेसीं ॥ अथवा काय निरोप देशी ॥ आम्ही जाऊं नाहीं तरी ॥३७॥ ऐकोनि द्विजांचें वचन ॥ अनसूया करी चिंतन ॥ आले विप्र पहावया मन ॥ कारणिक[1] पुरुष होतील ॥ ३८ ॥ पतिव्रताशिरोमणी ॥ विचार करी अंतःकरणीं ॥ अतिथी विमुख तरी हानि ॥ निरोप[2] केवीं उलंघूं ॥ ३९ ॥ माझें मन असे निर्मळ ॥ काय करील मन्मथ[3] खळ ॥ पतीचें असे तपफळ ॥ तारील मज म्हणतसे ॥४०॥ ऐसें विचारोनि मानसीं ॥ तथास्तु म्हणे तयासी ॥ भोजन करावें स्वस्थ चित्तेंसीं ॥ नग्न वाढीन म्हणतसे ॥४१॥ पाकस्थाना जाऊनि आपण ॥ चिंतन करी पतीचे चरण ॥ वस्त्र फेडोनि नग्न ॥ म्हणे अतिथी बाळ माझे ॥४२॥ नग्न होवोनि सती देखा ॥ घेऊनि आली अन्नोदका ॥ तंव तेचि झाले बाळका ॥ ठायांपुढें लोळती ॥ ४३ ॥ बाळें देखोनि अनसूया ॥ भयचकित होवोनियां ॥ पुनरपि वस्त्रें नेसोनियां ॥

१ सत्त्वाची परीक्षा घेण्याकरितां आलेले. २ आज्ञा. ३ काम.

आली तया बाळकांजवळी ॥ ४४ ॥ रुदन करिती तिन्ही बाळ ॥ अनसूया रहावी वेळोवेळ ॥ क्षुधार्त झालीं केवळ ॥ म्हणोनि कडिये घेतसे ॥ ४५ ॥ कडिये घेवोनि बाळकांसी ॥ स्तनपान करवी अतिहर्षी ॥ एका सांडोनि एकाशीं ॥ क्षुधा निवारण करीतसे ॥ ४६ ॥ पाहें पां नवल काय घडलें ॥ त्रयमूर्तींचे बाळ झाले ॥ स्तनपानमात्रें तोषले ॥ तपफळ ऐसें पतिव्रतेचें ॥४७॥ ज्याचे उदरीं चौदा भुवन ॥ सप्त समुद्र वडवाग्नि जाण ॥ त्याची क्षुधा निवारण ॥ पतिव्रतास्तनपानीं ॥ ४८ ॥ चतुर्मुख ब्रह्मयासी ॥ सृष्टि करणें अहर्निशीं ॥ त्याची क्षुधा स्तनपानेंसीं ॥ केविं झाली निवारण ॥४९॥ भाळाक्ष[1] कर्पूरगौर ॥ पंचवक्त्र काळाग्निरुद्र ॥ स्तनपान करी अनसूयासुंदर ॥ तपसामर्थ्यें अत्रीऐसा ॥ ५० ॥ अनसूया अत्रिरमणी ॥ नव्हती ऐशी कोणी ॥ त्रयमूर्ति झाली जननी ॥ ख्याति[2] प्रगट झाली त्रिभुवनांत ॥ ५१ ॥ कडिये

१ भाळावर म्हणजे कपाळावर आहे डोळा ज्याच्या असा त्रिलोचन-शंकर. २ कीर्ति.

घेवोनि बाळकांसी ॥ खेळवीतसे तिघांसी ॥ घालोनियां पाळण्यासी ॥ पर्यंदे गाय तये वेळीं ॥५२॥ पर्याय गाय नानापरी ॥ उपनिषदार्थ अतिकुसरीं ॥ अतिउल्हासें सप्त स्वरीं ॥ संबोखितसे त्रिमूर्तींसी ॥ ५३ ॥ इतुकें होतां तये वेळीं ॥ माध्यान्हवेळ अतिथिकाळीं ॥ अत्रि ऋषि अतिनिर्मळीं ॥ आला आपुले आश्रमां ॥ ५४ ॥ घरामाजी अवलोकितां ॥ तंव देखिली अनसूया गातां ॥ कैंचीं बाळें ऐसें म्हणतां ॥ पुसतसे स्त्रियेसी ॥ ५५ ॥ तिणें सांगे-तला वृत्तांत ॥ ऋषि ज्ञानी असे पाहात ॥ त्रयमूर्ति हेचि म्हणत ॥ नम-स्कार करितसे ॥५६॥ नमस्कारितां अत्रि देखा ॥ संतोष विष्णुवृषनायका ॥ आनंद झाला चतुर्मुखा ॥ प्रसन्न झाले तये वेळीं ॥ ५७ ॥ बाळ राहिले पाळणेंसी ॥ निजमूर्ति ठाकले सन्मुखेंसी ॥ साधुं साधु अत्रि ऋषि ॥ अनसूया सत्य पतिव्रता ॥५८॥ तुष्टलों तुझे भक्तींसीं ॥ माग मनीं वर जो इच्छिसी ॥

१ पाळणा. २ मार्मिकपणानें. ३ विष्णु व शंकर यांस. ४ धन्य.



[अ० ४ था ] घरामाजीं अवलोकितां । तव देखिली अनुसूया गातां । कैचीं बाळें ऐसें म्हणतां । पुसतसे त्रियेसी ॥ ५५ ॥

अत्रि म्हणे सतीसी ॥ जें वांछिसी माग आतां ॥ ५९ ॥ अनसूया म्हणे ऋषीसी ॥ प्राणेश्वरा तूंचि होसी ॥ देव पातले तुमच्या भक्तींसीं ॥ पुत्र मागा तुम्ही आतां ॥ ६० ॥ तिघे बाळक माझे घरीं ॥ रहावे माझे पुत्रा-परी ॥ हेंचि मागतों निर्धारीं ॥ त्रयमूर्ति आपणां एकरूप ॥ ६१ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ वर दिधला मूर्तीं तिन्ही ॥ राहती बाळकें म्हणोनि ॥ आपण गेले निजालयासी ॥ ६२ ॥ त्रिमूर्ति राहिले त्यांचे घरीं ॥ अनसूया पोशी बाळकापरी ॥ नामें ठेविलीं प्रीति करी ॥ त्रिवर्गांचीं परियेसा ॥ ६३ ॥ ब्रह्मामूर्ति चंद्र झाला ॥ विष्णुमूर्ति दत्त केवळा ॥ ईश्वर तो दुर्वास नाम पावला ॥ तिघे पुत्र अनसूयेचे ॥ ६४ ॥ दुर्वास आणि चंद्र देखा ॥ उभे राहूनि मातेसन्मुखा ॥ निरोप मागती कौतुका ॥ जाऊं तपा निजस्थाना ॥ ६५ ॥ दुर्वास म्हणे जननी ॥ आम्ही ऋषि अनुष्ठानीं ॥ जाऊं तीर्थं[1]

---

[1] आपआपल्या स्थानीं.

आचरोनि ॥ म्हणोनि निरोप घेतला ॥ ६६ ॥ चंद्र म्हणे अहो माते ॥ निरोप द्यावा आम्हां त्वरितें ॥ चंद्रमंडळीं वास मातें ॥ नित्य दर्शन तुमचे चरणीं ॥ ६७ ॥ तिसरा दत्त विष्णुमूर्ति ॥ असेल तुमचे धरोनि चित्तीं ॥ त्रयमूर्ति तोचि निश्चिती ॥ म्हणोनि सांगती तियेसी ॥६८॥ त्रयमूर्ति जाण तोचि दत्त ॥ सर्व विष्णुमय जगत ॥ राहील तुमचें धरोनि चित्त ॥ विष्णु-मूर्ति दत्तात्रेय ॥६९॥ त्रयमूर्ति ऐक्यें[2] होऊन ॥ दत्तात्रेय राहिला आपण ॥ दुर्वास चंद्र निरोप घेऊन ॥ गेले स्वस्थाना अनुष्ठानासी ॥ ७० ॥ अनसूयेचे[1] घरीं देखा ॥ त्रयमूर्ति राहिली मूर्ति एका ॥ नाम दत्तात्रेय ऐका ॥ मूळ-पीठ श्रीगुरूचें ॥ ७१ ॥ ऐशापरी सिद्ध देखा ॥ कथा सांगे नामधारका ॥ संतोषें प्रश्न करी अनेका ॥ पुसतसे सिद्धासी ॥ ७२ ॥ जय जय सिद्ध योगीश्वरा ॥ भक्तजनमनोहरा ॥ तारक संसारसागरा ॥ ज्ञानमूर्ति कृपा-

१ वात्सल्य. २ एकत्र होऊन.

सिंधो ॥७३॥ तुझेनि प्रसादें मज ॥ ज्ञान उपजलें सहज ॥ तारकें आमुचा योगिराजें ॥ विनंती माझी परियेसा ॥७४॥ दत्तात्रेयाचा अवतारू ॥ सांगीतला पूर्वापारू ॥ पुढें अवतार जाहले गुरु ॥ कवणेंपरी निरोपिजे ॥७५॥ विस्तारूनि आम्हांसी ॥ सांगा स्वामी कृपेंसीं ॥ अवतार त्रिमूर्तीसी ॥ अनुक्रमें निरोपावें ॥७६॥ म्हणे सरस्वतीगंगाधरू ॥ पुढील कथेचा विस्तारू ॥ ऐकतां होय मनोहरू ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ७७ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे अनसूयोपाख्यानं नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

॥ ओंवीसंख्या ॥ ७७ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

१ भवसमुद्रांतून तारणारा. २ योगिजनामध्यें श्रेष्ठ.

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक भक्तासी ॥ सांगे सिद्ध विस्तारेंसीं ॥ अवतार झाला मानुषीं ॥ भक्तजन तारावया ॥ १ ॥ ऐक भक्ता नामधारका ॥ अंबरीषाकारणें विष्णु देखा ॥ आंगिकारिले अवतार ऐका ॥ मानुषीं नाना रूप घेतसे ॥ २ ॥ मत्स्य कूर्म वराह देख ॥ नराचा देह सिंहाचें मुख ॥ वामनरूप झाला भिक्षुक ॥ झाला ब्राह्मण क्षेत्रकर्मी[1] ॥ ३ ॥ दशरथाचे कुळीं जन्म ॥ प्रख्यात अवतार श्रीराम ॥ राजा होऊनि मागुती जन्म ॥ गौळियां घरीं गुरें राखी ॥४॥ वस्त्रें फेडूनि झाला नग्न ॥ बौद्धरूपी झाला आपण ॥ होऊनि कलंकी अवतार जाण ॥ तुरंगारूढ[2] काय आवडी ॥५॥ नाना प्रकार नाना वेष ॥ अवतार धरी हृषीकेश ॥ तारावया भक्तजनांस ॥ दुष्टहनन करावया ॥६॥ द्वापारांतीं झाला कली ॥ अज्ञान लोक ब्राह्मणकुळीं ॥ आचारहीन होऊनि प्रबळीं ॥ वर्तती महिमा कलियुगीं ॥७॥ भक्तजनतारणार्थ ॥

१ क्षत्रियांचें कर्म आचरणारा. २ अश्वारूढ.

अवतार धरी श्रीगुरुनाथ ॥ सगरांकारणें भगीरथ ॥ आणी गंगा भूमंडळीं ॥८॥ तैसें एक विप्रवनिता ॥ आराधी श्रीविष्णु दत्ता ॥ तिचे उदरीं अवतार धरितां ॥ आश्चर्य झालें परियेसा ॥ ९ ॥ पिठापूर पूर्वदेशीं ॥ होता ब्राह्मण उत्तमवंशी ॥ आपस्तंब शाखेसी ॥ नाम आपळराजा जाण ॥१०॥ तयाची भार्या सुमता ॥ असे आचार पतिव्रता ॥ अतिथी आणि अभ्यागतां ॥ पूजा करी भक्तिभावें ॥ ११ ॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ पतिसेवा एकमनीं ॥ अतिथिपूजा सगुणी ॥ निरंतर करीतसे ॥ १२ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ आला दत्त अतिथिवेषीं ॥ श्राद्ध होतें अमावास्येसी ॥ विप्राघरीं तैं देखा ॥ १३ ॥ न जेवितां ब्राह्मण घरीं ॥ दत्ता भिक्षा घाली ते नारी ॥ दत्तात्रेय साक्षात्कारी ॥ प्रसन्न झाला तये वेळीं ॥ १४ ॥ त्रैमूर्तीचें रूप घेउनी ॥ स्वरूप दावियलें अतिगहनी ॥ पतिव्रता धावोनि चरणीं ॥

१ ब्राह्मणाची बायको.



[अ० ५.] न जेवितां ब्राह्मण घरीं । दत्ता भिक्षा घाली ते नारी । दत्तात्रेय साक्षात्कारीं । प्रसन्न झाला तये वेळीं ॥ १४ ॥

नमस्कारी मनोभावें ॥१५॥ दत्तात्रेय म्हणे तियेसी ॥ माग माते इच्छिसी ॥ जे जे वासना तुझे मानसीं ॥ पावसी त्वरित म्हणतसे ॥ १६ ॥ ऐकोनि स्वामीचें वचन ॥ विप्रवनिता करी चिंतन ॥ विनवीतसे करद्वय जोडून ॥ नानापरी स्तवोनियां ॥१७॥ म्हणे जय जय जगन्नाथा ॥ तूं तारक भवासी तत्त्वतां ॥ माझे मनीं असे जे अर्ता ॥ पुरवावी ते देवराया ॥ १८ ॥ तूं कृपाळू सर्वां भूतीं ॥ वेदपुराणें वाखाणिती ॥ केविं वर्णावी तुझी कीर्ति ॥ भक्तवत्सला कृपानिधि ॥ १९ ॥ मिथ्या नोहे तुझा बोल ॥ जें कां ध्रुवासी दिधलें पद अढळ ॥ बिभीषणासी लंकास्थळ ॥ देऊनि राज्य समर्पिलें ॥ २० ॥ भक्तजनां तूं आधार ॥ तयालागीं धरिसी अवतार ॥ ब्रीद असे चराचर ॥ चौदा भुवनांमाझारी ॥ २१ ॥ आतां मातें वर देसी ॥ वासना असे माझे मानसीं ॥ न व्हावें अन्यथा बोलासी ॥ कृपानिधि देवराया ॥२२॥

माझे मनींची वासना ॥ पुरवावी जगज्जीवना ॥ अनाथरक्षका नारायणा ॥ म्हणोनि चरणा लागतसे ॥२३॥ ऐकोनि तियेचें करुणावचन ॥ संतोषला त्रयमूर्ति आपण ॥ कर धरिला आश्वासोन ॥ सांग जननी म्हणतसे ॥२४॥ तंव बोलिली पतिव्रता ॥ स्वामी जें निरोपिलें आतां ॥ जननी नाम मज ठेवितां ॥ करा निर्धार याच बोला ॥२५॥ मज पुत्र झाले बहुत ॥ नव्हेत स्थिर उपजतमृत ॥ जे वांचले आतां असत ॥ अक्षहीन[1] पादहीन[2] ॥२६॥ योग्य झाले नाहीं कोणी ॥ काय करावे मूर्ख प्राणी ॥ असोनि नसती येणें गुणीं ॥ पुत्राविण काय जन्म ॥ २७ ॥ व्हावा पुत्र मज ऐसा ॥ ज्ञानवंत पुराणपुरुषा ॥ जगद्वंद्य वेदसदृशा ॥ तुम्हांसारिखा दातारा ॥ २८ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ प्रसन्न झाला दत्त आपण ॥ पुढें असे कार्यकारण ॥ दीक्षार्थ भक्तजनांसी ॥२९॥ तापसी म्हणे तियेसी ॥ पुत्र होईल परियेसीं ॥

१ आंधळे. २ पांगळे.

उद्धरील तुझे वंशासी ॥ ख्यातिवंत कलियुगीं ॥ ३० ॥ असावें तुम्हीं त्याचे बोलीं ॥ येऱ्हवीं न राहे तुम्हांजवळी ॥ ज्ञानमार्गी अतुर्बळी ॥ तुमचें दैन्य हरील ॥३१॥ इतुकें सांगोनि तापसी ॥ अदृश्य झाला परियेसीं ॥ विस्मय करितसे मानसीं ॥ विप्रवनिता तये वेळीं ॥३२॥ विस्मय करोनि मनांत ॥ पतीसी सांगे वृत्तांत ॥ दोघें हर्षें निर्भर होत ॥ म्हणती दत्तात्रेय होईल ॥ ३३ ॥ माध्यान्हसमयीं अतिथिकाळीं ॥ दत्त येताती तये वेळीं ॥ विमुख न होतां तये काळीं ॥ भिक्षा मात्र घालिजे ॥ ३४ ॥ दत्तात्रेयाचें स्थान ॥ माहूर करवीर क्षेत्र खूण ॥ तयाचा वास सदा जाण ॥ पांचाळेश्वर नगरांत ॥ ३५ ॥ नाना वेष भिक्षुकरूप ॥ दत्तात्रेय येती साक्षेप ॥ न पुसतां मज निरोप ॥ भिक्षा घाली म्हणतसे ॥ ३६ ॥ विप्रस्त्री म्हणे पतीसी ॥ आजि अवज्ञा केली तुम्हांसी ॥ ब्राह्मण न जेवितां आपण त्यासी ॥ भिक्षा घातली

१ बलिष्ठ ( निष्णात ).

म्हणतसे ॥ ३७ ॥ ऐकोनि सतीच्या बोला ॥ विप्र मनीं संतोषला ॥ म्हणे पतिव्रते लाभ झाला ॥ पितर माझे तृप्त झाले ॥३८॥ करावें कर्म पितरांच्या नामीं ॥ समर्पावें विष्णूसी आम्हीं ॥ साक्षात्कारें येऊनि स्वामी ॥ भिक्षा केली आम्हां घरीं ॥ ३९ ॥ कृतार्थ झाले पितृगण समस्त ॥ निर्धारें झाले स्वर्गस्थ ॥ साक्षात् विष्णु भेटले दत्त ॥ त्रैमूर्ति-अवतार ॥४०॥ धन्य तुझी मातापिता जे वर ॥ लाधलीस मुख्य आतां ॥ पुत्र होईल निभ्रांता ॥ न धरीं चिंता मानसीं ॥ ४१ ॥ हर्षे निर्भर होवोनि ॥ राहिलीं दोघें निश्चित मनीं ॥ होती जाहली गर्भिणी ॥ विप्रस्त्री परियेसा ॥४२॥ ऐसे नव मास क्रमोनि ॥ प्रसूत जाहली शुभदिनीं ॥ विप्रें स्नान करूनि ॥ केलें जातकर्म तये वेळीं ॥४३॥ मिळोनि समस्त विप्रकुळी ॥ जातक वर्तविती तये वेळीं ॥ म्हणती तपस्वी होईल बळी ॥ दीक्षाकर्ता जगद्गुरू ॥ ४४ ॥ ऐकोनि

१ पुलावण.

म्हणती मातापिता ॥ हो कां आमुचा कुळउद्धारिता ॥ आम्हां वर दिधला दत्ता ॥ म्हणोनि ठेविती तया नांव ॥४५॥ श्रीपाद म्हणोनि या कारण ॥ नाम ठेवी तो ब्राह्मण ॥ अवतार केला त्रैमूर्ति आपण ॥ भक्तजन तारा- वया ॥ ४६ ॥ वर्तत असतां त्याचे घरीं ॥ झालीं सात वर्षें पुरीं ॥ मौंजी- बंधन ते अवसरीं ॥ करिता झाला द्विजोत्तम ॥४७॥ बांधितां मौंजी ब्रह्म- चारी ॥ म्हणता झाला वेद चारी ॥ मीमांसा तर्क अतिविस्तारीं ॥ म्हणों लागला तये वेळीं ॥ ४८ ॥ ऐकोनि समस्त नगरलोक ॥ विस्मय करिती सकळिक ॥ होईल अवतार कारणिक ॥ म्हणोनि बोलती आपणांत ॥४९॥ आचार व्यवहार प्रायश्चित्त ॥ समस्तांसी आपण बोलत ॥ वेदांतभाष्य वेदार्थ ॥ सांगतसे द्विजवरांसी ॥ ५० ॥ वर्ततां ऐसें तयासी ॥झालीं वर्षें षोडशी ॥ विवाह करूं म्हणती पुत्रासी ॥ मातापिता अवधारा ॥ ५१ ॥ विचार करिती पुत्रासवें ॥ बा रे लग्न तुवां करावें ॥ श्रीपाद म्हणे ऐका

भावें ॥ माझी वांछा सांगेन ॥ ५२ ॥ कराल विवाह माझा तुम्ही ॥ सांगों ऐका विचार आम्ही ॥ वैराग्यस्त्रीसंगें असेन मी ॥ काम्य आमुचें तियेजवळी ॥५३॥ त्या स्त्रियेवांचूनि आणीक नारी ॥ समस्त जाणा मातेसरी ॥ जरी आणाल ते सुंदरी ॥ वरीन म्हणे तये वेळीं ॥ ५४ ॥ आपण तापसी ब्रह्मचारी ॥ योगस्त्रियेवांचोनि नारी ॥ बोल धरा निर्धारीं ॥ श्रीवल्लभ नाम माझे ॥ ५५ ॥ श्रीपाद श्रीवल्लभ नाम ऐसें ॥ झाले त्रिमूर्ति कैसें ॥ पितयातें म्हणतसे ॥ जाऊं उत्तरपंथासी ॥५६॥ ऐकोनि पुत्राचें वचन ॥ आठविलें पूर्वसूचन ॥ भिक्षुकें सांगितली जे खुण ॥ सत्य झाली म्हणतसे॥५७॥ आतांच या बोलासी ॥ मोडा घालितां परियेसीं ॥ विघ्न होईल त्वरितेसी ॥ म्हणोनि विचारिती तये वेळीं ॥५८॥ न म्हणावें पुत्र यासी ॥ अवतारपुरुष तापसी ॥ जैसें याचे वसे मानसीं ॥ तैसें करावें म्हणती दोघें ॥ ५९ ॥

१ वैराग्यरूप स्त्रीचे बरोबर. २ इच्छित. ३ आईप्रमाणें. ४ ज्ञानमार्गासी.

निश्चय करूनि आपुले मनीं ॥ पुत्राभिमुख जनकजननी ॥ होती आशा आम्हांलागुनी ॥ प्रतिपाळिसी म्हणोनियां ॥६०॥ ऐशीं मनीं व्याकुळित ॥ डोळां निघती अश्रुपात ॥ माता पडली मूर्च्छागत ॥ पुत्रस्नेहेंकरोनियां ॥ ६१ ॥ देखोनि मातेचें दुःख ॥ संबोखित परमपुरुष[1] ॥ उठवूनि स्वहस्तें देख ॥ अश्रुपात पुशितसे ॥६२॥ न करीं चिंता अहो माते ॥ जें मागसी तें देईन तूतें ॥ दृढ करूनि चित्तातें ॥ रहा सुखें म्हणतसे ॥ ६३ ॥ बा रे तुजकरितां आपण ॥ दुःख विसरलें संपूर्ण ॥ रक्षिसी आम्हां वृद्धांलागून ॥ दैन्यावेगळें करोनि ॥६४॥ पुत्र असती आपणा दोन ॥ पाय पांगुळ अक्षहीन ॥ त्यांतें पोशील आतां कोण ॥ आम्हां कवण रक्षील ॥६५॥ ऐकोनि जननीचें वचन ॥ अवलोकी अमृतदृष्टींकरून ॥ पुत्र दोघेही झाले सगुण ॥ आली दृष्टिचरणादिक ॥ ६६ ॥ वेदशास्त्रादि व्याकरण ॥ सर्व म्हणती

[1] अवतारी पुरुष.

तत्क्षण ॥ दोघे येऊनि धरिती चरण ॥ कृतार्थ झालों म्हणोनियां ॥ ६७ ॥ चिंतामणीचा[1] होतां स्पर्श ॥ सुवर्ण करी लोहास ॥ तैसें महात्मदृष्टीनें तयांस ॥ योग्यता आली तत्काळीं ॥६८॥ आश्वासून तया वेळीं ॥ दिधला वर तत्काळीं ॥ पुत्रपौत्रीं नांदा प्रबळीं ॥ श्रियायुक्त सनातन[2] ॥६९॥ सेवा करा जनकजननी ॥ पावा सुख महाज्ञानी ॥ इह सौख्य पावोनि ॥ व्हाल मुक्त हें निश्चयें ॥ ७० ॥ ऐसें बोलोनि तयांसी ॥ संबोधितसे मातेसी ॥ पाहोनियां दोघां पुत्रांसी ॥ राहतां सुख पावाल ॥ ७१ ॥ पुत्र दोघे शतायुषी ॥ निश्चय धरीं वो मानसीं ॥ कन्या पुत्र होतील यांसी ॥ तुम्ही नेत्रीं देखाल ॥ ७२ ॥ अखंड लक्ष्मी यांचे घरीं ॥ यांचे वंशपरंपरीं ॥ कीर्तिवंत सचराचरीं ॥ संपन्न होती वेदशास्त्रें ॥ ७३ ॥ आमची अवज्ञा न करितां ॥ निरोप द्यावा आम्हां त्वरिता ॥ जाणें असे उत्तरपंथा ॥ दीक्षा द्यावया

१ मनांत आलेली वस्तु देणारें एक रत्न ( प्रस्तुत प्रसंगीं परीस ). २ निरंतर.

साधुजनां ॥ ७४ ॥ सांगोनि मातापित्यासी ॥ अदृश झाला परियेसीं ॥ पावला त्वरित पुरी काशी ॥ गुप्तरूपें होता तेथें ॥ ७५ ॥ निघाला तेथूनि बदरीवना ॥ भेटी घेऊनि नारायणा ॥ अवतार असे आपणा ॥ कार्याकारण मनुष्यदेहीं ॥७६॥ दीक्षा करावया भक्तजनां ॥ तीर्थें हिंडणें आपणा॥ मनोवेगें मार्गक्रमणा ॥ आले तीर्थ गोकर्णासी ॥७७॥ ऐकोनि सिद्ध मुनींचें वचन ॥ विनवी नामधारक आपण ॥ तें परिसा श्रोतेजन ॥ म्हणे सरस्वती गंगाधरू ॥ ७८ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे दत्तात्रेयावतारकथनं नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्रीपादश्रीवल्लभनृसिंहसरस्वतीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ ओंव्या ॥७८॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ स्वामी तूं ज्योति अंध-
कारासी ॥ प्रकाश केला जी आम्हांसी ॥ गुरुपीठ आद्यंत ॥ १ ॥ त्रैमूर्ति
होऊनि आपण ॥ तीर्थें करावीं किंकारण ॥ विशेष असे काय गोकर्ण ॥
म्हणोनि गेले तया स्थाना ॥२॥ तीर्थें असती अपरंपारी ॥ समस्त सांडूनि
प्रीति करी ॥ कैसा पावला दत्तात्री ॥ अवतारी श्रीपाद श्रीवल्लभ ॥ ३ ॥
ऐक शिष्या शिखामणी ॥ तुवां पुशिलें जें कां प्रश्नीं ॥ संतोष झाला अंतः-
करणीं ॥ सांगेन चरित्र श्रीगुरूचें ॥ ४ ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ सांगा
स्वामी कृपेंसीं ॥ म्हणोनि लागला चरणांसी ॥ नामधारक प्रीतिकारें ॥५॥
ऐकोनि नामधारकाचें वचन ॥ संतोषलें सिद्धाचें मन ॥ सांगतसे विस्ता-
रोन ॥ गुरुचरित्र परियेसा ॥६॥ तुजकरितां आम्हांसी ॥ लाभ झाला असे
मानसीं ॥ गुरुचरित्र सांगावयासी ॥ उत्कंठा मानसीं होय ते ॥ ७ ॥ म्हणे

१ कथाकरितां. २ श्रेष्ठ.

त्रैमूर्ति अवतरोन ॥ तीर्थें हिंडे केविं आपण ॥ विशेष पावला गोकर्ण ॥ म्हणोनि पुससी आम्हांतें ॥८॥ दत्तात्रेय आपण ॥ तीर्थें हिंडे तयाचें कारण ॥ भक्तजनाहितार्थ दीक्षेस्तव जाण ॥ उपदेश करावया ॥ ९ ॥ विशेष तीर्थें आपुलें स्थान ॥ गोकर्णीं शंकर असे जाण ॥ याच कारणें निर्गुण ॥ त्रैमूर्ति वसती तया ठायीं ॥१०॥ गोकर्णींचें माहात्म्य ॥ सांगतसे अनुपम्य ॥ एकचित्त करूनि नेम ॥ ऐक शिष्या नामधारका ॥ ११ ॥ त्या तीर्थाचे आदि अंतीं ॥ सांगेन तुम्हां विस्तृतीं ॥ जे पूर्वीं वर लाधले असती ॥ अपूर्व असे ऐकतां ॥ १२ ॥ महाबळेश्वर-लिंग देखा ॥ स्वयंभू शिव असे एका ॥ आख्यान त्याचें ऐका ॥ लंबोदरें[1] प्रतिष्ठिलें तें ॥ १३ ॥ शिष्य म्हणे सिद्धासी ॥ तीर्थमाहिमा वर्णिसी[2] ॥ विघ्नेश्वरें प्रतिष्ठिलें तयासी ॥ विस्तारोनि सांग मज ॥१४॥ ऐसें शिष्य विनवीत ॥ ऐकोनि बहु संतोषत ॥ निरोपित आद्यंत ॥

१ गणपतीनें. २ प्रशंसा करितोस.

महाबळेश्वरचरित्र ॥१५॥ पुलस्त्य ब्राह्मणाची भार्या ॥ नाम तियेचें कैकया ॥ ईश्वरभक्ति अतिप्रिया ॥ शिवपूजा सार्वकाळ ॥ १६ ॥ नित्य करी शिवपूजन ॥ पूजेवीण न घे अन्न ॥ ऐसें करितां एक दिन ॥ न मिळे लिंग पूजेसी ॥ १७ ॥ व्रतभंग होईल म्हणोनि ॥ मृत्तिकालिंग करूनि ॥ पूजी अति संतोषोनि ॥ भक्तिपूर्वक अवधारा ॥ १८ ॥ तिचा पुत्र अतिक्रूर ॥ नाम तया दशशिर ॥ आला तेथें वेगवत्तर ॥ मातृदर्शन करावया ॥ १९ ॥ नमिता झाला मातेसी ॥ पुसे पूजा काय करिसी ॥ माता सांगे विस्तारेंसीं ॥ लिंग पूजिलें मृत्तिकेचें ॥ २० ॥ रावण म्हणे जननीसी ॥ माझी माता तूं म्हणविसी ॥ मृत्तिकेचें लिंग पूजेसी ॥ अभाग्य आपुलें म्हणतसे ॥ २१ ॥ मागुती म्हणे तियेसी ॥ पूजितां फळ काय यासी ॥ कैकया सांगे पुत्रासी ॥ कैलासपद पाविजे ॥२२॥ रावण म्हणे मातेसी ॥ कैलास आणुनी

१ पुराणांतरीं हिलाच कैकसी असें म्हटलें आहे. २ दहा तोंडाचा ( रावण. )

तुजपासीं ॥ देईन हें निश्चयेंसीं ॥ सायास कां वो करित्येसी ॥ २३ ॥ ऐसें बोले तो रावण ॥ मातेसवें करी पणें ॥ आणीन त्वरित उमारमण ॥ कैलासासहित लंकेसी ॥२४॥ पूजा करीं वो स्वस्थ चित्तेंसीं ॥ मृत्तिकालिंग कां करिसी ॥ म्हणोनि निघाला त्वरितेंसीं ॥ मनोवेगें निशाचर ॥२५॥ पावला त्वरें शिवपुरासी ॥ शुभ्र रम्य पर्वतासी ॥ धरोनि हालवी क्रोधेंसीं ॥ वीस बाहुभुजाबळें ॥ २६ ॥ आंदोळलें कैलासभुवन ॥ उपटीतसे तो रावण ॥ दाही शिरें टेंकून ॥ उचलीन म्हणे उल्हासें ॥२७॥ शिर लावून पर्वतासी ॥ कर टेंकून मांडीसी ॥ उचलिता झाला प्राणेंसीं ॥ सप्तपाताळ आंदोळलें ॥२८॥ फणा चुकवी शेष आपण ॥ कूर्म भ्याला कांपोन ॥ भयचकित देवगण ॥ अमरपुर कांपतसे ॥२९॥ कंप झाला स्वर्गभुवन ॥ सत्यलोक विष्णुभुवन ॥ येरू पडतसे गडबडोन ॥ म्हणती प्रळय मांडला ॥ ३० ॥ कैलासपुरींचे

१ श्रम. २ प्रतिज्ञा.

देवगण ॥ भयाभीत झाले कंपायमान ॥ भयाभीत गिरिजा आपण ॥ होऊनि गेली शिवापासीं ॥ ३१ ॥ पार्वती विनवी शिवापासीं ॥ काय झालें कैलासासी ॥ आंदोळतसे सभेसी ॥ पडों पहात निर्धारें ॥ ३२ ॥ नगरांत झाला आकांत ॥ बैसलेती तुम्ही स्वस्थ ॥ करा प्रतिकार त्वरित ॥ म्हणोनि चरणां लागली ॥ ३३ ॥ ईश्वर म्हणे गिरिजेसी ॥ न करीं चिंता मानसीं ॥ रावण माझा भक्त परियेसीं ॥ खेळतसे भक्तीनें ॥ ३४ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ विनवी गिरिजा नमोनि ॥ रक्ष रक्ष शूलपाणी ॥ समस्त देवगणांतें ॥ ३५ ॥ ऐकोनि उमेची विनंती ॥ शंकरें चेपिला वामहस्तीं ॥ दाही शिरें भुजांसहिती ॥ दडपलासे गिरीच्या तळीं ॥३६॥ चिंता करी मनीं बहुत ॥ शिव शिव ऐसें उच्चारित ॥ ध्यातसे स्तोत्र करीत ॥ शरणागता रक्ष म्हणोनि ॥ ३७ ॥ त्राहि त्राहि पिनाकपाणी ॥ जगद्रक्षक[1]शिरोमणी ॥ शरण आलों

१ जगताचें रक्षण करणाऱ्यांत श्रेष्ठ.

तुझे चरणीं ॥ मरण कैंचें भक्तासी ॥३८॥ शंकर भोळा चक्रवर्ती ॥ ऐकोनि त्याची विनंती ॥ चेपिलें होतें वामहस्तीं ॥ काढिलें त्वरित कृपेनें ॥ ३९ ॥ सुटला तेथूनि लंकेश्वर ॥ स्तोत्र करीतसे अपार ॥ स्वशिरें छेदोनि परिकर ॥ तंतु लाविले निज अंत्रें ॥ ४० ॥ वेद सहस्र एकवचनी ॥ वर्णक्रमादि विस्तारोनि ॥ सामवेद अतिगायनीं ॥ समस्त रागें गातसे ॥ ४१ ॥ गण ऋषेश्वरयुक्त ॥ गायन करी लंकानाथ ॥ तयांचीं नामें विख्यात ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ४२ ॥ आठही गण प्रख्यात ॥ उच्चारीतसे लंकानाथ ॥ मगण ब्राह्मण प्रख्यात ॥ नगण क्षत्री विशेष ॥४३॥ भगण वैश्य ध्यानेंसी॥ तगण शूद्रवर्णेंसी ॥ जगण दैत्य परियेसीं ॥ रगण प्रत्यक्ष च्यूतगुणें ॥४४॥ सगण तुरंगरूपेंसीं ॥ यगण शुद्ध परियेसीं ॥ विस्तारित गायनेंसीं ॥ लंकापति रावण ॥ ४५ ॥ गायन करीत नवरसेंसीं ॥ नांवें सांगेन परियेसीं ॥

१ साहसानें. २ आंतडीं. ३ क्षत्रिय.

शांत भयानक अद्भुतेंसीं ॥ शृंगार हास्य करुणा रस ॥ ४६ ॥ रौद्र वीर बीभत्सेंसीं ॥ गायन करी अति उल्हासीं ॥ वेणू वाजवी सप्तस्वरेंसीं ॥ ध्यान-पूर्वक विधीनें ॥ ४७ ॥ जंबुद्वीप वास ज्यासी ॥ षड्स्वर नाम परियेसीं ॥ कंठीहूनि उपज ज्यासी ॥ मयूरस्वर आलापित ॥ ४८ ॥ उत्तमवंशीं उपज ज्यासी ॥ गीर्वाणकुळीं ब्रह्मवंशीं ॥ तप्तकांचन वर्ण परियेसीं ॥ वन्हि देवता शृंगार रस ॥ ४९ ॥ द्वितीय स्वर ऋषभासी ॥ जन्म शाल्मली द्वीपासी ॥ उपज हृदयस्थानेंसीं ॥ पंचमस्वर आलापित ॥५०॥ प्रख्यात नाम क्षत्रवंशीं ॥ विराजवर्ण यमदेवतेसी ॥ क्रीडा अद्भुत रस ऐसी ॥ वीणा वाजवी रावण ॥५१॥ तृतीय स्वर गांधारेंसीं ॥ गायन करी रावण परियेसीं ॥ कुशद्वीप वास ज्यासी ॥ नासिकास्वर अवधारा ॥ ५२ ॥ अजस्वर वर्ण त्यासी ॥ गीर्वाण वैश्यवंशीं ॥ सुवर्णवर्ण[1] कांतीसी ॥ चंद्रदेवता अद्भुत रसें ॥ ५३ ॥

१ तापलेल्या सुवर्णाप्रमाणें.

मध्यम स्वर चातुर्थक ॥ क्रौंचद्वीप वास ऐक ॥ उरस्थान उक्त चारी सुख ॥ क्रौंचस्वरें आलापित ॥ ५४ ॥ गीर्वाणकुळ ब्रह्मवंश ॥ कुंदवर्ण रूप सुरस ॥ ध्यान करी लंकाधीश ॥ लक्ष्मी देवता करुणा रस ॥५५॥ शाल्मली द्वीप भूमीसी ॥ जन्म पंचमस्वरासी ॥ कंठीं उपजोनि नादासी ॥ कोकिळास्वर गातसे ॥५६॥ ध्यान करी तया स्वरासी ॥ उपज झाला पितृवंशीं ॥ कृष्ण-वर्ण रूप त्यासी ॥ गणनाथ देव हास्यरसें ॥ ५७ ॥ श्वेतद्वीप जन्म ख्यात ॥ स्वर असे नाम धैवत ॥ ललाट स्थान नाद व्यक्त ॥ दर्दुरस्वरें आलापी देखा ॥ ५८ ॥ ऐसा धैवत स्वरासी ॥ बीभत्स रस अतिउल्हासीं ॥ गाय रावण परियेसीं ॥ ईश्वराप्रती भक्तीनें ॥५९॥ पुष्कर द्वीप उपज त्यासी ॥ निषाद स्वर नाम परियेसीं ॥ उत्पत्ति आलाप संधीसी ॥ हस्तिस्वरें गातसे ॥६०॥ असुरवंश वैश्यकुळीं ॥ अल्प शुद्ध वर्ण पांटली ॥ तुंबर मुनि देवता

---

१ गुलाबी.

सकळीं ॥ सर्व देवता अवधारीं ॥६१॥ भयानक रस देखा ॥ चर्ची व्याकुळ असे निका ॥ येणेंपरीं सप्त स्वरिका ॥ गायन करी लंकानाथ ॥६२॥ रागसहित रागिणींसी ॥ गायन करी सामवेदासी ॥ श्रीरागादि वसंतासी ॥ आलाप करी दशशिर ॥ ६३॥ भैरवादि पंचमरागी ॥ नट नारायण मेघरागीं ॥ गायन करी अभ्यासरागीं ॥ लंकानाथ शिवाप्रति ॥ ६४ ॥ गौड कोल्हाळ कांदाळी ॥ द्राविडरागी कौशिकमाळी ॥ देवगांधार आनंदलिळी ॥ गायन करी लंकानाथ ॥६५॥ धनाश्रिया वराडीसी ॥ रामकलि मंजिरेंसीं ॥ गौडकी दशाकी हारिसी ॥ गायन करी लंकेश्वर ॥ ६६ ॥ भैरवी गुर्जरीसहित ॥ वेळावली राग ललित ॥ कर्नाटकी हंसयुक्त ॥ गायन करी दशशिर ॥ ६७ ॥ त्राटकी मोटकी देखा ॥ टंकाक्षी सुधा नाटका ॥ सैंधवा माळाकी ऐका ॥ गायन करी लंकानाथ ॥६८॥ बंगाली राग सोरटींसीं ॥ कामबोध मधुमाधवींसीं ॥ देवाकिया भूपाळीसी ॥ गायन करी दशानन

॥६९॥ रागवल्लभ माधुरीसी ॥ राव्हेरी राग हर्षी ॥ विहंगदात्री चंडीसी ॥ वसवीजादि रागानें ॥ ७० ॥ शिर कापून आपुलें देखा ॥ यंत्र केलें कर-कमळिका ॥ शिरा काढून तंतुका ॥ रावणेश्वर गातसे ॥७१॥ समयासमयीं आलापन ॥ करी दशशिर आपण ॥ प्रातःकाळीं करी गायन ॥ अष्टराग परियेसा ॥७२॥ मध्यमराग वेळोवेळीं ॥ दशांकभैरव करी भूपाळी ॥ मल्हार धनाश्री बंगाली ॥ प्रातःकाळीं गातसे ॥७३॥ बराडी ललिता गुर्जरींसीं ॥ गौडाकी आहिरी कौशिकेसी ॥ माध्यान्हसमयीं गायनासी ॥ रावण करी परि-येसा ॥ ७४ ॥ कुरंजी तुंडी मालश्रियेसी ॥ दशांक पंचम परियेसीं ॥ अप-राण्ह वेळ अतिहर्षी ॥ ईश्वराप्रती गातसे ॥७५॥ चारी प्रकार गौडियेसी ॥ रामकली श्रीरागासी ॥ देवाकी पटमंजिरेंसीं ॥ वसंतुरागें ऋतुकाळीं ॥७६॥ ऐसें छत्तीस रागेंसीं ॥ गायन करी सामवेदासी ॥ निर्वाणरूप भक्तीसी ॥

१ वाजविण्याचें यंत्र, तंबोरी. २ तारा.

चंद्रमौळी सांबाचिये ॥ ७७ ॥ रावणाचे भक्तींसीं ॥ प्रसन्न ईश्वर त्वरितेसी ॥
निजरूप अतिहर्षीं ॥ उभा राहिला सन्मुख ॥ ७८ ॥ पंचवक्र त्रिनेत्रेंसीं ॥
उभा राहोनि संतोषीं ॥ काय इच्छा तुझे मानसीं ॥ माग वर म्हणतसे ॥ ७९ ॥
म्हणे रावण शिवासी ॥ काय मागावें तुजपासीं ॥ लक्ष्मी माझे घरची दासी ॥
आठ निधि माझे घरीं ॥ ८० ॥ चतुरानन माझा जोशी ॥ तेहेतीस कोटी
देव हर्षीं ॥ सेवा करिती अहर्निशीं ॥ सूर्य चंद्र वरुण वायु ॥ ८१ ॥ अग्नि
सारिखा सेवा करी ॥ वस्त्रें धूत अतिकुसरीं ॥ यम माझा आज्ञाधारी ॥ नि-
रोपावेगळा न मारी कवणा ॥ ८२ ॥ इंद्रजितासारिखा पुत्र ॥ कुंभकर्णा-
ऐसा भ्रात्र ॥ स्थान समुद्रामाजी पवित्र ॥ कामधेनु माझे घरीं ॥ ८३ ॥
सहस्र कोटी आयुष्य मज ॥ हें सांगणें नलगे तुज ॥ आलों असें जें काज ॥
कैलास नेईन लंकेसी ॥ ८४ ॥ व्रत असे जननीसी ॥ नित्य पूजन तुम्हांसी ॥

१ ब्रह्मदेव. २ आतिशय कुशलपणानें.

मनोरथ पुरवावे भक्तींसीं ॥ कृपासिंधु दातारा ॥८५॥ ईश्वर म्हणे रावणासी ॥ जरी चाड असे पूजेसी ॥ काय करिसी कैलासासी ॥ आत्मलिंग तुज देतों आतां ॥ ८६ ॥ जे जे मनींची वासना ॥ पुरेल त्वरित ऐक जाणा ॥ लिंग असे प्राण आपणा ॥ म्हणोनि दिधलें रावणासी ॥ ८७ ॥ पूजा करीं वेळ तिन्ही ॥ अष्टोत्तर एक जप करोनि ॥ रुद्राभिषेकें अभिषेकोनि ॥ पूजा करावी एकचित्तें ॥ ८८ ॥ वर्षें तीन जे पूजिती ॥ तेचि माझें स्वरूप होती ॥ जें जें मनीं इच्छिती ॥ तें तें पावती अवधारा ॥ ८९ ॥ हें लिंग असे जयापासीं ॥ मृत्यु नाहीं गा परियेसीं ॥ दर्शनमात्रें महादोषी ॥ उद्धरतील अवधारा ॥ ९० ॥ ठेवूं नको भूमीवरी ॥ जोंवरी पावे तुझी नगरी ॥ वर्षें तीन पूजा करीं ॥ तूंचि ईश्वर होशील ॥ ९१ ॥ वर लाधोनि लंकेश्वर ॥ निरोप देत कर्पूरगौर[1] ॥ करूनि साष्टांग नमस्कार ॥ निघाला त्वरित

१ शंकर.

लंकेसी ॥ ९२ ॥ इतुका होता अवसर ॥ नारद होता ऋषीश्वर ॥ निघोनि गेला वेगें सत्वर ॥ अमरपुरा इंद्रभुवना ॥९३॥ नारद म्हणे इंद्रासी ॥ काय स्वस्थ चित्तें बैसलासी ॥ अमरत्व दिधलें रावणासी ॥ लक्ष्मी गेली आजि तुमची ॥ ९४ ॥ चिरायु झाला लंकेश्वर ॥ प्राणलिंग देत कर्पूरगौर ॥ आणिक दिधला असे वर ॥ तूंचि ईश्वर होशील ॥ ९५ ॥ वर्षें तीन पूजि- लियासी ॥ तूंचि माझें स्वरूप होसी ॥ तुझें नगर कैलासी ॥ मृत्यु नाहीं कदा तुज ॥९६॥ ऐसा वर लाधोनि ॥ गेला रावण संतोषोनि ॥ तेहतीस कोटी देव कोठूनि ॥ सुटती आतां तुम्हांसी ॥ ९७ ॥ जावें त्वरित तुम्हीं आतां ॥ सेवा करावी लंकानाथा ॥ उर्वशी रंभा मेनका त्वरिता ॥ भेटीस न्याव्या रावणाचे ॥९८॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ इंद्र भयभीत मनीं ॥ नारदा विनवी कर जोडूनि ॥ काय करावें म्हणतसे ॥९९॥ नारद म्हणे इंद्रासी ॥

१ अवकाश.

उपाय काय त्वरितेंसीं ॥ जावें तुम्हीं ब्रह्मयापासीं ॥ तयासी उपाय करील ॥ १०० ॥ इंद्र नारदासमवेत ॥ गेले ब्रह्मलोका त्वरित ॥ विस्तारोनियां वृत्तांत ॥ सांगे इंद्र ब्रह्मयासी ॥ १ ॥ ब्रह्मा म्हणे इंद्रासी ॥ जावें त्वरित वैकुंठासी ॥ दैत्यवैरी हृषीकेशी ॥ उपाय करील निर्धारें ॥ २ ॥ म्हणोनि निघाले तिघेजण ॥ पावले त्वरित वैकुंठभुवन ॥ भेटला तत्काळ नारायण ॥ सांगती वृत्तात रावणाचा ॥३॥ विरिंचि म्हणे विष्णूसी ॥ प्रतिकार करावा वेगेंसीं ॥ कारण असे तुम्हांसी ॥ राम-अवतारीं परियेसा ॥ ४ ॥ तेहतीस कोटी देवांसी ॥ घातलें असे बंदीसी ॥ याचि कारणें तुम्हांसी ॥ करणें असे अवधारा ॥ ५ ॥ ईश्वराचें प्राणलिंग ॥ घेऊनि गेला राक्षस चांग ॥ आतां रावणा नाहीं भंग ॥ तोचि होईल ईश्वर ॥६॥ त्वरित उपाय करावा यासी ॥ पुढें जड होईल तुम्हांसी ॥ निर्दाळावया राक्षसांसी ॥ अवतरोनि

१ चांगलें.

तुम्हींच यावें ॥७॥ ऐसें विनवी चतुरानन ॥ मग कोपोन नारायण ॥ कार्य नासेल म्हणोन ॥ निघाला झडकर कैलासा ॥ ८ ॥ विष्णु आला ईश्वरा-पाशीं ॥ म्हणे शंकरा परियेसीं ॥ प्राणलिंग रावणासी ॥ द्यावया कारण तुम्हां काय ॥ ९ ॥ रावण क्रूर महादैत्य ॥ सुरवर सकळ त्याचे भृत्य ॥ कारागृहीं असती समस्त ॥ केवीं सुटती सांग आम्हां ॥ ११० ॥ ऐसें दुरा-चारियासी ॥ वर देतां उल्हासीं ॥ देवत्व गेलें त्याचे घरासीं ॥ घेईल स्वर्ग निर्धारें तो ॥११॥ ईश्वर म्हणे विष्णूसी ॥ तुष्टलों तयाचे भक्तींसीं ॥ विसर पडला आम्हांसी ॥ संतोषें दिधलें प्राणलिंग ॥ १२ ॥ आपलें शिर छेदोनि देखा ॥ वीणा केला स्वहस्तका ॥ सप्तस्वर वेदादिका ॥ गायन केलें संतोषें ॥ १३ ॥ जरी मागता पार्वतीसी ॥ देतों सत्य परियेसीं ॥ भुली पडली भक्तींसीं ॥ लिंग नेलें प्राण माझा ॥ १४ ॥ विष्णु म्हणे उमाकांता ॥ तुम्ही

ऐसा वर देतां ॥ आम्हां सायास होय तत्त्वतां ॥ दैत्य उन्मत्त होताती ॥ १५॥ देवद्विज लोकांसी ॥ पीडा करिती बहुवसीं ॥ याचि कारणें आम्हांसी ॥ अवतार धरणें घडतें देखा ॥ १६ ॥ कधीं दिलें लिंग त्यासी ॥ नेलें असेल लंकेसी ॥ शंकर म्हणे विष्णूसी ॥ पांच घटी झाल्या आतां ॥ १७ ॥ ऐकतांच शिववचन ॥ उपाय करी नारायण ॥ धाडिलें चक्र सुदर्शन ॥ सूर्याआड व्हावया ॥ १८ ॥ बोलावूनि नारदासी ॥ सांगतसे हृषीकेशी ॥ तुम्हीं जावें त्वरितेसी ॥ रावण जातो लंकेसी देखा ॥ १९ ॥ मार्गीं जाऊनि तयासी ॥ विलंब करावा परियेसीं ॥ जाऊं न द्यावें लंकेसी ॥ त्वरित जावें म्हणतसे ॥१२०॥ चक्र झालें सूर्याआड ॥ स्नानसंध्या रावणा चाड ॥ तुम्हीं जाऊनियां दृढ ॥ विलंब करावा तयासी ॥ २१ ॥ ऐकोनियां श्रीविष्णूच्या बोला ॥ नारद त्वरित निघोन गेला ॥ मनोवेगें पावला ॥ जेथें होता लंकानाथ ॥ २२ ॥ नारदातें पाठवूनि ॥ विष्णु विचारी आपुल्या मनीं ॥

गणेशातें बोलावूनि ॥ पाठवूं म्हणे विघ्नासी ॥२३॥ बोलावूनि गणेशासी ॥ सांगे विष्णु परियेसीं ॥ कैसा रावण तुजसी ॥ सदा उपेक्षितो ॥ २४ ॥ सकळ देव तुज वंदिती ॥ त्याचे मनोरथ पुरती ॥ तुज जे कां उपेक्षिती ॥ विघ्नें बाधती तयांसी ॥ २५ ॥ तुज नेणतां रावण देखा ॥ घेऊनि गेला निधान ऐका ॥ प्राणलिंगा अतिविशेखा ॥ नेलें शिवाजवळोनि ॥ २६ ॥ आतां त्वा करावें एक ॥ रावणापाशीं जाऊनि देख ॥ कपटरूपें कुब्जक[1] ॥ बाळवेष धरोनियां ॥२७॥ वाटेसि होईल अस्तमान ॥ रावण करील संध्या-वंदन ॥ नारद गेला याचि कारण ॥ विलंब करावया दैत्यासी ॥ २८ ॥ आज्ञा शिवाची रावणासी ॥ न ठेवीं लिंग भूमीसी ॥ शौचाचमनसमयासी ॥ आपणाजवळीं न ठेविजे ॥ २९ ॥ बाळवेषें तुवां जावें ॥ शिष्यरूप करुणा-भावें ॥ सूक्ष्मरूप दाखवावें ॥ लिंगस्थान विश्वासुनी ॥ १३० ॥ संध्यासमयीं

१ कुबडा, ठेंगू.

तुझे हातीं ॥ लिंग देईल विश्वासरीतीं ॥ तुवां ठेवावें तत्काळ क्षितीं[1] ॥ लिंग राहील तेथेंची ॥ ३१ ॥ येणेंपरी गणेशासी ॥ शिकवी विष्णु परियेसीं ॥ संतोषोनि हर्षी ॥ भोतुकें[2] मागे तये वेळीं ॥ ३२ ॥ लाडू तिळव[3] पंचखाद्य ॥ इक्षु खोबरें दालिम आद्य ॥ शर्करा घृत क्षीर सद्य ॥ द्यावें त्वरित आपणासी ॥ ३३ ॥ चणे भिजवून आपणासी ॥ तांदूळ लाह्या साखरेंसीं ॥ त्वरीत भक्षण करावयासी ॥ द्यावें स्वामी म्हणतसे ॥ ३४ ॥ जें जें मागितलें विघ्नेश्वरें ॥ त्वरित दिधलें शार्ङ्गधरें ॥ भक्षित निघाला वेगवक्रें ॥ ब्रह्मचारीवेष धरूनि ॥ ३५ ॥ गेला होता नारद पुढें ॥ ब्रह्मऋषि महात्म्य गाढें[4] ॥ उभा ठाकला रावणापुढें ॥ कवण कोठूनि आलासी ॥ ३६ ॥ रावण म्हणे नारदासी ॥ गेलों होतों कैलासासी ॥ केलें उत्कृष्ट तपासी ॥ तोषविलें तया शिवा ॥ ३७ ॥ तेणें प्रसन्न होऊनि आम्हांसी ॥ लिंग दिधलें

१ जमिनीवर. २ खाऊ. ३ तिळांचे लाडू. ४ मोठें.

परियेसीं ॥ आणिक सांगितलें संतोषीं ॥ लिंगमहिमा अपार ॥३८॥ नारद म्हणे लंकानाथा ॥ दैव थोर तुझें आतां ॥ लिंग लाधलासी अद्भुता ॥ जाणों आम्ही आद्यंत ॥ ३९ ॥ दाखवीं लिंग आम्हांसी ॥ खुणें ओळखूं परियेसीं ॥ लिंगलक्षण विस्तारेंसीं ॥ सांगूं आम्ही तुजलागीं ॥१४०॥ नारदाचिया वचनासी ॥ न करी विश्वास परियेसीं ॥ दाखवीतसे दुरोनि लिंगासी ॥ व्यक्त करोनि त्या समयीं ॥४१॥ नारद म्हणे लंकेशा ॥ लिंगमहिमेचा प्रकार ऐसा ॥ सांगेन तुज बहु सुरसा ॥ बैसोनि ऐकें स्वस्थ चित्तें ॥४२॥ लिंग उपजलें कवणे दिवशीं ॥ पूर्वीं जाणिलें तयासी ॥ एकचित्तें परियेसीं ॥ कथा असे अतिपूर्व ॥४३॥ गिळूनि सकळ सौरभांसी[1] ॥ मृग एक काळाग्निसमेसी ॥ ब्रह्मांडखंड परियेसीं ॥ पडिला होता तो मृग ॥४४॥ ब्रह्माविष्णुमहेश्वरांसी ॥ गेले होते पारधियेसी ॥ मृग मारिले परियेसीं ॥ भक्षिलें मेदं[2] तये

१ सुगंधी वस्तु. २ मांस.

वेळीं ॥४५॥ तयासी होतीं तीन शृंगें ॥ खालीं असती तीन लिंगें ॥ तिघीं घेतलीं तीन भागें ॥ प्राणलिंगें परियेसा ॥४६॥ लिंगमहिमा एक कानीं ॥ जे पूजिती वर्षें तिनी ॥ तेचि ईश्वर होती निर्गुणी ॥ वेदमूर्ति तेचि होय ॥४७॥ लिंग असे जये स्थानीं ॥ तोचि कैलास जाण मनीं ॥ महत्त्व असे यात्र गुणीं ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वरांसी ॥ ४८ ॥ असे आणिक एक बरवें ॥ सांगेन ऐक एकभावें ॥ रावण म्हणे आम्हां जाणें ॥ असे त्वरित लंकेसी ॥ ४९ ॥ म्हणोनि निघाला महाबळी ॥ नारद म्हणे तये वेळीं ॥ सूर्यास्त आहे जवळी ॥ संध्याकाळ ब्राह्मणासी ॥१५०॥ सहस्रवेद आचरसी ॥ संध्याकाळीं मार्ग क्रमिसी ॥ वाटेस होईल तुज निशी ॥ संध्यालोप होईल ॥ ५१ ॥ आम्ही जाऊं संध्यावंदनासी ॥ म्हणोनि नारद विनयेंसीं ॥ पुसोनियां रावणासी ॥ गेला नदीतीरा ॥ ५२ ॥ इतुकिया अवसरीं ॥ पातला गणेश

१ एकनिष्ठेनें.

ब्रह्मचारी ॥ रावणापुढें चांचरीं¹ ॥ समिधा तोडी कौतुकें ॥ ५३ ॥ रावण चिंती मानसीं ॥ व्रतभंग होईल आपणासी ॥ संध्या करावी त्रिकाळेसी ॥ संदेह घडला म्हणतसे ॥५४॥ ईश्वरें सांगितलें आम्हांसी ॥ लिंग न ठेवावें भूमीसी ॥ संध्यासमयो झाली निशी ॥ काय करूं म्हणतसे ॥ ५५ ॥ तंव देखिला ब्रह्मचारी ॥ अति सुंदर बाळकापरी ॥ हिंडतसे नदीतीरीं ॥ देखिला रावणें तये वेळीं ॥५६॥ मनीं विचारी लंकानाथ ॥ ब्रह्मचारी कुमार दिसत ॥ न करा आमुचा विश्वासघात ॥ लिंग देऊं तया हातीं ॥५७॥ संध्या करूं स्वस्थचित्तेंसीं ॥ लिंग असेल तयापासीं ॥ बाळक असे हें निश्चयेंसीं ॥ म्हणोनि गेला तयाजवळी ॥ ५८ ॥ देखोनियां दशशिर ॥ पळतसे लंबोदर ॥ रावण झाला द्विजवर ॥ अभय देऊनि गेला जवळी ॥ ५९ ॥ रावण म्हणे तयासी ॥ तूं कवण बा सांग आम्हांसी ॥ मातापिता कवण तुजसी ॥ कवण

१ तांतडीनें, लगबगीनें.

कुळीं जन्म तुझा ॥१६०॥ ब्रह्मचारी म्हणे रावणा ॥ इतुकें पुससी कवण्या कारणा ॥ आमुच्या बापें तुझ्या ऋणा ॥ काय द्यावें सांग मज ॥ ६१ ॥ हांसोनियां लंकेश्वर ॥ लोभें धरिला त्याचा कर ॥ सांग बाळका कवणाचा कुमर ॥ प्रीतीभावें पुसतों मी ॥६२॥ ब्रह्मचारी म्हणे रावणासी ॥ आमुचा पिता काय पुससी ॥ जटाधारी भस्मांगासी ॥ रुद्राक्षमाळा असती देखा ॥ ६३ ॥ शंकर म्हणती तयासी ॥ भिक्षा मागणें अहर्निशीं ॥ वृषभारूढ उमा सरसी ॥ जननी ते जगन्माता ॥ ६४ ॥ इतुकें आम्हांसी पुसतोसी ॥ तुज देखतां भय मानसीं ॥ बहुत वाटे पारयेसीं ॥ सोड हात जाऊं दे ॥६५॥ रावण म्हणे ब्रह्मचारी ॥ तव पिता असे दरिद्री ॥ भिक्षा मागे घरोघरीं ॥ सौख्य तुज कांहीं नसे ॥ ६६ ॥ आमुचें नगर लंकापुर ॥ रत्नखचित असे सुंदर ॥ आम्हांसवें चाल सत्वर ॥ देवपूजा करीत जायीं ॥ ६७ ॥ जें जें मागसी आम्हांसी ॥ सकळ देईन परियेसीं ॥ सुखें रहावें मजपासीं ॥ म्हणे

रावण तये वेळीं ॥६८॥ ब्रह्मचारी म्हणे त्यासी ॥ लंकेसी बहुत राक्षसी ॥ आम्ही बाळक अरण्यवासी ॥ खातील तेथें जातांची ॥६९॥ न येऊं तुझिया नगरासी ॥ सोड जाऊं दे घरासी ॥ क्षुधें पीडतों बहुवसी ॥ म्हणोनि भक्षितों भातुकें ॥१७०॥ इतुकें ऐकोनि लंकानाथ ॥ त्या बाळका संबोधित ॥ लिंग धरीं ऐसें म्हणत ॥ मी संध्या करीन तोंवरी ॥ ७१ ॥ बाळक विनवी तयासी ॥ न धरीं लिंग परियेसीं ॥ मी ब्रह्मचारी अरण्यवासी ॥ उपद्रवूं नको म्हणतसे ॥ ७२ ॥ तव लिंग असे जड ॥ मी पण बाळ असें वेड ॥ न घें लिंग जाऊं दे सोड ॥ धर्म घडेल तुजलागीं ॥७३॥ नानापरी संबोधित ॥ लिंग देत लंकानाथ ॥ संध्या करावया आपण त्वरित ॥ समुद्रतीरीं बैसला ॥ ७४ ॥ ब्रह्मचारी तयासी ॥ उभा विनवीतसे रावणासी ॥ जड झालिया आपणासी ॥ ठेवीन त्वरित भूमीवरी ॥ ७५ ॥ वेळ तीन परियेसीं ॥ बोलवीन तुम्हांसी ॥ वेळ लागलिया परियेसीं ॥ आपण ठेवीन

भूमीवरी ॥ ७६ ॥ ऐसा निर्धार करोनि ॥ उभा गणेश लिंग घेऊनि ॥
समस्त देव विमानीं ॥ बैसोनि पाहती कौतुक ॥ ७७ ॥ अर्घ्यसमयीं राव-
णासी ॥ बोलवी गणेश परियेसीं ॥ जड झालें लिंग आम्हांसी ॥ सत्वर
घे गा म्हणतसे ॥ ७८ ॥ न्यासपूर्वक अर्घ्य देखा ॥ रावण करी अति
विवेका ॥ हाता दाखवी बाळका ॥ येतों राहें म्हणोनि ॥ ७९ ॥ आणिक
क्षणभर राहोनि ॥ गणेश बोले वेळ दोनी ॥ जड झालें म्हणोनि ॥ शीघ्र
यावें म्हणतसे ॥ १८० ॥ न ये रावण ध्यानस्थ ॥ गणेश असे विचारीत ॥
समस्त देवांतें साक्षी करीत ॥ लिंग ठेवीत भूमीवरी ॥ ८१ ॥ श्रीविष्णूतें
स्मरोनि ॥ लिंग ठेविलें स्थापोनि ॥ संतोष जाहला गगनीं ॥ पुष्पें वर्षती
सुरवर ॥ ८२ ॥ अर्घ्य देवोनि लंकेश्वर ॥ निघोनि आला सत्वर ॥ लिंग
देखिलें भूमीवर ॥ मनीं विकळ[1] जाहला ॥८३॥ आवेशोनि[2] रावण देखा ॥

१ दुःखी. २ रागावून.



[ अ० ६ ] अर्घ्यसमयीं रावणासी । बोलावी गणेश परियेसी । जड झालें लिंग आम्हांसी । सत्वर घे गा म्हणतसे ॥ १७८ ॥

ठोंसे मारी गणनायका ॥ हास्यवदनें रडे तो ऐका ॥ भूमीवरी लोळतसे ॥ ८४ ॥ म्हणे माझिया पित्यासी ॥ सांगेन आतां त्वरितेंसीं ॥ कां मारिलें मज बाळकासी ॥ म्हणोनि रडत निघाला देखा ॥ ८५ ॥ मग रावण काय करी ॥ लिंग धरोनियां दृढ करीं ॥ उचलूं गेला नानापरी ॥ भूमीसहित हालतसे ॥८६॥ कांपे धरणी तये वेळीं ॥ रावण उचली महाबळी ॥ न ये लिंग शिर आफळी ॥ महाबळी राहिला ॥ ८७ ॥ नाम पावला याचि कारणें ॥ महाबळेश्वर लिंग जाणें ॥ मुरडोनि ओढितां रावणें ॥ गोकर्णाकार जाहलें ॥ ८८ ॥ ऐसें करितां लंकानाथ ॥ मागुती गेला तपार्थ ॥ ख्याती झाली गोकर्णांत ॥ समस्त देव तेथें आले ॥ ८९ ॥ आणिक असे अपार महिमा ॥ सांगतसें अनुपमा ॥ स्कंदपुराणीं वर्णिली सीमा ॥ प्रख्यात असे परियेसा ॥ १९० ॥ ऐकोनि सिद्धाचें वचन ॥ नामधारक संतोषोन ॥

१ गाईच्या कानाच्या आकृतीसारखें.

पुनरपि चरणा लागे जाण ॥ म्हणे सरस्वती गंगाधरू ॥ १९१ ॥ इति श्री-गुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे गोकर्णमहिमावर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ १९१ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ गोकर्णमहिमा आम्हांसी ॥ निरोपिजे स्वामी कृपेंसीं ॥ पूर्वीं कवणा साक्ष झाली ॥ १ ॥ समस्त तीर्थें सांडुनी ॥ श्रीपाद गेले किंकारणीं ॥ पूर्वीं आधार केला कवणीं ॥ पुराण कथा सांगा मज ॥२॥ ज्यावरी असेल गुरूची प्रीति ॥ तीर्थमहिमा ऐकणें चित्तीं ॥ वांछा होतसे ज्ञानज्योती ॥ कृपासिंधु गुरुराया ॥ ३ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गोकर्णमहिमा मज पुससी ॥ सांगेन तुज विस्तारेंसीं ॥ एकचित्तें परियेसा ॥४॥ पूर्वयुगीं[1] इक्ष्वाकुवंशीं ॥ मित्रसह राजा परियेसीं ॥ प्रतापवंत क्षत्रियराशी ॥ सर्वधर्मरत देखा ॥ ५ ॥ राजा सकळशास्त्रज्ञ ॥ विवेकी असे श्रुतिनिपुण ॥ बलाढ्य शूर महाभीम[2] ॥ विद्योद्योगी दयानिधि ॥ ६ ॥ असतां राजा एके दिवशीं ॥ विनोदें निघाला पारधीसी ॥ प्रवेशला महावनासी ॥ वसती शार्दूल[3] सिंह जेथें ॥७॥ निर्मनुष्य अरण्यांत ॥ राजा

१ पुरातन, जुनी. २ महान् तेजस्वी. ३ वाघ.

पारधी खेळत ॥ भेटला तेथें अद्भुत ॥ दैत्य ज्वाळाकार भयानक ॥ ८ ॥ राजा देखोनि तयासी ॥ वर्षता शर[1] झाला कोपेंसीं ॥ मूर्छना येऊनि धरणीसी ॥ पडला दैत्य तया वेळीं ॥९॥ होता तयाचा बंधु जवळी ॥ आक्रंदतसे प्रबळी ॥ पाषाण हाणी कपाळीं ॥ बंधुशोकेंकरोनियां ॥ १० ॥ प्राण त्यजिता निशाचर ॥ बंधूसी म्हणतसे येर ॥ जरी तूं होसी माझा सहोदर[2] ॥ सूड घेई माझा तूं ॥११॥ ऐसें बोलोनि बंधूसी ॥ दैत्य पावला पंचत्वासी[3] ॥ अनेक मायापाशीं ॥ नररूप धरिलें तया वेळीं ॥१२॥ रूप धरोनि मानवाचें ॥ सौम्य वाणी बोले वाचें ॥ सेवकत्व करी राजयाचें ॥ अतिनम्रत्वें बोलोनियां ॥ १३ ॥ सेवा करी नानापरी ॥ सेवकाचे सारखें मन धरी ॥ कितीक दिवसांवरी ॥ वनांतरीं राजा होता देखा ॥ १४ ॥ समस्त मृग जिंकूनि ॥ दुष्ट जीवांतें वधोनि ॥ राजा आला परतोनि ॥ आपुल्या नगरा

१ बाण. २ सख्खा भाऊ. ३ मरण



[ अ० ७ ] राजा देखोनी तयासी । वर्षता झाला शर कोपेंसीं । मूर्च्छना येवोनां धरणीसीं । पडला दैत्य तया वेळीं ॥ ९ ॥

परियेसा ॥ १५ ॥ ऐसें असतां एके दिवशीं ॥ पितृश्राद्ध आलें परियेसीं ॥ आमंत्रण सांगे ऋषींसी ॥ वसिष्ठादिकां परियेसा ॥ १६ ॥ ते दिवशीं राजा नेमें स्वयंपाक ॥ करवीतसे सविवेक ॥ कापट्यें होता तो सेवक ॥ तया स्थानीं ठेविला ॥ १७ ॥ राजा म्हणे तयासी ॥ पाकस्थानीं तूं वससी ॥ जें जें मागेल भाणवेसीं ॥ सर्व आणूनि त्वां द्यावें ॥ १८ ॥ अंगिकारोनि तो सेवक ॥ नरमांस आणोनि देख ॥ कापट्यभावें करवी पाक ॥ केली शाक तया वेळीं ॥ १९ ॥ ठाय घालितां ऋषेश्वरांसी ॥ पहिलेंच वाढिलें नरमांसासी ॥ पाहतां कोप आला वसिष्ठासी ॥ दिघला शाप तये वेळीं ॥ २० ॥ वसिष्ठ म्हणे रायासी ॥ नरमांस वाढिलें आम्हांसी ॥ त्वरित ब्रह्मराक्षस होसी ॥ म्हणोनि शाप दिधला ॥ २१ ॥ शाप देतां तये काळीं ॥ राजा कोपला तत्काळीं ॥ अपराध नसतां प्रबळी ॥ वायां मज कां शापिलें ॥ २२ ॥

१ स्वयंपाकघरांत

नेणें मांसपाक कोणीं केला ॥ माझा निरोप[1] नाहीं झाला ॥ वृथा आमुतें शाप दिधला ॥ आपण शापीन म्हणतसे ॥ २३ ॥ उदक घेऊनि अंजुळीं ॥ शापावया सिद्ध झाला तये काळीं ॥ तंव राजपत्नी येऊनि जवळी ॥ वर्जी[2] आपुले पतीतें ॥ २४ ॥ पतीसी म्हणे ते नारी ॥ गुरूसी शापितां दोष भारी ॥ वंदुनी तयाचे चरण धरीं ॥ तेणें भवसागर तरशील ॥ २५ ॥ मदयंती सतीचें वचन ॥ मानिता झाला राजा आपण ॥ अंजुळीचें उदक जाण ॥ टाकी आपुले चरणावरी ॥२६॥ शाप देतां कल्मषपाणी[3] ॥ पडलें राजाचे चरणीं ॥ कल्मषपाद नाम म्हणोनि ॥ ब्रह्मराक्षस झाला तो राव ॥ २७ ॥ राजपत्नी येवोनि परियेसीं ॥ लागली वसिष्ठचरणांसी ॥ उद्धरीं स्वामी बाळकासी ॥ एवढा कोप काय काज ॥२८॥ करुणावचन ऐकोनि ॥ शांत झाला वसिष्ठ मुनि ॥ वर्षें बारा क्रमोनि ॥ पुनरपि राजा होशील ॥२९॥

१ आज्ञा. २ निषेध करी. ३ पापयुक्त उदक हातीं घेतलेला.

उःशाप देऊनि वसिष्ठ ऋषि ॥ गेला आपुले स्थानासी ॥ ब्रह्मराक्षस राजा परियेसीं ॥ होउनी गेला वनांतरा ॥ ३० ॥ निर्मनुष्य अरण्यांत ॥ राजा राहिला प्रख्यात ॥ भक्षीतसे अनेक जंत ॥ पशुमनुष्य आदिकरूनि ॥३१॥ ऐसें क्रमितां तये वनीं ॥ मार्गस्थ दंपत्यें दोनी ॥ ब्राह्मण जातां मार्ग क्रमुनी ॥ देखिला राक्षस भयासुर ॥ ३२ ॥ येऊनि धरी ब्राह्मणासी ॥ व्याघ्र जैसा पशूसी ॥ घेऊनि गेला भक्षावयासी ॥ विप्रस्त्री समागमें ॥३३॥ अतिशोक करी ब्राह्मणी ॥ जाऊनि लागे राक्षसचरणीं ॥ राखें मजला अहेवपणीं ॥ प्राणेश्वरातें सोडीं पितया ॥३४॥ न भक्षीं गा माझा पति ॥ माझी तयावरी अतिप्रीति ॥ मज भक्षीं गा म्हणे सुमति ॥ वल्लभातें सोडोनियां ॥३५॥ पतीविण राहतां नारी ॥ जन्म वृथाचि दगडापरी ॥ पहिलें मातें स्वीकारीं ॥ प्राण राखें पतीचे ॥ ३६ ॥ पती लावण्य पूर्ववैयेंसीं ॥ वेदशास्त्रपांरंगेसी ॥

१ सौभाग्ययुक्त. २ तरुण वय. ३ प्रवीण.

याचा प्राण जरी तूं रक्षिसी ॥ जगीं होईल तुज पुण्य ॥ ३७ ॥ कृपा करीं गा आम्हांवरी ॥ होईन तुझी कन्या कुमारी ॥ मज पुत्र होतील जरी ॥ नाम वाढवीन तुझें मी ॥३८॥ ऐसें नानापरीं देखा ॥ विप्रस्त्री करी महादुःखा ॥ बोल न मानोनि राक्षसें ऐका ॥ त्या ब्राह्मणातें भक्षिलें ॥ ३९ ॥ पतीतें भक्षिलें देखोनि ॥ शाप वदली ते ब्राह्मणी ॥ म्हणे राक्षसा एक कानीं ॥ शाप माझा निर्धारें ॥४०॥ तूं राजा सूर्यवंशी ॥ शापास्तव राक्षस झालासी ॥ पुढें मागुती राजा होसी ॥ द्वादश वर्षें क्रमोनि ॥ ४१ ॥ परी रमतां स्त्रियेसवें ॥ प्राण जाईल स्वभावें ॥ अनाथा भक्षिलें दुष्ट भावें ॥ दुरात्म्या तूं राक्षसा ॥ ४२ ॥ शाप देऊनि तया वेळीं ॥ पतीच्या अस्थि मिळवूनि जवळी ॥ काष्ठें घालूनियां प्रबळी ॥ अग्निप्रवेश केला तिनें ॥४३॥ ऐसें असतां राव देखा ॥ क्रमी बारा वर्षें निका ॥ पुनरपि राजा होऊन ऐका ॥

आला आपुले नगरासी ॥ ४४ ॥ विप्रस्त्रियेचें शापवचन ॥ स्त्रियेसी सांगितली खूण ॥ म्हणे संग करितां तत्क्षण ॥ मृत्यु असे आपणासी ॥ ४५ ॥ ऐकोनि पतीचें वचन ॥ मदयंती दुःख करी आपण ॥ मन करूनि निर्वाण ॥ त्यजावया प्राण पहातसे ॥ ४६ ॥ मदयंती म्हणे रायासी ॥ संतान नाहीं तुमचे वंशासी ॥ वनीं कष्टलां बारा वर्षी ॥ आपुलें कर्म न चुकेची ॥४७॥ ऐकोनि सतीचें वचन ॥ शोकें दाटला अतिगहन ॥ अश्रु आले नेत्रांतून ॥ काय करूं म्हणतसे ॥४८॥ मंत्रीवृद्धपुरोहितांसी ॥ बोलाविलें परियेसीं ॥ ब्रह्महत्या घडली आम्हांसी ॥ विमोचन होय कवणेंपरी ॥ ४९ ॥ मंत्रीवृद्धपुरोहित ॥ तयासी म्हणती ऐका मात ॥ तीर्थें आचरावीं समस्त ॥ तेणें पुनीत व्हाल तुम्ही ॥ ५० ॥ करोनि ऐसा विचार ॥ राजा निघे तीर्थां साचार ॥ सर्व तीर्थपरिकर ॥ विधिपूर्वक करीतसे ॥५१॥ ज्या ज्या तीर्था

१ एकाग्र. २ मुक्तता. ३ गोष्ट. ४ पवित्र. ५ तीर्थांचा समुदाय.

जाय आपण ॥ अनेक पुण्य करी जाण ॥ यज्ञादिक कर्म अन्नदान ॥ ब्राह्म-णादिकां देतसे ॥ ५२ ॥ ऐसीं नाना तीर्थें करीत ॥ परी ब्रह्महत्या सवेंचि येत ॥ अघोररूपीं असे दिसत ॥ कवणेंपरी न जायची ॥ ५३ ॥ कष्टोनि राजा बहुतांपरी ॥ निर्वाण होऊनि मनाभीतरीं ॥ हिंडत पातला मिथिला-पुरीं ॥ चिंताग्रस्त होवोनियां ॥ ५४ ॥ नगरा-बाह्यप्रदेशीं ॥ श्रमोनि राजा परियेसीं ॥ चिंता करी मानसीं ॥ वृक्षच्छाये बैसलासे ॥ ५५ ॥ ऋषेश्वरा-समवेत ॥ जैसा रुद्र प्रकाशित ॥ गौतम ऋषि अवचित ॥ तया स्थानासि पातला ॥५६॥ राजा देखोनि गौतमासी ॥ चरणीं लोळे संतोषी ॥ नमन करी साष्टांगेंसीं ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ५७ ॥ आश्वासूनि तये वेळीं ॥ गौतम पुसे करुणा बाहेळी ॥ क्षेमसमाधान सकळी ॥ पुसता झाला वृत्तांत ॥५८॥ काय झालें तुझें राज्य ॥ अरण्यवासाचें काय काज ॥ चिंताकुलित

१ भाकूं लागला.

मुखांबुज ॥ कवण कार्य घडलें असे ॥५९॥ ऐकोनि ऋषीचें वचन ॥ राजा सांगे विस्तारोन ॥ शाप जाहला ब्रह्मवचन ॥ ब्रह्महत्या घडली मज ॥६०॥ प्रायश्चित्तें सकळिक ॥ यज्ञादि कर्में धर्मादिक ॥ सुक्षेत्रें अपार तीर्थें देख ॥ आपण सकळ आचरलीं ॥ ६१ ॥ शमन न होय महादोष ॥ सवेंचि येत अघोर वेष ॥ व्रतें आचरलों कोटिश ॥ न जाय दोष सर्वथा ॥ ६२ ॥ आजिचेनि माझें सफळ जनन ॥ दर्शन झालें जी तुमचे चरण ॥ होतील माझे कष्ट निवारण ॥ म्हणोनि चरणां लागला ॥ ६३ ॥ ऐकोनि रायाचें वचन ॥ करुणासागर गौतम आपण ॥ म्हणे भय सांडीं गा निर्वाण वचन ॥ तारील शंकर मृत्युंजय ॥६४॥ तुझे पापनिवारणासी ॥ सांगेन तीर्थविशेषीं ॥ महापातक संहारावयासी ॥ गोकर्ण क्षेत्र असे भलें ॥ ६५ ॥ स्मरण करितां गोकर्णासी ॥ ब्रह्महत्यादि पाप नाशी ॥ तेथें ईश्वर सदा निवासी ॥ मृत्युं-जय सदाशिव ॥ ६६ ॥ जैसें कैलासाचें शिखर ॥ अथवा स्वर्धुनीमंदिर ॥

निश्चय वास कर्पूरगौर ॥ गोकर्णक्षेत्रीं परियेसा ॥ ६७ ॥ जैसी अंधकार-
रजनी[1] ॥ प्रकाशावया जेवीं अग्नि ॥ चंद्रोदय जरी होय निर्वाणीं ॥ तरी
सूर्यप्रकाशावीण गति नव्हे ॥ ६८ ॥ तैसें समस्त तीर्थानें ॥ पाप नच जाय
याचि कारणें ॥ सूर्योदयीं तमहरणें ॥ तैसें गोकर्णदर्शनें होय ॥६९॥ सहस्र
ब्रह्महत्या जरी ॥ घडल्या असती या शरीरीं ॥ प्रवेश होतां गोकर्णक्षेत्रीं ॥
शुद्धात्मा होय परियेसा ॥ ७० ॥ रुद्रोपेंद्र[2]विरिंचि[3] देखा ॥ जाऊनि तया
स्थानीं ऐका ॥ तप केलें हा सकळिका ॥ कार्यसिद्धि होय त्यांप्रती ॥७१॥
भक्तिपूर्वक तया स्थानीं ॥ जप व्रत करिती जाणोनि ॥ फळ होय त्यां
लक्षगुणीं ॥ असे पुण्यक्षेत्र ऐसें ॥ ७२ ॥ जेथें ब्रह्मा विष्णु देखा ॥ इंद्रादि
देवां सकळिकां ॥ साध्य झालें तप ऐका ॥ यावेगळें काय सांगूं ॥ ७३ ॥
जाणा तो साक्षात् ईश्वर ॥ गोकर्णक्षेत्र कैलासपुर ॥ प्रतिष्ठा करी विघ्नेश्वर ॥

१ अंधःकारयुक्त रजनी, काळोखी रात. २ विष्णु. ३ ब्रह्मदेव.

विष्णुनिरोपें विनयार्थ ॥ ७४ ॥ समस्त देव तेथें येती ॥ पुण्यक्षेत्रीं वास करिती ॥ ब्रह्मा विष्णु इंद्रासहिती ॥ विश्वेदेव मरुद्गण ॥ ७५ ॥ चंद्र सूर्य वस्वादिक ॥ पूर्वद्वारीं राहिले ऐक ॥ प्रीति करी भक्तिपूर्वक ॥ बैसले असती तये स्थानीं ॥७६॥ अग्नि यम चित्रगुप्त ॥ एकादश रुद्र पितृदैवत ॥ दक्षिण-द्वारीं वास करित ॥ संतोषें राहिले असती ॥७७॥ वरुणासहित गंगा सकळी ॥ राहती पश्चिमद्वारस्थळीं ॥ प्रीति करी चंद्रमौळी ॥ तया सकळां परि-येसा ॥७८॥ कुबेर वायु भद्रकाळी ॥ मातृदेवता चंडी सकळी ॥ उत्तरवास त्रिकाळीं ॥ पूजा करिती महाबळेश्वराची ॥ ७९ ॥ चित्ररथादि विश्वावसु परियेसीं ॥ चित्रसेन गंधर्व सुरसी ॥ पूजा करिती सदाशिवासी ॥ सदा वसोनि तया ठायीं ॥८०॥ घृताची रंभा मेनका ॥ तिलोत्तमा उर्वशी ऐका ॥ नित्य नृत्य करिती देखा ॥ महाबळेश्वराचे सन्मुख ॥ ८१ ॥ वसिष्ठ कश्यप

१ चंद्र आहे मस्तकीं ज्याच्या असा शंकर.

कण्व ऋषि ॥ विश्वामित्र महातापसी ॥ भरद्वाज जैमिनी जाबाल ऋषि ॥ पूजा करिती सदा तेथें ॥८२॥ कृतयुगीं ब्रह्म-ऋषि ॥ आचार करिती महातापसी ॥ महाबळेश्वराचे भक्तीसी ॥ राहिले गोकर्णक्षेत्रांत ॥८३॥ मरीचि नारद अत्रि ऋषि ॥ दक्षादि ब्रह्म-ऋषि परियेसीं ॥ सनकादिक महातापसी ॥ उपनिषदार्थ उपासिती ॥८४॥ अनेक सिद्ध साध्य जाण ॥ मुनीश्वर अजिनधारण ॥ दंडधारी संन्यासी निर्गुण ॥ ब्रह्मचारी तेथें वसती ॥८५॥ त्वगस्थिमात्रशरीरेंसीं ॥ अनुष्ठिती महातापसी ॥ पूजा करिती भक्तींसीं ॥ चंद्रमौळीची परियेसा ॥८६॥ गंधर्वादि समस्त देव ॥ पितर सिद्ध अष्टवसव ॥ विद्याधर किंपुरुष सर्व ॥ सेवेसी जाती निरंतर ॥८७॥ गुह्यक किन्नर स्वर्गलोक ॥ शेषादि नाग तक्षक ॥ पिशाच वेताळ सकळिक ॥ जाती पूजेसी तया स्थानीं ॥ ८८ ॥ नाना शृंगार करूनि ॥ अनेक भूषणें विराजमानीं ॥

१ चर्म पांघरणारे. २ नुसती त्वचा व हाडेंच ज्यांच्या शरिरांत आहेत असे.

सूर्यशशी विमानीं ॥ व्रहनीं येती वळंघोनियां ॥८९॥ स्तोत्रें गायन करिती देखा ॥ नमिती नृत्य करिती अनेका ॥ पूजेकारणें येती सकळिका ॥ महाबळेश्वरलिंगासी ॥ ९० ॥ जे जे इच्छिती मनकामना ॥ पावती त्वरित निर्धारें जाणा ॥ समान नाहीं क्षेत्र गोकर्णा ॥ या ब्रह्मांडगोलकांत ॥९१॥ अगस्त्यादि सनत्कुमार ॥ प्रियव्रतादि राजकुमार ॥ अग्निदेवदानवादि येर ॥ वर लाधले सर्व तया ठायीं ॥ ९२ ॥ शिशुमारी भद्रकाळी ॥ पूजा करिती त्रिकाळीं ॥ नागातें गरुड न गिळी ॥ महाबळेश्वरदर्शनें ॥९३॥ रावणादि राक्षसकुळीं ॥ कुंभकर्ण येर सकळीं ॥ वर लाधले ये स्थळीं ॥ बिभीषण पूजीतसे ॥ ९४ ॥ ऐसें समस्त देवकुळ ॥ सिद्धदानवादि सकळ ॥ गोकर्ण-क्षेत्रा जाऊनि प्रबळ ॥ आराधिती नानापरी ॥ ९५ ॥ लिंग स्थापिती आपुले नामीं ॥ असे ख्याति तया नामीं ॥ वर लाधले अनेक कामीं ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥९६॥ ब्रह्मा विष्णु आपण देखा ॥ कार्तवीर्य विनायका ॥

आपुले नामीं लिंग देखा ॥ प्रतिष्ठा केली तये ठायीं ॥ ९७ ॥ धर्मक्षेत्रपाळादी ॥ दुर्गादेवीशक्तिवृंदीं[१] ॥ लिंग स्थापिलें आपुले नामीं ॥ ज्या गोकर्णक्षेत्रांत ॥ ९८ ॥ गोकर्णक्षेत्र असे गहन ॥ लिंग तीर्थें असंख्य जाण ॥ पदोपदीं असे निर्गुण ॥ ऐसें क्षेत्र अनुपम असे ॥९९॥ सांगों किती विस्तारोन ॥ असंख्यात तीर्थें जाण ॥ पाषाण समस्त लिंग खूण ॥ समस्त उदकें जाणावीं तीर्थें ॥ १०० ॥ कृतयुगीं महाबळेश्वर श्वेत[२] ॥ त्रेतायुगीं लोहित[३] ॥ द्वापारीं सुवर्णपीत[४] ॥ कलियुगीं कृष्णवर्ण जाहला ॥ १ ॥ सप्त पाताळ खोलावोन ॥ उभें असे लिंग आपण ॥ कलियुगीं मृदु होऊन ॥ दिसे सूक्ष्मरूपानें ॥ २ ॥ पश्चिम समुद्रतीरासी ॥ गोकर्णक्षेत्रविशेषीं ॥ ब्रह्महत्यादि पातकें नाशी ॥ काय आश्चर्य परियेसा ॥३॥ ब्रह्महत्यादि महापापें ॥ परदारादि[५] षट् पापें ॥ दुःशील दुराचारी पापें ॥ जाती गोकर्णदर्शनें ॥४॥ दर्शनमात्रें पुनीत होती ॥

१ समुदायांनीं. २ शुभ्र, पांढरा. ३ तांबडा, रक्त. ४ सोन्यासारखा पिवळा. ५ परस्त्रीगमन.

समस्त काम्यार्थ साधती ॥ अंतीं होय तयांसी गति ॥ गोकर्णलिंगदर्शनें ॥ ५ ॥ तये स्थानीं पुण्यदिवशीं ॥ जे जे अर्चिती भक्तींसीं ॥ तेचि जाणा रुद्रअंशी ॥ रायासी म्हणे गौतम ॥ ६ ॥ एखादे समयीं गोकर्णासी ॥ जाय भक्तीनें मानुषी ॥ पूजा करितां सदाशिवासी ॥ शिवपद निश्चयें पावे जाणा ॥७॥ आदित्य सोम बुधवारीं ॥ अमावास्यादि पर्वांभीतरीं ॥ स्नान करूनि समुद्रतीरीं ॥ दानधर्म करावा ॥ ८ ॥ शिवपूजा व्रत हवन ॥ जप ब्राह्मण-संतर्पण ॥ किंचित् करितां अनंत पुण्य ॥ गौतम म्हणे रायासी ॥ ९ ॥ व्यतिपातादि पर्वणीसी ॥ सूर्यसंक्रांतीचे दिवशीं ॥ महाप्रदोष त्रयोदशी ॥ पूजितां पुण्य अगण्य ॥१ १ ०॥ काय सांगों त्याचा महिमा ॥ निवाडा होय अखिल कर्मा ॥ ईश्वर भोळा अनंतमहिमा ॥ पूजनमात्रें तुष्टतसे ॥ ११ ॥ असित पक्ष माघमासीं ॥ शिवरात्री चतुर्दशीसी ॥ बिल्वपत्र वाहिलें यासी ॥

१ इच्छित हेतु. २ वद्य.

दुर्लभ असे त्रिभुवनांत ॥१२॥ ऐसें अनुपम स्थान असतां ॥ न जाती मूर्ख लोक ऐकतां ॥ शिवतीर्थ असे दुर्लभता ॥ नेणती मूढ बधिर जाणा ॥१३॥ उपोषणादि जागरण ॥ लिंग सन्निध गोकर्ण ॥ स्वर्गासि जावया सोपान- ॥ पद्धति असे परियेसा ॥ १४ ॥ ऐसे या गोकर्णस्थानासी ॥ जे जाती जन यात्रेसी ॥ चतुर्विध पुरुषार्थांसी ॥ लाधती लोक अवधारा ॥ १५ ॥ स्नान करूनि समस्त तीर्थीं ॥ महाबळेश्वरलिंगार्थीं ॥ पूजा करावी भक्त्यर्थीं ॥ पातकाव्यातिरिक्त होय जाणा ॥ १६ ॥ ऐशापरी गोकर्णमहिमा ॥ प्रकाश केला ऋषीं गौतमां ॥ राजा ऐकोनि अतिप्रेमां ॥ पुसता झाला ते वेळीं ॥१७॥ राजा म्हणे गौतमासी ॥ गोकर्णस्थान निरोपिलेंसी ॥ पूर्वीं पावला कोण यापासीं ॥ साक्ष झाली असेल ॥ १८ ॥ विस्तारोनि तें आम्हांसी ॥ सांगावें स्वामी करुणेंसीं ॥ म्हणोनि लागला चरणांसी ॥ अतिभक्तीं-

१ जिना.

करोनियां ॥१९॥ म्हणे गौतम तये वेळीं ॥ गोकर्णक्षेत्र महाबळी ॥ जाणों आम्ही बहुकाळीं ॥ अपार साक्षी देखिली असे ॥१२०॥ गेलों होतों आम्ही यात्रे ॥ देखिला दृष्टांत विचित्र ॥ आले होते तेथें जनमात्र ॥ यात्रारूपें करोनियां ॥२१॥ माध्यान्हकाळीं आम्ही तेथें ॥ बैसलों होतों वृक्षच्छायेतें ॥ दुरोनि देखिलें चांडाळीतें ॥ वृद्ध अंध महारोगी ॥ २२ ॥ शुष्कमुखी निराहारी ॥ कुष्ठ सर्वांगशरीरीं ॥ कृमि पडले अघोरी ॥ पूय शोणित दुर्गंधि ॥ २३ ॥ कुक्षिरोगी गंडमाळा ॥ कफें दाटला असे गळा ॥ दंतहीन अतिविव्हळा ॥ वस्त्र नाहीं परिधाना ॥२४॥ चंद्रसूर्यकिरण पडतां ॥ प्राण जाय कंठगता ॥ शौचव्याधी असे बहुता ॥ सर्वांगशूळ महादुःखी ॥ २५ ॥ विधवा आपण केशवपनीं ॥ दिसे जैशी कुपूयपणी ॥ क्षणक्षणा पडे धरणीं ॥ प्राणत्याग करूं पाहे ॥ २६ ॥ ऐशी अवस्था चांडाळीसी ॥ आली वृक्षच्छायेसी ॥

१ पू. २ रक्त. ३ वाईट, घाणेरडी.

देह टाकिला धरणीसी ॥ त्यजूं पाहे प्राण आपुला ॥ २७ ॥ प्राण त्यजितां तये वेळीं ॥ विमान उतरे तत्काळीं ॥ शिवदूत अतिबळी ॥ त्रिशूळ खट्वांग धरूनियां ॥२८॥ टंकायुध चंद्र भाळीं ॥ दिव्यकांति चंद्रासारखी केवळी ॥ किरीटकुंडलें मिरवलीं ॥ चतुर्वर्ग येणेंपरी ॥ २९ ॥ विमानीं सूर्यासारिखें तेज ॥ अतिविचित्र दिसे विराज ॥ आलें चांडाळियेकाज ॥ अपूर्व वर्तलें तये वेळीं ॥१३०॥ आम्हीं पुशिलें शिवदूतांसी ॥ आलेति कवण्या कार्यासी ॥ दूत म्हणती आम्हांसी ॥ न्यावया आलों चांडाळीतें ॥३१॥ ऐकोनि दूताचें वचन ॥ विस्मित झालें आमुचें मन ॥ पुनरपि केला त्यासी प्रश्न ॥ ऐक राया तूं एकचित्तें ॥ ३२ ॥ ऐशिया चांडाळी पापिणीसी ॥ कैसी योग्य विमानेंसी ॥ नेऊनियां श्वानासी ॥ सिंहासनीं कैसें योग्य ॥३३॥ या जन्मा-दारभ्य[1] इसी ॥ पापें पापसंग्रहासी ॥ ऐशी पापीण दुर्वृत्त इसी ॥ केवीं न्याल

१ जन्मापासून.

कैलासा ॥ ३४ ॥ नाहीं इसी शिवज्ञान ॥ न करीच हे तपसाधन ॥ दया सत्य कदा नेणे ॥ इसी कैसें न्याल तुम्ही ॥३५॥ पशुमांस आहार इसी ॥ सदा करी जीवहिंसी ॥ ऐशिया दुष्ट कुष्ठी पापिणीसी ॥ केविं नेतां स्वर्ग-भुवना ॥३६॥ अथवा कधीं शिवपूजन ॥ न करी पंचाक्षरीजपन[१] ॥ नाहीं केलें शिवस्मरण ॥ इसी कैसें न्याल तुम्ही ॥ ३७ ॥ शिवरात्रीं उपोषण ॥ नाहीं केलें पुण्यदान ॥ यज्ञयागादिक साधन ॥ नाहीं केलें इणें कधीं ॥३८॥ न करी स्नान पर्वकाळीं ॥ नेणे तीर्थ कवणे वेळीं ॥ अथवा व्रतादि सकळीं ॥ केलें नाहीं इणें कधीं ॥३९॥ सर्वांगीं पूय शोणित ॥ दुर्गंधी असे बहुत ॥ ऐशी चांडाळी दुर्वृत्त ॥ कैसी विमानीं बैसवाल ॥१४०॥ अर्चन जन्मांतरींचें म्हणा ॥ कुष्ठ सर्वांग तेंचि खुणा ॥ कृमि निघती मुखांतून ॥ पूर्वार्जित काय केलें ॥ ४१ ॥ ऐशी पापिणी दुराचारी ॥ केविं नेतां कैलासपुरीं ॥ योग्य

१ 'नमः शिवाय' या पांच अक्षरांच्या मंत्राचें.

नव्हे चराचरीं ॥ तुम्ही केविं न्याल इसी ॥ ४२ ॥ गौतम म्हणे रायासी ॥
ऐसें पुशिलें दूतांसी ॥ त्यांणीं सांगितला आम्हांसी ॥ आद्यंत तये चांडा-
ळाचा ॥ ४३ ॥ म्हणे गौतम ऋषेश्वर ॥ चांडाळीचें पूर्वापार ॥ सांगेन
तुम्हांस सविस्तर ॥ असे आश्चर्य परियेसा ॥४४॥ पूर्वीं इचें जन्मस्थान ॥
ब्राह्मणकन्या असे जाण ॥ सौमिनी नाम असे पूर्ण ॥ सोमबिंबासारखें
मुख ॥४५॥ अतिसुंदर रूप इसी ॥ उपवर जाहली पितृगृहासी ॥ न मिळे
वर तियेसी ॥ चिंता करिती मातापिता ॥४६॥ न मिळे वर सुंदर तिसी ॥
उन्मत्त जाहली दहा वरुषी ॥ मिळवूनि एक द्विजासी ॥ गृह्योक्तेंसीं लग्न
केलें ॥ ४७॥ विवाह झालियावरी ॥ होती तया पतीचे घरीं ॥ कवित्काळ
येणेंपरी ॥ होती नारी परियेसा ॥ ४८ ॥ वर्ततां असें पुढें देख ॥ तिचे
पतीस झालें दुःख ॥ पंचत्व पावला तात्काळिक ॥ विधिलेखेंकरूनियां ॥४९॥

१ चंद्र. २ गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधिप्रमाणें. ३ मरण.

ऐकोनि तिचे मातापिता ॥ कन्या आपुले घरा आणिती तत्त्वतां ॥ पतीचे दुःखें दुःखिता ॥ खेद करी ते नारी ॥ १५० ॥ अतिसुंदर पूर्ववयासी ॥ मदें व्याप्त प्रतिदिवसीं ॥ चंचळ होय मानसीं ॥ परपुरुषातें देखोनियां ॥५१॥ गुप्तरूपें क्वचित्काळीं ॥ जारकर्म करी ते बाळी ॥ प्रगट जाहलें तत्काळीं ॥ गौप्य नोहे पातक ॥ ५२ ॥ आपण विधवा असे नारी ॥ पूर्ववयासी अतिसुंदरी ॥ विषयीं प्रीति असे भारी ॥ स्थिर नोहे तिचें मन ॥ ५३ ॥ ऐसें तिचिया पातकासी ॥ विदित जाहलें सर्वांसी ॥ वोळीत केलें तियेसी ॥ मातापिताबंधुवर्गीं ॥ ५४ ॥ माता पिता बंधुजन ॥ तीतें त्यजिती निर्भर्त्सोन ॥ आपण प्रायश्चित्त घेऊन ॥ शुद्ध झाले परियेसा ॥ ५५ ॥ शंका होती पहिली तिसी ॥ निःशंक झाली व्यभिचारासी ॥ प्रगटरूप अहर्निशीं ॥ रमों लागली नगरांत ॥ ५६ ॥ तिये नगरीं एक वाणी ॥ रूपें होता अति-

१ तरुण वयाची. २ जातीबाहेर ( बहिष्कृत ). ३ अडचण.

लावण्यगुणी ॥ त्यासी तिणें पूर्ववयस देखोनि ॥ झाली त्याची कुलस्त्री ॥५७॥ तया शूद्राचिया घरीं ॥ वर्ततसे ते नारी ॥ ऐशी पापिणी दुराचारी ॥ कुळवैरीण बेचाळीस ॥ ५८ ॥ श्लोक ॥ स्त्रियः कामेन नश्यंति ब्राह्मणो हीनसेवया ॥ राजानो ब्रह्मदंडेन यतयो भोगसंग्रहात् ॥ ५९ ॥ टीका ॥ स्त्रिया नासती कामवेगें ॥ ब्राह्मण नासे हीन[1]सेवें ॥ राज्य जाय द्विजक्षोभें[2] ॥ यति[3] विषयसेवनें ॥१६०॥ शूद्रासवें अहर्निशीं ॥ रमत होती अतिहर्षी ॥ पुत्र जाहला तियेसी ॥ शूद्रगृहीं असतां ॥ ६१ ॥ नित्य मांस आहार तिसी ॥ मद्यपान उन्मत्तेसी ॥ होऊनि तया शूद्रमहिषी[4] ॥ होती पापिणी दुराचारी ॥ ६२ ॥ वर्ततां एके दिवसीं ॥ उन्मत्त होवोनि परियेसीं ॥ छेदिलें वांसरूं आहारासी ॥ मेषै[5] म्हणोनि पापिणीनें ॥६३॥ छेदोनि वत्स परियेसीं ॥ पाक केला विनयेंसीं ॥ शिर ठेविलें शिंकियासी ॥ दुसरे दिवशीं भक्षावया ॥ ६४ ॥

१ नीच लोकांच्या सेवेनें. २ ब्राह्मणांच्या शापानें. ३ संन्यासी. ४ मुख्य स्त्री. ५ मेंढा.

आपण भ्रमित मद्यपानीं ॥ जागृत जाहली अस्तमानीं ॥ वांसरूं पाहे जावोनि ॥ धेनू दोहावयालागीं ॥६५॥ वत्सस्थानीं असे मेष ॥ भ्रमित जाहली अतिक्लेश ॥ घरीं पाहातसे शिरास ॥ स्पष्ट दिसे वांसरूं ॥ ६६ ॥ अनुतप्त होवोनि तये वेळीं ॥ शिव शिव म्हणे चंद्रमौळी ॥ अज्ञानानें ऐशीं पापें घडलीं ॥ म्हणोनि चिंती दुरात्मिणी ॥ ६७ ॥ तया वत्सशिरासी ॥ निक्षेप[1] केला भूमीसी ॥ पति कोपेल म्हणोनि परियेसीं ॥ अस्थिचर्म निक्षेपिलें ॥६८॥ जाऊनि सांगे शेजार लोकां ॥ व्याघ्रें वत्स नेलें ऐका ॥ भक्षिलें म्हणोनि रडे देखा ॥ पतीपुढें येणेंपरी ॥ ६९ ॥ ऐसी कितीक दिवसांवरी ॥ नांदत होती शूद्राघरीं ॥ पंचत्व पावली ते नारी ॥ नेली दूतीं यमपुरा ॥ १७० ॥ घातली तियेसी नरकांत ॥ भोग भोगी अतिदुःखित ॥ पुनरपि जन्मा चांडाळी जात ॥ उपजली नारी परियेसा ॥ ७१ ॥ उपजतांचि जाहली

१ पुरून ठेवणें.

अंधळी ॥ विद्रूपवर्ण जैशी काजळी ॥ माता पिता क्वचित्काळीं ॥ प्रतिपाळिती मायामोहें ॥ ७२ ॥ उच्छिष्ट अन्न घालिती तोंडा ॥ स्वजन तयेचे अखंडा ॥ बाळपणें तयेसि विघडा ॥ पोसिताती येणेंपरी ॥७३॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ सर्वांग झालें कुष्ठवर्णी ॥ पंचत्व पावलीं पिताजननी ॥ दरिद्री झाली निराश्रय ॥ ७४ ॥ सर्वांग कुष्ठवर्णपीडित ॥ त्यजिती तियेसि स्वजन भ्रात ॥ भिक्षा मागोनि उदर भरित ॥ रक्षण करी शरीर आपुलें ॥ ७५ ॥ येणेंपरी चांडाळी ॥ वर्तत असे बहुककाळीं ॥ क्षुधेनें पीडित सर्वकाळीं ॥ आपण अंध कुष्ठ देहीं ॥ ७६ ॥ न मिळे तिसी वस्त्र अन्न ॥ दुःख करीत अतिगहन ॥ ऐसें तिचें पूर्वकर्म ॥ झाली वृद्ध अतिकष्टें ॥७७॥ भिक्षा मागे जनांसी ॥ मार्गीं पडोनि अहर्निशीं ॥ कधीं न भरे उदर तिसी ॥ दुःखें विलपे अपार ॥ ७८ ॥ व्याधि असे शरीरासी ॥ शोणित पूय परियेसीं ॥ दुर्गंधि येत असे महादोषी ॥ सर्वांग कुष्ठें गळतसे ॥ ७९ ॥ ऐसें वर्ततां

माघमासीं ॥ लोक निघाले यात्रेसी ॥ महास्थान गोकर्णासी ॥ कलत्रपुत्र-सहित देख ॥ १८० ॥ शिवरात्रीचे यात्रेसी ॥ येती लोक देशोदेशीं ॥ चतुर्वर्ण[1] आसपासीं ॥ हरुषें[2] येती परियेसा ॥८१॥ देशोदेशींचे राजे देखा ॥ हस्तीरथादिसहित ऐका ॥ येती समस्त भूमांडलिका ॥ महाबळेश्वरदर्शनासी ॥८२॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ येती यात्रेसी विनोद ॥ समारंभ वाद्य-नाद ॥ अमित[3] लोक परियेसा ॥ ८३ ॥ किती हांसती गायन करिती ॥ धावती नृत्य करीत येती ॥ शिवस्मरणें गर्जना करिती ॥ यात्राप्रसंगीं जन देखा ॥ ८४ ॥ ऐसी महाजनांसमवेत ॥ चांडाळी गेली तेथें त्वरित ॥ सवें भिक्षुक असती बहुत ॥ तयांसवें जात असे ॥८५॥ येणेंपरी गोकर्णासी ॥ चांडाळी पातली सायासीं ॥ करावलंबें महाजनांसी ॥ भिक्षा मागे करुणा-वचनें ॥८६॥ लोक जाती मार्गांत ॥ शयन करी आक्रंदत ॥ कर वोढूनि

१ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र हे चार. २ आनंदानें. ३ मोजतां येत नाहींत असे, पुष्कळ.

मागत ॥ महाजन लोकांसी ॥ ८७ ॥ पूर्वींची पापी आपण ॥ पीडत असें याचो कारण ॥ भिक्षा घाला क्षुधानिवारण ॥ म्हणोनि मागे सकळिकां ॥ ८८ ॥ नेणें कधींच वस्त्र प्रावरण¹ ॥ धुळींत लोळे आपण ॥ क्षुधाक्रांत होतसे मरण ॥ धर्म करा सकळांसी म्हणे ॥ ८९ ॥ सर्वांगीं रोगग्रस्त ॥ वस्त्रावीण बाधे शीत³ ॥ अक्ष⁴ नाहीं क्षुधाक्रांत ॥ धर्म करा सकळिक हो ॥ १९० ॥ पूर्वीं जन्मशतांतरीं ॥ नाहीं केलें पुण्य येरीं ॥ याचि कारणें पीडित भारी ॥ धर्म करा सकळिक ॥९१॥ येणेंपरी मागांत ॥ चांडाळी असे याचित ॥ ते दिवशीं असे शिवरात्रिव्रत ॥ कोणी न घाली भिक्षा तिसी ॥ ९२ ॥ येरी विव्हळे क्षुधाक्रांत ॥ जठराग्नि प्रदीप्त असे बहुत ॥ धर्म करा ऐसें म्हणत ॥ पडली मार्गांत तेधवां ॥ ९३ ॥ पूजेसि जाती सकळ जन ॥ त्यांतें मागे आक्रंदोन ॥ एक म्हणती हांसोन ॥ उपवास आजि अन्न कैंचें ॥९४॥

१ आच्छादन. २ मरणोन्मुख. ३ थंडी. ४ डोळे.

हातीं होती बिल्वमंजरी ॥ घाली ती तियेच्या करीं ॥ आघ्राणोनि पाहे येरी ॥ भक्षणवस्तु नव्हे म्हणे ॥९५॥ कोपोनि टाकी ते अवसरीं ॥ जाऊनि पडली लिंगावरी ॥ रात्री असतां अंधारी ॥ अलभ्य पूजा घडली देखा ॥ ९६ ॥ कोणी न घालिती भिक्षा तिसी ॥ उपास घडला ते दिवशीं ॥ पूजा पावली त्या शिवासी ॥ बिल्वमंजरी शिवमस्तकीं ॥९७॥ इतुकें पुण्य घडलें तिसी ॥ प्रयत्न न करितां परियेसीं ॥ तुष्टला ईश्वर हर्षी ॥ भवार्णवा कुंडें केलें ॥ ९८ ॥ येणेंपरी चांडाळीसी ॥ उपवास घडला अनायासीं ॥ तेथूनि उठली दुसरे दिवसीं ॥ भिक्षा मागावयाकारणें ॥ ९९ ॥ पहिलीच कुष्ठरोगी असे ॥ अशक्त झाली उपवासें ॥ चक्षुहीन मार्ग न दिसे ॥ जात असे मंदमंद ॥ २०० ॥ सूर्यरश्मींकरूनि तिसी ॥ दुःख होय आसमासीं ॥ पूर्वार्जित कर्में ऐसीं ॥ म्हणती दूत गौतमातें ॥१॥ ऐसी चांडाळी कष्टत ॥

१ वास घेऊन. २ डबकें. ३ सूर्याचे किरणांनीं. ४ सगळीकडून.

आली वृक्षच्छायेसमीपत ॥ त्यजूं पाहे प्राण त्वरित ॥ म्हणोनियां आलों धांवोनि ॥२॥ पुण्य घडलें इसी आजी ॥ उपवास शिवतिथीकाजीं ॥ बिल्वपत्रें ईश्वर पूजी ॥ घडलें रात्रीं जागरण ॥ ३ ॥ तया पुण्येंकरूनि इचें ॥ पाप गेलें शतजन्मींचें ॥ हें प्रीतिपात्र ईश्वराचें ॥ म्हणोनि पाठविलें आम्हांसी ॥४॥ ऐसें म्हणती शिवदूत ॥ तियेवरी शिंपुनियां अमृत ॥ दिव्यदेह पावूनि त्वरित ॥ गेली ऐका शिवलोका ॥५॥ ऐसें गोकर्ण असे स्थान ॥ गौतम सांगे विस्तारोन ॥ रायासि म्हणे तूं निघोन ॥ त्वरित जाईं गोकर्णासी ॥ ६ ॥ जातांचि तुझीं पापें जाती ॥ इह सौख्य परत्र उत्तम गति ॥ संशय न धरीं गा चित्तीं ॥ म्हणोनि निरोपि रायासी ॥ ७ ॥ परिसोनि गौतमाचें वचन ॥ राजा मनीं दृढ संतोषोन ॥ त्वरित पावला क्षेत्र गोकर्ण ॥ पापावेगळा जाहला तो ॥ ८ ॥ ऐसें पुण्यपावन स्थान ॥ म्हणोनि राहिले श्रीपाद आपण ॥ सिद्ध म्हणे ऐक कथन ॥ नामधारका एकचित्तें ॥ ९ ॥

म्हणोनि सरस्वतीगंगाधरू ॥ सांगे गुरुचरित्र-विस्तारू ॥ श्रोते करूनि निर्धारू ॥ एकचित्तें परियेसा ॥२१०॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे गोकर्णमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ २१० ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ गोकर्णमहिमा निरोपिलासी ॥ श्रीगुरु राहिले किती दिवसीं ॥ वर्तलें पुढें काय सांग ॥ १ ॥ श्रीगुरुमूर्ति कृपासिंधु ॥ माझे मनीं लागला वेधू ॥ चरित्र ऐकतां महानंदू ॥ अतिउल्हास होतसे ॥२॥ परिसोनि शिष्याचें वचन ॥ संतोषे सिद्ध अतिगहन ॥ सांगता झाला विस्तारोन ॥ श्रोते तुम्ही अवधारा ॥ ३ ॥ गोकर्णक्षेत्रीं श्रीपाद यति ॥ राहिले वर्षें तीन गुप्तीं ॥ तेथोनि श्रीगिरिपर्वता येती ॥ लोकानुग्रहाकारणें ॥४॥ जयाचें करितां चरणदर्शन ॥ समस्त तीर्थांसमान जाण ॥ 'चरणं पवित्रं विततं पुराणं' ॥ वेदश्रुति ऐसें बोलतसे ॥ ५ ॥ समस्त तीर्थें गुरुचरणीं ॥ तो कां हिंडे तीर्थभवनीं ॥ लोकानुग्रहालागुनी ॥ जात असे परियेसा ॥ ६ ॥ मास चारी क्रमोनि तेथें ॥ आले निवृत्तिसंगमातें ॥ दर्शन देती साधुभक्तांतें ॥ पातले तया कुरवपुरा ॥ ७ ॥ कुरवपुर

१ गुप्तरूपानें.

महाक्षेत्र ॥ कृष्णा-गंगा वाहे नीरं ॥ माहिमा तेथील सांगतां अपार ॥ भू-मंडळांत दुर्लभ ॥८॥ तेथील माहिमा सांगतां ॥ विस्तार होईल बहुत कथा ॥ पुढें असे चरित्र अमृता ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ९ ॥ श्रीपाद राहिले कुरवपुरीं ॥ ख्याति राहिली भूमीवरी ॥ प्रगटे महिमा अपरंपारीं ॥ सांगतां विस्तार असे देखा ॥१०॥ जे जन भजती भक्तींसीं ॥ सौख्य पावती अप्र-यासीं ॥ कन्या पुत्र लक्ष्मीसी ॥ चिंतिलें फळ पावती ॥११॥ समस्त महिमा सांगावयासी ॥ विस्तार होईल बहुवसीं ॥ नामधारका स्वस्थ परियेसीं ॥ सांगेन किंचित तुज आतां ॥ १२ ॥ पुढें अवतार व्हावया गति ॥ सांगेन ऐका एकचित्तीं ॥ श्रीपाद कुरवपुरा असती ॥ कार्यकारण-मनुष्यदेही ॥१३॥ अवतार व्हावयाचें कारण ॥ सांगेन त्याचें पूर्वकथन ॥ वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण ॥ होता तया ग्रामीं ॥ १४ ॥ त्याची भार्या होती देखा ॥ नाम

१ उदक.

तियेचें अंबिका ॥ सुशील आचार पतिसेवका ॥ महापुण्य सती देखा ॥१५॥ तियेसी पुत्र होऊनि मरती ॥ पूर्वकर्मफळ अर्जिती ॥ अनेक तीर्थें आचरती ॥ तिणें केलीं परियेसा ॥ १६ ॥ ऐसें असतां जे होणार गति ॥ पुत्र जाहला मंदमति ॥ माता स्नेह करी भक्तीं ॥ अपूर्व आपणासी म्हणोनि ॥ १७ ॥ वर्धतां मातापित्याघरीं ॥ विप्रात्मज वाढला प्रीतिकरीं ॥ व्रतबंध[1] करिती कुळाचारीं ॥ वेदाभ्यास करावया ॥१८॥ विद्या नये तया कुमरा ॥ मंदमति अज्ञान बहिरा ॥ चिंता वर्ते त्या द्विजवरा ॥ म्हणे पुत्र मंदमति ॥ १९ ॥ अनेक देव आराधोनि ॥ पुत्र लाधलों कष्टोनि ॥ प्राचीन कर्म न सुटे म्हणोनि ॥ चिंता करी अहोरात्र ॥२०॥ अनेक प्रकारें शिकवी त्यासी ॥ ताडन करी बहुवसीं ॥ होतसे दुःख जननीसी ॥ वर्जी[2] आपुले पतीतें ॥२१॥ पतीसी म्हणे ते नारी ॥ पुत्र नाहींत आम्हां घरीं ॥ कष्ट करोनि नानापरी ॥

१ मौंजीबंधन, मुंज. २ निषेध करी.

पोसिलें एका बाळकासी ॥२२॥ विद्या न येचि वेद त्यासी ॥ वायां मारून कां कष्टसी ॥ प्राचीन कर्म न सुटे त्यासी ॥ कीं मूढ होऊनि उपजावें ॥२३॥ आतां जरी तुम्ही यासी ॥ ताडन कराल अहर्निशीं ॥ प्राण त्यजीन मी भरंवसीं ॥ म्हणोनि विनवी पतीतें ॥ २४ ॥ स्त्रियेचें वचन ऐकोनि ॥ विप्र राहिला निश्चिंत मनीं ॥ ऐसा कांहीं काळ क्रमोनि ॥ होतीं तया ग्रामांत ॥ २५ ॥ वर्ततां ऐसें तया स्थानीं ॥ विप्र पडला असमाधानीं ॥ दैववशें-करूनि ॥ पंचत्व पावला परियेसा ॥२६॥ मग पुत्रासहित ते नारी ॥ होती तेथें कुरवपुरीं ॥ याचूनि आपुलें उदर भरी ॥ येणेंपरी जीवित्व रक्षी ॥२७॥ विप्रस्त्रियेचा पुत्र देखा ॥ विवाहायोग्य झाला निका ॥ निंदा करिती सकळिका ॥ मतिहीन म्हणोनियां ॥ २८ ॥ कन्या न देती तयासी कोणी ॥ म्हणती काष्ठें वाहतो का पाणी ॥ समस्त म्हणती असे दूषणी ॥ उदर भरी

१ उगाच. २ दुखण्यांत. ३ भीक मागून.

येणें विद्यें ॥२९॥ समस्त लोक म्हणती त्यासी ॥ तूं दगडापरी व्यर्थ जन्मलासी ॥ लांछन लाविलें वंशासी ॥ अरे मूर्खा कुळनाशका ॥३०॥ तुझ्या पितयाचा आचार ॥ ख्याति असे चारी राष्ट्र ॥ जाणे धर्म वेद शास्त्र ॥ त्याचे पोटीं अवतरलासी ॥३१॥ बोल आणिलासी तुवां पितरांसी ॥ घातलें तया अधोगतीसी ॥ भिक्षा मागोनि उदर भरिसी ॥ लाज कैसी तुज न वाटे ॥ ३२ ॥ जन्मोनियां संसारीं ॥ काय व्यर्थ पशूचिये परी ॥ अथवा गंगेंत प्रवेश करीं ॥ काय जन्मोनि सार्थक ॥३३॥ ऐसें ऐकोनि ब्रह्मचारी ॥ दुःख करीत नाना प्रकारीं ॥ मातेसि म्हणे ते अवसरीं ॥ प्राण त्यागीन मी आतां ॥३४॥ निंदा करिती सर्वही मज ॥ असोनि देह कवण काज ॥ पोसूं न शके माते तुज ॥ जाईन अरण्यवासासी ॥ ३५ ॥ ऐकोनि पुत्राचें वचन ॥ माता करी चिंता गहन ॥ शोकदुःखेंकरून ॥ विलाप करी ते नारी ॥ ३६ ॥ माता सुत दुःख करीत ॥ गेलीं गंगाप्रवाहांत ॥ तेथें देखिले

जगदुद्धरित ॥ श्रीपाद योगी स्नान करितां ॥ ३७ ॥ जाऊनि दोघें लागती चरणीं ॥ विनविताती कर जोडुनी ॥ वासना असे आमुचे मनीं ॥ प्राण त्यजावा गंगेंत ॥ ३८ ॥ निरोप द्यावा जी आम्हांसी ॥ सद्गति व्हावया कारणासी ॥ आत्महत्या महादोषी ॥ म्हणोनि विनवितों कृपासिंधु ॥ ३९ ॥ ऐकोनि विप्रसतीचें वचन ॥ पुसती श्रीपाद कृपायमान ॥ कां संकटीं तुमचें मन ॥ त्यजितां प्राण काय निमित्त ॥ ४० ॥ विप्रस्त्री तया वेळां ॥ सांगतसे दुःखा सकळा ॥ म्हणे स्वामी भक्तवत्सला ॥ तारावें आम्हां बाळकांतें ॥ ४१ ॥ पुत्राविण कष्ट भारी ॥ अनेक तीर्थें पादचारी ॥ केलें व्रत पूजा जरी ॥ सकळ देव आराधिले ॥ ४२ ॥ व्रतें उपवास सांगूं किती ॥ करितें झालें अपरिमिती ॥ झाला पुत्र हा दुर्मति ॥ निंदा करिती सकळ जन ॥ ४३ ॥ वेदशास्त्रसंपन्न ॥ पति माझा होता ब्राह्मण ॥ त्याचिये पोटीं झाला हीन ॥ मंदमति दुरात्मा हा ॥ ४४ ॥ कृपा करीं गा श्रीपाद यति ॥ जन्मोजन्मीं



[अ० ८] जावोनी·दोघे लागती चरणां । विनवितांतां कर जोडोनी । वासना असे अमुचे मनीं । प्राण त्यजावा गंगेंत ॥ ३८ ॥

देवगति ॥ पुत्र न व्हावा मंदमति ॥ ऐसा प्रकार सांगावा ॥ ४५ ॥ कृपासागर दैन्यहरण ॥ म्हणोनि धरिले तुझे चरण ॥ शरणागताचें करावया रक्षण ॥ आलासि आजि कृपासिंधु ॥ ४६ ॥ जन्मोनियां संसारीं ॥ कष्ट केले नानापरी ॥ न देखेंचि सौख्यंकुसरी ॥ परी जाहले पुत्र न राहती ॥४७॥ वांचोनियां हा एक सुत ॥ शेळीचे गळां स्तन लोंबत ॥ वृथा जन्मला म्हणत ॥ विनवीतसे श्रीगुरूसी ॥ ४८ ॥ देवा आतां ऐसें करणें ॥ पुढील जन्मीं मनुष्यपणें ॥ पूज्यमान पुत्र पावणें ॥ जैसा पूज्य तूं जगत्रयासी ॥४९॥ सकळ लोक ज्यासि वंदिती ॥ ऐसा पुत्र व्हावा म्हणे ती ॥ उपाय सांगा श्रीगुरु यती ॥ म्हणोनि चरणा लागली ॥५०॥ त्याचेनि मातें उद्धारगति ॥ मागुती न होय पुनरावृत्ति ॥ पितरां सकळां स्वर्गप्राप्ति ॥ लाधे ऐसें निरोपावें ॥ ५१ ॥ वासना असे माझे मनीं ॥ पुत्र व्हावा ब्रह्मज्ञानी ॥

१ सौख्याचा लवलेश. २ सर्व लोकांस मान्य होईल असा. ३ पुनर्जन्म.

बाळपणींच पाहों नयनीं ॥ पूज्यमान समस्तांसी ॥ ५२ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ सांगती कृपा भक्ति पाहोन ॥ करीं वो ईश्वरआराधन ॥ पुत्र होईल श्रीहरीऐसा ॥ ५३ ॥ गौळियाचे घरीं देखा ॥ कृष्ण उपजला कारणिका ॥ व्रत केलें गौळीं ऐका ॥ ईश्वराची आराधना ॥ ५४ ॥ तैसा तूं आराधीं ईश्वर ॥ पुत्र पावशील हा निर्धार ॥ तुझा मनोरथ साचार ॥ पावेल सिद्धि श्रीपाद म्हणती ॥५५॥ विप्रस्त्री म्हणे ते वेळीं ॥ कैसें व्रत आचरले गौळी ॥ कैसा पूजिला चंद्रमौळी ॥ विस्तारावें मजप्रती ॥ ५६ ॥ तैसेंच व्रत करीन आपण ॥ म्हणोनि धरी सद्गुरुचरण ॥ कृपामूर्ति सद्गुरु जाण ॥ सांगता झाला ते वेळीं ॥ ५७ ॥ म्हणती श्रीपाद यति तियेसी ॥ ईश्वर पूजीं हो प्रदोषीं ॥ मंदवारीं तूं विशेषीं ॥ पूजा करीं भक्तीनें ॥ ५८ ॥ पूजा करी जे गौळणी ॥ विस्तार असे स्कंदपुराणीं ॥ कथा सांगेन ऐक कानीं ॥

१ कांहीं एका कारणानें.

म्हणती श्रीगुरु तियेसी ॥५९॥ ऐकोन श्रीगुरूचे वचना ॥ संतोषली विप्रांगना ॥ पुढतीं घाली लोटांगणा ॥ तया श्रीपाद श्रीगुरूप्रती ॥६०॥ विप्रस्त्री म्हणे स्वामीसी ॥ अभिनव मातें निरोपिलेंसी ॥ देखतां पूजा प्रदोषीं ॥ पुत्र झाला कृष्णाऐसा ॥६१॥ आपण केलिया पूजा जरी ॥ फळ पावेन निर्धारीं ॥ पूर्वी झालें कवणें परी ॥ विस्तारावें दातारा ॥ ६२ ॥ श्रीगुरु सांगती तियेसी ॥ सांगेन ऐक एकचित्तेंसीं ॥ उज्जनी नाम नगरीसी ॥ जाहलें विचित्र परियेसा ॥६३॥ तया नगरीं चंद्रसेन ॥ राजा होता धर्मपरायण ॥ त्याचा सखा असे प्राण ॥ मणिभद्र नामें परियेसा ॥६४॥ सदा ईश्वरभक्ति करी ॥ नाना प्रकारें अपरंपारीं ॥ भोळा देव प्रसन्न करी ॥ दिधला चिंतामणि एक ॥६५॥ कोटिसूर्यांचा प्रकाश ॥ माणिक शोभे महासरस ॥ कंठीं घालितां महाहर्ष ॥ तया मणिभद्ररायासी ॥६६॥ तया मण्याचें लक्षण ॥ सुवर्ण होय

१ पुन्हा. २ चमत्कारिक. ३ सांगितलें. ४ महादेव.

लोह पाषाण ॥ तेज फांकलें ज्यावरी जाण ॥ तें कनक होय परियेसा ॥६७॥ जें जें चिंतीत मानसीं ॥ तें तें पावत त्वरितेंसीं ॥ ऐशी ख्याति माणिकासी ॥ समस्त राजे कांक्षा करिती ॥ ६८ ॥ इष्टत्वें मागती किती एक ॥ मागों पाठविती तें माणिक ॥ बलात्कारें इच्छिती एक ॥ राजे वांछिती परियेसा ॥६९॥ म्हणती विक्रय करूनि देखा ॥ आपणां द्यावें तें माणिका ॥ जरी न देशी स्वाभाविका ॥ तरी युद्धालागीं येऊं म्हणती ॥ ७० ॥ राजे समस्त मिळोनि ॥ पातले नगरातें उज्जनी ॥ अपार सैन्य मिळवूनि ॥ वेढिलें तया नगरासी ॥७१॥ ते दिवशीं शनिवार त्रयोदशी ॥ राजा बैसला पूजनासी ॥ शंका न धरितां मानसीं ॥ एकचित्तें पूजीतसे ॥ ७२ ॥ महाबळेश्वरलिंगासी ॥ पूजा करी तो राजा हर्षी ॥ गौळियाचा कुमर पहायासी ॥ आला तया शिवालया ॥ ७३ ॥ पूजा पाहोनि शिवाची ॥ मुलें म्हणती

१ सुवर्ण, सोनें. २ इच्छा. ३ समजुतीनें.

गौळियांचीं ॥ खेळूं चला आम्ही असेची ॥ लिंग करूनि पूजूं आतां ॥७४॥ म्हणोनि विनोदेंकरूनि ॥ आपुले गृहासन्निधानीं ॥ एकवटोनि पाषाणीं ॥ कल्पिलें तेथें शिवालय ॥ ७५ ॥ पाषाणाचें करूनि लिंग ॥ पूजा करीत बाळकें चांग ॥ नानापरीची पत्री सांग ॥ कल्पिली तेथें पूजेसी ॥ ७६ ॥ षोडशोपचारें पूजा करिती ॥ उदक नैवेद्य समर्पिती ॥ ऐसें कौतुकें खेळती ॥ गोपकुमार तये वेळीं ॥७७॥ गोपिका स्त्रिया येउनी ॥ पुत्रांतें नेती बोलावुनी ॥ भोजनाकारणें म्हणोनि ॥ गेले सकळही बाळक ॥ ७८ ॥ त्यांतील एक गोपीसुत ॥ लिंगभुवन न सोडित ॥ त्याची माता जवळी येत ॥ मारी आपुले पुत्रासी ॥ ७९ ॥ म्हणे कुमारा भोजनासी ॥ चाल गृहासी झाली निशी ॥ कांहीं केल्या न जाय परियेसीं ॥ तो गोपकुमारक ॥८०॥ कोपेंकरूनि ते गौळिणी ॥ मोडी पूजा-खेळ अंगणीं ॥ पाषाण दूर टाकुनी ॥

१ चांगली. २ ज्या ठिकाणीं लिंगाची स्थापना केली होती तें.

गेली आपुले सदनासी ॥ ८१ ॥ पूजा मोडितां तो बाळक ॥ प्रलाप करी अनेक ॥ मूर्च्छा येऊनि क्षणेक ॥ पडिला भूमीं अवधारा ॥ ८२ ॥ लय लावूनि लिंगस्थानीं ॥ प्राण त्यजूं पाहे निर्वाणीं ॥ प्रसन्न झाला शूलपाणी ॥ तया गोपसुताकारणें ॥८३॥ शिवालय रत्नखचित ॥ सूर्यासमान प्रभावंत ॥ लिंग दिसे रत्नखचित ॥ जागृत झाला तो बाळ ॥८४॥ निजरूप धरी गौरीरमण ॥ उठवी बाळ करीं धरून ॥ वर माग म्हणे मी झालों प्रसन्न ॥ देईन जें वांछिसी तें ॥ ८५ ॥ बाळकें नमिलें ईश्वरासी ॥ कोप न करावा मातेसी ॥ पूजा बिघडली तव प्रदोषीं ॥ क्षमा करणें म्हणतसे ॥८६॥ ईश्वर भोळा चक्रवर्ती ॥ वर दिधला बहुप्रीतीं ॥ प्रदोषसमयीं पूजा देखती ॥ गौळिणी होय देवजननी[1] ॥ ८७ ॥ तिचे पोटीं होईल सुत ॥ तोचि विष्णु अवतार ख्यात ॥ न करीं पूजा पहिली म्हणत ॥ पोषीं आपुले पुत्रासी ॥८८॥

---

१ देवाची ( कृष्णाची ).

जें जं मानसीं तूं इच्छिसी ॥ पावेल तें तें घरीं मानसीं ॥ अखिल सौख्य तुझिया वंशासी ॥ पुत्रपौत्रेंसीं नांदसील ॥ ८९ ॥ प्रसन्न होवोनि गिरिजा-पती ॥ गेले लिंगालयीं गुप्ती ॥ लिंग राहिलें रत्नखचिती ॥ गौळियाघरीं याचिपरी ॥ ९० ॥ कोटिसूर्यप्रकाश ॥ शिवालय दिसे अति सुरस ॥ लोक म्हणती काय प्रकाश ॥ उदय झाला दिनकरा ॥ ९१ ॥ आले होते पर-राष्ट्र-राजे ॥ विस्मय करिती चोंजें ॥ सांडूनि द्वेष बोलती सहजें ॥ भेटूं म्हणती रायासी ॥ ९२ ॥ पाहें या पवित्र नगरांत ॥ सूर्य झाला असे उ-दित ॥ राजा असे बहु पुण्यवंत ॥ ऐसियासीं विरोधं न करावा ॥ ९३ ॥ म्हणोनि पाठविती सेवकासी ॥ भेटूं म्हणती रायासी ॥ राजा बोलवी तयांसी ॥ आपुले गृहासी नगरांत ॥ ९४ ॥ इतुकें होतां ते अवसरीं ॥ राजा पुसतसे प्रीतीकरीं ॥ रात्री असतां अंधकारी ॥ उदय पावला केवीं

१ नाहींसे झाले. २ कौतुकानें. ३ द्वेष.

सूर्य ॥ ९५ ॥ राजा चंद्रसेनसहित ॥ पाहावया येती कौतुकार्थ ॥ दिसे विचित्र रत्नखचित ॥ शिवालय अनुपम[1] ॥ ९६ ॥ येणेंचि परी गौळ्याचें सदन[2] ॥ अतिरम्य विराजमान ॥ पुसता झाला आपण ॥ तया गौळीकुमारकातें ॥ ९७ ॥ सांगितला सकळ वृत्तांत ॥ संतोष करिती राजे समस्त ॥ गौळियांत राजा तूं म्हणत ॥ देती नानादेशसंपदा ॥ ९८ ॥ निघोनि गेले राजे सकळ ॥ राहिला चंद्रसेन निर्मळ ॥ शनिप्रदोष पूजा सफळ ॥ भय कैंचें तया राजा ॥ ९९ ॥ गौळीकुमर येऊनि घरा ॥ सांगे माते सविस्तरा ॥ पुढें येईल तुझ्या उदरा ॥ नारायण अवतरोनि ॥ १०० ॥ ऐसा ईश्वरें दिधला वर ॥ संशय न करीं तूं निर्धार ॥ संतोषला कर्पूरगौर ॥ देखिली पूजा प्रदोषाची ॥ १ ॥ मोडिली पूजा म्हणोनि ॥ म्यां विनविला शूळपाणी[3] ॥ क्षमा करूनि घेतलें म्हणोनि ॥ सांगे वृत्तांत मातेसी ॥ २ ॥

१ उपमारहित, अद्वितीय. २ घर. ३ त्रिशूल हातीं घेणारा.

ऐसा ईश्वर प्रसन्न झाला ॥ प्रदोषपूजनें तया फळला ॥ श्रीपाद सांगती तया वेळा ॥ विप्रस्त्रियेकारणें ॥ ३ ॥ तुझे मनीं असेल जरी ॥ होईल पुत्र मंजसरी ॥ संशय सांडूनि निर्धारीं ॥ शनिप्रदोषीं पूजीं शंभु ॥ ४ ॥ ऐसें म्हणोनि श्रीपाददेव ॥ चक्रवर्ती भोळा शिव ॥ विप्रस्त्रियेचा पाहोनि भाव ॥ प्रसन्न होत तया वेळीं ॥ ५ ॥ बोलावूनि तिचे कुमारासी ॥ हस्त ठेविती मस्तकेसीं ॥ ज्ञान जाहलें तत्काळेंसीं ॥ त्रिवेदी झाला तो ब्राह्मण ॥ ६ ॥ वेदशास्त्रादि तर्कभाषा ॥ म्हणता झाला अतिप्रकाशा ॥ विस्मय झाला असे सहसा ॥ विप्र म्हणती आश्चर्य ॥ ७ ॥ विस्मय करोनि विप्रवनिता ॥ म्हणे ईश्वर हाचि निश्चिता ॥ कार्याकारणें अवतार होता ॥ आला नरदेह धरोनि ॥ ८ ॥ पूर्वजन्मींचें पुण्यार्जित ॥ जोडला आम्हां हा निश्चित ॥ भेटला असे श्रीगुरुनाथ ॥ म्हणोनि नमिती क्षणोक्षणां ॥ ९ ॥ म्हणे ईश्वर

१ माझ्यासारखा. २ भाष्य. ३ ब्राह्मणाची बायको.

तूंचि होसी ॥ पूजा करीन तुझी मी प्रदोषीं ॥ मिथ्या नोहे तुझे वाक्यासी ॥ पुत्र व्हावा तुजऐसा ॥११०॥ ऐसा निश्चय करोनि ॥ पूजा करिती नित्य येऊनि ॥ प्रदोषपूजा अतिगहनी ॥ करी श्रीपादरायासी ॥ ११ ॥ पुत्र तिचा झाला ज्ञानी ॥ वेदशास्त्रार्थसंपन्नी ॥ पूज्य जाहला सर्वांहूनी ॥ ब्रह्मवृंद[1] मानित ॥ १२ ॥ विवाह झाला मग यासी ॥ पुत्रपौत्रीं नांदे हर्षीं ॥ श्रीगुरुकृपा होय ज्यासी ॥ ऐसें होय अवधारा ॥ १३ ॥ ऐसा श्रीगुरु कृपावंत ॥ भक्तजना असे संरक्षित ॥ ऐक शिष्या एकचित्त ॥ नामधारका श्रीमता ॥ १४ ॥ नामधारक भक्तासी ॥ सांगे सिद्ध विस्तारेंसीं ॥ परियेसा समस्त अहर्निशीं ॥ म्हणे सरस्वती गंगाधरू ॥ ११५ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे

[1] ब्राह्मणसमुदाय.

प्रदोषव्रतमाहात्म्यकथनं नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥
ओंवीसंख्या ॥ ॥ ११५ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ऐकोनि सिद्धाचें वचन ॥ नामधारक करी नमन ॥ विनवीत कर जोडून ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ १ ॥ श्रीपाद कुरवपुरीं असतां ॥ पुढें वर्तली कैसी कथा ॥ विस्तारूनि सांग आतां ॥ कृपामूर्ति दातारा ॥ २ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें कथा अपूर्व देखा ॥ तया ग्रामीं रंजक[1] एका ॥ सेवक झाला श्रीगुरूचा ॥ ३ ॥ भक्तवत्सल श्रीगुरु- राव ॥ जाणोनि शिष्याचा भाव ॥ विस्तार करोनि भक्तीस्तव ॥ निरोपित गुरुचरित्र ॥ ४ ॥ नित्य श्रीपाद गंगेसी येती ॥ विधिपूर्वक स्नान करिती॥ लोकवेव्हार[2] संपादिती ॥ त्रयमूर्ति आपण ॥ ५ ॥ ज्याचें दर्शन गंगास्नान ॥ त्यासी कायसें आचरण ॥ लोकानुग्रहाकारण ॥ स्नान करीत परियेसा ॥ ६ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ श्रीपाद यति येती स्नानासी ॥ गंगा वहात असे दशदिशीं ॥ मध्यें असती आपण ॥ ७ ॥ तया गंगातटाकांत[3] ॥ रजक असे

१ परीट. २ लोकरीतीप्रमाणें संध्या, पूजा वगैरे. ३ तीरावर, कांठावर.

वस्त्रें धूत ॥ नित्य येऊनि असे नमित ॥ श्रीपादगुरुमूर्तीसी ॥ ८ ॥ नित्य त्रिकाळ येवोनियां ॥ दंडप्रणाम करोनियां ॥ नमन करी अतिविनया ॥ मनोवाक्कायकर्मे ॥ ९ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ आला रजक नमस्कारासी ॥ श्रीपाद म्हणती तयासी ॥ एकाचित्तें परियेसा ॥ १० ॥ श्रीपाद म्हणती रजकासी ॥ कां नित्य कष्टतोसी ॥ तुष्टलों मी तुझ्या भक्तीसी ॥ सुखें राज्य करीं आतां ॥ ११ ॥ ऐकतां गुरूचें वचन ॥ गांठी बांधी पल्लवीं शकुन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ सत्यसंकल्प गुरुमूर्ति ॥ १२ ॥ रजक सांडी संसारचिंता ॥ सेवक जाहला एकचित्ता ॥ दुरोनि करी दंडवता ॥ मठा गेलिया येणेंचि परी ॥ १३ ॥ ऐसे बहुत दिवसांवरी ॥ रजक तो सेवा करी ॥ आंगण झाडी प्रोक्षी वारी ॥ नित्य नेमें येणें विधीं ॥ १४ ॥ असतां एके दिवसीं देखा ॥ वसंतऋतु वैशाखा ॥ क्रीडा

१ साष्टांग नमस्कार, लोटांगण. २ धोतराचे पदरास. ३ सडा टाकी.

करीत नदीतटाका ॥ आला राजा म्लेंछ एक ॥ १५ ॥ स्त्रियांसहित राजा आपण ॥ अलंकृत आभरण ॥ क्रीडा करीत स्त्रिया आपण ॥ गंगेमधून येतसे ॥ १६ ॥ सर्व दळ येत दोनी थंडीं ॥ अमित्त असती हस्ती घोडीं॥ मिरंविताती रत्नकोडी ॥ अलंकृत सेवकजन ॥ १७ ॥ ऐसा गंगेच्या प्रवाहांत ॥ राजा आला खेळत ॥ अनेक वाद्यनाद गर्जत ॥ कृष्णावेणी थडियेसी ॥ १८ ॥ रजक होता नमस्कारित ॥ शब्द झाला तो दुश्चित ॥ असे गंगेंत अवलोकित ॥ समारंभ राजयाचा ॥ १९ ॥ विस्मय करी बहु मानसीं ॥ जन्मोनियां संसारासी ॥ जरी न देखिजे सौख्यासी ॥ पशुसमान देह आपुला ॥ २० ॥ धन्य राजयाचें जिणें ॥ ऐसें सौख्य भोगणें ॥ स्त्रिया वस्त्रें अनेक भूषणें ॥ कैसा भक्त ईश्वराचा ॥ २१ ॥ कैसें याचें आर्जव फळलें ॥ कवण्या देवा आराधिलें ॥ कैसे श्रीगुरु असती भेटले ॥

१ सैन्य, दळभार. २ तीरांवर. ३ पुष्कळ. ४ सेवा.

मग पावला ऐसी दशा ॥ २२ ॥ ऐसें मनीं चिंतित ॥ करीतसे दंडवत ॥ श्रीपादराय कृपावंत ॥ वळखिली वासना तयाची ॥ २३ ॥ भक्तवत्सल श्रीगुरुमूर्ति ॥ जाणोनि अंतरीं त्याची स्थिति ॥ बोलावूनियां पुसती ॥ काय चिंतिसी मनांत ॥ २४ ॥ रजक म्हणे स्वामीसी ॥ देखिलें दृष्टीं रायासी ॥ संतोष झाला मानसीं ॥ केवळ दास श्रीगुरूचा ॥ २५ ॥ पूर्वीं आराधोनि देवासी ॥ पावला आतां या पदासी ॥ म्हणोनि चिंतितों मानसीं ॥ कृपासिंधु दातारा ॥ २६ ॥ ऐसें अविद्यासंबंधेंसीं ॥ नाना वासना इंद्रियांसी ॥ चाड[१] नाहीं या भोगासी ॥ चरणीं तुझे मज सौख्य ॥ २७ ॥ श्रीपाद म्हणती रजकासी ॥ जन्मोदारभ्य[२] कष्टलासी ॥ वांछा असे भोगावयासी ॥ राज्यभोग तमोवृत्ति[३] ॥ २८ ॥ निववीं इंद्रियें सकळ ॥ नातरी मोक्ष नव्हे निर्मळ ॥ बाधा करिती पुढें केवळ ॥ जन्मांतरीं परियेसीं॥२९॥

१ इच्छा. २ जन्मास आल्यापासून. ३ तमोगुणापासून झालेले.



[ अ० ९ ] श्रीपाद म्हणती रजकासी । जन्मदारभ्य कष्टलासी । वांछा असे भोगावयासी । राज्यभोग तमोवृत्ती ॥ २८ ॥

तुष्टवावया इंद्रियांसी ॥ तुवां जावें म्लेंछवंशासी ॥ आवडी जाहली तुझे मानसीं ॥ राज्य भोगीं जाय त्वरित ॥ ३० ॥ ऐकोनि स्वामीचें वचन ॥ विनवी रजक कर जोडून ॥ कृपासागरू तूं गुरुराज पूर्ण ॥ उपेक्षूं नको म्हणतसे ॥ ३१ ॥ अंतरतील तुझे चरण ॥ द्यावें मातें पुनर्दर्शन ॥ तुझा अनुग्रह असे कारण ॥ ज्ञान द्यावें दातारा ॥ ३२ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ वैदुरानगरीं जन्म घेसी ॥ भेटी देऊं अंतकाळासी ॥ कारण असे येणें आम्हां ॥ ३३ ॥ भेटी होतांचि आम्हांसी ॥ ज्ञान होईल तुझे मानसीं॥ न करीं चिंता भरंवसीं ॥ आम्हां येणें घडेल ॥ ३४ ॥ आणिक कार्यकारणासी ॥ अवतार घेऊं परियेसीं ॥ वेष धरोनि संन्यासी ॥ नाम नृसिंहसरस्वती ॥ ३५ ॥ ऐसें तया संबोधूनि ॥ निरोप देती जाय म्हणोनि ॥ रजक लागला तये चरणीं ॥ नमस्कारीत तये वेळीं ॥ ३६ ॥ देखोनि

श्रीगुरु कृपामूर्ति ॥ रजकासी जवळी पाचारिती ॥ इह भोगिसी कीं पुढतीं ॥ राज्यभोग सांग मज ॥ ३७ ॥ रजक विनवीत श्रीपादासी ॥ झालों आपण वृद्धवयेसी ॥ भोग भोगीन बाळाभ्यासी ॥ यौवनगोड राज्यभोग ॥ ३८ ॥ ऐकोनि रजकाचें वचन ॥ निरोप देती श्रीगुरु आपण ॥ त्वरित जाईं रे म्हणोन ॥ जन्मांतरीं भोगीं म्हणती ॥ ३९ ॥ निरोप देतां तया वेळीं ॥ त्यजिला प्राण तत्काळीं ॥ जन्मता झाला म्लेंछकुळीं ॥ वैदुरानगरीं विख्यात ॥ ४० ॥ ऐसी राजयाची कथा ॥ पुढें सांगेन विस्तारता ॥ सिद्ध म्हणे नामधारका आतां ॥ चरित्र पुढतीं अवधारीं ॥ ४१ ॥ ऐसें झालिया अवसरी ॥ श्रीपादराय कुरवपुरीं ॥ असतां महिमा अपरंपारी ॥ प्रख्यात असे परियेसा ॥४२॥ महिमा सकळ सांगतां ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ पुढील अवतार असंख्याता ॥ सांगेन ऐक नामधारका ॥ ४३ ॥ महत्त्व

१ या जन्मीं. २ राज्याचा उपभोग तरुणवयांत फार प्रिय असतो.

वर्णावया श्रीगुरूचें ॥ शक्ति कैंची या वाचे ॥ नवल हें अमृतदृष्टीचें ॥ स्थानमहिमा ऐसा ॥ ४४ ॥ श्रीगुरु राहती जे स्थानीं ॥ अपार महिमा त्या भुवनीं ॥ विचित्र जयाची करणी ॥ दृष्टांतें तुज सांगेन ॥४५॥ स्थान-महिमाप्रकार ॥ सांगेन ऐक एकाग्र ॥ प्रख्यात असे कुरवपुर ॥ मनकामना पुरती तेथें ॥ ४६ ॥ ऐसे कित्येक दिवसांवरी ॥ श्रीपाद होते कुरवपुरीं ॥ कारण असे पुढें अवतारीं ॥ म्हणोनि अदृश्य होते तेथें ॥ ४७ ॥ आश्विन वद्य द्वादशी ॥ नक्षत्र मृगराज परियेसीं ॥ श्रीगुरु बैसले निजानंदेंसीं ॥ अदृश्य झाले गंगेंत ॥ ४८ ॥ लौकिकीं दिसती अदृश्य जाण ॥ कुरवपुरीं असती आपण ॥ श्रीपादराव निर्धार जाण ॥ त्रयमूर्तींचा अवतार ॥४९॥ अदृश्य होवोनि तया स्थानीं ॥ श्रीपाद राहिले निर्गुणीं ॥ दृष्टांत सांगेन विस्तारोनि ॥ म्हणे सरस्वती गंगाधरू ॥ ५० ॥ जे जन असती भक्त केवळ ॥ त्यांसी दिसती श्रीगुरु निर्मळ ॥ कुरवपुर क्षेत्र अपूर्व स्थळ ॥

असे प्रख्यात भूमंडळीं ॥ ५१ ॥ सिद्ध सांगे नामधारकासी ॥ तेचि कथा विस्तारेंसीं ॥ सांगतसे सकळिकांसी ॥ गंगाधराचा आत्मज ॥ ५२ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारक-संवादे रजकवरप्रदानं नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ ओंवीसंख्या ॥ ५२ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ऐकोनि सिद्धाचें वचन ॥ नामधारक विनवी जाण ॥ कुरवपुरींचें महिमान ॥ केवीं जाहलें परियेसा ॥ १ ॥ म्हणती श्रीपाद नाहीं गेले ॥ आणि म्हणती अवतार झाले ॥ विस्तार करोनियां सगळें ॥ निरोपावें म्हणतसे ॥ २ ॥ सिद्ध सांगे नामधारकासी ॥ श्रीगुरुमहिमा काय पुससी ॥ अनंतरूपें होतीं परियेसीं ॥ विश्वंव्यापक परमात्मा ॥ ३ ॥ पुढें कार्यकारणासी ॥ अवतार झाले परियेसीं ॥ राहिले आपण गुप्तवेषीं ॥ तया कुरवक्षेत्रांत ॥ ४ ॥ पाहें पां भार्गवेराम देखा ॥ अद्यापवरी भूमिका ॥ अवतार जाहले अनेका ॥ त्याचेच एकीं अनेक ॥ ५ ॥ सर्वां ठायीं वास आपण ॥ मूर्ति एक नारायण ॥ त्रिमूर्तींचे तीन ॥ उत्पत्ति स्थिति आणि प्रलय ॥ ६ ॥ भक्तजनां तारावयासी ॥ अवतरतो हृषीकेशी ॥ शाप देत दुर्वासऋषि ॥ कारण असे तयाचें ॥ ७ ॥ त्रयमूर्तींचा अवतार ॥ याचा

१ सर्व जगाला व्यापणारा. २ परशुराम.

कवणा न कळे पार ॥ निधान तीर्थ कुरवपुर ॥ वसे तेथें गुरुमूर्ति ॥ ८ ॥
जें जें चिंतावें भक्तजनें ॥ तें तें पावे गुरुदर्शनें ॥ श्रीगुरु वसावयाचीं
स्थानें ॥ कामधेनु असे जाणा ॥ ९ ॥ श्रीपादवल्लभस्थानमाहिमा ॥ वर्णा-
वया अनुपमा ॥ अपार असे सांगतों तुम्हां ॥ दृष्टांतेंसीं अवधारा ॥ १० ॥
तुज सांगावया कारण ॥ गुरुभक्ति वृथा नव्हे जाण ॥ सर्वथा न करी
निर्वाण ॥ पाहे वाट भक्तांची ॥ ११ ॥ भक्ति करावी दृढतर ॥ गंभीरपणें
असावें धीर ॥ तरीच उतरिजे पैलपार ॥ इहपरत्रीं सौख्य पावे ॥ १२ ॥
याचि कारणें दृष्टांतें तुज ॥ सांगेन ऐक वर्तलें सहज ॥ काश्यपगोत्रीं
होता द्विज ॥ नाम तया वल्लभेश ॥ १३ ॥ सुशील द्विज आचारवंत ॥
उदीम[1] करूनि उदर भरीत ॥ प्रतिसंवत्सरीं यात्रेस येत ॥ तया श्रीपाद-
क्षेत्रासी ॥ १४ ॥ असतां पुढें वर्तमानीं ॥ उदीमा निघाला तो धनी ॥

१ व्यापार.

नवस केला अतिगहनीं ॥ संतर्पीवें ब्राह्मणासी ॥ १५ ॥ उदीम आलिया फळासी ॥ यात्रेसि येईन विशेषी ॥ सहस्र संख्या ब्राह्मणांसी ॥ इच्छा-भोजन देईन म्हणे ॥ १६ ॥ निश्चय करोनि मानसीं ॥ निघाला द्विजवर उदीमासी ॥ चरण ध्यातसे मानसीं ॥ सदा श्रीपादवल्लभाचे ॥ १७ ॥ जे जे ठायीं जाय देखा ॥ अनंत संतोष पावे निका ॥ शतगुणें लाभ झाला ऐका ॥ परमानंद प्रवर्तला ॥ १८ ॥ लय लावूनि श्रीपादचरणीं ॥ यात्रेसि निघाला ते क्षणीं ॥ वेंचावया ब्राह्मणसंतर्पणीं ॥ द्रव्य घेतलें समागमें ॥ १९ ॥ द्रव्य घेऊनि द्विजवर ॥ निघतां देखती तस्कर[१] ॥ कापट्यवेषें सत्वर ॥ तेही तस्कर निघाले ॥ २० ॥ दोनतीन दिवसांवरी ॥ तस्कर असती संगिकारी[२] ॥ एके दिवसीं मार्गीं रात्रीं ॥ जात असतां मार्गस्थ ॥ २१ ॥ तस्कर म्हणती द्विजवरासी ॥ आम्ही जाऊं कुरव-

१ चोर. २ बरोबर.

पुरासी ॥ श्रीपादवल्लभदर्शनासी ॥ प्रतिवर्षीं नेम असे ॥ २२ ॥ ऐसें बोलती मार्गासी ॥ तस्करीं मारिलें द्विजासी ॥ शिर छेदूनियां परियेसीं ॥ द्रव्य घेतलें सकळिक ॥ २३ ॥ भक्तजनांचा कैवारी ॥ श्रीपादराव कुरवपुरीं ॥ पातला त्वरित वेषधारी ॥ जटामंडितें भस्मांकित ॥ २४ ॥ त्रिशूळ खट्वांग घेऊनि हातीं ॥ उभा ठेला तस्करांपुढतीं ॥ वधिता झाला तयांप्रती ॥ त्रिशूळेंकरूनि तात्काळ ॥ २५ ॥ समस्त तस्करां मारितां ॥ एक तस्कर येऊनि विनविता ॥ कृपाळुवा जगन्नाथा ॥ निरपराधी आपण असें ॥ २६ ॥ नेणें यातें वधितील म्हणोनि ॥ आलों आपण संगी होऊनि ॥ तूं सर्वोत्तमा जाणसी मनीं ॥ विश्वाची मनवासना ॥ २७ ॥ ऐकोनि तस्कराची विनंती ॥ श्रीपाद त्यातें बोलाविती ॥ हातीं देऊनियां विभूति ॥ विप्रावरी प्रोक्षीं म्हणे ॥ २८ ॥ मन लावूनि तया वेळां ॥

१ जटेनें सुशोभित दिसणारा.



[ अ० १० ] ऐकोनी तस्कराची विनंती । श्रीपाद त्यातें बोलविती । हातीं देऊनियां विभूती । विप्रावरी प्रोक्षा म्हणे ॥ २८ ॥

मंत्रोनि लाविती विभूति गळां ॥ सजीव जाहला तात्काळा ॥ ऐक वत्सा एकचित्तें ॥ २९ ॥ इतुकें वर्ततां परियेसीं ॥ उदय जाहला दिनकरांसी ॥ श्रीपाद जाहले गुप्तेसी ॥ राहिला तस्कर द्विजाजवळीं ॥ ३० ॥ विप्र पुसतसे तस्करासी ॥ म्हणे तूं मातें कां धरिलेंसी ॥ कवणें वधिलें तस्करासी ॥ म्हणोनि पुसे तया वेळीं ॥ ३१ ॥ तस्कर सांगे द्विजासी ॥ आला होता एक तापसी ॥ जाहलें अभिनव परियेसीं ॥ वधिले तस्कर त्रिशूळें ॥ ३२ ॥ मज रक्षिलें तुजनिमित्तें ॥ धरोनि बैसविलें स्वहस्तें ॥ विभूति लावूनि मग तूंतें ॥ सजीव केला तव देह ॥ ३३ ॥ उभा होता आतां जवळी ॥ अदृश्य जाहला तत्काळीं ॥ न कळे कवण मुनि बळी ॥ तुझा प्राण रक्षिला ॥ ३४ ॥ होईल ईश्वर त्रिपुरारि ॥ भस्मांगी होय जटाधारी ॥ तुझी भक्ति निर्धारीं ॥ म्हणोनि आला ठाकोनियां ॥ ३५ ॥ ऐकोनि तस्क-

राचें वचन ॥ विश्वासला तो ब्राह्मण ॥ तस्कराजवळील द्रव्य घेऊन ॥ गेला यात्रेसी कुरवपुरा ॥ ३६ ॥ नानापरी पूजा करी ॥ ब्राह्मणभोजन सहस्र चारी ॥ अनंतभक्तीं प्रीतिकरीं ॥ पूजा करी श्रीपादुकांची ॥ ३७ ॥ ऐसे अनंत भक्तजन ॥ मिळून सेविती श्रीपादचरण ॥ कुरवपुर प्रख्यात जाण ॥ अपार महिमा ॥ ३८ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ संशय न धरीं तूं मानसीं ॥ श्रीपाद आहेती कुरवपुरासी ॥ अदृश्यरूप होऊनियां ॥ ३९ ॥ पुढें अवतार असे होणें ॥ गुप्त असती याचि गुणें ॥ म्हणती अनंतरूप नारायण ॥ परिपूर्ण सर्वां ठायीं ॥ ४० ॥ ऐसी श्रीपादवल्लभमूर्ति ॥ लौकिकीं प्रगटली ख्याति ॥ झाला अवतार पुढती¹ ॥ नृसिंहसरस्वती विख्यात ॥ ४१ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधरू ॥ सांगत कथेचा विस्तारू ॥ ऐकतां होय मनोहरू ॥ सकळाभीष्टें² साधती ॥ ४२ ॥ इति श्रीनृसिंह-

१ पुढें. २ इच्छा.

सरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे भक्तसंकटहरणं नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ॥ ओंवीसंख्या ॥ ४२ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ पुढें अवतारपरंपरा कैसी॥ विस्तारोनियां आम्हांसी ॥ सांगा स्वामी कृपासिंधु ॥ १ ॥ सिद्ध म्हणे ऐक वत्सा ॥ अवतार झाला श्रीपाद कैसा ॥ पूर्वी वृत्तांत ऐसा ॥ कथा सांगितली विप्रस्त्रियेची ॥ २ ॥ शनिप्रदोषीं सर्वेश्वरासी ॥ पूजित होती गुरु-उपदेशीं ॥ देहवासना असतां तियेसी ॥ पंचत्व पावली तत्काळ ॥ ३ ॥ जन्म झाला पुढें तिसी ॥ करंजनगर उत्तरदेशीं ॥ वाजसनेय शाखेसी ॥ विप्रकुळीं जन्मली ॥ ४ ॥ जातक वर्तलें तियेसी ॥ नामें अंबा भवानीऐसी ॥ आरोपिती स्नेहासी ॥ मातापिता परियेसा ॥ ५ ॥ वर्ततां मातापितयागृहीं ॥ वाढली कन्या अतिस्नेहीं ॥ विवाह करिती महोत्साहीं ॥ देती विप्रासी त्याचि ग्रामीं ॥ ६ ॥ शिवव्रती असे तो ब्राह्मण ॥ नाम तया माधव जाण ॥ तयासी दिधली कन्या दान ॥ अतिप्रीतींकरोनियां ॥ ७ ॥ तया माधवविप्राघरीं ॥ शुभाचारें[1] होती नारी ॥ वासना तिची पूर्वापरीं[2] ॥ ईश्वरपूजा करीतसे ॥ ८ ॥

१ शुद्ध आचरणानें. २ पूर्व जन्मींची.

पूजा करी ईश्वरासी ॥ दंपत्य उभय मनोमानसीं ॥ प्रदोषपूजा अतिहर्षीं ॥ करिती भक्तिपुरःसर ॥ ९ ॥ मंदवारीं त्रयोदशीसी ॥ पूजा करिती अतिविशेषीं ॥ संवत्सरें झालीं षोडशी[1] ॥ अंतर्वत्नी[2] झाली ऐका ॥ १० ॥ तृतीय हो पांचवे मासीं ॥ उत्साह करिती बहुहर्षीं ॥ उत्तम डोहळे होती तियेसी ॥ ब्रह्मज्ञान बोलतसे ॥ ११ ॥ उत्साह करिती मास सातीं ॥ द्विजवर करी सीमंती[3] ॥ अक्षयवाणें वोंवाळिती आरती ॥ सुवासिनी मिळूनियां ॥ १२ ॥ ऐसें क्रमितां नवमासीं ॥ प्रसूत झाली शुभ दिवशीं ॥ पुत्र जाहला म्हणून हर्षीं ॥ निर्भर झालीं मातापिता ॥ १३ ॥ जन्मतांच तो बाळक ॥ ॐकार शब्द म्हणतसे ऐक ॥ पाहूनि झाले तटस्थ लोक ॥ अभिनव म्हणती ते वेळीं ॥ १४ ॥ जातकर्म करी ब्राह्मण ॥ विप्रांसी दक्षिणा देत आपण ॥ ज्योतिषी सांगती तयाचें लक्षण ॥ लग्न सत्वर पाहोनियां ॥ १५ ॥

१ सोळा. २ गरोदर. ३ एक संस्कारविशेष.

सांगती ज्योतिषी त्या द्विजासी ॥ मुहूर्त बरवा असे विशेषीं ॥ कुमार होईल कारुण्यऋषि ॥ गुरु सकळांचा निश्चयें ॥ १६ ॥ याचा अनुग्रह होईल ज्यासी ॥ तो वंद्य होईल विश्वासी ॥ याचें वाक्य प्रमाणेसी ॥ चिंतामणी याचे चरण ॥ १७ ॥ अष्ट सिद्धि याचे द्वारीं ॥ वोळंगत राहतील निरंतरीं ॥ नव निधि याचे घरीं ॥ राहतील ऐक द्विजोत्तमा ॥ १८ ॥ न होती तयासी गृंहिणी सुत ॥ पूज्य होईल त्रिभुवनांत ॥ याचे दर्शनमात्रें पतित ॥ पुनीत होती परियेसीं ॥ १९ ॥ होईल अवतारी पुरुष ॥ माना निश्चयें विश्वास ॥ संदेह न धरावा यास ॥ म्हणोनि करिती नमस्कार॥ २०॥ ऐसें म्हणती द्विजवर ॥ सांगती जनकासी विचार ॥ याचेनि महादैन्य हरे ॥ भेणें नलगे कळिकाळा ॥ २१ ॥ जे जे वासना तुमचे मनीं ॥ सर्व साधेल याचेनि ॥ याचिया पालनपोषणीं ॥ निधान आलें तुमचे घरा ॥ २२ ॥

१ उपदेश, २ स्त्री.

ऐसें जातक वर्तवोन ॥ सांगता झाला ब्राह्मणस्तोम¹ ॥ जनक-जननी संतोषोन ॥ देती वस्त्रें आभरणें² तयां ॥ २३ ॥ सांगोनि गेले ब्राह्मण ॥ मातापिता आनंदघन³ ॥ दृष्टि लागेल म्हणून ॥ निंबलोणें⁴ वोंवाळिती ॥ २४ ॥ वार्ता गेली नगरांत ॥ अभिनव आजि देखिलें म्हणत ॥ उपजत बाळ ॐकार जपत ॥ आश्चर्य करिती सकळ जन ॥ २५ ॥ नगरलोक इष्ट मित्र ॥ पहावया येती विचित्र ॥ दृष्टि लागेल म्हणोनि पळमात्र ॥ न दाविती कवणापुढें ॥ २६ ॥ मायामोहें जनकजननी ॥ बाळासी दृष्टि लागेल म्हणोनि ॥ आंगारा लाविती मंत्रोनि ॥ रक्षा बांधिती कृष्णसुतें⁵ ॥ २७ ॥ परमात्मा अवतरे ॥ दृष्टि केवीं संचरे ॥ लौकिकधर्म चमत्कारें ॥ मातापिता संरक्षिती ॥ २८ ॥ वर्ततां बाळ येणेंपरी ॥ दिवस दहा झालियावरी ॥ नामकरण परस्परीं ॥ करी जनक द्विजोत्तम ॥ २९ ॥ शालिग्रामदेव

१ समुदाय. २ भूषणें. ३ हर्षानें पूर्ण. ४ दृष्टिदोष दूर करण्याचे पदार्थ मीठ, वगैरे. ५ काळ्या दोऱ्यानें.

म्हणत ॥ जन्मनाम विख्यात ॥ नाम नरहरी ऐसें म्हणत ॥ उच्चार केला धर्मकर्मीं ॥ ३० ॥ ममत्व थोर बाळकावरी ॥ प्रतिपाळिती प्रीतीकरीं ॥ माता म्हणतसे अवसरीं ॥ न पुरे क्षीरं बाळकासी ॥ ३१ ॥ पतीसी म्हणे ते वेळां ॥ स्तनीं दुग्ध थोडें बाळा ॥ मेळवा एखादी अबला ॥ स्तनपान द्यावया ॥ ३२ ॥ अथवा आणा अंजा एक ॥ आपुले स्तनें न शमे भूक ॥ ऐकोनि हासे बाळक ॥ स्पर्शो स्तन सव्यंकरें ॥३३॥ स्तनास स्पर्शतां कर ॥ बत्तीस धारा वाहे क्षीरं ॥ वस्त्रें भिजोनि विचित्र ॥ वाहों लागलें भूमीवरी ॥ ३४ ॥ विस्मय करिती जनकजननी ॥ प्रगट न करी गौप्यगुणी ॥ नमन करिती बाळकाचरणीं ॥ माता होय खेळविती ॥ ३५ ॥ पाळण्या घालोनि बाळकासी ॥ पर्यंदगायँन अतिहर्षी ॥ न राहे कुमार पाळणेसीं ॥ सदा खेळे भूमीवरी ॥ ३६ ॥ वर्धतां बाळ येणेंपरी ॥ माता पिता नम-

१ दूध. २ शेळी. ३ उजव्या. ४ पाळण्याचें गाणें.

स्कारी ॥ बाळ झाला संवत्सरीं ॥ न बोले आतां काय करूं ॥ ३७ ॥
माता बोलवी कुमारासी ॥ बोले शब्द ॐकारेसी ॥ चिंता करीतसे मान-
सीं ॥ मुकें झालें दैवयोगें ॥ ३८ ॥ पुसती जाण जोशियासी ॥ या बाळका
बोलावयासी ॥ काय उपायविशेषी ॥ म्हणोनि पुसती वेळोवेळां ॥ ३९ ॥
जोशी सांगती तयासी ॥ आराधावें कुळदेवतेसी ॥ अर्कवारीं[1] अश्वत्थप-
र्णेसी[2] ॥ अन्न घाली हो तीन वेळां ॥ ४० ॥ एक म्हणती होईल मुकें ॥
त्यासि शिकवावें विवेकें ॥ बाळबोल बोलविती निके ॥ परि तो बाळ न
बोलेची ॥ ४१ ॥ हांसोनि ॐकार उच्चारी तो बाळ ॥ आणिक नेणे बोल
केवळ ॥ विस्मय करिती लोक सकळ ॥ ॐकार शब्द ऐकोनियां ॥ ४२ ॥
एक म्हणती नवल झालें ॥ सर्व ज्ञान असे भलें ॥ श्रवणीं ऐकतां बोल
सगळे ॥ जाणूनि न बोले काय गुणें ॥ ४३ ॥ कांहीं केल्या न बोले सुत ॥

१ रविवार. २ पिंपळाचें पान.

चिंता करिती मातापिता ॥ वर्षें सात झालीं तत्त्वतां ॥ मुका झाला दैव-
योगें ॥ ४४ ॥ सात वर्षें कुमारासी ॥ योग्य झाला मुंजीसी ॥ पुसते झाले
ब्राह्मणासी ॥ केविं करावें म्हणोनियां ॥ ४५ ॥ विप्र म्हणती तया वेळां ॥
संस्करावें ब्राह्मणकुळा ॥ उपनयनावेगळा केवळा ॥ अष्टवरुषें होऊनियां
॥ ४६ ॥ मातापिता चिंता करिती ॥ उपदेशावें कवणें रीतीं ॥ मुका असे
हा निश्चितीं ॥ कैसें अदृष्ट झालें आम्हां ॥ ४७ ॥ कैसें अदृष्ट आपुलें ॥
ईश्वरगौरी आराधिले ॥ त्रयोदशीस शिवा पूजिलें ॥ वायां झालें म्हणतसे
॥ ४८ ॥ ईश्वरें तरी दिधला वरू ॥ सुलक्षण झाला कुमरू ॥ न बोले
आतां काय करूं ॥ म्हणोनि चिंती शिवासी ॥ ४९ ॥ एकचि बाळ
आमुचे कुशीं ॥ आणिक न देखों स्वप्नेसीं ॥ वेष्टिलों होतों आम्ही आशें-
सीं ॥ आमुतें रक्षील म्हणोनियां ॥ ५० ॥ नव्हेच माझे मनींची आस ॥
अपुत्र झाला निर्वाणवेष ॥ काय वर देत महेश ॥ शनिप्रदोष पूजितां म्यां

॥ ५१ ॥ ऐसें नानापरी ती देख ॥ जननी करी महादुःख ॥ जवळी येवोनि बाळक ॥ संबोखित मातेसी ॥ ५२ ॥ घरांत जाऊनि तये वेळां ॥ घेऊनि आणी लोखंड सबळा ॥ हातीं धरितांचि निर्मळा ॥ झालें सुवर्ण बावनकशी ॥ ५३ ॥ आणोनि देत असे मातेसी ॥ विस्मय करी बहुवसीं ॥ बोलावूनियां पतीसी ॥ दाविती झाली ते वेळां ॥ ५४ ॥ गौप्य करूनि तये वेळां ॥ गृहांत नेलें तया बाळा ॥ पाहती त्याची बाळलीला ॥ आणिक लोह देती हातीं ॥ ५५ ॥ अमृतदृष्टीं पाहतां ॥ लोह सुवर्ण होय तत्त्वतां ॥ विश्वासोनि म्हणती हा सर्वथा ॥ होईल पुरुष कारणिक[1] ॥ ५६ ॥ मग पुत्रातें आलिंगोनि ॥ विनविताती जनकजननी ॥ तूं तारक बा शिरोमणी ॥ कारणिक पुरुष कुळदीपक ॥ ५७ ॥ तुझेनि सर्वे सौख्य लाधलों ॥ मुका म्हणोनि निर्बुजलों[2] ॥ अज्ञान-आवरणें वेष्टलों॥

१ अवतारी. २ घाबरलों.

जनीं मुका म्हणती तुज ॥ ५८ ॥ आमुचे मनींची वासना ॥ तुवां पुरवावी नंदना[1] ॥ तुझे बोबडे शब्द आपणा ॥ ऐकावे वाटे पुत्रराया ॥ ५९॥ हास्यवदनें तये वेळां ॥ दावी यज्ञोपवीत गळां ॥ कटीं[2] बांधावी मौंजीमेखळा ॥ खूण दाखवी मातेसी ॥ ६० ॥ संज्ञा[3] करोनि मातेसी ॥ बाळ दाखवी संतोषीं ॥ मौंजी बांधितां आपणासी ॥ येतील म्हणे बोल सकळ ॥ ६१ ॥ मातापिता संतोषती ॥ विद्वान ज्योतिषी पाचारिती ॥ व्रतबंधमुहूर्त पाहती ॥ सर्व आईतीं करिते झाले ॥ ६२ ॥ केली सामग्री बहुतांपरी ॥ रत्नखचित अळंकारीं ॥ मायामोहें प्रीतिकरीं ॥ समारंभ करिताती ॥ ६३ ॥ चतुर्वेदी ब्राह्मण येती ॥ शाखापरत्वें वेद पढती ॥ इष्ट सोयरे दाईज गोती ॥ समस्त आले तया भवना ॥ ६४ ॥ नानापरींचे शृंगार ॥ उभारिले मंडप अपार ॥ आनंद करितसे द्विजवर ॥ अपार द्रव्य वेंचता

१ पुत्रा. २ कमरेला. ३ खूण.

होय ॥६५॥ नगरलोक विस्मय करिती ॥ मुक्या पुत्रासी येवढी आईती ॥ द्विजालागीं असे भ्रांति ॥ द्रव्य वेंची वृथा आपुलें ॥ ६६ ॥ इतुकें वेंचूनि पुत्रासी ॥ व्रतबंध करील परियेसीं ॥ गायत्री केवीं उपदेशी ॥ करील आचार कवणेंपरी ॥ ६७ ॥ एक म्हणती हो कां भलतें ॥ मिष्टान्न स्वेच्छा आम्हां मिळतें ॥ देकार देईल हिरण्य वस्त्रें ॥ चाड नाहीं त्याच्या मंत्रा ॥ ६८ ॥ ऐसे नानापरी लोक ॥ विचार करिती अनेक ॥ मातापित्यास अत्यंत सुख ॥ देवदेवक करिताती ॥ ६९ ॥ चौलकर्म येरे दिवसीं ॥ भोजन चौलमणीसी ॥ पुनरपि अभ्यंग करूनि हर्षी ॥ यज्ञोपवीत धारण केलें ॥ ७० ॥ मंत्रपूर्वक यज्ञोपवीत ॥ धारण करविती समस्त ॥ सहभोजन करावया गृहांत ॥ घेऊनियां गेली माता ॥ ७१ ॥ भोजन करी मातेसवें ॥ निरोप घेत एका भावें ॥ मौंजीबंधन असें करावें ॥ म्हणोनि आला पित्या-

१ कोणी म्हणूं लागले, 'कांहीं कां होईना!' २ दक्षिणा. ३ सोनें. ४ पर्वा.

जवळी ॥ ७२ ॥ विधियुक्तमार्गें मौंजी देखा ॥ बंधन केलें त्या बाळका ॥ सुमुहूर्त आला तात्काळिका ॥ मंत्रोपदेश करिता झाला ॥ ७३ ॥ गायत्रीमंत्र अनुक्रमेंसीं ॥ उपदेश देतां परियेसीं ॥ बाळ उच्चारी मनोमांनसीं ॥ व्यक्त न बोले कवणापुढें ॥ ७४ ॥ गायत्रीमंत्र कुमारासी होतां ॥ भिक्षा घेऊन आली माता ॥ वस्त्रें आभरणें रत्नखचिता ॥ देती झाली तया वेळीं ॥ ७५॥ पहिली भिक्षा घेऊनि करीं ॥ आशीर्वचन देती नारी ॥ बाळ ऋग्वेद म्हणोन उच्चारी ॥ आचारधर्में वर्ततसे ॥ ७६ ॥ पहिली भिक्षा येणेंपरी ॥ देती झाली प्रीतीकरीं ॥ अग्निमीळे म्हणोनि उच्चारी ॥ ब्रह्मचारी तये वेळीं ॥ ७७ ॥ दुसरी भिक्षा देत माता ॥उच्चार केला यजुर्वेद इषेत्वा ॥ लोक समस्त तटस्था ॥ माथा तुंकिती तये वेळीं ॥ ७८ ॥ तिसरी भिक्षा देत माता ॥ होय सामवेद पढता ॥ अग्नऽआयाहि गायन करितां ॥ वेद

१ मनांतले मनांत, आपणाशींच. २ स्पष्ट. ३ मस्तक. ४ डोलवतात.

तीन म्हणतसे ॥ ७९ ॥ सभा समस्त विस्मय करी ॥ पिता हर्षनिर्भरीं ॥ मुका बोले वेदचारी ॥ म्हणती होईल कारणिक ॥ ८० ॥ यातें म्हणों नये नर ॥ होईल देवाचा अवतार ॥ म्हणोनि करी नमस्कार ॥ जगद्गु-रूसी ते समयीं ॥ ८१ ॥ इतुक्यावरी तो बाळक ॥ मातेसी म्हणतसे ऐक ॥ तुवां उपदेश केला एक ॥ भिक्षा माग म्हणोनि ॥ ८२ ॥ नव्हेचि बोल तुझा मिथ्या ॥ निरोप द्यावा आम्हां त्वरिता ॥ निर्धार[1] झाला माझिया चित्ता ॥ जाऊं तीर्थें आचरावया ॥ ८३ ॥ आम्हां आचार ब्रह्मचारी ॥ भिक्षा करावी घरोघरीं ॥ वेदाभ्यास मनोहरी ॥ करणें असे परियेसा ॥ ८४ ॥ ऐकोनि पुत्राचें वचन ॥ दुःखें दाटली अतिगहन ॥ उदकें भरले अडती नयन ॥ आली मूर्च्छना[2] तया वेळीं ॥ ८५ ॥ निर्जीव होऊनि क्षणेक ॥ करिती झाली महाशोक ॥ पुत्र माझा तूं रक्षक ॥ केली आशा

१ निश्चय. २ मूर्च्छित.

बहु मनीं ॥ ८६ ॥ आमुतें रक्षिसी म्हणोनि ॥ होती आशा फार मनीं ॥ न बोलसी आमुचिया गुणीं ॥ मुकें म्हणविसी आपणासी ॥ ८७ ॥ नायकों कधीं तुझिया बोला ॥ आतां ऐकतां संतोष झाला ॥ पूजनें ईश्वर फळला ॥ म्हणोनि विश्वास केला ॥ ८८ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ पुत्रासि म्हणतसे बाळिका ॥ आलिंगोनियां कुमारका ॥ कृपा भाकी तये वेळीं ॥८९॥ ऐकोनि मातेचें वचन ॥ बाळक सांगे ब्रह्मज्ञान ॥ नको दुखवूं अंतःकरण ॥ आम्हां करणें तेंचि असे ॥ ९० ॥ तूतें आणिक पुत्र चारी ॥ होतील माते निर्धारीं ॥ तुझी सेवा परोपरी ॥ करितील मनोभावेंसीं ॥ ९१ ॥ तुवां आराधिला शंकर ॥ जन्मांतरीं पूर्वापार ॥ म्हणोनि ठेविला मस्तकीं कर ॥ मग जहाली जातिस्मृति[१] ॥ ९२ ॥ पूर्वजन्मींचा वृत्तांत ॥ सविस्तर स्मरण करीत ॥ परम जाहली विस्मित ॥ श्रीपादवल्लभ जाणोनि

१ पूर्वजन्माचें स्मरण.

॥ ९३ ॥ देखोनि माता तये वेळां ॥ नमन केलें चरणकमळां ॥ श्रीपादें उठवूनि अवलीळा[1] ॥ सांगती गौप्य अवधारा ॥ ९४ ॥ ऐक माते ज्ञानवंती ॥ हा बोल करीं हो गुप्ती ॥ संन्यासी आम्ही यति ॥ अलिप्त असों संसारीं ॥ ९५ ॥ याचि कारणें आम्ही आतां ॥ हिंडूं समस्त तीर्थयात्रा ॥ कारण असे पुढें तत्त्वतां ॥ म्हणोनि निरोप मागती ॥ ९६ ॥ येणेंपरी जननीसी ॥ गुरुमूर्ति सांगती विनयेंसीं ॥ माता बोलत पुत्रासी ॥ श्रोते सावध परियेसा ॥ ९७ ॥ पुत्रासी विनवी तये वेळ ॥ आम्हां नाडूनि जाशील ॥ आणिक डोळां न देखों बाळ ॥ केवीं वांचों पुत्रराया ॥ ९८ ॥ धाकुटपणीं तुम्ही तापस[2] ॥ कोण धर्म असे हर्ष ॥ धर्मशास्त्रख्याति सरस ॥ आश्रम चारी आचरावे ॥ ९९ ॥ ब्रह्मचर्य वर्षें बारा ॥ गृहस्थाश्रम तदनंतरा ॥ घडती पुण्यें अपरंपारा[3] ॥ गृहस्थाश्रमीं सुख असे ॥ १०० ॥

१ तात्काळ, लीलेनें, सहज. २ तप करणारे. ३ अगणित.



[ अ० ११ ] ऐक माते ज्ञानवंती । हा बोल करीं हो गुप्तीं । संन्यासी आम्ही यती । अलिप्त असों संसारीं ॥ ९५ ॥

मुख्य आश्रम असे गृहस्थ ॥ आचरतां होय अतिसमर्थ ॥ संन्यास घ्यावा मुख्यार्थ ॥ धर्मशास्त्र येणेंपरी ॥ १ ॥ ब्रह्मचर्यमार्ग ऐका ॥ पठण करावें वेदादिकां ॥ विवाह होतां गृहस्थें निका ॥ पुत्रादिकां लाधावें ॥ २ ॥ यज्ञादि कर्म साधोनियां ॥ तदनंतर संन्यास न्याया ॥ येणें विधीं आचरोनियां ॥ अग्राह्य संन्यास बाळपणीं ॥ ३ ॥ समस्त इंद्रियें संतोषवावीं ॥ मनींची वासना पुरवावी ॥ नंतर तपाची वाट धरावी ॥ संन्यास घेतां मुख्य असे ॥ ४ ॥ ऐकोनि मातेचें वचन ॥ गुरु सांगती तत्त्वज्ञान ॥ नामधारक सुमन ॥ करूनि ऐक म्हणे सिद्ध ॥ ५ ॥ गंगाधराचा नंदन ॥ श्रोतयां सांगे नमून ॥ परिसा तुम्ही समस्त जन ॥ गुरुचरित्रविस्तार ॥ ६ ॥ पुढें वर्तलें अपूर्व ऐका ॥ सिद्ध सांगे नामधारका ॥ महाराष्ट्रभाषा करूनि टीका ॥ सांगे सरस्वतीगंगाधर ॥ ७ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्प-

तरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे श्रीपादावतारबाल-
चरित्रं नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवी-
संख्या ॥ १०७ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरु म्हणती मातेसी ॥ आम्हां ऐसा निरोप देसी ॥ अनित्य शरीर तूं जाणसी ॥ काय भरंवसा जीवित्वाचा ॥ १ ॥ श्लोक ॥ अनित्यानि शरीराणि विभवो नैव शाश्वतः ॥ नित्यः सन्निहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥ २ ॥ टीका ॥ एखादा असेल चिरंजीवी ॥ त्यासी तुझी बुद्धि बरवी ॥ अनित्य देहवैभवभावीं ॥ पुढें कोणा भरंवसा ॥ ३ ॥ देह तो क्षणभंगुर ॥ नाहीं राहिले कवण स्थिर ॥ जोंवरी दृढ शरीर ॥ पुण्यमार्गें रहाटावें ॥ ४ ॥ जो मृत्यूसी जिंकीत ॥ त्याणें निश्चयावें शरीर नित्य ॥ त्यासि तवोपदेश सत्य ॥ म्हणे धर्म करीन पुढें ॥ ५ ॥ अहोरात्रीं आयुष्य उणें ॥ होतसे क्षणक्षणें ॥ करावा धर्म याचि कारणें ॥ पूर्ववयासी परियेसा ॥ ६ ॥ जैसा सूर्यरथ चाले ॥ निमिष होतां शीघ्रकाळें ॥ बावीस सहस्र गांव पळे ॥ तैसें आयुष्य क्षीण होय ॥ ७ ॥ अल्पोदकीं जैसे मत्स्य ॥

१ आयुष्याचा. २ पुष्कळ दिवस वांचणारा. ३ चालावें.

तैसा मनुष्य अल्पायुष्य[1] ॥ जोंवरी प्राण सुरस ॥ धर्म करावा परियेसीं ॥ ८ ॥ पर्जन्यें पडतां वृक्षावरी ॥ उदक राहे पर्णाग्रीं ॥ स्थिर नव्हे निर्धारीं ॥ सर्वेचि पडे भूमीवरी ॥ ९ ॥ तेवीं शरीर नव्हे स्थिर ॥ जीवित यौवन साचार ॥ जरा[2] मरण निर्धार ॥ केधवां पडे न कळेची ॥ १० ॥ याचि कारणें देहासी ॥ विश्वासूं नये परियेसीं ॥ मृत्यु असे देहासी ॥ धर्म करावा तात्काळीं ॥ ११ ॥ पिकलें पान वृक्षा जैसें ॥ लागलें असें सूक्ष्मवशें ॥ तैसेंचि शरीर भरंवसें ॥ केधवां पडेल न कळेचि ॥ १२ ॥ एखादा नर कलत्रांसी[3] ॥ द्रव्य देतां परियेसीं ॥ दिवसगणना करी कैसी ॥ तैसा यम रात्रंदिवस ॥ १३ ॥ जैशा समस्त नद्या देखा ॥ समुद्रासी घेऊनि जाती उदका ॥ परतोनि न येति जन्मभूमिका ॥ तैसें आयुष्य न परते ॥ १४ ॥ अहोरात्री जाती पळोन ॥ ऐसें निश्चयें जाणोन ॥ पुण्य न करिती जे

१ पानाच्या शेवटावर. २ वृद्धदशा, म्हातारपण. ३ बायकांसाठीं.

जन ॥ पशुसमान परियेसा ॥ १५ ॥ ज्या दिवशीं पुण्य नाहीं ॥ वृथा गेला दिन पाहीं ॥ त्या यमा करुणा नाहीं ॥ करावें पुण्य तात्काळीं॥ १६॥ पुत्र दारा धन गोधन ॥ आयुष्य गृह येणें गुण ॥ जे जन मानिती निश्चय म्हणोन ॥ ते पशुसम परियेसीं ॥ १७ ॥ जैसी सुसरी मनुष्यासी ॥ भक्षिती होय परियेसीं ॥ तैसें या शरिरासी ॥ वार्धक्य भक्षी परियेसा ॥ १८ ॥ या-कारणें तरुणपणीं ॥ करावें पुण्य विद्वज्जनीं ॥ आम्हां कां वर्जिसी जननी ॥ काय बुद्धि बरवी असे ॥ १९ ॥ जो यमाचा असेल इष्ट ॥ त्याणें करावा हा हट्ट ॥ अमरत्वें असे जो स्पष्ट ॥ त्यानें पुढं धर्म करणें ॥ २० ॥ संसार म्हणजे स्वप्नापरी ॥ जैसें पुष्प मोगरी ॥ सवेंचि होय शुष्क वारी ॥ तया-परी देह जाणा ॥ २१ ॥ जैसी विजू असे लवत ॥ सवेंचि होय गुप्त ॥ त्याचि परी देह होत ॥ स्थिर नव्हे परियेसा ॥ २२ ॥ ऐसा नानापरी देखा ॥ बोधिता झाला जननीजनकां ॥ विस्मय वाटे सभालोकां ॥ बाळक

केवीं ज्ञान सांगे ॥ २३ ॥ ऐकोनि पुत्राचें वचन ॥ माता करीतसे नमन ॥ देवा निरोपिलें ज्ञान ॥ विनंती माझी परियेसीं ॥ २४ ॥ त्वां निरोपिलें आम्हांसी ॥ पुत्र चौघे होतील कुशीं ॥ विश्वास नव्हे गा मानसीं ॥ कुळदैवता पुत्रराया ॥ २५ ॥ जोंवरी होय एक सुत ॥ त्वां रहावें समीपत ॥ निरोप नेदीं तोंवरी सत्य ॥ म्हणोनि विनवी ते वेळीं ॥ २६ ॥ माझें वचन लंघूनि ॥ जरी जाशील निघोनि ॥ मी प्राण देईन तत्क्षणीं ॥ हा निश्चय अवधारा ॥ २७ ॥ पुत्र नव्हे तूं आम्हांसी ॥ आमुचा कुळदैवत होसी ॥ सत्य करीं गा वचनासी ॥ बोल आपुले दातारा ॥ २८ ॥ ऐकोनि मातेचें वचन ॥ श्रीगुरु बोलती हांसोन ॥ आमचा बोल सत्य जाण ॥ तूं हें वाक्य निर्धारीं पां ॥ २९ ॥ तूतें होतांचि पुत्र दोनी ॥ निरोप द्यावा संतोषोनि ॥ मग न राहें ऐक जननी ॥ बोल आपुले सत्य करीं ॥ ३० ॥ संवत्सर एक तव घरीं ॥ राहीन माते निर्धारीं ॥ वासना पुरवीन यावरी ॥ मग मज

आज्ञा देणें ॥ ३१ ॥ ऐसें बोलोनि निगुती ॥ राहिले श्रीगुरु अतिप्रीतीं ॥ वेदाभ्यासें ख्याति ॥ केली शिष्यवर्गासी ॥ ३२ ॥ नगरलोक विस्मय करिती ॥ नवल झालें ऐसें बोलती ॥ बाळ पहा वर्षें साती ॥ वेद चारी सांगतसे ॥ ३३ ॥ विद्वज्जन विद्यार्थी ॥ तीन वेळां पढों येती ॥ सकळ-शास्त्री जे म्हणविती ॥ तेही येती शिकावया ॥ ३४ ॥ येणेंपरी त्या घरीं ॥ राहिले श्रीगुरु प्रीतीकरीं ॥ माता झाली गरोदरी ॥ महानंद करीतसे ॥ ३५ ॥ नित्य पूजिती पुत्रासी ॥ देव मानोनि मानसीं ॥ निधान लाधलें एखाद्यासी ॥ काय सांगूं संतोष त्यांचा ॥ ३६ ॥ नवमास होतांचि त्वरित ॥ माता झाली प्रसूत ॥ पुत्र झाले युग्म[२] ख्यात ॥ अतिसुंदर परियेसा ॥ ३७ ॥ पुत्र झाले उल्हास थोर ॥ मातापित्या संतोष फार ॥ आशीर्वचन निर्धार[१] ॥ असत्य नव्हे देवाचें ॥ ३८ ॥ याकारणें गुरुवचन ॥ सत्य माना हो

१ निश्चयानें. २ जुळे.

जन ॥ जैसें असेल अंतःकरण ॥ तैसें होईल परियेसा ॥ ३९ ॥ ऐशापरी वर्ष एक ॥ त्रिमासी झाले ते बाळक ॥ खेळवितसे माता ऐक ॥ आले श्रीगुरु त्यांजवळी ॥ ४० ॥ जननी ऐकावें माझे वचना ॥ झाली तव मन-कामना ॥ दोघे पुत्र निधाना ॥ पूर्णायुषी जन्मले ॥ ४१ ॥ आणिक होतील दोघे लेंक ॥ त्यानंतर कन्या एक ॥ असाल नांदत अत्यंत सुख ॥ वासना पुरेल तुमची जाणा ॥४२॥ आतां आम्हांतें निरोप द्यावें ॥ जातों आम्ही स्वभावें ॥ संतोषरूपी असावें ॥ म्हणोनि निरोप घेती ॥ ४३ ॥ संतोषोनि मातापिता ॥ चरणांवरी ठेविती माथा ॥ स्वामी आमुची कुळ-देवता ॥ अशक्य आम्ही बोलाया ॥ ४४ ॥ न कळे आम्हां स्वरूपज्ञान ॥ काय ओळखावें पूर्ण ॥ मायामोहें वेष्टोन ॥ आम्ही नेणों महिमा ॥ ४५ ॥ मायाप्रपंचें वेष्टोनि ॥ तूतें आम्ही मत म्हणोनि ॥ निष्ठुर बोलों एके क्षणीं ॥

१ तीन महिन्यांचं. २ जाणत नाहीं.

क्षमा करणें स्वामिया ॥४६॥ सहभोजन शयनाशनीं ॥ तूतें गांजों कोंडोनि ॥ कडे न घेचि उचलोनि ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ४७ ॥ तारक आमुचे वंशासी ॥ बापा तूं अवतरलासी ॥ प्रदोषपूजा फळासी ॥ आली मातें स्वामिया ॥ ४८ ॥ आतां आम्हां काय गति ॥ सांगा स्वामी श्रीगुरुमूर्ती ॥ यातायात न पावे वृत्ति ॥ कृपा करीं देवराया ॥ ४९ ॥ सगरांवरी जैसी गंगा ॥ तों आळशावरी आली वेगा ॥ पावन केलें ममांगा ॥ उभयकुळ बेचाळिस ॥ ५० ॥ आम्हां ठेवसी कवणेंपरी ॥ महाधुरंधर संसारीं ॥ तव दर्शन होय जरी ॥ तरीच वांचो आत्मजा ॥ ५१ ॥ ऐकोनि मातापित्यांचें वचन ॥ श्रीगुरु बोलती आपण ॥ जे जे समयीं तुमचें मन ॥ स्मरण करील आमुचें ॥ ५२ ॥ स्मरण करितां तुम्हांजवळी ॥ येईन मी तात्काळीं ॥ न करीं चिंता वेळोवेळीं ॥ म्हणोन भाक देतसे ॥५३॥ आणिक

१ रागावत असूं. २ मुका. ३ वचन, कबूली.

कन्या पुत्र तिन्ही ॥ होतील ऐक भवानी ॥ दैन्य नाहीं तव भुवनीं ॥ सदा श्रीमंत नांदाल ॥ ५४ ॥ जन्मांतरीं ईश्वरासी ॥ पूजा केली प्रदोषीं ॥ याची महिमा आहे ऐसी ॥ जन्मोजन्मीं श्रियायुक्त ॥ ५५ ॥ इह जन्मीं सौख्य ऐक ॥ देहांतीं परम लोक ॥ पूजा करितां पिनाक ॥ पुनर्जन्म नसे कीं ॥ ५६ ॥ त्वां आराधिला शंकर ॥ आम्हां करविला अवतार ॥ वासना पुरविली तुझी जर ॥ आम्हांसी निरोप दे आतां ॥ ५७ ॥ पुन्हा दर्शन तुम्हांसी ॥ होईल ऐका वर्षासी ॥ जावोनि बदरीवनासी ॥ सिद्ध-दर्शन मी घेतों ॥ ५८ ॥ निरोप घेवोनि तये वेळां ॥ श्रीगुरु निघाले अवें-लीळा ॥ नगरलोक येती सकळा ॥ मातापिता बोळविती ॥ ५९ ॥ म्हणती समस्त नरनारी ॥ तपासी निघाला ब्रह्मचारी ॥ होईल पुरुष अवतारी ॥ मनुष्यदेही दिसताहे ॥ ६० ॥ एक म्हणती पहा हो नवल ॥ तपासी निघाला

१ हें त्याच्या आईचें नांव होतें. २ मेल्यानंतर. ३ शंकराची. ४ सहज.

बाळ ॥ मातापिता सकळ ॥ निरोप देती कौतुकें ॥ ६१ ॥ कैसें यांचें अंतःकरण ॥ जैसा हो कां पाषाण ॥ मन करोनि निर्वाण ॥ बोळविती पुत्रासी ॥ ६२ ॥ एक म्हणती नव्हे बाळ ॥ वंद्य जैसा जाश्वनीळ ॥ अनुमान नसे निश्चळ ॥ वेद केवीं म्हणतसे ॥ ६३ ॥ सात वर्षांचें बाळ देखा ॥ वेद म्हणतो अखिल शाखा ॥ मनुष्यमात्र नव्हे लेखा ॥ ऐसें बोलती साधुजन ॥ ६४ ॥ ऐसें त्याला बोलोन ॥ करिती साष्टांग नमन ॥ नानापरी स्तोत्रवचन ॥ करिते झाले अवधारा ॥ ६५ ॥ नमन करोनि सकळिक ॥ आले आपुले गृहांतिक ॥ पुढें जाती जननीजनक ॥ पुत्रासवें बोळवीत ॥ ६६ ॥ निजरूप जननीसी ॥ दाविता झाला मातेसी ॥ श्रीपादवल्लभदत्तात्रेयासी ॥ देखते झाले जनकजननी ॥ ६७ ॥ त्रिमूर्तींचा अवतार ॥ झाला नरहरी नर ॥ निजरूपीं कर्पूरगौर ॥ पाहतां नमी चरणासी ॥ ६८ ॥ जय जय जगद्गुरू ॥ त्रिमूर्तींचा अवतारू ॥ आमुचें पुण्य होते

थोरू ॥ म्हणोनि देखिले तुझे चरण ॥ ६९ ॥ तूं तारक विश्वासी ॥ आम्हां उद्धरिलें विशेषीं ॥ पुनर्दर्शन आम्हांसी ॥ द्यावें म्हणोनि नमस्कार करिती ॥ ७० ॥ ऐसें म्हणोनि मातापिता ॥ चरणांवरी ठेविला माथा ॥ आलिंगिती श्रीगुरुनाथा ॥ स्नेहभावेंकरूनियां ॥ ७१ ॥ संतोष मानी श्रीगुरुमूर्ति ॥ आश्वासन केलें अतिप्रीतीं ॥ पुनर्दर्शन हो निश्चिती ॥ देईन म्हणती तये वेळीं ॥ ७२ ॥ ऐसें तयां संबोखोनि[1] ॥ निरोप घेतला तये क्षणीं ॥ परतोनि गेलीं जनकजननी ॥ येती संतोषें मंदिरा ॥ ७३ ॥ वरदमूर्ति गुरुराणा ॥ निघाले जावया बदरीवना ॥ पातले आनंदकानना[2] ॥ वाराणसीक्षेत्रासी ॥ ७४ ॥ अविमुक्ता वाराणसी पुरी ॥ क्षेत्र थोर चराचरीं ॥ विश्वेश्वर अवधारीं ॥ अनुपम्य असे त्रिभुवनीं ॥ ७५ ॥ राहोनियां त्या स्थानीं ॥ अनुष्ठान करिती श्रीगुरुशिरोमणी ॥ विश्वेश्वराचे दर्शनीं ॥

१ समजूत करून. २ आनंदानें पूर्ण भरलेलें.

करिती [1]आत्माराम ॥ ७६ ॥ येणेंपरी त्या स्थानीं ॥ कचित्काळ क्रमोनि ॥ अष्टांगयोगेंकरूनि ॥ तप करिती परियेसा ॥ ७७ ॥ तया काशीनगरांत ॥ तपस्वी असती आणिक बहुत ॥ संन्यासी येती अवधूत ॥ तप करिती अनुष्ठानें ॥ ७८ ॥ त्यांमाजीं श्रीगुरु ब्रह्मचारी ॥ योगाभ्यासधुरंधरी ॥ देखोनियां तापसी [2]येरी ॥ नवल करिती मनांत ॥ ७९ ॥ म्हणती पहा हो ब्रह्मचारी ॥ तप करितो नानापरी ॥ कैसें वैराग्य याचे उदरीं ॥ ठसावलें असेल [3]निर्लिप्त ॥ ८० ॥ शरीरस्वार्थ नाहीं यासी ॥ योगी होय संन्यासी ॥ स्नान करितो त्रिकाळेंसी ॥ मणिकर्णिकेमाझारी ॥ ८१ ॥ ऐसें अमित स्तोत्र करिती ॥ सकळ संन्यासी दर्शन घेती ॥ वृद्ध होता एक यति ॥ नाम तया कृष्णसरस्वती ॥ ८२ ॥ तो केवळ ब्रह्मज्ञानी ॥ तपस्वी असे महामुनि ॥ तो देखोनियां नयनीं ॥ स्नेहभावें भावीतसे ॥ ८३ ॥

१ निजस्वरूपीं रममाण होणें. २ दुसरे. ३ निर्दोष.

म्हणे सकळ यतीश्वरांसी ॥ न म्हणा नरू ब्रह्मचारी यासी ॥ अवतारपुरुष अतितापसी ॥ विश्ववंद्य दिसतसे ॥ ८४ ॥ वार्धक्यपणें आम्हांसी ॥ वंदितां भूषण सकळांसी ॥ विशेष आम्ही संन्यासी ॥ मूर्ख जन निंदिती ॥८५॥ वय धाकुटें जाणोनि ॥ नमन करा हो तुम्हीं मनीं ॥ प्रख्यात मूर्ति त्रिभुवनीं ॥ आम्हां वंद्य असे देखा ॥ ८६ ॥ या कारणें आम्ही यासी ॥ विनवूं परोपकारासी ॥ संन्यास देतां समस्तांसी ॥ मति स्थिर होईल ॥ ८७ ॥ लोकानुग्रहानिमित्त ॥ हा होय गुरु समर्थ ॥ याचे दर्शनमात्रें पतित ॥ पुनीत होती परियेसा ॥ ८८ ॥ याकारणें बाळकासी ॥ विनवूं आम्ही विनयेंसीं ॥ आश्रम घ्यावा संन्यासी ॥ पूजा करूं एकभावें ॥ ८९ ॥ म्हणोनि आले त्याजवळीं ॥ विनविताती मुनि सकळी ॥ ऐक तापसी स्तोममौळी ॥ विनंती असे परियेसा ॥ ९० ॥ लोकानुग्रहाकारणें ॥ तुम्हीं

१ सगळ्या जगानें वंदन करण्यास योग्य.

आतां संन्यास घेणें ॥ आम्हांलागीं उद्धरणें ॥ पूजा घ्यावी आम्हां करीं ॥ ९१ ॥ कलियुगीं संन्यासी म्हणोन ॥ निंदा करिती सकळ जन ॥ स्थापना करणार कवण ॥ भूमीवरी न दिसताती ॥ ९२ ॥ श्लोक ॥ अग्निहोत्रं गवालंभं[1] संन्यासं पलपैतृकम्[2] ॥ देवराच्च सुतोत्पत्तिः कलौ पंच विवर्जयेत् ॥ ९३ ॥ टीका ॥ यज्ञदान गवालंभन ॥ संन्यास घेतां अतिदूषण ॥ पलपैतृक घे भ्रातुरंगना[3] ॥ करूं नये म्हणताती ॥ ९४ ॥ करितां कलियुगांत ॥ निषिद्ध बोलती जन समस्त ॥ संन्यासमार्ग सिद्धांत ॥ वेदसंमत विख्यात ॥ ९५ ॥ पूर्वीं ऐसें वर्तमानीं ॥ निषिद्ध केलें सकळ जनीं ॥ शंकराचार्य अवतारोनि ॥ स्थापना केली परियेसा ॥ ९६ ॥ त्यावरी इतुके दिवस ॥ चालत आला मार्ग संन्यास ॥ कलि प्रबळ होतां नाश ॥ पुनरपि निंदा करिताती ॥९७॥ आश्रमाचा उद्धार ॥ सकळ जनां उपकार ॥

१ गवालंभ नांवाचा मधुपर्कांचे वेळचा एक विधि. २ श्राद्धाचे दिवशीं मद्यमांस घेणें. ३ भावजय.

करावया कृपासागर ॥ म्हणती सकळ मुनिवर ॥ ९८ ॥ ऐकोनि त्यांची विनंती ॥ गुरुमुनि आश्रम घेती ॥ वृद्ध कृष्णसरस्वती ॥ तयापासोनि परियेसा ॥ ९९ ॥ ऐसें म्हणती सिद्धमुनि ॥ विनवीतसे नामकरणी ॥ संदेह होतो माझे मनीं ॥ कृपामूर्ति गुरुराया ॥ १०० ॥ म्हणती श्रीजगद्गुरु ॥ यातें झाला आणिक गुरु ॥ त्रिमूर्तीचा अवतारु ॥ कोणेंपरी दिसतसे ॥ १ ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ सांगेन त्याची स्थिति कैसी ॥ पूर्वीं श्रीरघुनाथासी ॥ झाला वसिष्ठ जैसा कीं ॥ २ ॥ आठवा अवतार कृष्णासी ॥ सांदीपनी गुरु परियेसीं ॥ अवतार होतांचि मानुषीं ॥ तयापरी रहाटावें ॥ ३ ॥ याकारणें गुरुमूर्तीं ॥ गुरु केला कृष्णसरस्वती ॥ बहुकाळींचा होता यति ॥ म्हणोनि त्यातें मानिलें ॥४॥ शिष्य म्हणे सिद्धासी ॥ स्वामी कथा निरोपिलीसी ॥ वृद्ध कृष्णसरस्वतीसी ॥ गुरु केलें म्हणोनियां ॥ ५ ॥ समस्त यतीश्वर मिळोन ॥ तया दिधला बहुमान ॥



[ अ० १२·] ऐकोनी त्यांची विनंति । गुरुमूर्ति आश्रम देती । वृद्ध कृष्णसरस्वती । तयापासोनी परियेसा ॥ ९९ ॥

कृष्णसरस्वती पूर्वीं कोण ॥ कोण गुरूचें मूळपीठ ॥ ६ ॥ विस्तारोनियां आम्हांसी ॥ निरोपावें कृपेंसीं ॥ येणें माझे मानसीं ॥ संतोष होय स्वामिया ॥ ७ ॥ ऐसें शिष्यें विनवितां ॥ सांगे सिद्ध विस्तारता ॥ मूळपीठ आद्यंता ॥ गुरुसंतति परियेसा ॥ ८ ॥ पूर्वपीठ शंकरू ॥ त्यानंतर विष्णु गुरु ॥ त्यावरी चतुर्वक्त्र ॥ गुरुपीठ अवधारीं ॥ ९ ॥ तदनंतर वसिष्ठ गुरु॥ तेथोनि शक्ति पराशरू ॥ त्याचा शिष्य व्यास थोरू ॥ जो कां अवतार विष्णूचा ॥ ११० ॥ तयापासाव शुक जाण ॥ गौडपाद आचार्य सगुण ॥ आचार्य गोविंद तयाहून ॥ पुढें आचार्य शंकर जाहले ॥ ११ ॥ तेथोनि विश्वरूपवर्या ॥ पुढें ज्ञानबोधनगिरिया ॥ त्याचा शिष्य सिद्धगिरियां ॥ ईश्वरतीर्थ पुढें झाले ॥ १२ ॥ तदनंतर नृसिंहतीर्थ ॥ पुढें शिष्य विद्यातीर्थ ॥ शिवतीर्थ भारतीतीर्थ ॥ गुरुसंतति अवधारा ॥ १३ ॥ मग त्या-

१ ब्रह्मदेव.

पासोनि ॥ विद्यारण्य श्रीपादमुनि ॥ विद्यातीर्थ म्हणोनि ॥ पुढें झाला परियेसा ॥ १४ ॥ त्याचा शिष्य मलियानंद ॥ देवतीर्थ सरस्वतीवृद्ध ॥ तेथोनि सरस्वतीयादवेंद्र ॥ गुरुपीठ येणेंपरी ॥ १५ ॥ यादवेंद्र मुनीचा शिष्य ॥ कृष्णसरस्वती विशेष ॥ बहुकाळींचा होता संन्यास ॥ तेणें विशेष मानिती ॥ १६ ॥ येणेंपरी श्रीगुरुनाथ ॥ आश्रम घेती चतुर्थ ॥ संन्यासमार्गस्थापनार्थ ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥ १७॥ समस्त वेदांचा अर्थ ॥ सांगते झाले श्रीगुरुनाथ ॥ म्हणोनि वंदिती समस्त ॥ तया काशीपुरीं ॥ १८ ॥ ख्याति झाली अतिगहनी ॥ त्या वाराणसीभुवनीं ॥ यति समस्त देखोनि ॥ सेवा करिती श्रीगुरूची ॥ १९ ॥ मग निघाले तेथोनि ॥ बहु शिष्य सवें घेवोनि ॥ उत्तरपथ बदरीवनीं ॥ अनंत तीर्थें पहावया ॥ १२० ॥ सव्य घालूनि मेरूसी ॥ तीर्थें नवखंड क्षितीसी ॥ सांगतां विस्तार बहुवसीं ॥ एक

---

१ गुरुपरंपरा.

शिष्या नामकरणी ॥ २१ ॥ समस्त तीर्थें अवलोकित ॥ सवें शिष्य येती बहुत ॥ भूमिप्रदक्षिणा करित ॥ आले गंगासागरासी ॥ २२ ॥ सिद्ध म्हणे नामांकिता ॥ समस्त तीर्थें सांगतां ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ तांवन्मात्र सांगतों ॥२३॥ सकळ महिमा सांगावयासी ॥ शक्ति कैंची आम्हांसी ॥ अनंत महिमा त्रिमूर्तीसी ॥ गुरुचरित्र परियेसा ॥ २४ ॥ गंगासागरापासाव ॥ तटाकयात्रा करिती देव ॥ प्रयागस्थानीं गुरुराव ॥ येते झाले परियेसा ॥ २५ ॥ तया स्थानीं असतां गुरु ॥ आला एक द्विजवरू ॥ माधवनामा विप्र थोरू ॥ श्रीगुरूसी भेटला ॥ २६ ॥ ब्रह्मज्ञान तयासी ॥ उपदेश केला परियेसीं ॥ चतुर्थाश्रम त्यासी ॥ देते झाले परियेसा ॥ २७ ॥ नाम माधवसरस्वती ॥ तया शिष्या ठेविती ॥ त्यावरी बहुप्रीति ॥ शिष्यांमध्यें परियेसा ॥ २८ ॥ सिद्ध म्हणे नामकरणी ॥ शिष्य झाले बहुतगुणी ॥

१ थोडक्यांत. २ सर्व.

आखिल येती नामकरणी ॥ पुढें विंचारणी होईल ॥ २९ ॥ गंगाधराचा नंदनू ॥ सांगे गुरुचरित्र कामधेनू ॥ ऐकतां होय महाज्ञानू ॥ लाधती चारी पुरुषार्थ ॥ ३० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ गुरुपरंपरा विख्यात ॥ सांगितला निश्चितार्थ ॥ द्वादश प्रश्नीं श्रोतयांसी ॥ १३१ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे गुरुपरंपराकथनद्वादशप्रश्नं नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ ओंवीसंख्या १३१

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

१ उल्लेख.

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागे सिद्धाचिया चरणां ॥ करसंपुट जोडोनि जाणा ॥ विनवीतसे परियेसा ॥ १ ॥ जय जया जी सिद्ध मुनी ॥ तूं तारक भवार्णी[१] ॥ सांगितलें ज्ञान प्रकाशोनि ॥ परिसोनि मना सुख जाहलें ॥ २ ॥ गुरुचरित्रकथामृत ॥ सेवितां तृष्णा[२] अधिक होत ॥ शमन करणार समर्थ ॥ तूंचि एक कृपानिधि ॥ ३ ॥ गुरुचरित्र कामधेनु ॥ सांगितलें तुम्हीं विस्तारोनु ॥ तृप्त नव्हे माझें मनु ॥ आणिक अपेक्षा होतसे ॥ ४ ॥ क्षुधेनें पीडिलें ढोर ॥ जैसें पावे तृणबिढार[३] ॥ त्यातें होय मनोहर ॥ न वंचे तेथोनि परियेसा ॥ ५ ॥ एखादा न देखे तक्र स्वप्नीं ॥ त्यासी मिळे क्षीरबरैणी ॥ नव्हे साचें मन घर्णीं[४] ॥ केवीं साडी तो ठावो ॥ ६ ॥ तैसा आपण स्वल्पज्ञानी ॥ नेणत होतों गुरु निर्वाणी ॥ अविद्यामाया वेष्टोनि ॥ कष्टत होतों स्वामिया ॥ ७ ॥ अज्ञानतिमिररज-

१ संसारसमुद्रांत. २ इच्छा. ३ गवताच्या राशीजवळ. ४ झाले. ५ दुधानें भरलेलें भांडें.

नीसी ॥ ज्योतिःस्वरूप तूंचि होसी ॥ प्रकाश केला गा आम्हांसी ॥ निज-
स्वरूप श्रीगुरूचें ॥८॥ तुवां केलें उपकारासी ॥ उत्तीर्ण काय होऊं सरसी ॥
॥ कल्पवृक्ष दिल्हीयासी ॥ प्रत्युपकार काय द्यावा ॥ ९ ॥ एखादा देतां
चिंतामणी ॥ त्यासी उपकार काय धरणीं ॥ नाहीं दिल्हें न ऐकों कानीं ॥
कृपामूर्ति सिद्धराया ॥ १० ॥ ऐशा तवोपकारासी ॥ उत्तीर्ण न व्हावें वंशो-
वंशीं ॥ म्हणोनि लागतसे चरणांसी ॥ एकभावेंकरोनियां ॥ ११ ॥ स्वामी
निरोपिले धर्मार्थ ॥ अधिक झाले मज स्वार्थ ॥ उपजला मज परमार्थ ॥
गुरुभजनीं निरंतर ॥ १२ ॥ प्रयागीं असतां गुरुमूर्ति ॥ माधवसरस्वतीस
दीक्षा देती ॥ पुढें काय वर्तली स्थिति ॥ ते आम्हांप्रती विस्तारिजे ॥१३॥
ऐकोनि शिष्याचें वचन ॥ सिद्ध मुनि संतोषोन ॥ मस्तकीं हस्त ठेवोन ॥
आश्वासित त्या वेळीं ॥ १४ ॥ धन्य शिष्या सगुण ॥ तुज लाधले गुरु-
चरण ॥ संसारतारक भवार्णं ॥ तूंचि एक परियेसा ॥ १५ ॥ त्वां ओळ-

खिली गुरुसोय ॥ म्हणोनि बोलती गुरुराय ॥ संतोष होतो आनंदमय ॥ तव प्रश्न ऐकोनियां ॥ १६ ॥ सांगेन ऐक एकचित्तें ॥ चरित्र गुरूचें विख्यातें ॥ उपदेशोनि माधवातें ॥ होते तेथें कचित्काळ ॥ १७ ॥ असतां तेथें वर्तमानीं ॥ प्रख्यात झाली महिमा सगुणी ॥ शिष्य झाले अपार मुनि ॥ मुख्य माधवसरस्वती ॥ १८ ॥ त्या शिष्यांचीं नामें सांगतां ॥ विस्तारेल बहुत कथा ॥ प्रख्यात नामें असती सात ॥ सांगतों ऐक एकचित्तें ॥ १९ ॥ बाळसरस्वती कृष्णसरस्वती ॥ उपेंद्र माधवसरस्वती ॥ पांचवा होता आणीक यति ॥ सदानंदसरस्वती देखा ॥ २० ॥ ज्ञानज्योतिसरस्वती एक ॥ सातवा सिद्ध आपण एक ॥ अपार होते शिष्य आणिक ॥ एकाहूनी एक श्रेष्ठ पैं ॥ २१ ॥ त्या शिष्यांसमवेत ॥ गुरु लंघित दक्षिणपंथ ॥ समस्त क्षेत्रें पावन करित ॥ आले करंजनगरासी ॥ २२ ॥ भेटी झाली जनकजननी ॥ येवोनि लागती चरणीं ॥ चतुर्वर्ग भ्राता

भगिनी ॥ समस्त भेटती स्वामिया ॥ २३ ॥ देखोनि गुरुमूर्तीसी ॥ नगर-
लोक अत्यंत हर्षी ॥ आले सकळ भेटीसी ॥ पूजा करिती परोपरी ॥२४॥
घरोघरीं श्रीगुरूसी ॥ पाचारिती भिक्षेसी ॥ आले स्वरूपी बहुवसी ॥ घरो-
घरीं घेती पूजा ॥ २५ ॥ समस्त विस्मय करिती ॥ अवतार विष्णु हा
निश्चितीं ॥ वेषधारी दिसे यति ॥ पेरमपुरुष होय जाणा ॥ २६ ॥ यातें
नर जे बोलती ॥ ते जाती नरकाप्रती ॥ कार्याकारण अवतार होती ॥
ब्रह्माविष्णुमहेश ॥ २७ ॥ जननीजनक येणें रीतीं ॥ पूजा करिती भाव-
भक्तीं ॥ श्रीगुरु झाले श्रीपादयाति ॥ झाली स्मृति जननीसी ॥ २८ ॥
जननी देखोनि तये वेळीं ॥ माथा ठेवी चरणकमळीं ॥ सत्यसंकल्प चंद्रमौळी
॥ प्रदोषपूजा फळा आली पैं ॥ २९ ॥ पतीस सांगे तये वेळीं ॥ पूर्वजन्म-
चरित्र सकळीं ॥ विश्ववंद्य पुत्र प्रबळी ॥ व्हावा म्हणोनि आराधिलें ॥३०॥

१ बोलाविताव. २ ईश्वर. ३ आठवण.

त्या श्रीपाद ईश्वराची ॥ पूजा केली मनोवाचीं ॥ प्रसिद्ध झालीं जन्में आमुचीं ॥ सफळ केलें परियेसा ॥ ३१ ॥ म्हणोनि नामिती दोघें चरणीं ॥ विनविताती करुणावचनीं ॥ उद्धारावें या भवार्णीं ॥ जगन्नाथ यतिराया ॥ ३२ ॥ श्रीगुरु म्हणती त्यांसी ॥ एकाद्या काळीं परियेसीं ॥ पुत्र होईल संन्यासी ॥ उद्धरील कुळें बेचाळिस ॥ ३३ ॥ त्यासी शाश्वत[1] ब्रह्मलोक ॥ अचळ[2] पद असे ऐक ॥ त्याचे कुळीं उपजतां देख ॥ ब्रह्मपद शाश्वत त्यासी पैं ॥३४॥ यमाचे दुःखें भयाभीत ॥ नव्हे त्याचे संततींत ॥ पूर्वज जरी नरकीं असत ॥ त्यांस शाश्वत ब्रह्मलोक ॥ ३५ ॥ त्या कारणें आम्हीं देखा ॥ घेतला आश्रमविशेषा ॥ तुम्हां नाहीं यमाची शंका ॥ ब्रह्मपद असे सत्य ॥ ३६ ॥ ऐसें सांगोनि त्यांसी ॥ आश्वासिती बहुवसीं ॥ तुमचे पुत्र शतायुषी ॥ अष्टैश्वर्यें नांदती ॥ ३७ ॥ त्या पुत्रां तुम्ही धनी ॥ पहाल सुखें नयनीं ॥

१ सदा सर्वकाळ. २ न ढळणारें.

पावाल क्षेत्र काशीभुवनीं ॥ अंतकाळीं परियेसा ॥३८॥ मुक्तिस्थान काशीपुर ॥ प्रख्यात असे वेदशास्त्र ॥ न करीं चिंता अणुमात्र ॥ म्हणोनि सांगती तये वेळीं ॥ ३९ ॥ त्यांची कन्या असे एक ॥ नाम रत्नाई निःशंक ॥ श्रीगुरूतें नमोनि ऐक ॥ विनवीतसे परियेसा ॥ ४० ॥ विनवीतसे परोपरी ॥ स्वामी मातें तारीं तारीं ॥ बुडतें मी भवसागरीं ॥ संसारमाया वेष्टोनियां ॥ ४१ ॥ निर्लेप करीं मजसी ॥ मग मी जाईन तपासी ॥ ऐकोनियां वचनासी ॥ गुरु निरोपिती ॥ ४२ ॥ पतिसेवा करावी ॥ तेणेंच बरवी मोक्षपदवी ॥ पावेल त्यांत न धरावी ॥ अन्य वृत्ति ॥ ४३ ॥ येणें या भवार्णवासी ॥ कडे पडती परियेसीं ॥ जैसें जैसें भावयासी ॥ तैसें होय परियेसा ॥ ४४ ॥ उतरावया पैल पार ॥ स्त्रियांसी असे वो भ्रतार ॥ मनीं ठेवी निर्धार ॥ भजावा पुरुष शिवसम ॥ ४५ ॥

१ थोडीसुद्धां. २ पति.

त्यांसी होय उद्धार गति ॥ वेदपुराणें वांनिती ॥ अंतरीं न करीं खंती ॥ तुज गति होईल ॥ ४६ ॥ ऐकोनि गुरूचें वचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ गुरुमूर्ति ब्रह्मज्ञान ॥ विनवीतसे अवधारा ॥ ४७ ॥ जाणसी भविष्यभूत ॥ कैसें मातें उपदेशित ॥ माझें प्रारब्ध कवण गत ॥ विस्तारावें मजपुढें॥४८॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ तव वासना असे तपासी ॥ संचित आपुलें असें भोगसी ॥ भोगणें असे परियेसीं ॥ ४९ ॥ पूर्वजन्मीं परियेसीं ॥ चरणीं लाथिलें धेनूसी ॥ शेजारी स्त्रीपुरुषांसीं ॥ विरोध लाविला कलह पैं ॥५०॥ त्या दोषास्तव देखा ॥ तुज बाधा असे अनेका ॥ गाय लाथिली तेणें ऐका ॥ सर्वांगीं कुष्ठी होसी ॥ ५१ ॥ विरोध केला स्त्रीपुरुषांसीं ॥ तव पुरुष होईल तापसी ॥ तूतें त्यजील भरंवसीं ॥ आर्जित तव ऐसें असे॥५२॥ ऐकोनि दुःख करी बहुत ॥ श्रीगुरुचरणांवरी लोळत ॥ उद्धारीं गुरुनाथ

१ वाखाणतात.

त्वरित ॥ म्हणोनि चरणां लागली ॥ ५३ ॥ श्रीगुरु म्हणती ऐक बाळे ॥ कचित्काळें असाल भले ॥ अपरवय होतां काळें ॥ पति तुझा याति होईल ॥ ५४ ॥ तदनंतर तुझा देह ॥ कुष्ठी होईल आँवेव ॥ भोगूनि शुद्ध देह ॥ मग होईल तुज गति ॥ ५५ ॥ नासतां तुझा देह जाण ॥ भेटी होईल माझी पूर्ण ॥तव पाप होईल दहन ॥ सांगेन क्षेत्र एक पां ॥ ५६ ॥ भीमा-तीर दक्षिण देश ॥ तेथें तीर्थ पापविनाश ॥ जाय तेथें भरंवसें ॥ अवस्था तुज घडलियावरी ॥ ५७ ॥ या भूमंडळीं विख्यात ॥ असे तीर्थ अतिसामर्थ ॥ गंधर्वपुर प्रख्यात ॥ अमरजासंगम प्रसिद्ध पैं ॥ ५८ ॥ ऐसें सांगोनि तिसी ॥ गुरु निघाले दक्षिणादिशीं ॥ त्र्यंबकनाम क्षेत्रासी ॥ आले गौतमी-उद्भव जेथें ॥५९॥ शिष्यांसह गुरुमूर्ति ॥ आले नाशिकक्षेत्राप्रती ॥ तीर्थमाहिमा असे ख्याति ॥ पुराणांत परियेसा ॥ ६० ॥ तीर्थमहिमा सां-

१ वृद्धापकाळीं. २ काळेंकरून. ३ अवयव.

गतां ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ संक्षेप सांगेन आतां ॥ तें परियेसीं ॥ ६१ ॥ त्या गौतमीचा महिमा.॥ सांगतां अपार आम्हां ॥ बहिरार्णव उदक नामा ॥ ब्रह्मांडाऽव्यतिरिक्त ॥ ६२ ॥ जटामुकुटीं सर्वेश्वर ॥ धरीतसे निरंतर ॥ मिळोनि सकळ ऋषीश्वर ॥ उपाय केला परियेसा ॥ ६३ ॥ ब्रह्मऋषि गौतम देखा ॥ तपस्वी असे विशेषा ॥ [1]व्रीहि पेरिलें [2]वृत्ती ऐका ॥ अनुष्ठानस्थानाजवळी ॥ ६४ ॥ पूर्वीं ऋषीं मुनीं सकळीं ॥ नित्य पेरूनि पिकविती साळी ॥ ऐसे त्यांचे मंत्र प्रबळी ॥ महा तपस्वी पुण्यपुरुष ॥ ६५ ॥ समस्त ऋषि मिळोनि ॥ विचार करिती आपुले मनीं ॥ गौतमऋषि महाज्ञानी ॥ मुख्य दास ईश्वराचा ॥ ६६ ॥ त्यासी घालितां सांकडें[3] ॥ गंगा आणील आमुचेकडे ॥ समस्तां आम्हां पुण्य घडे ॥ गंगा आणूनि भूमंडळीं ॥ ६७ ॥ श्लोक ॥ या गतिर्योगयुक्तानां मुनीनामूर्ध्वरेतसाम् ॥ सा

१ भात. २ उपजीविका. ३ संकट.

गतिः सर्वजंतूनां गौतमीतीरवासिनाम् ॥ ६८ ॥ टीका ॥ ऊर्ध्वरेत मुनीश्वरांसी ॥ कोटिवर्षें तपस्व्यांसी ॥ जे गति होय परियेसीं ॥ ते गति गौतमीतीरस्थां ॥ ६९ ॥ या कारणें गौतमीसी ॥ आणावें यत्नें भूमंडळासी ॥ सांकडें घालावें गौतमासी ॥ गंगा आणितां आम्हां लाभ ॥ ७० ॥ म्हणोनि रचिली माया एक ॥ दुर्वेची गाय सवत्सक ॥ करोनि पाठविली एक ॥ गौतमव्रीहिभक्षणार्थ ॥ ७१ ॥ ऋषि होता अनुष्ठानीं ॥ देखतां धेनु नयनीं ॥ निवाराया तत्क्षणीं ॥ दर्भपवित्र सोडिलें ॥ ७२ ॥ तेंचि दुर्वार जाहलें शस्त्र ॥ धेनूसी लागलें जैसें वज्रास्त्र ॥ पंचत्व पावली त्वरित ॥ घडली हत्या गौतमासी ॥ ७३ ॥ मिळोनि सर्व ऋषिजन ॥ प्रायश्चित्त देती जाण ॥ गंगा भूमंडळीं आण ॥ यावीण तुज नाहीं शुद्धि ॥ ७४ ॥ त्या कारणें गौतमऋषीं ॥ तप केलें सहस्र वर्षीं ॥ प्रसन्न झाला व्योमकेशी ॥ वर माग

१ आजन्म ब्रह्मचर्यानें रहाणारे. २ गोदावरीच्या तीरांवर रहाणाऱ्यांस. ३ कपट, दंभ.

म्हणतसे ॥ ७५ ॥ गौतम म्हणे सर्वेश्वरा ॥ मज प्रसन्न झालां दातारा ॥ उद्धारावया चराचरा ॥ गंगा द्यावी भूमंडळीं ॥ ७६ ॥ गौतमाचे विनंतीसी ॥ निरोप दिधला गंगेसी ॥ घेवोनि आले भूमंडळासी ॥ पापक्षालनार्थ मनुष्यांचे ॥ ७७ ॥ ऐसी गंगाभागीरथी ॥ कोंणा वर्णवे सामर्थी ॥ याचि कारणें गुरुमूर्ति ॥ आले ऐक नामधारका ॥ ७८ ॥ ऐशी गौतमीतटाकयात्रा ॥ श्रीगुरु आचरती पवित्रा ॥ पुढें लोकानुग्रहमात्रा ॥ आपण हिंडत ॥ ७९ ॥ तटाकयात्रा करितां देखा ॥ आले श्रीगुरु मंजरिका ॥ तेथें होता मुनि एका ॥ विख्यात माधवारण्य ॥ ८० ॥ सदा मानसपूजा त्यासी ॥ नृसिंहमूर्ति परियेसीं ॥ देखता झाला श्रीगुरूसी ॥ मानसमूर्ति जैसी देखे ॥ ८१ ॥ नमिता झाला श्रीगुरूसी ॥ स्तोत्र करी बहुवसीं ॥ विस्मित होऊनि मानसीं ॥ अतिभक्तीं करोनियां ॥ ८२ ॥ श्लोकः ॥ यद्दिव्यपादद्वयमेव लक्षितं देवैर्न दृष्टं तदिदं समीपे ॥ यदुत्तरे तीरनिवासमानं

लक्ष्मीसमीपे निवसद्धिनीतम् ॥ १ ॥ टीका ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ विनवी माधवारण्य हर्षीं ॥ श्रीगुरु म्हणती संतोषीं ॥ तया माधवारण्यासी देखा ॥८३॥ श्लोक ॥ अत्यंतमार्गस्थितिमार्गरूपमत्यंतयोगैराधिगम्य तत्त्वम् ॥ मार्गप्रदं मार्गं विचिन्वते मे मार्गोदयं माधवदर्शनं च ॥ ८४ ॥ ऐसें गुरूचें स्वरूप ॥ देखोनि तयासी सुख अमूप ॥ आश्वासोनि निजरूप ॥ दाविते झाले परियेसा ॥ ८५ ॥ श्रीगुरुस्वरूप देखोनि ॥ संतुष्ट झाला तो मुनि ॥ विनवीतसे कर जोडोनि ॥ नानापरी स्तुति करी ॥ ८६ ॥ जय जय जगद्गुरू ॥ त्रिमूर्तींचा अवतारू ॥ लोकां दिसतोसी नरू ॥ परमपुरुषा जगन्नाथा ॥ ८७ ॥ तूं तारक विश्वासी ॥ म्हणोनि भूमीं अवतरलासी ॥ कृतार्थ केलें आम्हांसी ॥ दर्शन देवोनि चरणांचें ॥ ८८ ॥ ऐसे परी श्रीगुरूसी ॥ स्तुति करी तो तापसी ॥ संतोषोनि अति हर्षीं ॥ आश्वासिलें

१ पुष्कळ.

त्या वेळीं ॥ ८९ ॥ म्हणती श्रीगुरु त्यासी ॥ सिद्धि झाली तव मंत्रासी ॥ तव सद्गति भरंवसीं ॥ ब्रह्मलोकीं होय ॥ ९० ॥ नित्यपूजा तूं मानसीं ॥ करिसी नृसिंहमूर्तीसी ॥ प्रत्यक्ष[1] होईल परियेसीं ॥ न करीं संशय मनांत ॥ ९१ ॥ ऐसें सांगोनि त्यासी ॥ श्रीगुरु निघाले परियेसीं ॥ आले वासर-ब्रह्मेश्वरासी ॥ गंगातीर महाक्षेत्र ॥ ९२ ॥ त्या गंगातटाकांत ॥ श्रीगुरु समस्त शिष्यांसहित ॥ स्नान करितां गंगेंत ॥ आला विप्र एक त्या स्थळीं ॥ ९३ ॥ कुक्षिव्यथा[2] असे बहुत ॥ तटाकीं असे लोळत ॥ उदर-व्यथा अत्यंत ॥ त्यजूं पाहे प्राण देखा ॥ ९४ ॥ पोटव्यथा बहु त्यासी ॥ नित्य करी तो उपवासासी ॥ भोजन केलिया दुःखें ऐसी ॥ प्राणांतिक होतसे ॥ ९५ ॥ या कारणें द्विजवर ॥ सदा करी फलाहार ॥ अन्नासीं त्यासीं असे वैर ॥ जेवितां प्राण त्यजूं पाहे ॥ ९६ ॥ पक्षमासां[3] भोजन

१ प्रत्यक्ष दर्शन. २ पोटदुखी. ३ महिनापंधरा दिवशीं.

करी ॥ परम व्यथा असे त्याचे उदरीं ॥ ऐसें किती दिवसांवरी ॥ कष्टत होता तो द्विज ॥ ९७ ॥ पूर्वदिनीं त्या ग्रामीं ॥ असे सण महानवमी ॥ जेविला मिष्टान्नें नेमीं ॥ मास एक पारणें केलें ॥ ९८ ॥ भोजन केलें अन्न बहुत ॥ त्याणें पोट असे दुखत ॥ गंगातीरीं असे लोळत ॥ प्राण त्वरित त्यजूं पाहे ॥ ९९ ॥ दुःख करी द्विज अपार ॥ म्हणे गंगेंत त्यजीन शरीर ॥ नको आतां संसार ॥ पापरूपें वर्ततों ॥ १०० ॥ अन्न प्राण अन्न जीवन ॥ कोण असेल अन्नावीण ॥ अन्न वैरी झालें जाण ॥ मरण बरवें आतां मज ॥ १ ॥ मनीं निर्धार करोनि ॥ गंगाप्रवेश करितों म्हणोनि ॥ पोटीं पाषाण बांधोनि ॥ गंगेमध्यें निघाला ॥ २ ॥ मनीं स्मरे कर्पूरगौर ॥ उपजूनि आपण भूमिभार ॥ केले नाहीं परोपकार ॥ अन्नदानादिक देखा ॥ ३ ॥ न करीं पुण्य इह जन्मांत ॥ जन्मांतरीं पूर्व शत ॥ पुण्यफळ नसे सत ॥ मग कष्ट भोगीतसें ॥ ४ ॥ ग्राम हरिले ब्राह्मणाचे ॥ किंवा धेनु

कापलंचें ॥ घात केलिया विश्वासियाचें ॥ मग हे कष्ट भोगितसें ॥ ५ ॥ अपूर्ती पूजा ईश्वराची ॥ केली असे निंदा गुरूची ॥ अवज्ञा केली माता-पित्यांची ॥ मग हे कष्ट भोगितों ॥ ६ ॥ अथवा मारिलें पशूंसी ॥ अभि घातिला रानासी ॥ वेगळें सांडूनि जनकजननींसी ॥ स्त्रियेसहित वेगळा होतों ॥ ७ ॥ अथवा पूर्वजन्मीं आपण ॥ केलें असे द्विजां धिक्करण ॥ अतिथि आलिया न घालीं अन्न ॥ वैश्वदेवसमयासी ॥ ८ ॥ मातापिता त्यजोनियां ॥ होतों सुखें जेवोनियां ॥ पूर्वजन्मापासोनियां ॥ मग हे कष्ट भोगितों ॥ ९ ॥ ऐशीं पापें आठवीत ॥ विप्र जातो गंगेंत ॥ तंव देखिती गुरुनाथ ॥ म्हणती बोलवा ब्राह्मणासी ॥ ११० ॥ आणा आणा हो तयासी ॥ आत्महत्या महादोषी ॥ प्राण त्यजितो कां सुखेंसीं ॥ पुसों कोण कवणाचा ॥ ११ ॥ श्रीगुरुवचन ऐकोनि ॥ गेले शिष्य धांवोनि ॥ द्विजवरातें काढो-नि ॥ आणिला श्रीगुरुसन्मुख ॥ १२ ॥ अनाथासी कल्पतरु ॥ दुःखितासी

कृपासागरु ॥ पुसतसे श्रीगुरु ॥ तया विप्रवरासी ॥ १३ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ प्राण कां त्यजूं पाहसी ॥ आत्महत्या महादोषी ॥ काय वृत्तांत सांग आम्हां ॥ १४ ॥ विप्र म्हणे गा यतिराया ॥ काय कराल पुसोनियां ॥ उपजोनियां जन्म वायां ॥ भूमिभार जाहलों ॥ १५ ॥ मासां पक्षां भोजन करितों ॥ उदरव्यथेनें कष्टतों ॥ साहूं न शकें प्राण देतों ॥ काय सांगावें स्वामिया ॥ १६ ॥ आपणासी अन्न वैरी असतां ॥ केवीं वांचावें गुरुनाथा ॥ शरीर अन्नमय तत्त्वतां ॥ केवीं वांचूं जगद्गुरु ॥ १७ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ तुझी व्यथा गेली परियेसीं ॥ औषध असे आम्हांपासीं ॥ क्षण एक सांगों तुज ॥ १८ ॥ संशय न धरीं आपुले मनीं ॥ भिऊं नको अंतःकरणीं ॥ व्याधि गेली पळोनि ॥ भोजन करीं पोटभरी ॥ १९ ॥ श्रीगुरुवचन ऐकोनि ॥ स्थिर झाला अंतःकरणीं ॥ माथा ठेवोनि श्रीगुरु-चरणीं ॥ नमन केलें त्या वेळीं ॥ १२० ॥ इतुकिया अवसरीं ॥ त्या ग्रामाचा

अधिकारी ॥ विप्र एक अवधारीं ॥ आला स्नाना गंगेसी ॥ २१ ॥ तंव देखिलें गुरूसी ॥ येवोनि लागला चरणांसी ॥ नमन केलें भक्तींसीं ॥ नमोवाक्कायकर्में ॥ २२ ॥ आश्वासोनि तये वेळीं ॥ पुसती श्रीगुरु स्तोम-मौळी ॥ कवण नाम कवणे स्थळीं ॥ वास म्हणती तयासी ॥ २३ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ सांगतसे तो ब्राह्मण ॥ गोत्र आपुलें कौंडिण्य ॥ आपस्तंब शाखा असे ॥ २४ ॥ नाम सायंदेव ऐसें ॥ वास कांचींत राहतसें ॥ आलों उदरपूर्ती[1] असें ॥ सेवा करितों यवनाची ॥ २५ ॥ अधिकार-पणें या ग्रामीं ॥ असों संवत्सर एक स्वामी ॥ धन्य धन्य झालों आम्ही ॥ तव दर्शनमात्रेंसीं ॥ २६ ॥ तूं तारक विश्वासी ॥ दर्शन दिधलें आम्हांसी ॥ कृतार्थ झालों भरंवसीं ॥ जन्मांतरींचे दोष गेले ॥ २७ ॥ तवानुग्रह[2] होय ज्यांसी ॥ तरतील या भवार्णवासी ॥ अप्रयत्नें आम्हांसी ॥ दर्शन दिधलें

१ पोट भरण्याकारितां. २ तुमचा उपदेश.

स्वामिया ॥ २८ ॥ श्लोक ॥ गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा ॥
पापं तापं च दैन्यं च सद्यः साधुसमागमः ॥ २९ ॥ टीका ॥ गंगा देखितां
पापें जाती ॥ चंद्रदर्शनें ताप जाती ॥ कल्पतरूची ऐशी गति ॥ दैन्यावेगळें
करी जाण ॥ १३० ॥ तैसे नव्हे तुमचे गुण ॥ पापतापदैन्यहरण ॥ देखिले
आजि तुमचे चरण ॥ चतुर्वर्गफळ पावलों ॥ ३१ ॥ ऐशी स्तुति करोनि ॥
पुनरपि लागे श्रीगुरुचरणीं ॥ जगद्गुरू आश्वासोनि ॥ निरोप देती तये
वेळीं ॥ ३२ ॥ श्रीगुरु म्हणती त्यासी ॥ आमुचें वाक्य परियेसीं ॥ जठर-
व्यथा या विप्रासी ॥ प्राणत्याग करितसे ॥ ३३ ॥ उपशम त्या व्याधीसी ॥
सांगों औषध तुम्हांसी ॥ नेवोनि आपुले मंदिरासी ॥ भोजन करवीं
मिष्टान्न ॥ ३४ ॥ अन्न जेवितां याची व्यथा ॥ व्याधी न राहे सर्वथा ॥
घेवोनि जावें त्वरिता ॥ क्षुधाक्रांत विप्र असे ॥ ३५ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें

१ धर्म, अर्थ, काम, मोक्ष असे चारही पुरुषार्थ.



[ अ० १३ ] अन्न जेवितां याची व्यथा । व्याधी न राहे सर्वथा । घेवोनि जावें त्वरिता । क्षुधाक्रांत विप्र असे ॥ ३५ ॥

वचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ प्राणत्याग करितां भोजन ॥ ऐसी व्यथा होतसे ॥ ३६ ॥ जेविला काल मासें एक ॥ त्याणें प्राण त्यजीतसे ऐक ॥ अन्न देतां आम्हांसी देख ॥ घडेल हत्या त्वरित पैं ॥ ३७ ॥ श्रीगुरु म्हणती सायंदेवासी ॥ आम्ही औषध देतों त्यासी ॥ अपूपादि माषान्नासी ॥ क्षीरमिश्रित परमान्न ॥ ३८ ॥ अन्न जेवितां त्वरेंसीं ॥ व्याधि जाईल परियेसीं ॥ संशय न धरितां मानसीं त्वरित गृहासी नेईं वेगें ॥ ३९ ॥ अंगिकारोनि तये वेळीं ॥ माथा ठेवी चरणकमळीं ॥ विनवितसे करुणा बाहाळी ॥ यावें स्वामी भिक्षेसी ॥ १४० ॥ अंगिकारोनि श्रीगुरुनाथ ॥ निरोप देती हो कां त्वरित ॥ सिद्ध म्हणे ऐक मात ॥ नामधारक शिष्योत्तमा ॥ ४१ ॥ आम्ही होतों तये वेळीं ॥ समस्त शिष्य सकळी ॥ जठरव्यथेचा विप्र जवळी ॥ श्रीगुरु गेले भिक्षेसी ॥ ४२ ॥ विचित्र झालें त्याचे घरीं ॥ पूजा करिती परोपरी ॥ पतिव्रता त्याची नारी ॥ जाखाई म्हणिजे

परियेसा ॥ ४३ ॥ ते पूजिती गुरूसी ॥ षोडशोपचारें परियेसीं ॥ तेणेंचि रीतियें आम्हांसी ॥ शिष्या सकळीं वंदिलें ॥ ४४ ॥ गुरुपूजेचें विधान ॥ विचित्र केलें अतिगहन ॥ मंडळ केलें रक्तवर्ण ॥ एकएकासी पृथक् देखा ॥ ४५ ॥ पद्म रचोनि अष्टदळी ॥ नानापरी रंगमाळी ॥ पंचवर्ण विचित्र कळी ॥ रचिली तियें परियेसा ॥ ४६ ॥ संकल्पोनि विधीसी ॥ नमन केलें साष्टांगेंसीं ॥ माथा ठेवूनि चरणन्यासीं ॥ पाद सर्वही अष्टांगीं ॥ ४७ ॥ चित्रासन गुरूसी ॥ येणेंचि परी सकळिकांसी ॥ मंडळार्चनविधीसी ॥ करिती गंधपुष्पाक्षता ॥ ४८ ॥ षोडशोपचारें विधींसीं ॥ पंचामृतादि परियेसीं ॥ रुद्रसूक्तमंत्रेंसीं ॥ चरण स्नापिले तये वेळीं ॥ ४९ ॥ श्रीगुरुचरणीं अति-हर्षीं ॥ पूजा करिती षोडशी ॥ तया विप्रा प्रज्ञा कैसी ॥ चरणतीर्थ धरिता झाला ॥ १५० ॥ तया चरणतीर्थासी ॥ पूजा करिती भक्तींसीं ॥ गीतवाद्य आनंदेंसीं ॥ करिती आरती निरांजन ॥ ५१ ॥ अनुक्रमें श्रीगुरुपूजा ॥

करिता झाला तो द्विज ॥ पुनरपि षोडशोपचारें वोजा ॥ पूजा करी भक्तीनें ॥५२॥ अक्षय वाणें आरती ॥ श्रीगुरूसी ओंवाळिती ॥ मंत्रघोष अतिभक्तीं ॥ पुष्पांजळी करिता झाला ॥ ५३ ॥ अनेकपरी गायन करी ॥ नमस्कारी प्रीतीकरीं ॥ पतिव्रता असे नारी ॥ पूजा करिती उभयवर्गें ॥ ५४ ॥ ऐशा-परी श्रीगुरूसी ॥ पूजा केली परियेसीं ॥ येणें विधीं शिष्यांसी ॥ समस्तांसी वंदिलें ॥ ५५ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ अतिहर्षीं वर देती ॥ तव संतति होईल ख्याति ॥ गुरुभक्ति वंशोवंशीं ॥ ५६ ॥ तूं जाणसी गुरूस ॥ अभि-वृद्धि वंशास ॥ पुत्रपौत्रां हर्ष ॥ गुरुभक्तीनें घडे ॥ ५७ ॥ ऐसें बोलोनि द्विजासी ॥ आश्वासिती अतिहर्षीं ॥ नमन करोनि श्रीगुरूसी ॥ ठाय घातले द्विजें त्या वेळीं ॥ ५८ ॥ नानापरींचीं पक्वान्नें ॥ अपूपादि माषान्नें ॥ अष्टविध परमान्नें ॥ शर्करासहित निवेदिलीं ॥ ५९ ॥ शाका पाक नाना-परी ॥ वाढताती सविस्तारीं ॥ भोजन करी प्रीतीकरीं ॥ श्रीगुरु परियेसा

॥ १६० ॥ उदरव्यथेच्या ब्राह्मणें ॥ भोजन केलें परिपूर्णें ॥ व्याधि गेली तत्क्षणें ॥ श्रीगुरूचे कृपादृष्टीं ॥ ६१ ॥ परिस लागतां लोहासी ॥ सुवर्ण होय परियेसीं ॥ दर्शन होतां श्रीगुरूसी ॥ व्याधि कैंची सांग मज ॥ ६२ ॥ उदय होतां दिनकरासी ॥ संहार होय अंधकारासी ॥ श्रीगुरुकृपा होय ज्यासी ॥ दैन्य कैंचें तया घरीं ॥ ६३ ॥ ऐसेपरी श्रीगुरुनाथें ॥ भोजन केलें शिष्यासहित ॥ आनंद झाला तेथें बहुत ॥ विस्मय करिती सकळ जन ॥ ६४ ॥ अभिनव करिती सकळ जन ॥ द्विजासी होतें वैरी अन्न ॥ औषध झालें तेंचि जाण ॥ व्याधि गेली निघोनि ॥ ६५ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गुरुकृपा होय ज्यासी ॥ जन्मांतरींचे दोष जाती ॥ व्याधि कैंची त्याचे देहीं ॥ ६६ ॥ गंगाधराचा नंदनू ॥ सरस्वती सांगे विस्तारोनू ॥ गुरुचरित्र कामधेनू ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ६७ ॥ जे ऐकती भक्ति धरूनि ॥ व्याधि नसती तया स्थानीं ॥ अखिल सौख्य होय त्या

जनीं ॥ सत्य सत्य त्रिवाचा ॥ ६८ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ गुरुचरित्र-वर्णन येथ ॥ ब्राह्मण व्याधि निरसोनि त्वरित ॥ सुखी केला श्रीगुरूनें ॥६९॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनाम-धारकसंवादे विप्रोदरव्यथानिरसनं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्रीगु-रुदत्तार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ १६९ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्य देखा ॥ विनवी सिद्धासी कौतुका ॥ प्रश्न करी अतिविशेखा[1] ॥ एकचित्तें परियेसा ॥ १ ॥ जय जया जी योगीश्वरा ॥ सिद्धमूर्ती ज्ञानसगरा ॥ पुढील कथा विस्तारा ॥ ज्ञान होय आम्हांसी ऐसी ॥ २ ॥ उदरव्यथेच्या ब्राह्मणासी ॥ प्रसन्न झाले श्री गुरु कृपेंसीं ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ विस्तारावें आम्हांप्रती ॥ ३ ॥ ऐकोनि शिष्याचें वचन ॥ संतोषे सिद्ध आपण ॥ गुरुचरित्र कामधेनु जाण ॥ सांगता झाला विस्तारोनि ॥ ४ ॥ ऐक शिष्या शिरोमणी ॥ भिक्षा केली त्याचे भुवनीं ॥ तयावरी संतोषोनि ॥ प्रसन्न झाले परियेसा ॥ ५ ॥ गुरुभक्तीचा प्रकार ॥ पूर्ण जाणे द्विजवर ॥ पूजा केली विचित्र ॥ म्हणोनि आनंदे परियेसा ॥ ६ ॥ तया सायंदेव द्विजासी ॥ श्रीगुरु बोलती संतोषीं ॥ भक्त व्हावे वंशोवंशीं ॥ माझी प्रीती तुजवरी ॥ ७ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें

१ विशेष.

वचन ॥ सायंदेव नमन करून ॥ माथा चरणीं ठेवून ॥ नमिता झाला पुनःपुनः ॥ ८ ॥ जय जया जी सद्गुरू ॥ त्रिमूर्तींचा अवतारू ॥ अविद्यामायें दिससी नरू ॥ वेदां अगोचेरू[1] तुझा महिमा ॥ ९ ॥ विश्वव्यापक तूंचि होसी ॥ ब्रह्मा विष्णु व्योमकेशी[2] ॥ धरिलें स्वरूप तूं मानवासी ॥ भक्तजन तारावया ॥ १० ॥ तव महिमा वर्णावयासी ॥ शक्ति कैंची आम्हासी ॥ मागतों एक तुम्हांसी ॥ कृपा करणें गुरुमूर्ती ॥ ११ ॥ माझे वंशपरंपरीं ॥ भक्ति द्यावी निर्धारीं ॥ इह सौख्य पुत्रपौत्रीं ॥ अंतीं द्यावी सद्गति ॥ १२ ॥ ऐशी विनंती करुनी ॥ पुनरपि विनवी करुणावचनीं ॥ सेवा करितों द्वारीं यवनी ॥ महाक्रूर असे तो ॥ १३ ॥ प्रतिसंवत्सरीं ब्राह्मणांसी ॥ घात करितो जो बहुवसीं ॥ याचि कारणें आम्हांसी ॥ बोलावीतसे परियेसा ॥ १४ ॥ जातां तयाजवळी आपण ॥ निश्चयें घेईल माझा प्राण ॥ भेटी झाली

१ न समजणारा, अज्ञेय. २ महादेव.

तुमची म्हणोन ॥ मरण कैंचें आम्हांसी ॥ १५ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ अभय देती तयाप्रती ॥ विप्रमस्तकीं हस्त ठेविती ॥ चिंता न म्हणोनियां ॥ १६ ॥ भय सांडूनि त्वां जावें ॥ क्रूर यवनातें भेटावें ॥ संतोषोनि प्रिय-भावें ॥ पुनरपि पाठविल आम्हांप्रती ॥ १७ ॥ जोंवरी परतोनि तूं येसी ॥ असों आम्ही भरंवसीं ॥ तूं आलिया संतोषीं ॥ जाऊं मग येथोनियां ॥ १८ ॥ निजभक्त आमुचा तूंचि होसी ॥ परंपरीं वंशोवंशीं ॥ अखि-लाभीष्ट[1] तूं पावसी ॥ वाढे संतति तुझी बहुत ॥ १९ ॥ तुझे वंशपरंपरीं ॥ सुखें नांदती पुत्रपौत्रीं ॥ अखंड लक्ष्मी तुझे घरीं ॥ निरोगी शतायु[2] नांदाल ॥ २० ॥ ऐसा वर लाधोन ॥ निघे सायंदेव ब्राह्मण ॥ जेथें होता तो यवन ॥ गेला त्वरित त्याजवळी ॥ २१ ॥ कालांतक यम देखा ॥ यवन दुष्ट परियेसा ॥ ब्राह्मणातें पाहतां कैसा ॥ ज्वालारूप होता झाला

१ सर्व प्रकारचीं इच्छितें. २ शंभर वर्षें आयुष्याचे.

॥ २२ ॥ विन्मुख होऊनि गृहांत ॥ गेला यवन कोपत ॥ विप्र झाला भयचकित ॥ मनीं श्रीगुरु ध्यातसे ॥ २३ ॥ कोप आलिया ओळंबयासी ॥ केवीं स्पर्शे अग्नीसी ॥ श्रीगुरुकृपा असे जयासी ॥ काय करील यवन दुष्ट ॥ २४ ॥ गरुडाचिया पिलीयासी ॥ सर्प कैसा डंशी ॥ तैसी त्या ब्राह्मणासी ॥ असे कृपा श्रीगुरूची ॥ २५ ॥ कां एखादे सिंहासी ॥ ऐरावत केविं ग्रासी ॥ श्रीगुरुकृपा ज्यासी ॥ कलिकाळाचें भय नाहीं ॥ २६ ॥ ज्याचे हृदयीं गुरुस्मरण ॥ भय कैचें तया दारुण ॥ काळमृत्यु न बाधे जाण ॥ अपमृत्यु काय करील ॥ २७ ॥ ज्यासि नाहीं मृत्यूचें भय ॥ त्यासी यवन करील काय ॥ श्रीगुरुकृपा ज्यासी होय ॥ यमाचें भय नाहीं तया ॥ २८ ॥ ऐसियापरी तो यवन ॥ गृहीं निघाला भ्रमेंकरून ॥ दृढ निद्रा लागतां जाण ॥ शरीरस्मरण नाहीं त्यासीं ॥ २९ ॥ हृदयज्वाळा

१ बाळिंबा. २ हत्ती. ३ कलिरूप काळाचें. ४ पूर्ण आयुष्य भरल्यावर येणारा मृत्यु, महामृत्यु.



[ अ० १४ ] स्मरण झालें तसें वेळीं। धांवत गेला ब्राह्मणाजवळीं। लोळतसे चरणकमळीं। म्हणे स्वामी तूंचि माझा ॥ ३२ ॥

होवोनि त्यासी ॥ जागृत होवोनि परियेसीं ॥ प्राणांतक व्यथेसी ॥ कष्टतसे तये वेळीं ॥ ३० ॥ स्मरण नसे कांहीं ॥ म्हणे शस्त्र मारितो घाई ॥ छेदन करितो अवेवं पाहीं ॥ विप्र एक आपणासी ॥ ३१ ॥ स्मरण झालें तये वेळीं ॥ धांवत गेला ब्राह्मणाजवळी ॥ लोळतसे चरणकमळीं ॥ म्हणे स्वामी तूंचि माझा ॥ ३२ ॥ तूतें पाचारिलें येथें कवणीं ॥ जावें त्वरित परतोनि ॥ वस्त्रें भूषणें देवोनि ॥ निरोप देत तये वेळीं ॥ ३३ ॥ संतोषोनि द्विजवर ॥ आला ग्रामीं सत्वर ॥ गंगातीरीं जाय लवकर ॥ श्रीगुरूचे दर्शनासी ॥ ३४ ॥ देखोनियां श्रीगुरूसी ॥ नमन करी भावेंसीं ॥ स्तोत्र करी बहुवसीं ॥ सांगे वृत्तांत आद्यंत ॥ ३५ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ तया द्विजा आश्वासिती ॥ दक्षिण दिशे जाऊं म्हणती ॥ स्नान तीर्थयात्रेसी ॥ ३६ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥

१ अवयव.

न विसंबें आतां तुमचे चरण ॥ आपण येईन समागमें ॥ ३७ ॥ तुमचे चरणाविणें देखा ॥ राहूं न शकें क्षण एका ॥ संसारसागरतारका ॥ तूंचि देवा कृपासिंधु ॥ ३८ ॥ उद्धराया संगरांसी ॥ गंगा आली भूमीसी ॥ तैसा स्वामी आम्हांसी ॥ दर्शनें उद्धार आपुल्या ॥ ३९ ॥ भक्तवत्सल तुझी ख्याति ॥ आम्हां सांडेणें काय नीति ॥ सवेंचि येऊं हें निश्चिती ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ४० ॥ येणेंपरि श्रीगुरूसी ॥ विनवी विप्र भावेंसीं ॥ संतोषोनि विनयेंसीं ॥ श्रीगुरु म्हणती तये वेळीं ॥ ४१ ॥ कारण असे आम्हां जाणें ॥ तीर्थें असती दक्षिणे ॥ पुनरपि तुम्हां दर्शन देणें ॥ संवत्सरीं पंचदशीं ॥ ४२ ॥ आम्ही तुमचे ग्रामासमीपत ॥ वास करूं हें निश्चित ॥ कलत्र पुत्र इष्ट भ्रात ॥ तुम्हीं आम्हां भेटावें ॥ ४३ ॥

१ सगर राजाचे साठ हजार मुलगे कपिल महामुनीचे शापानें जळून गेले त्यांच्या उद्धाराकरितां भगीरथानें तपश्चर्या करून स्वर्गांतून गंगेस खालीं आणिलें. २ सोडणें. ३ बरोबर.

न करीं चिंता असा सुखें ॥ सकळ अरिष्टें गेलीं दुःखें ॥ म्हणोनि हस्त ठेवी मस्तकीं ॥ भाक देती तये वेळीं ॥ ४४ ॥ ऐसेपरी सांगोनि ॥ श्रीगुरु निघाले तेथोनि ॥ जेथें असे आरोग्यभवानी ॥ वैजनाथ महाक्षेत्र तें ॥ ४५ ॥ समस्त शिष्यांसमवेत ॥ श्रीगुरु आले तीर्थ पहात ॥ प्रख्यात असे वैजनाथ ॥ तेथें राहिले गुप्तरूपें ॥ ४६ ॥ नामधारक विनवी सिद्धासी ॥ कारण काय गुप्त व्हावयासी ॥ होते शिष्य बहुवसी ॥ त्यांसी कोठें ठेविलें ॥ ४७ ॥ गंगाधराचा नंदन ॥ सांगे गुरुचरित्रवर्णन ॥ सिद्धमुनि विस्तारोन ॥ सांगे नामधारकासी ॥ ४८ ॥ पुढील कथेचा विस्तार ॥ सांगतसे अपरंपार ॥ मन करूनि एकाग्र ॥ ऐका श्रोते सकळिक ॥ ४९ ॥ वास सरस्वतीचे तीरीं ॥ सांयंदेव साचारी ॥ तया गुरूतें निर्धारीं ॥ वस्त्रें भूषणें दीधलीं ॥ ५० ॥ गुरुचरित्र अमृत ॥ सायंदेव आख्यान येथ ॥ यवनभयरक्षित ॥ थोर भाग्य तयाचें ॥ ५१ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथा-

कल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने दुष्टयवनशासनं नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ श्रीगुरुदत्तार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ ५१ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ऐक शिष्या शिरोमणी ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ भक्ति तुझी गुरुचरणीं ॥ लीन झाली परियेसा ॥ १ ॥ तूं मातें पुसतोसी ॥ होतो संतोष मानसीं ॥ गौप्य झाले कवण कार्यासी ॥ सांगेन ऐक एकचित्तें ॥ २ ॥ महिमा प्रगट झाला बहुत ॥ तेणें भजनीं लोक समस्त ॥ कामार्थी ते अमितें ॥ येती गुरुदर्शनासी ॥ ३ ॥ साधु असाधु धूर्त सकळी ॥ समस्त येती गुरूजवळी ॥ वर्तमानी खोटा कळी ॥ अवघे शिष्य होऊं म्हणती ॥ ४ ॥ भार्गवराम अवतारोनि ॥ निःक्षेत्रें केला मेदिनी ॥ राज्य विप्रांसी देउनी ॥ गेला पश्चिमसमुद्रासी ॥ ५ ॥ पुनरपि जाती तयापासीं ॥ तोही ठावं मागावयासी ॥ या कारणें विप्रांसी ॥ कांक्षा न सुटे सर्वथा ॥ ६ ॥ उठोनि भार्गव देखा ॥ गेला सागरमध्योदका ॥ गौप्यरूपें असे ऐका ॥ आणिक मागती म्हणोनियां ॥ ७ ॥ तैसे श्रीगुरुमूर्ति ऐका ॥ गुप्त

१ जडली. २ नानाप्रकारच्या इच्छा करणारे. ३ पुष्कळ. ४ क्षत्रियरहित. ५ पृथ्वी. ६ ठिकाण. ७ आशा.

राहिले कारणिका ॥ वर मागतां सकळ लोक ॥ नाना यांती येवोनियां ॥ ८ ॥ विश्वव्यापक जगदीश्वर ॥ तो काय देऊं न शके वर ॥ पाहोनि पात्रानुसार ॥ प्रसन्न होय परियेसा ॥ ९ ॥ या कारणें तये स्थानीं ॥ श्रीगुरु राहिले गौप्यगुणीं ॥ शिष्य सकळ बोलावुनी ॥ निरोप देती यात्रेसी ॥ १० ॥ सकळ शिष्य बोलावोनि ॥ निरोप देती नृसिंहमुनि ॥ समस्त तीर्थें आचरोनि ॥ यावें भेटी श्रीशैल्या ॥ ११ ॥ ऐकोनि गुरूचे वचना ॥ समस्त धरिती चरणा ॥ कृपामूर्ती गुरुराणा ॥ कां उपेक्षा आम्हांसी ॥ १२ ॥ तुमच्या दर्शनमात्रेंसीं ॥ समस्त तीर्थें आम्हांसी ॥ आम्हीं जावें कवणे ठायासी ॥ सांडोनि चरण श्रीगुरूचे ॥ १३ ॥ समस्त तीर्थें श्रीगुरुचरण ॥ ऐसें बोलती श्रुतिपुराण ॥ शास्त्रीं हेंचि विवरणें ॥ असे प्रख्यात परियेसा ॥ १४ ॥ जवळी असतां निधान ॥ का हिंडावें रानोरान

१ जाती. २ वर्णन.

॥ कल्पवृक्ष सोडून ॥ केवीं जावें देवराया ॥ १५ ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ आम्ही आश्रमी संन्यासी ॥ राहूं नये पांचवे दिवशीं ॥ एके ठायीं वास करूनि ॥ १६ ॥ चतुर्थाश्रम घेवोनि ॥ हिंडावें तीर्थभुवनीं ॥ तेथें मन स्थिर करोनि ॥ मग रहावें एकस्थानीं ॥ १७ ॥ विशेष आमुचें वाक्य ऐक ॥ अंगिकारणें अधिक ॥ तीर्थें हिंडोनि सकळिक ॥ मग यावें आम्हांपासीं ॥ १८ ॥ बहुधान्य नाम संवत्सरासी ॥ आम्ही येऊं श्रीशैल्यासी ॥ तेथें आमुचे भेटीसी ॥ यावें तुम्हीं सकळिक ॥ १९ ॥ ऐसेपरि शिष्यांसी ॥ सांगती श्रीगुरु परियेसीं ॥ समस्त लागती चरणांसी ॥ ऐक शिष्या नामकरणी ॥ २० ॥ शिष्य विनविती श्रीगुरूसी ॥ तुमचें वाक्य प्रमाण आम्हांसी ॥ जातों आम्ही भरंवसीं ॥ करूं तीर्थें भूमीवरी ॥ २१ ॥ श्रीगुरुवाक्य जो न करी ॥ तो पडे रौरव घोरीं ॥ त्याचें घर यमपुरीं ॥ अखंड नरक भोगी जाण ॥ २२ ॥ जावें आम्हीं कवण तीर्था ॥

निरोपावें जी समर्था ॥ तुझें वाक्य दृढ चित्ता ॥ करूनि जाऊं स्वामिया ॥ २३ ॥ जे जे स्थानीं निरोप देसी ॥ जाऊं तेथें भरंवसीं ॥ तुझें वाक्य आम्हांसी ॥ सिद्ध होय स्वामिया ॥ २४ ॥ ऐकोनि शिष्यांचें वचन ॥ श्रीगुरुमूर्ति प्रसन्नवदन ॥ निरोप देती साधारण ॥ तीर्थयात्रा करावया ॥ २५ ॥ या ब्रह्मांडगोलांत ॥ तीर्थराज काशी विख्यात ॥ तेथें जावें तुम्हीं त्वरित ॥ गंगाभागीरथी सेवावया ॥ २६ ॥ भागीरथीतटाकयात्रा[1] ॥ साठ योजनें पवित्रा ॥ साठ कृच्छ्रें[2] फळ पवित्रा ॥ प्रयाग गंगाद्वारीं द्विगुणें[3] ॥ २७ ॥ यमुनानदीतटाकेसी ॥ पंचवीस गांवें परियेसीं ॥ कृच्छ्रफळ तेथें विशेषीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ २८ ॥ सरस्वती म्हणजे गंगा ॥ भूमीवरी असे चांगा ॥ चतुर्विंशती गांवें जागा ॥ स्नान करावें तटाकीं ॥ २९ ॥

१ एका तीरावरून निघून परत त्या ठिकाणीं यावयाचें त्यास तटाकयात्रा म्हणतात ( प्रदक्षिणा ).
२ एक प्रकारचें प्रायश्चित्त आहे. ३ दुप्पट.



[अ० १५ ] ऐकोनि शिष्यांचें वचन । श्रीगुरुमूर्ती प्रसन्नवदन । निरोप देती साधारण । तीर्थयात्रा करावया ॥ २५ ॥

इतुकेनी फळ त्यासी ॥ यज्ञाचें फळ परियेसीं ॥ ब्रह्मलोक शाश्वतेसी ॥ राहे नर पितरांसहित ॥ ३० ॥ करुणानदी कुशावर्ती ॥ श्रुत कृष्णा वेणी ख्याती ॥ वितस्ता नदी शरावती ॥ असती नद्या मनोहर ॥ ३१ मरुद्वृद्धा नद्या थोर ॥ असिक्नी मधुमती येर ॥ पयस्वती घृतवतीतीर ॥ तटाकयात्रा तुम्हीं करा ॥ ३२ ॥ देवनदी म्हणजे एक ॥ असे ख्याति भूमंडळीक ॥ पंधरा गांवें तटाक ॥ यात्रा तुम्हीं करावी ॥ ३३ ॥ जितुके गांव तितकें कृच्छ्र ॥ स्नानमात्रें पवित्र ॥ जाती ब्रह्महत्यादि पापें विचित्र ॥ मनोभावें आचरावें ॥ ३४ ॥ चंद्रभागा रेवतीसी ॥ शरयू आणि गौतमीसी ॥ वेदिका नदी कौशिकेसी ॥ नित्यजल मंदाकिनी ॥ ३५ ॥ सहस्रवक्र नदी थोर ॥ पूर्णायुष्य नदी थोर ॥ बहुधा नदी वरुणा प्रखर ॥ षोडश गांवें तटाकयात्रा ॥ ३६ ॥ जेथें नदीसंगम असती ॥ तेथील स्नानें पुण्य अमिती ॥ त्रिवेणी स्नानफळें असती ॥ संगमनदी स्नान करा ॥ ३७ ॥

सेतूबंध भीमेश्वरीं ॥ श्रीरंग पद्मनाभेश्वरीं ॥ पुरुषोत्तम मनोहरी ॥ नैमिषारण्यीं तीर्थ असे ॥ ३८ ॥ पुष्करतीर्थ वैरोचनी ॥ सन्निहित असे ज्ञानी ॥ नदीतीर्थ असे गुणी ॥ गंगातीर्थी स्नान करा ॥ ३९ ॥ बदरीतीर्थ नारायण ॥ नदीतीर्थ पुण्यपावन ॥ कुरुक्षेत्रीं करा स्नान ॥ श्रीशैल्ययात्रेसी ॥ ४० ॥ महालयतीर्थ देखा ॥ पिप्रांमती तर्पणें ऐका ॥ द्विचत्वारि कुळें निका ॥ स्वर्गा जाती भरंवसीं ॥ ४१ ॥ केदारतीर्थ पुष्करतीर्थ ॥ कोटितीर्थ नर्मदातीर्थ ॥ मातृकेश्वर कुब्जतीर्थ ॥ कोकामुखी विशेष असे ॥ ४२ ॥ प्रसादतीर्थ विजयतीर्थ ॥ पुरींद्र चंद्रनदीतीर्थ ॥ गोकर्ण शंखकर्ण ख्यात ॥ स्नान बरवें मनोहर ॥ ४३ ॥ अयोध्या मथुरा कांचीसी ॥ द्वारावती गयेसी ॥ शालिग्रामतीर्थासी ॥ शंभलग्राम मुक्तिक्षेत्र ॥ ४४ ॥ गोदावरीतटाकेसी ॥ योजनें सहा परियेसीं ॥ तेथील महिमा आहे ऐसी ॥

१ बेचाळीस.

वाजपेययज्ञसम पुण्य ॥ ४५ ॥ सव्यापसव्य वेळां तीनी ॥ तटाकयात्रा एकाग्रपणीं ॥ स्नान करितां होय ज्ञानी ॥ महापातकी शुद्ध होय ॥ ४६ ॥ आणिक दोन तीर्थें असती ॥ प्रयागसमान असे ख्याति ॥ भीमेश्वर तीर्थ म्हणती ॥ ॥ वंजरासंगम प्रख्यात ॥ ४७ ॥ कुशतीर्थ तर्पण बरवें ॥ तटाकयात्रा द्वादश गांवें ॥ गोदावरीसंगमा जावें ॥ षट्त्रिगुणेंशीं ॥ कृच्छ्रफळ ॥ ४८ ॥ पूर्णनदीतटाकेंसी ॥ चारी गांवें आचरा हर्षीं ॥ कृष्णावेणीतीरासी ॥ पंधरा गांवें तटाकयात्रा ॥ ४९ ॥ तुंगभद्रातीर बरवें ॥ तटाकयात्रा वीस गांवें ॥ पंपासरोवर स्वभावें ॥ अनंतमहिमा परियेसा ॥ ५० ॥ हरिहरक्षेत्र महाख्याति ॥ समस्त दोष परिहरती ॥ तैसीच असे भीमरथी ॥ दहा गांवें तटाकयात्रा ॥ ५१ ॥ पांडुरंग मातुलिंग ॥ क्षेत्र बरवें पुरी गाणग ॥ तीर्थें असती तेथें चांग ॥ अष्टतीर्थें मनोहर ॥ ५२ ॥ अमरजा-

१ छात्तिसपद.

संगमांत ॥ कोटी तीर्थें असती ख्यात ॥ वृक्ष तेथें असे अश्वत्थ ॥ कल्पवृक्ष तोचि जाणा ॥ ५३ ॥ तया अश्वत्थासन्मुखेसी ॥ नृसिंहतीर्थ परियेसीं ॥ तया उत्तरभागेसी ॥ वाराणसी तीर्थ असे ॥ ५४ ॥ तया पूर्वभागेसी ॥ तीर्थ पापविनाशी ॥ तदनंतर परियेसीं ॥ रुद्रपादतीर्थ असे ॥ ५५ ॥ चक्रतीर्थ असे एक ॥ केशवदेव विनायक ॥ कोटितीर्थ विशेष ॥ मन्मथतीर्थ पुढें असे ॥ ५६ ॥ कलेश्वर देवस्थान ॥ असे तेथें गांधारभुवन ॥ ठाव असे अनुपम जाण ॥ सिद्धमुनि गाणगापुर ॥ ५७ ॥ तेथें जे जन अनुष्ठान करिती ॥ त्वरित कामना सर्व पावती ॥ कल्पवृक्ष असे यति ॥ काय नोहे मनकामना ॥ ५८ ॥ कांकिणीसंगम असे बरवें ॥ भीमातीर क्षेत्र नांवें ॥ अनंत तीर्थ पुण्य स्वभावें ॥ प्रयागासमान असे देखा ॥ ५९ ॥ तुंगभद्रा वरदा नदी ॥ संगमस्थान तपोनिधि ॥ मलप्रभासंगमीं आधीं ॥ पापें जाती शतजन्मांचीं ॥ ६० ॥ निवृत्तिसंगमीं असे ख्याति ॥ ब्रह्महत्या

नाश होती ॥ जावें तुम्हीं तेथें त्वरिती ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ ६१ ॥
सिंहराशी बृहस्पती ॥ येतां तीर्थें संतोषती ॥ समस्तां ठायीं भागीरथी ॥
येऊनि ऐक्य होतसे ॥ ६२ ॥ कन्यागतीं कृष्णेसी ॥ त्वरित येती भागी-
रथी ॥ तुंगभद्रा तुळागतीं ॥ सुरनदीप्रवेश परियेसा ॥ ६३ ॥ कर्कराशीं
सूर्य येतां ॥ मलप्रभाकृष्णासंयुता ॥ सर्व जन स्नान करितां ॥ ब्रह्महत्यादि
पापें जाती ॥ ६४ ॥ भीमाकृष्णासंगमेसीं ॥ स्नान करितां परियेसीं ॥
सात जन्म विप्रवंशीं ॥ उपजे नर परियेसा ॥ ६५ ॥ तुंगभद्रासंगम देख ॥
त्याहूनि फळ त्रिगुणी[1] अधिक ॥ निवृत्तिसंगम ऐक ॥ चतुर्गुण तयाहूनी
॥ ६६ ॥ पाताळगंगेचिया स्नानीं ॥ मल्लिकार्जुनदर्शनीं ॥ पुण्य षड्गुण[2] तया-
हूनी ॥ पुनरावृत्ति नाहीं तया ॥ ६७ ॥ लिंगालयीं पुण्य द्विगुण[3] ॥ समुद्र-
कृष्णसंगमीं अगण्यें[4] ॥ कावेरीसंगमीं पंधरा गुण ॥ स्नान करा मनोभावें

१ तिप्पट. २ सहा पट. ३ दुप्पट. ४ अगणित, अनंत.

॥ ६८ ॥ ताम्रपर्णी येणेंपरी ॥ पुण्य असे स्नानमात्रीं ॥ कृतमालानदीतीरीं ॥ सर्व पाप परिहरे ॥ ६९ ॥ पयस्विनी आणिक ॥ भवनाशिनी अतिवि-शेष ॥ सर्व पापें हरती ऐक ॥ समुद्रस्कंधदर्शनें ॥ ७० ॥ शेषाद्रिक्षेत्र श्रीरं-गनाथ ॥ पद्मनाभ श्रीमदनंत ॥ पूजा करोनि जावें त्वरित ॥ तृणामल-क्षेत्रासी ॥ ७१ ॥ समस्त तीर्थें समान ॥ असे आणिक कुंभकोण ॥ कन्याकुमारी-दर्शन ॥ मत्स्यतीर्थीं स्नान करा ॥ ७२ ॥ पक्षतीर्थ असे बरवें ॥ रामेश्वर धनुष्यकोटी नामें ॥ कावेरी तीर्थ बरवें ॥ रंगनाथसान्निध ॥ ७३ ॥ पुरुषोत्तम चंद्रकुंडेसी ॥ कोटितीर्थ परियेसीं ॥ महालक्ष्मी कोल्हा-पुरासी ॥ दक्षिण काशी करवीरें[1] ॥ ७४ ॥ तयासन्निध असे बरवें ॥ कोल्हग्रामीं नरसिंहदेव ॥ परमात्मा सदाशिव ॥ तोचि असे प्रत्यक्ष ॥ ७५ ॥ भिलवडी कृष्णातीरीं ॥ शाक्ति असे भुवनेश्वरी ॥ तेथें तप करिती जरी ॥

[1] कोल्हापर.

तेचि ईश्वरीं ऐक्य होती ॥ ७६ ॥ वरुणासंगमीं असे बरवें ॥ तेथें तुम्हीं मनोभावें ॥ स्नान करा मार्कंडेय नांवें ॥ संगमेश्वर पूजावा ॥ ७७ ॥ ऋषेश्वरांचे आश्रम ॥ कृष्णातीरीं असती उत्तम ॥ स्नानें लाभे ज्ञानोत्तम ॥ तयासन्निध कृष्णेच्या ॥ ७८ ॥ पुढें कृष्णप्रवाहांत ॥ अमरापुर प्रख्यात ॥ पंचगंगासंगमीं स्नात ॥ प्रयागाहूनि अधिक पुण्य ॥ ७९ ॥ अखिल तीर्थं तया स्थानीं ॥ तप करिती सकळ मुनि ॥ सिद्ध होती त्वरित ज्ञानी ॥ अनुपम क्षेत्र परियेसा ॥ ८० ॥ ऐसें प्रख्यात तये स्थानीं ॥ अनुष्ठितां दिवस तीनी ॥ अखिलाभीष्ट पावोनि ॥ पावती त्वरित परमार्थ ॥ ८१ ॥ युगालय तीर्थ बरवें ॥ दृष्टीं पडतां मुक्त व्हावें ॥ शूर्पालय तीर्थ नांवें ॥ पुढें असे परियेसा ॥ ८२ ॥ विश्वामित्र असे ख्याति ॥ तपस्थान भगवती ॥ तेथें समस्त दोष जाती ॥ मलयप्रभासंगमीं ॥ ८३ ॥ कपिलऋषि विष्णु-

मूर्ति ॥ प्रसन्न तयासी गायत्री ॥ श्वेतशृंगीं प्रख्याती ॥ उत्तरवाहिनी कृष्णा असे ॥ ८४ ॥ तया स्थानीं स्नान करितां ॥ काशीहूनी अधिकता ॥ एक मंत्र तेथें जपतां ॥ कोटीगुण फळ असे ॥ ८५ ॥ आणिक असे तीर्थ बरवें ॥ केदारेश्वर पहावें ॥ पिठापुरीं दत्तात्रेयदेवें ॥ वास केला सनातनें ॥ ८६ ॥ काय सांगूं तीर्थथोरी ॥ प्रख्यात असे मणिगिरी ॥ सप्तऋषीं प्रीतीकरीं ॥ तप केलें बहुत दिवस ॥ ८७ ॥ वृषभाद्रि कल्याण नगर ॥ तीर्थें असती अपरंपार ॥ न होय संसारयेरझार ॥ तया क्षेत्रा आचरावें ॥ ८८ ॥ अहो महाबळाचें दर्शन ॥ साठी यज्ञांचें पुण्य जाण ॥ श्रीगिरीचे पाहतां चरण ॥ नाहीं जन्म मागुता ॥ ८९ ॥ समस्त तीर्थें भूमीवरी ॥ आचरावीं परिवारीं ॥ रजस्वला सरिता होती जरी ॥ स्नान करितां दोष होय ॥ ९० ॥ संक्रांति कर्काटक धरुनी ॥ त्यजावे तुम्हीं मास दोनी ॥

१ कोटीपट. २ संसाराचे हेलपाटे. ३ दोषयुक्त.

नदीतीरीं वास करोनि ॥ राहतां त्यासी दोष नाहीं ॥ ९१ ॥ तयामध्यें विशेष ॥ त्यजावे तीन दिवस ॥ नदी रजस्वला खास ॥ महानदी येणेंपरी ॥ ९२ ॥ भागीरथी गौतमेसी ॥ चंद्रभागा सिंधुनदीसी ॥ नर्मदा शरयू परियेसीं ॥ वर्जावे तुम्हीं दिवस तीन्ही ॥ ९३ ॥ ग्रीष्मकाळीं सर्व नदीस ॥ रजस्वला दोष दहा दिवस ॥ वापी[1]कूप[2]तटाकां[3]स ॥ एक रात्र वर्जावें ॥ ९४ ॥ नवें उदक ज्या दिवशीं ॥ तया ओळखा रजस्वला ऐसी ॥ स्नान करितां महादोषी ॥ येणेंपरी वर्जावें ॥ ९५ ॥ साधारण तुम्हांसी ॥ सांगितलीं तीर्थें परियेसीं ॥ जें जें पहाल दृष्टींसीं ॥ विधिपूर्वक आचरावें ॥ ९६ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ शिष्य सकळ करिती नमन ॥ गुरुनिरोप घेऊन ॥ निघती शिष्य सकळिक ॥ ९७ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ निरोप घेउनी श्रीगुरुपासीं ॥ शिष्य गेले यात्रेसी ॥ राहिले श्रीगुरु गौप्यरूपें

१ ज्यांस आंत उतरण्याला पायऱ्या असतात अशा विहिरी. २ आड, कुवे. ३ तळीं.

॥ ९८ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ पुढील कथेचा विस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ९९ ॥ ब्रह्मरसाची गोडी ॥ सेविती जे घडोघडी ॥ त्यांसी होई आवडी ॥ साधे त्वरित परमार्थ ॥ १०० ॥ गुरुचरित्र कामधेनु ॥ श्रोते होवोनि सावधानु ॥ जे ऐकती भक्तजनु ॥ लाधती चारी पुरुषार्थ ॥ १०१ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे-क्षेत्रतीर्थवर्णनं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥ ओंवीसंख्या ॥ १०१ ॥ ७ ७

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ विनवी शिष्य नामांकित ॥ सिद्ध योग्यातें पुसत ॥ सांगा स्वामी वृत्तांत ॥ गुरूचरित्र विस्तारोनि ॥ १ ॥ श्रीगुरु गेले यात्रेसी ॥ राहिले कोण गुरुपाशीं ॥ पुढील कथा वर्तली कैसी ॥ विस्तारोनि सांग पां ॥ २ ॥ ऐकोनि शिष्याची वाणी ॥ संतोषी झाले सिद्ध मुनि ॥ धन्य शिष्य शिरोमणी ॥ गुरुभक्ता नामधारका ॥ ३ ॥ अविद्यामायासुंषुप्तींत[1] ॥ निजलें होतें माझें चित्त ॥ तुजलागीं झालें जागृत ॥ ज्ञानज्योति उदय मज ॥ ४ ॥ तूंचि माझा प्राणसखा ॥ ऐक शिष्या नामधारका ॥ तुजकरितां जोडलों सुखा ॥ गुरुचरित्र आठवलें ॥ ५ ॥ अज्ञानतिमिररजनींत ॥ पीडोनि आलों कष्टत ॥ सुधामृतसागरांत ॥ त्वां मातें लोटिलें ॥ ६ ॥ त्वां केलें उपकारासी ॥ संतुष्ट झालों मानसीं ॥ पुत्रपौत्रीं तूं नांदसी ॥ दैन्य नाहीं तुझे घरा ॥ ७ ॥ गुरुकृपेचा तूं बाळक ॥ तुज मानिती सकळ

१ मायेच्या गुंगींत.

लोक ॥ संदेह न धरितां घे कां भाक ॥ अष्टैश्वर्यें नांदसी ॥ ८ ॥ गुरुचरित्र-कामधेनु ॥ सांगेन तुज विस्तारोनु ॥ श्रीगुरु राहिले गौप्यगुणु ॥ वैजेश्वर-सन्निधानीं ॥ ९ ॥ समस्त तीर्थें शिष्यांसी ॥ स्वामीं निरोपिलीं परियेसीं ॥ होतों आपण गुरुमूर्तीपासीं ॥ सेवा करून अनुक्रमें ॥ १० ॥ संवत्सर एक तया स्थानीं ॥ अंबा आरोग्यभवानी ॥ होते श्रीगुरु गौप्य होउनी ॥ स्थान बरवें मनोहर ॥ ११ ॥ असतां तेथें वर्तमानीं ॥ आला ब्राह्मण एक मुनि ॥ श्रीगुरूतें देखोनि नमन केलें भक्तिभावें ॥ १२ ॥ माथा ठेवोनि चरणांवरी ॥ स्तोत्रें करी परोपरी ॥ स्वामी मातें तारीं तारीं ॥ अज्ञानसा-गरीं बुडालों ॥ १३ ॥ तप करितों बहु दिवस ॥ स्थिर न व्हेनि माझें मानस ॥ याचि कारणें ज्ञानास ॥ न दिसे मार्ग आम्हांसी ॥ १४ ॥ ज्ञाना-विणें तपास ॥ वृथा होती सायास ॥ तुम्हा देखतां मानस ॥ संतोषलें स्वामिया ॥ १५ ॥ गुरुसेवा बहु दिवस ॥ केली नाहीं सायास ॥ याचि

कारणें मानस ॥ स्थिर नोहे स्वामिया ॥ १६ ॥ तूं तारक विश्वासी ॥ म्हणून मातें भेटलासी ॥ उपदेश करावा आम्हांसी ॥ ज्ञान होईल त्वरित मज ॥ १७ ॥ ऐकोनि मुनींचें वचन ॥ श्रीगुरु पुसती हांसोन ॥ पावलासी केवीं मुनीपण ॥ गुरुविणें सांग मज ॥ १८ ॥ ऐसें पुसतां श्रीगुरुमूर्ति ॥ मुनीच्या डोळां अश्रु येती ॥ दुःखें दाटला अमित चित्तीं ॥ ऐकें स्वामी गुरुराया ॥ १९ गुरु होतां आपणासी एक ॥ अतिनिष्ठुर त्याचें वाक्य ॥ मातें गांजिलें अनेक ॥ अकृत्य[1] सेवा सांगे मज ॥ २० ॥ न सांगे वेदशास्त्राध्ययन ॥ तर्कभाष्यादि व्याकरण ॥ म्हणे तुझें अंतःकरण ॥ स्थिर नोहे अद्यापि ॥ २१ ॥ म्हणोनि सांगे आणिक कांहीं ॥ आपुलें मन स्थिर नाहीं ॥ न ऐकें त्याचें वाक्य कांहीं ॥ आणिक कोपे मजवरी ॥ २२ ॥ या कारणें बहुदिवशीं ॥ होतों तया गुरूपासीं ॥ बोले मातें निष्ठुरेंसीं ॥

१ न करण्यासारखी.

कोपोनि आलों तयावरी ॥ २३ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ श्रीगुरुमूर्ति हास्यवदन ॥ म्हणती कैसा ब्राह्मण ॥ आत्मघातकी तूं होसी ॥ २४ ॥ एखादा मूर्ख आपुले करीं ॥ मळ विसर्जी देहावरी ॥ आपुलें अदृष्ट ऐसें-परी ॥ म्हणोनि सांगे सकळिकां ॥ २५ ॥ तैसें तुझें अंतःकरण ॥ आपुलें नासिक छेदून ॥ पुढिल्यातें अपशकुन ॥ करणार होसी तूंचि एक ॥ २६ ॥ न विचारिसी आपुले गुण ॥ तूंतें होय कैंचें ज्ञान ॥ गुरुद्रोही तूंचि जाण ॥ अल्पबुद्धि परियेसा ॥ २७ ॥ आपुले गुरूचे गुणदोष ॥ सदां उच्चार करिसी हर्ष ॥ ज्ञान कैंचें होय मानस ॥ स्थिर केवीं होय आतां ॥ २८ ॥ जवळी असतां निधानू ॥ कां हिंडावें रानोरानू ॥ गुरु असतां कामधेनू ॥ त्यजोनि आलासी आम्हांपासीं ॥ २९ ॥ गुरुद्रोही जो कां नर ॥ त्यासी नाहीं इह पर ॥ ज्ञान कैंचें होय सादर ॥ तया दिवांध नरासी ॥ ३० ॥ जो जाणे गुरूची सोय ॥ वेदशास्त्रादि त्वरित होय ॥ तो सर्वज्ञ शीघ्र होय ॥

गुरु संतुष्ट होतांची ॥ ३१ ॥ संतोष होतां श्रीगुरुसी ॥ अष्टसिद्धि त्याच्या दासी ॥ क्षण न लागतां परियेसीं ॥ वेदशास्त्र तया साध्य ॥ ३२ ॥ ऐसी ऐकोनि गुरुवाणी ॥ माथा ठेवी त्यांचे चरणीं ॥ विनवीतसे कर जोडुनी ॥ करुणावचनेंकरूनियां ॥ ३३ ॥ जय जया जी जगद्गुरू ॥ निर्गुण तूंचि निर्विकारू ॥ ज्ञानसागर अपरंपारू ॥ उद्धरावें आपणातें ॥ ३४ ॥ अज्ञान-माया वेष्टोनि ॥ नेणों गुरु असे कवणी ॥ सांगा स्वामी प्रकाशोनि ॥ ज्ञान होय आपणासी ॥ ३५ ॥ कैसा गुरु ओळखावा ॥ कवणेंपरी असे सेवा ॥ प्रकाशोनि सांग देवा ॥ विश्ववंद्या गुरुमूर्ती ॥३६॥ जेणें माझें मन स्थिरू ॥ होवोनि ओळखे श्रीगुरु ॥ ऐसा करणें उपकारू ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ३७ ॥ करुणावचन ऐकोनि ॥ श्रीगुरु म्हणती ऐक मुनी ॥ तूतें सांगेन विस्तारोनि ॥ गुरुसेवाविधान ॥ ३८ ॥ श्रीगुरु म्हणती ऐक मुनी ॥ गुरु म्हणजे जनकजननी ॥ उपदेशकर्ता आहे कोणी ॥ तोचि जाणावा परम-

गुरु ॥ ३९ ॥ गुरु हरि हर विरिंची जाण ॥ स्वरूपें तोचि नारायण ॥ मन करूनि निर्वाण ॥ सेवा करावी भक्तीनें ॥ ४० एतदर्थ कथा एक ॥ सांगेन ते तत्पर ऐक ॥ आदिपर्वीं असे देख ॥ गुरुसेवा भक्तिभावें ॥ ४१ ॥ द्वारावती तीर्थ परियेसीं ॥ विप्र एक धौम्यऋषी ॥ तिघे शिष्य होते त्यासी ॥ वेदाभ्यास करावया ॥ ४२ ॥ एक अरुणी पांचाळ ॥ दुसरा बैद केवळ ॥ तिसरा उपमन्यु बाळ ॥ सेवा करिती विद्येलागीं ॥ ४३ ॥ पूर्वीं गुरूची ऐशी रीती ॥ शिष्याकरवीं सेवा घेती ॥ अंतःकरण त्याचें पहाती ॥ कैसें निर्वाण शिष्याचें ॥ ४४ ॥ पाहोनियां अंतःकरण ॥ असे भक्ति निर्वाण ॥ कृपा करिती तत्क्षण ॥ मनकामना पुरविती ॥ ४५ ॥ ऐसा धौम्यऋषी भला ॥ तया अरुणी पांचाळा ॥ एके दिवशीं निरोप दिधला ॥ ऐक द्विजा एकचित्तें ॥ ४६ ॥ शिष्यासी म्हणे धौम्यमुनि ॥ आजि त्वां जावोनि रानीं ॥ वृत्तीस न्यावें तडागपाणी ॥ जंववरी भूमि तृप्त होय

॥ ४७ ॥ असे वृत्ति तळखालीं ॥ तेथें पेरिली असे साळी ॥ उदक नेवोनि तेथें घालीं ॥ शीघ्र म्हणे शिष्यासी ॥ ४८ ॥ ऐसा गुरुनिरोप होतां ॥ गेला शिष्य धांवता ॥ झाला तटाकातें पाहता ॥ कालवा थोर वहातसे ॥ ४९ ॥ जेथें उदक असे वहात ॥ अतिदरारा गर्जत ॥ वृत्तिभूमि असे उन्नत ॥ उदक केवीं चढों पाहे ॥ ५० ॥ म्हणे आतां काय करूं ॥ कोपती आतां मातें गुरु ॥ उदक जातसे दरारू ॥ केवीं बांधूं म्हणतसे ॥ ५१ ॥ आणोनियां शिळा दगड ॥ बांधितां उदका आड ॥ पाणी जातसे घडाड ॥ जाती पाषाण वाहोनियां ॥ ५२ ॥ प्रयत्न करी नानापरी ॥ कांहीं केल्या न चढे वारी ॥ म्हणे देवा श्रीगुरुहरी ॥ काय करूं म्हणतसे ॥ ५३ ॥ मग आपण मनीं विचारी ॥ गुरूचे शेतीं न चढे वारी ॥ प्राण त्यजीन निर्धारीं ॥ गुरूचे वृत्तीनिमित्त ॥ ५४ ॥ निश्चय करूनि मानसीं ॥ मनीं ध्यात श्रीगुरूसी ॥ म्हणे काय आतां उपाय यासीं ॥ योजूनि प्रयत्न

करावा ॥ ५५ ॥ उदकाचे प्रवाहांत ॥ घालितां पाषाण जाती वहात ॥ आपण आड पडों म्हणत ॥ निर्धारिलें तये वेळीं ॥ ५६ ॥ हातीं दरडी धरी दृढें ॥ पाय ठेवी दुसरीकडे ॥ झाला आपण उदकाआड ॥ मनीं श्रीगुरु ध्यातसे ॥ ५७ ॥ ऐसा शिष्यशिरोमणी ॥ निवारण करी तत्क्षणीं ॥ वृत्तीकडे गेलें पाणी ॥ प्रवाहाचें अर्ध देखा ॥ ५८ ॥ अर्धें पाणी जैसें तैसें ॥ वाहतसे नित्यसरिसें ॥ तयामध्यें शिष्यें कैसें ॥ बुडविलें आंग आपुलें ॥ ५९ ॥ ऐसा शिष्य तया स्थानीं ॥ बुडाला असे प्रवाहवाणीं ॥ गुरूची वृत्ति झाली धणी[1] ॥ उदकें पूर्ण परियेसा ॥ ६० ॥ त्याचा गुरु धौम्यमुनि ॥ विचार करी अंतःकरणीं ॥ दिवस गेला अस्तमानीं ॥ अद्यापि शिष्य न येची ॥ ६१ ॥ ऐसें मनीं विचारित ॥ गेला आपण वृत्तींत ॥ झालें असे उदक बहुत ॥ संतोषला बहु मुनि ॥ ६२ ॥ न देखे शिष्य तये वेळीं ॥

१ भिजून चिंब झाली.

म्हणोनि मारितसे आरोळी ॥ किंवा भक्षिलें व्याघ्रव्यांळीं ॥ कोठें आहेसी म्हणतसे ॥ ६३ ॥ ऐसें मनीं विचारित ॥ उंच स्वरें बोभाटत ॥ अरे शिष्या ऐसें म्हणत ॥ प्रेमभावें बोलावी ॥ ६४ ॥ येणेंपरी करुणावचनीं ॥ पाचारीतसे धौम्यमुनि ॥ शब्द पडे शिष्यकानीं ॥ मग तेथोनि निघाला ॥ ६५ ॥ येवोनियां श्रीगुरूसी ॥ नमन केलें भावेंसीं ॥ धौम्यमुनि महाऋषि ॥ आलिंगोनियां आश्वासिला ॥ ६६ ॥ वर दीधला तये वेळीं ॥ ऐक शिष्या स्तोममौळी ॥ तूंतें सकळ विद्या आली ॥ वेदशास्त्रादिव्याकरण ॥ ६७ ॥ ऐसें म्हणतां तत्क्षणीं ॥ झाला विद्यावंत ज्ञानी ॥ लागतसे गुरुचरणीं ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ६८ ॥ कृपानिधि धौम्यमुनि ॥ आपुल्या आश्रमांत नेवोनि ॥ निरोप दिधला संतोषोनि ॥ विवाह आतां करीं म्हणे ॥ ६९ ॥ निरोप घेवोनि शिष्यराणा ॥ गेला आपुल्या स्वस्थाना ॥ आणिक शिष्य

१ सर्पांनीं. २ हांका मारीत.

दोघे जाणा ॥ होते तया गुरूजवळी ॥ ७० ॥ दुसरा शिष्य वेद जाणा ॥ गुरूची करी शुश्रूषणा ॥ त्याच्या पहावें अंतःकरणा ॥ धौम्य गुरु म्हणतसे ॥ ७१ ॥ धौम्य म्हणे शिष्यासी ॥ सांगेन ऐक तुजसी ॥ तुवां जावोन अहर्निशीं ॥ वृत्ति आमुची रक्षावी ॥ ७२ ॥ रक्षुनियां वृत्तीसी ॥ आणावें धान्य घरासी ॥ म्हणतां शिष्य अतिहर्षी ॥ गेला तया वृत्तीकडे ॥ ७३ ॥ वृत्ती पिके जोंवरी ॥ अहोरात्रीं कष्ट करीं ॥ रात्र होतां ते अवसरीं ॥ आला आपुल्या गुरूपाशीं ॥ ७४ ॥ सांगता झाला श्रीगुरूसीं ॥ म्हणे वृत्ती भरली राशीं ॥ आतां आणावया घरासी ॥ काय निरोप म्हणतसे ॥ ७५ ॥ मग म्हणे धौम्यमुनि ॥ बा रे शिष्या शिरोमणी ॥ कष्ट केले बहु रानीं ॥ आतां धान्य आणावें ॥ ७६ ॥ म्हणोनि देती एक गाडा ॥ तया जुंपोनियां रेडा ॥ येणेंपरी घेवोनि गाडा ॥ आला शेताजवळिक ॥ ७७ ॥



[ अ० १६ ] इतुकें होतां निर्वाणी । सन्मुख पातला धौम्यमुनी । त्या शिष्यातें पाहोनी । कृपा अधिक उपजली ॥ ८३ ॥

दोन खंडी साळीसी ॥ भरली शिष्यें गाडियासीं ॥ एकीकडे रेडियासी ॥ जुंपोनि ओढी आपण देखा ॥ ७८ ॥ रेडा चाले शीघ्रेंशीं ॥ न ओढवे तयासरसीं ॥ मग आपुले कंठासी ॥ बांधिता झाला जूं देखा ॥ ७९ ॥ सत्राणें तयासरसी ॥ चालता झाला मार्गासी ॥ रेडा रुतला चिखलासीं ॥ आपले बळें ओढीतसे ॥ ८० ॥ चिखलीं रुतला रेडा म्हणोनि ॥ चिंता करी बहु मनीं ॥ आपण ओढी सत्राणीं ॥ गळां फांस पडे तैसा ॥ ८१ ॥ सोडोनियां रेड्यासी ॥ काढिला गाडा बाह्य प्रदेशीं ॥ ओढितां आपण गळां फांसीं ॥ पडूनि प्राण त्यजूं पाहे ॥ ८२ ॥ इतुकें होतां निर्वाणीं ॥ सन्मुख पातला धौम्यमुनि ॥ त्या शिष्यातें पाहोनि ॥ कृपा अधिक उपजली ॥ ८३ ॥ सोडोनियां शिष्यातें ॥ आलिंगोनि करुणा बहुतें ॥ वर दिधला बहुमतातें ॥ संपन्न तूंचि वेदशास्त्रीं ॥ ८४ ॥ वर

१ जोखड. २ त्रास करून, जोरानें.

देतां तत्क्षणासी ॥ सर्व विद्या आली तयासी ॥ निरोप घेवोनि गेला घरासी ॥ शिष्य वैद परियेसा ॥ ८५ ॥ तिसरा शिष्य उपमन्यु जाण ॥ सेवेविषयीं बहुगुण ॥ गुरुसेवा शुश्रूषण ॥ बहु करी परियेसा ॥ ८६ ॥ त्यासी बहुत आहार ॥ म्हणोनि विद्या नाहीं स्थिर ॥ त्यासी विचारी[1] गुरुवर ॥ काय उपाय करावा ॥ ८७ ॥ त्यासी म्हणे धौम्यमुनि ॥ तूंतें सांगेन ऐकें कानीं ॥ नित्य गोधनें नेउनि ॥ रक्षण करीं वनामध्यें ॥ ८८ ॥ ऐसें म्हणतां तत्क्षणीं ॥ नमन केलें त्याचे चरणीं ॥ गुरें नेऊनियां रानीं ॥ तीं चारिलीं बहुत दिवस ॥ ८९ ॥ क्षुधा लागली आपणासी ॥ शीघ्र आणिलीं घरासी ॥ कोपे गुरु तयासी ॥ म्हणे शीघ्र येतोसी कां ॥ ९० ॥ सविता[3] जाय अस्तमानीं ॥ तंववरी गुरें असों दे रानीं ॥ येणेंपरी प्रतिदिनीं ॥ वर्तावें त्वां म्हणतसे ॥ ९१ ॥ अंगिकारोनि शिष्यराणा ॥ गुरें

१ त्याबद्दल. २ विचार करी. ३ सूर्य.

घेवोनि गेला वना ॥ क्षुधाक्रांत होवोनियां जाणा ॥ चिंतित असे श्रीगुरूसी ॥ ९२ ॥ चरती गुरें नदीतीरीं ॥ आपण तेथें स्नान करी ॥ तयाजवळी घरें चारी ॥ असती विप्रआश्रम तेथें ॥ ९३ ॥ जाऊनियां तया स्थानांसी ॥ भिक्षा मागूनि करी भोजनासी ॥ मग रक्षी गोधनासी ॥ प्रतिदिवशीं यापरी ॥ ९४ ॥ नित्य करी येणेंपरी ॥ रक्षूनि आणि गुरें घरीं ॥ वर्तत असतां निरंतरीं ॥ धौम्यमुनि पुसतसे ॥ ९५ ॥ गुरु म्हणे शिष्यासी ॥ तूं नित्य गा उपवासी ॥ तुझा देह दिसे पुष्टीसी ॥ कवण्या गुणें होतसे ॥ ९६ ॥ ऐकोनि गुरूचें वचन ॥ सांगे शिष्य उपमन्य ॥ भिक्षा करूनि भोजन ॥ विप्रांघरीं तेथें देखा ॥ ९७ ॥ भोजन करुनि प्रतिदिवसीं ॥ गुरें चारोनि येतों निशीं ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ आम्हां सांडोनि केवीं भुक्ती[1] ॥ ९८ ॥ भिक्षा मागोनि प्रतिदिवसीं ॥

१ जेवणें.

आणोनि द्यावी घरासी ॥ मागुती जावें गुरुंपाशीं ॥ घेवोनि यावें निशिकाळीं ॥ ९९ ॥ गुरुनिरोपें येरे दिवशीं ॥ नेलीं गुरें रानासी ॥ मागे भिक्षा नित्य जैसी ॥ दिधली ठेवोनि घरांत ॥ १०० ॥ घरीं तयातें भोजन ॥ कधीं न हो परिपूर्ण ॥ पुनः जावोनि आपण ॥ भिक्षा करूनि जेवितसे ॥ १ ॥ नित्य भिक्षा वेळ दोनी ॥ पहिली देवोनि सदनीं ॥ दुसरी आपण भक्षोनि ॥ काळ ऐसा कंठीतसे ॥ २ ॥ येणेंपरी कांचित्काळ ॥ वर्तता झाला महास्थूळ ॥ एके दिवशीं गुरु कृपाळ ॥ पुसतसे शिष्यातें ॥ ३ ॥ शिष्य सांगे वृत्तांत ॥ जेणें आपुली क्षुधा शमत ॥ नित्य भिक्षा मागत ॥ वेळ दोनी म्हणतसे ॥ ४ ॥ एक वेळ घरासी ॥ आणोनि देतों प्रतिदिवसीं ॥ दुसरी भिक्षा स्वयेंसीं ॥ करितों भोजन आपण ॥ ५ ॥ ऐसें म्हणतां धौम्यमुनि ॥ त्या शिष्यावरी कोपोनि ॥ म्हणे भिक्षा वेळ दोनी ॥ आणोनि घरीं देईं कां ॥ ६ ॥ गुरु निरोपी येणेंपरी ॥ दोनी

भिक्षा देवोनि घरीं ॥ कैसा शिष्य निर्धारी ॥ मनीं क्लेश न करीच ॥ ७ ॥ गुरेंसहित रानांत ॥ असे शिष्य क्षुधाक्रांत ॥ गोवत्स होतें स्तन पीत ॥ देखतसे तयासी ॥ ८ ॥ स्तन पीत वांसरासी ॥ उच्छिष्ट गळे संधींसीं ॥ वायां जातसे भूमीसी ॥ म्हणोनि जवळ पैं गेला ॥ ९ ॥ आपण असे क्षुधाक्रांत ॥ म्हणोनि गेला धांवत ॥ पसरोनियां दोनी हात ॥ धरी उच्छिष्ट क्षीर देखा ॥ ११० ॥ ऐसें क्षीरपान करी ॥ तेणें आपण उदर भरी ॥ दोनी वेळा भिक्षा घरीं ॥ देतसे भावभक्तीनें ॥ ११ ॥ अधिक पुष्ट झाला आपण ॥ म्हणे गुरु अवलोकून ॥ पाहों याचें शरीररक्षण ॥ कैसा स्थूळ होतसे ॥ १२ ॥ मागुती पुसे तयासी ॥ कवणें रीतीं पुष्ट होसी ॥ सांगे आपुल्या वृत्तांतासी ॥ उच्छिष्ट क्षीर पान करितों ॥ १३ ॥ ऐकोनि म्हणे शिष्यासी ॥ मतिहानि होय उच्छिष्टेंसीं ॥ दोष असे बहुवसीं ॥ भक्षूं नको म्हणतसे ॥ १४ ॥ भक्षूं नको म्हणे गुरु ॥ नित्य नाहीं तया

आहारु ॥ दुसरे दिवशीं क्षुधित येरु ॥ काय करूं म्हणतसे ॥ १५ ॥ येणेंपरी गुरेंसहित ॥ जात होता रानांत ॥ गळत होतें क्षीर बहुत ॥ एक रुईच्या झाडासी ॥ १६ ॥ म्हणे बरवें असे क्षीर ॥ उच्छिष्ट नव्हे निर्धार ॥ पान करूं तृप्तोदर ॥ म्हणोनि तेथें बैसला ॥ १७ ॥ पानें तोडोनि द्रोण करी ॥ तयामध्यें क्षीर भरी ॥ घेत होता धणीवरी ॥ तंव भरिलें डोळ्यांत ॥ १८ ॥ तेणें गेल्या दृष्टी दोन्ही ॥ हिंडतसे रानोरानीं ॥ गुरें न दिसती नयनीं ॥ म्हणोनि चिंता करीतसे ॥ १९ ॥ कष्टतांही अक्षहीन ॥ चिंता करीतसे गोधन ॥ गुरें पाहों जातां रानां ॥ पडला एके आडांत ॥ १२० ॥ पडोनियां आडांत ॥ चिंता करी अत्यंत ॥ गुरें गेलीं आतां सत्य ॥ गुरु बोलेल मजलागीं ॥ २१ ॥ पडला शिष्य तये स्थानीं ॥ दिवस गेला अस्तमानीं ॥ चिंता करी धौम्यमुनि ॥ अजूनी शिष्य न येची ॥ २२ ॥

१ तांडांत.

म्हणोनि गेला रानासी ॥ देखे तेथें गोधनासी ॥ शिष्य नाहीं म्हणोनि क्लेशी ॥ दीर्घस्वरें पाचारी ॥ २३ ॥ पांचारितां धौम्यमुनि ॥ ध्वनि पडली शिष्यकानीं ॥ प्रत्युत्तर देतां तत्क्षणीं ॥ जवळी गेला कृपाळू ॥ २४ ॥ ऐकोनियां वृत्तात ॥ उपजे कृपा अत्यंत ॥ अश्विनौ देव स्तवीं म्हणत ॥ निरोप दिधला तये वेळीं ॥ २५ ॥ गुरुनिरोपें तये वेळीं ॥ अश्विनौ देवां ध्याय मनीं ॥ दृष्टि आली दोनी नयनीं ॥ आला गुरुसन्मुख ॥ २६ ॥ येवोनियां श्रीगुरूसी ॥ नमन करी भक्तींसीं ॥ स्तुति करी बहुवसीं ॥ शिष्योत्तम तये वेळीं ॥ २७ ॥ संतोषोनि धौम्यमुनि ॥ तया शिष्या आलिंगोनि ॥ म्हणे शिष्या शिरोमणी ॥ तुष्टलों तुझिया भक्तीसी ॥ २८ ॥ प्रसन्न होवोनि शिष्यासीं ॥ हस्तस्पर्श मस्तकेसी ॥ वेदशास्त्रें तत्क्षणेसीं ॥ आलीं तया शिष्यासी ॥ २९ ॥ गुरु म्हणे शिष्यासी ॥ जावें आपुल्या

१ हाक मारितां. २ आश्विनीकुमार; देवांचे वैद्य. ३ दिसूं लागलें.

घरासी ॥ विवाह करूनि सुखेंसीं ॥ नांदत असा म्हणतसे ॥ १३० ॥ होईल तुझी बहु कीर्ति ॥ शिष्य होती बहु जगतीं ॥ उत्तंक नाम विख्याती ॥ शिष्य तुझा परियेसीं ॥ ३१ ॥ तोचि तुझिये दक्षिणेसी ॥ आणील कुंडलें परियेसीं ॥ जिंकोनियां शेषासी ॥ कीर्तिवंत होईल ॥ ३२ ॥ जन्मेजय रायासी ॥ तोच करील उपदेशासी ॥ मारवील सर्पांसी ॥ याग करूनि परियेसा ॥ ३३ ॥ तो उत्तंक जाऊन ॥ पुढें केला सर्पयज्ञ[1] ॥ जन्मेजयातें प्रेरून ॥ समस्त सर्प मारविले ॥ ३४ ॥ ख्याति झाली त्रिभुवनांत ॥ तक्षक आणिला इंद्रासहित ॥ गुरुकृपेचें सामर्थ्य ॥ ऐसें असे परियेसा ॥ ३५ ॥ जो असे गुरुद्वेषक[2] ॥ त्यासी कैंचा परलोक ॥ अंतीं होय कुंभीपाक[3] ॥ गुरुद्रोह पातकराशी ॥३६॥ संतुष्ट करितां गुरूसी ॥ काय न साधे तयासी ॥ वेदशास्त्रज्ञानराशी ॥ लाधे क्षण न लागतां ॥ ३७ ॥

१ सर्पसत्र. २ गुरूचा द्वेष करणारा. ३ या नांवाचा एक नरक आहे.

ऐसें जाणोनि मानसीं ॥ वृथा हिंडे अविद्येसी ॥ जाईं आपुल्या गुरूपासीं ॥ तोची तुज तारील ॥ ३८ ॥ त्याचें मन संतुष्टत ॥ तुज मंत्र साध्य त्वरित ॥ मन करूनि निश्चित ॥ त्वरित जाय म्हणती देखा ॥ ३९ ॥ ऐसा श्रीगुरु निरोप देतां ॥ विप्र झाला अतिज्ञांता[1] ॥ चरणांवरी ठेविला माथा ॥ विनवितसे तये वेळीं ॥ १४० ॥ जय जया जी गुरुमूर्ती ॥ तूंचि साधन परमार्थीं ॥ मातें निरोपिलें प्रीतीं ॥ तत्त्वबोध कृपेनें ॥ ४१ ॥ गुरुद्रोही आपण सत्य ॥ अपराध घडले मज अमित ॥ गुरूचें दुखविलें चित्त ॥ आतां केवीं संतुष्टे ॥ ४२ ॥ सुवर्णादि लोह सकळ ॥ भिन्न होतां सांधवेल ॥ होतां भिन्न मुक्ताफळ[2] ॥ केवीं पुन्हा ऐक्य होय ॥ ४३ ॥ अंतःकरण भिन्न झालें असतां ॥ प्रयास असे ऐक्य करितां ॥ ऐसें माझें मन असतां ॥ काय उपयोग वांचूनि ॥ ४४ ॥ ऐसें शरीर माझें द्रोही ॥ काय उपयोग

१ फार ज्ञानी. २ मोतीं

वांचूनही ॥ जीवित्वाची आशा नाहीं ॥ प्राण त्यजीन गुरुपासीं ॥ ४५ ॥ ऐसेपरी श्रीगुरूसी ॥ विनवी ब्राह्मण अतिहर्षीं ॥ नमुनी निघे वैराग्येंसीं ॥ निश्चय केला प्राण त्यजूं ॥ ४६ ॥ अनुतप्त[1] झाला तो ब्राह्मण ॥ निर्मळ झालें अंतःकरण ॥ अग्नि लागतां जैसें तृण ॥ भस्म होय तत्क्षणीं ॥ ४७ ॥ जैसी कार्पासराशी[2] ॥ वंन्हि[3] लागतां परियेसीं ॥ जळोनि जाय त्वरितेसी ॥ तैसें तयासी जहालें ॥ ४८ ॥ या कारणें पापासी ॥ अनुतप्त होतां परि-येसीं ॥ क्षालन होईल त्वरितेसी ॥ शतजन्मींचें पाप जाय ॥ ४९ ॥ निर्वा-णेंरूपें[4] द्विजवर ॥ निघाला त्यजूं कलेवर[5] ॥ ओळखिलें गुरुवर ॥ पाचारिलें तयासी ॥ १५० ॥ बोलावोनियां विप्रासी ॥ निरोप देती कृपेंसीं ॥ न करीं चिंता तूं मानसीं ॥ गेले तुझे दुरितदोष ॥ ५१ ॥ वैराग्य उपजलें तुझे मनीं ॥ दुष्कृत[6] गेलें जळोनि ॥ एकचित्तेंकरूनि ॥ स्मरीं आपुले गुरुचरणा

१ पश्चात्तापानें युक्त. २ कापसाची रास. ३ अग्नि. ४ निश्चय करून. ५ देह. ६ पाप.

॥ ५२ ॥ तये वेळीं श्रीगुरूसी ॥ नमन केलें चरणासी ॥ जगद्गुरु तूंचि होसी ॥ जयमूर्ती-अवतार ॥ ५३ ॥ तव कृपा होय जरी ॥ पापें कैंचीं शरीरीं ॥ उदय होतां तमारी ॥ अंधकार केवीं राहे ॥ ५४ ॥ ऐशियापरी श्रीगुरूसी ॥ स्तुति करी भक्तींसीं ॥ रोमांच उठले अंगासी ॥ सद्गदित कंठ झाला ॥ ५५ ॥ निर्मळ मनेंसीं तये वेळीं ॥ माथा ठेवी चरणकमळीं ॥ विनवीतसे करुणा बहाळी ॥ तारीं तारीं श्रीगुरुराया ॥ ५६ ॥ निर्वाण देखोनि अंतःकरणीं ॥ मस्तकीं ठेवी दक्षिण पाणी ॥ ज्ञान झालें तत्क्षणीं ॥ तया ब्राह्मणासी परियेसा ॥ ५७ ॥ वेदशास्त्रें तात्काळ ॥ मंत्रशास्त्रें आलीं सकळ ॥ प्रसन्न जहाले गुरु दयाळ ॥ काय न्यून त्या विप्रासी ॥ ५८ ॥ परिसं लागतां लोहासी ॥ होय सुवर्ण बावनकसी ॥ तैसें तया ब्राह्मणासी ॥ ज्ञान जहालें परियेसा ॥ ५९ ॥ आनंद झाला ब्राह्मणासी ॥

१ सूर्य. २ उजवा. ३ हात.

श्रीगुरु निरोपिती तयासी ॥ आमुचें वाक्य परियेसीं ॥ जाय त्वरित गुरु-
जवळी ॥ १६० ॥ जावोनियां गुरूपासीं ॥ नमन करीं भावेंसीं ॥ संतोष
होईल भरंवसीं ॥ तोची आपण सत्य मानीं ॥ ६१ ॥ ऐसेपरी गुरुमूर्ती ॥
तया ब्राह्मणा संबोखिती ॥ निरोप घेऊनियां त्वरित्ती ॥ गेला आपल्या
गुरूपासीं ॥ ६२ ॥ निरोप देऊनि ब्राह्मणासी ॥ श्रीगुरु निघाले परियेसीं ॥
आले भिल्लवडी ग्रामासी ॥ भुवनेश्वरी सन्निध ॥ ६३ ॥ कृष्णापश्चिमतटाकेसी ॥
औदुंबर वृक्ष परियेसीं ॥ श्रीगुरुस्वामी राहिले गुप्तेसी ॥ एकचित्तें परियेसा
॥ ६४ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ राहिले श्रीगुरु भिल्लवडीसी ॥
महिमा वाढली बहुवसीं ॥ प्रख्यात गेले सांगोन ॥ ६५ ॥ म्हणोनि सर-
स्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकळा-
भीष्टें[1] साधती ॥ ६६ ॥ इति श्रीगुरुचरित्र ॥ विवेकबोधें शिष्य पवित्र ॥

१ सवकामना.

गुरुभजनें पवित्र ॥ सर्व विद्या पावले ॥ १६७ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरम-कथाकल्पतरौ श्रीगुरुचरित्रे सिद्धनामधारकसंवादे गुरुशुश्रूषणं नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ ओंवीसंख्या ॥ १६७ ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नम ॥ ऐक शिष्या नामकरणी ॥ तूं गुरुभक्ताशिखामणी ॥ तुझी भक्ती गुरुचरणीं ॥ लीन होय निर्धारें ॥ १ ॥ पर्जन्य येतां पुढारां ॥ जैसा येतो सूचना वारा ॥ सद्गुरुकृपा दैन्यहरा ॥ ऐकें श्रीगुरुचरित्र ॥ २ ॥ ऐसें चरित्र कामधेनू ॥ सांगतों तुज विस्तारोनू ॥ एकचित्तेंकरुनी मनू ॥ ऐक शिष्या नामधारका ॥ ३ ॥ कृष्णावेणीतटाकासी ॥ भुवनेश्वरी-पश्चिमेसी ॥ औदुंबर वृक्षापासीं ॥ राहिले गुरु परियेसा ॥ ४ ॥ गौप्यरूपें असती गुरु ॥ ठाव असे अगोचरू ॥ अनुष्ठान धुरंधरू ॥ चातुर्मास्य येणेंपरी ॥ ५ ॥ सिद्धस्थान असे गहन ॥ भुवनेश्वरीसन्निधान ॥ विशेष गुरु राहिले म्हणोन ॥ उत्कृष्ट महिमा वाढला असे ॥ ६ ॥ ऐकोनि सिद्धाचे वचना ॥ नामधारक करी नमना ॥ श्रीगुरु परमात्मा जाणा ॥ कां राहिले गौप्यरूपें ॥ ७ ॥ काय त्यासी तपोद्देश ॥ भिक्षा मागणें काय हर्ष[1] ॥ हा

[1] मोठें.

संदेह माझ्या मानसीं ॥ यातें निवारीं दातारा ॥ ८ ॥ ऐक शिष्या नाम-धारका ॥ भिक्षा मागणें पिनाका ॥ आणिक सांगेन ऐका ॥ दत्तात्रेया गुरुमूर्तीसी ॥ ९ ॥ कृपासागर दत्तात्रेयमूर्ती ॥ भिक्षुकरूपी असे दिसती ॥ भक्तजनां अनुग्रहार्थी ॥ तीर्थयात्रेसी हिंडती ॥ १० ॥ अनुपम तीर्थें महीवरी ॥ असती गौप्य अपारीं ॥ श्रीगुरुमूर्ति परोपकारी ॥ प्रगट करी भक्तांलागीं ॥ ११ ॥ भक्तजनउद्धारार्थ ॥ तीर्थें हिंडे श्रीगुरुनाथ ॥ गौप्य व्हावया कारणार्थ ॥ समस्त येवोनि मागती ॥ १२ ॥ लपवितां दिनक-रासी ॥ केवीं लपे तेजराशी ॥ कस्तूरी ठेवितां गौप्येंसीं ॥ सुगंध केवीं गौप्य होय ॥ १३ ॥ आणिक सांगेन तुजप्रती ॥ कल्पवृक्ष जेवीं जगतीं ॥ जेथें राहे तया क्षितीं ॥ कल्पिलें फळ देतसे ॥ १४ ॥ या कारणें तया स्थानीं ॥ सांगेन तुज विस्तारोनि ॥ प्रकट झाले गुरुमुनि ॥ एकचित्तें परियेसा ॥ १५ ॥ करवीरक्षेत्र नगरांत ॥ ब्राह्मण एक वेदरत ॥ शास्त्र-

पुराणें विख्यात ॥ सांगे सकळां विद्वज्जनां ॥१६॥ आद्यवेदी असे आपण ॥ जाणे तर्कव्याकरण ॥ आन्हिकाप्रमाणें आचरण ॥ कर्ममार्गीं रत असे ॥ १७ ॥ त्यासी जाहला एक सुत ॥ मतिमंद असे उपजत ॥ माता-पिता समस्त ॥ गेलीं मरोनि तयाचीं ॥ १८ ॥ दिवसमास वर्धतां बाळ ॥ वर्षें सात जहालीं केवळ ॥ व्रतबंध करिती कुळाचार ॥ तया द्विजकुमराचा ॥ १९ ॥ न ये स्नानसंध्या तयासी ॥ गायत्रीमंत्र परियेसीं ॥ वेद कैंचा मूर्खासी ॥ पशुसमान जहाला असे ॥ २० ॥ जेथें सांगती अध्ययन ॥ आपण शिके जाऊन ॥ तावन्मात्र शिकतां जाण ॥ सर्वेचि विस्मृति होय त्यासी ॥ २१ ॥ तया ग्रामींचे द्विजजन ॥ निंदा करिती आपण ॥ विप्र-कुळीं जन्मून ॥ विद्या न ये तुजलागीं ॥ २२ ॥ तुझा पिता ज्ञानवंत ॥ वेदशास्त्र अभिज्ञात ॥ त्याच्या पोटीं कैसा सुत ॥ उपजलासी दगडापरी

१ ऋग्वेदी. २ बुद्धिहीन, मूर्ख. ३ वाढत असतां. ४ अल्प, थोडें. ५ जाणणारा.

॥ २३ ॥ जळो जळो तुझें जिणें ॥ पित्याच्या नांवा आणिलें उणें ॥ पोट बांधुनी पाषाणें ॥ बावीं तळीं रिघेनासी कां ॥ २४ ॥ जन्मोनिया संसारीं ॥ वृथा जाहलासी सूकरापरी ॥ तुज गति यमपुरीं ॥ आचारहीन वर्तसी ॥ २५ ॥ ज्यासी असे विद्या एक ॥ तोचि मनुष्यांमाजी अधिक ॥ जैसा चिंतामणी देख ॥ तैसी विद्या परियेसा ॥२६॥ ज्याचे हृदयीं असे विद्या ॥ त्यासी सकळ भोग सदा ॥ यशस्वी होय सुखसंपदा ॥ समस्तांमध्यें पूज्य तोचि ॥ २७ ॥ एखाद्या समयीं विदेशासी ॥ जाय नर विद्याभ्यासी ॥ पूजा करिती त्यासी ॥ विदेश[2] होय स्वदेश ॥२८॥ श्रेष्ठ असेल वय थोर ॥ विद्या नाहीं अपूज्य नर ॥ अश्रेष्ठ असेल एखादा जर ॥ विद्या असतां पूज्य होय ॥ २९ ॥ ज्यासी नाहीं सहोदर[3] ॥ तयासी विद्या भ्रातर ॥ सकळिकां वंद्य होय नर ॥ विद्यागुण ऐसा असे ॥ ३० ॥ जयासी असे विद्या

१ उडी टाकीनास. २ परदेश. ३ भाऊ.

बहुत ॥ तोचि होय ज्ञानवंत ॥ त्याचिया देहीं दैवत ॥ पूजा घेई सकळां-पासीं ॥ ३१ ॥ एखादे समयीं राजाधिपतीसी ॥ समस्त वंदिती तयासी ॥ राजाही आपण हर्षी ॥ विद्यावंत पूजीतसे ॥ ३२ ॥ ज्याचे घरीं नाहीं धन ॥ त्यासी विद्या असे धन ॥ शिकावयाचें कारण ॥ हेंचि असे जाणपां ॥ ३३ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ ब्रह्मचारी करी नमन ॥ स्वामी निरोपिलें ज्ञान ॥ विद्याभ्यास करावया ॥ ३४ ॥ जन्मांतरीं पूर्वी आपण ॥ केलें नाहीं विद्यादान ॥ न ये विद्या याची कारण ॥ काय करूं म्हणतसे ॥ ३५ ॥ ऐसा आपण दोषी ॥ जरी असेल उपाय यासी ॥ उद्धरावें जी कृपेंसीं ॥ निरोपावें दातारा ॥ ३६ ॥ परिसोनि सकळ ब्राह्मण ॥ सांगती तयासी हांसोन ॥ होईल पुढें जनन ॥ तधीं येईल विद्या तूंतें ॥ ३७ ॥ तुज कैंचा विद्याभ्यास ॥ पशु केवळ नरविशेष ॥ भिक्षा मागून उदरपोष ॥ असे रे मूर्खा कुळनाशका ॥ ३८ ॥ ऐसें नीचोत्तरेंसीं ॥ बोलती द्विजलोक

त्यासी ॥ वैराग्य धरोनि मानसीं ॥ निघाला असे अरण्यांत ॥ ३९ ॥ मनीं झाला खेदें खिन्न ॥ म्हणे आतां त्यजीन प्राण ॥ समस्त ठेविती दूषण ॥ काय उपयोग वांचोनियां ॥ ४० ॥ जळो जळो आपुलें जिणें ॥ पशु झालों मतिहीनें ॥ आतां वांचोनि काय कारणें ॥ म्हणोनि निघाला वैराग्यें ॥ ॥ ४१ ॥ भिल्लवडीग्रामासी ॥ आला तो नर परियेसीं ॥ अन्न न घेई उपवासी ॥ पातला निशीं दैववशें ॥ ४२ ॥ जेथें असे जगन्माता ॥ भुवनेश्वरी विख्याता ॥ तेथें पावला त्वरिता ॥ करी दर्शन देवीचें ॥ ४३ ॥ न करी स्नानसंध्या देख ॥ अपार करीतसे दुःख ॥ देवद्वारासन्मुख ॥ धरणें घेतलें तयानें ॥ ४४ ॥ येणेंपरी दिवस तीन्ही ॥ निर्वाण मन करुनी ॥ अन्नोदक त्यजुनी ॥ बैसला होता तो द्विज ॥४५॥ नोहे स्वप्न त्यालागोनि ॥ म्हणोनि कोपे तो बहु मनीं ॥ म्हणे अंबा भवानी ॥ कां उपेक्षिसी मजलागीं ॥ ४६ ॥

१ निश्चयी.



[अ० १७] आक्रंदोनी तसे वेळीं । शस्त्रें घेवोनि प्रबळीं । आपुली जिव्हा तात्काळीं । छेदोनि वाहे तिचे चरणीं ॥ ४७ ॥

आक्रंदोनि तये वेळीं ॥ शस्त्रें घेऊनि प्रबळी ॥ आपुली जिव्हा तात्काळीं ॥ छेदोनि वाहे तिचे चरणीं ॥ ४७ ॥ जिव्हा वाहोनि अंबेसी ॥ मागुती म्हणे परियेसीं ॥ जरी तूं मज उपेक्षिसी ॥ वाहीन शीर तुझे चरणीं ॥ ४८ ॥ ऐसें निर्वाण मानसीं ॥ क्रमितां झाली असे निशी ॥ स्वप्न झालें तयासी ॥ ऐका समस्त श्रोते हो ॥ ४९ ॥ एक बाळ ब्रह्मचारी ॥ आक्रोशसी आम्हांवरी ॥ असे कृष्णापश्चिमतीरीं ॥ त्वरित जाय तये स्थानीं ॥ ५० ॥ औदुंबराचे वृक्षातळीं ॥ असे तापसी महाबळी ॥ अवतारपुरुष चंद्रमौळी ॥ तुझी वांछा पुरवील ॥ ५१ ॥ ऐसें स्वप्न तयासी ॥ झालें अभिनव परियेसीं ॥ जागृत होतां तत्क्षणेसी ॥ निघाला तेथोनि ब्राह्मण ॥ ५२ ॥ निघाला विप्र त्वरित ॥ पळत गेला प्रवाहांत ॥ सादर[1] लक्षितांचि तेथ ॥ देखता झाला श्रीगुरूसी ॥ ५३ ॥ चरणांवरी ठेवोनियां माथा ॥ अत्यंत स्तोत्र झाला

१ प्रेमानें, भावानें.

करिता ॥ श्रीगुरुमूर्ति संतोषतां ॥ आश्वासीत तये वेळीं ॥५४॥ श्रीगुरुमूर्ति संतोषती ॥ माथां हस्त ठेविती ॥ ज्ञान झालें तयाप्रती ॥ जिव्हा आली तात्काळिक ॥ ५५ ॥ जैसा मानससरोवरास ॥ वायस[1] जाय परियेस[2] ॥ तो होय राजहंस ॥ तैसें झालें विप्रातें ॥ ५६ ॥ चिंतामणीसंपर्केंसीं ॥ सुवर्णत्व येई लोहासी ॥ मृत्तिका पडतां जांबूनदासी ॥ सुवर्ण जेवीं होय ऐका ॥ ५७ ॥ तैसें तया ब्राह्मणासी ॥ स्पर्शतां गुरुचरणांसी ॥ आली सकळ विद्या त्यासी ॥ वेद शास्त्र तर्क भाष्य ॥ ५८ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ श्रीगुरुमहिमा ऐका निका ॥ जे जे स्थानीं वास देखा ॥ तेथें महिमा ऐसी असे ॥ ५९ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्र सविस्तर ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ६० ॥ इति श्रीगुरुचरित्र ॥ मूर्खासि झालें ज्ञान भास ॥ तेचि कथा वर्णिली येथ ॥ श्रीगुरुप्रसादें ॥ ६१ ॥

१ कावळा. २ परिस.

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे द्विजोद्धरणं नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ ६१ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ जय जया जी सिद्धमुनि ॥ तूं तारक भवार्णीं ॥ सुधा-रस आमुचे श्रवणीं ॥ पूर्ण केला दातारा ॥ १ ॥ गुरुचरित्र कामधेनू ॥ ऐकतां न धाय माझें मनू ॥ कांक्षा होतसे अंतःकरणूं ॥ कथामृत ऐका-वया ॥ २ ॥ ध्यान लागलें श्रीगुरुचरणीं ॥ तृप्ति नोहे अंतःकरणीं ॥ कथा-मृतसंजीवनी ॥ आणिक निरोपीं दातारा ॥ ३ ॥ येणेंपरी सिद्धासी ॥ विनवी शिष्य भक्तींसीं ॥ मस्तक ठेवी चरणांसी ॥ कृपा भाकी तये वेळीं ॥ ४ ॥ शिष्यवचन ऐकोनि ॥ संतोषले सिद्धमुनि ॥ सांगतात विस्तारोनि ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ५ ॥ ऐक शिष्यशिखामणी ॥ धन्य धन्य तुझी वाणी ॥ तुझी भक्ति गुरुचरणीं ॥ तल्लीन झाली निश्चयें ॥ ६ ॥ तुजकरितां आम्हांसी ॥ चेतन झालें परियेसीं ॥ गुरुचरित्र आद्यंतेंसीं ॥ स्मरण जाहलें अवधारा ॥ ७ ॥ भिल्लवडीस्थानमहिमा ॥ निरोपिलें अनुपमा ॥ पुढील चरित्र उत्तमा ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ८ ॥ कचित्काळ तये स्थानीं ॥

श्रीगुरु होते गौप्य होवोनि ॥ प्रकट झाले म्हणोनि ॥ पुढें निघाले परियेसा ॥ ९ ॥ वरुणासंगम असे ख्यात ॥ दक्षिणवाराणसी म्हणत ॥ श्रीगुरु आले अवलोकित ॥ भक्तानुग्रह करावया ॥ १० ॥ पुढें कृष्णप्रवाहांत ॥ श्रीगुरु तीर्थें पावन करीत ॥ पंचगंगासंगम ख्यात ॥ तेथें राहिले द्वादशाब्दें ॥ ११ ॥ अनुपम तीर्थ मनोहर ॥ जैसें अविमुक्त काशीपूर ॥ प्रयाग मानस तीर्थ थोर ॥ म्हणोनि राहिले परियेसा ॥ १२ ॥ कुरवपूर ग्राम गहन ॥ कुरुक्षेत्र तेंचि जाण ॥ पंचगंगाकृष्णासंगम ॥ अति उत्तम परियेसा ॥ १३ ॥ कुरुक्षेत्रीं जितकें पुण्य ॥ तयाहुनी अधिक जाण ॥ तीर्थें असती अगम्य ॥ म्हणोनि राहिले श्रीगुरु ॥ १४ ॥ पंचगंगानदीतीरीं ॥ प्रख्यात असे पुराणांतरीं ॥ पांच नामें आहेत थोरी ॥ सांगेन ऐक एकचित्तें ॥ १५ ॥ शिवा भद्रा भोगावती ॥ कुंभीनदी सरस्वती ॥ पंचगंगा नामें ख्याति ॥ महापातकें संहारिती ॥ १६ ॥ ऐशा प्रख्यात पंचगंगा ॥ आल्या कृष्णेचिया

संगा ॥ प्रयागाहुनी असे चांगा ॥ संगमस्थान मनोहर ॥ १७ ॥ अमरापुर म्हणिजे ग्राम ॥ स्थान असे अनुपम ॥ जैसा प्रयागसंगम ॥ तैसें स्थान मनोहर ॥ १८ ॥ वृक्ष असे औदुंबरू ॥ प्रख्यात जाणा कल्पतरू ॥ देव असे अमरेश्वरू ॥ तया संगमीं जाण पां ॥ १९ ॥ जैसी वाराणसी पुरी ॥ गंगाभागीरथी सरी ॥ पंचनदीसंगम थोरी ॥ तत्समान असे परियेसा ॥ २० ॥ अमरेश्वरसन्निधानीं ॥ वसती चौसष्ट योगिनी ॥ शक्तितीर्थ निर्गुणी ॥ प्रख्यात असे परियेसा ॥ २१ ॥ अमरेश्वरलिंग बरवें ॥ तयासी वंदोनि स्वभावें ॥ पूजितां नरें अमर व्हावें ॥ विश्वनाथ तोचि जाणा ॥ २२ ॥ प्रयागीं करितां माघस्नान ॥ जें पुण्य होय साधन ॥ शतगुण होय त्याहुन ॥ एक स्नानें परियेसा ॥ २३ ॥ सहजनदीसंगमांत ॥ प्रयागासमान विख्यात ॥ अमरेश्वर परब्रह्म सत्य ॥ तया स्थानीं वसतसे ॥ २४ ॥ या कारणें तया स्थानीं ॥ कोटितीर्थें असती निर्गुणी ॥ वाहे

गंगा दक्षिणी ॥ वेणीसहित निरंतर ॥ २५ ॥ अमित तीर्थें तया स्थानीं ॥ सांगतां विस्तार पुराणीं ॥ अष्ट तीर्थें असती गुणी ॥ तया कृष्णप्रवाहांत ॥ २६ ॥ उत्तर दिशे असे देखा ॥ वाहे कृष्णा पश्चिममुखा ॥ शुक्लतीर्थ नाम ऐका ॥ ब्रह्महत्यापापें जाती ॥ २७ ॥ औदुंबरसन्निधेसी ॥ तीन तीर्थें परियेसीं ॥ एकाहुनि एक अधिकेसी ॥ तीर्थें असती मनोहर ॥ २८ ॥ पापविनाशी काम्य तीर्थ ॥ तिसरें सिद्धवरद तीर्थ ॥ अमरेश्वरसन्निधार्थ ॥ अनुपम तीर्थें असती पैं ॥ २९ ॥ पुढें संगमषट्कुळांत ॥ प्रयागतीर्थ असे ख्यात ॥ शक्तितीर्थ अमरतीर्थ ॥ कोटितीर्थ परियेसा ॥ ३० ॥ तीर्थें असती अपारी ॥ सांगतां असे विस्तारी ॥ या कारणें श्रीगुरु त्या पुरीं ॥ राहिले तेथें द्वादशाब्दें ॥ ३१ ॥ कृष्णा वेणी नदी दोनी ॥ पंचगंगा मिळोनि ॥ सप्तगंगासंगम सगुणी ॥ काय सांगों महिमा त्याचा ॥ ३२ ॥ ब्रह्महत्यादि पातकें ॥ जळोनि जाती स्नानें एकें ॥ ऐसें सिद्धस्थान निकें ॥ सकळाभीष्टें

होती तेथें ॥ ३३ ॥ काय सांगों त्यांचा महिमा ॥ आणिक द्यावया नाहीं उपमा ॥ दर्शनमात्रें होती काम्या ॥ स्नानफळ काय वर्णूं ॥ ३४ ॥ साक्षात् जाणा कल्पतरु ॥ वृक्ष असे औदुंबरू ॥ गौप्य होतां अगोचरू ॥ राहिले श्रीगुरु तये स्थानीं ॥ ३५ ॥ भक्तजनतारणार्थ ॥ होणार असे तीर्थ प्रख्यात ॥ राहिले तेथें श्रीगुरुनाथ ॥ म्हणोनि प्रकट जाहले ॥ ३६ ॥ असतां पुढें वर्तमानीं ॥ भिक्षा करावया प्रतिदिनीं ॥ अमरापूर म्हाणिजे ग्रामीं ॥ जाती श्रीगुरु परियेसा ॥ ३७ ॥ तया ग्रामीं द्विज एक ॥ असे वेदाभ्यासक ॥ भार्या त्याची पतिसेवक ॥ पतिव्रताशिरोमणी ॥ ३८ ॥ सुशीळ असे ब्राह्मण ॥ शुष्क भिक्षा करी आपण ॥ कर्ममार्ग-आचरण ॥ असे सात्त्विक वृत्तीनें ॥ ३९ ॥ तया विप्रमंदिरांत ॥ असे वेल उन्नत ॥ शेंगा निघती नित्य बहुत ॥ त्याणें उदरपूर्ति करी ॥ ४० ॥ एखाद्या दिवशीं ब्राह्मणासी ॥ चरु न मिळे परियेसीं ॥ तया शेंगा रांधोनि हर्षी ॥ दिवस क्रमी येणेंपरी ॥ ४१ ॥

ऐसा ब्राह्मण दरिद्री ॥ याचकवृत्तीं उदर भरी ॥ पंचमहायज्ञ कुसरी ॥ अतिथी पूजी भक्तीनें ॥ ४२ ॥ भक्तिपूर्वक श्रीगुरूसी ॥ पूजा करी नेमासी ॥ घेवड्याच्या शेंगा परियेसीं ॥ करी शाखनैवेद्या ॥ ४३ ॥ वर्ततां श्रीगुरु एके दिवसीं ॥ तया विप्रमंदिरासी ॥ गेले आपण भिक्षेसी ॥ नेलें विप्रें भक्तीनें ॥ ४४ ॥ भिक्षा करून ब्राह्मणासी ॥ आश्वासिती अतिसंतोषीं ॥ गेले तुझे दरिद्रदोष ॥ म्हणोनि निघती तये वेळीं ॥ ४५ ॥ तया विप्रगृहांत ॥ जो कां होता वेल उन्नत ॥ घेवडा नामें विख्यात ॥ आंगण सर्व वेष्टिलें ॥ ४६ ॥ तया वेलाचें बुडमूळ ॥ श्रीगुरु छेदिती तात्काळ ॥ टाकोनि देती समूळ ॥ गेले आपण संगमासी ॥ ४७ ॥ विप्रवनिता तये वेळीं ॥ दुःख करिती पुत्र सकळीं ॥ म्हणती पहा हो दैव बळी ॥ कैसें देवें केलें आम्हां ॥ ४८ ॥ आम्हीं तया यतीश्वरासी ॥ काय उपद्रव केला त्यासी ॥ छेदिलें आमुच्या ग्रासासी ॥ टाकोनि दिलें भूमीवरी ॥ ४९ ॥ ऐशापरी ती नारी ॥ दुःख



[अ० १८·] तया वेलाचें बूड मूळ । श्रीगुरु छेदिती तात्काळ । टाकोनी देती सकळ । गेले आपण संगमासी ॥ ४७ ॥

करी अनिवारी ॥ पुरुष तिचा कोपें वरी ॥ म्हणे प्रारब्ध प्रमाण ॥ ५० ॥ भ्रतार म्हणे तये वेळीं ॥ जें होणार जया काळीं ॥ निमित्य करी चंद्रमौळी ॥ तया आधीन विश्व जाण ॥ ५१ ॥ विश्वव्यापक नारायण ॥ उत्पत्तिस्थिति-लयकारण ॥ पिपीलिकादि स्थूल जीवन ॥ समस्तां आहार करितसे ॥ ५२ ॥ आयुरन्नं प्रयच्छति ॥ ऐसें बोले वेदश्रुति ॥ पंचानना आहार हस्ती ॥ केवीं करितसे प्रत्यहीं ॥ ५३ ॥ चौऱ्यायशी लक्ष जीवांसी ॥ स्थूल सूक्ष्म समस्तांसी ॥ निर्माण केलें आहारासी ॥ उत्पत्ति केली तदनंतर ॥ ५४ ॥ रंका राया एक दृष्टीं-॥ करूनि पोषितो हे सृष्टि ॥ आमुचें प्रारब्ध असे वोखटी ॥ तैसें फळ आपणासी ॥ ५५ ॥ पूर्वजन्मीं निक्षेपण ॥ सुकृत दुष्कृत असे जाण ॥ भोगणें आपुलें आपण ॥ पुढिलीयावरी काय बोल ॥ ५६ ॥ आपुलें दैव असतां उणें ॥ पुढल्या बोलती मूर्खपणें ॥ जें पेरिलें तें भक्षणें ॥ कवण बोल सांगें मज ॥ ५७ ॥ बोल ठेविसी ईश्वरासी ॥ आपलें अर्जित न विचा-

रसी ॥ ग्रास घेतला म्हणसी ॥ अविद्यामाया वेष्टोनि ॥ ५८ ॥ तो तारक आम्हांसी ॥ म्हणोनि आले भिक्षेसी ॥ नेलें आमुच्या दरिद्रासी ॥ तोचि तारी अंतीं आम्हां ॥ ५९ ॥ येणेंपरी स्त्रियेसी ॥ संबोधित परियेसीं ॥ काढोनि वेल-शाखेसी ॥ टाकिता झाला गंगेंत ॥ ६० ॥ तया वेलाचें मूळ जरी ॥ जें कां होतें आपुल्या द्वारीं ॥ टाकों म्हणूनि द्विजवरीं ॥ खणिता झाला त्या काळीं ॥ ६१ ॥ काढितां वेलमूळासी ॥ लागला कुंभ निधानेसी ॥ आनंद झाला बहुवसीं ॥ घेवोनि गेला घरांत ॥ ६२ ॥ म्हणे नवल प्रवर्तलें ॥ यतीश्वर प्रसन्न झाले ॥ म्हणोनि वेलासी तोडिलें ॥ निधान लाधलें आम्हांसी ॥ ६३ ॥ नर नव्हे तो योगेश्वर ॥ होय ईश्वरी अवतार ॥ आम्हां भेटला दैन्यहर ॥ म्हणती चला दर्शनासी ॥ ६४ ॥ जावोनि संगमीं गुरुपासीं ॥ पूजा करिती भावेंसीं ॥ वृत्तांत सांगितला तयासी ॥ तये वेळीं हर्षयुक्त ॥ ६५ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ तुम्हीं हें न सांगावें कवणासी ॥

अखंड लक्ष्मी तुमचे वंशीं ॥ आम्हां प्रकटतां जाईल ॥ ६६ ॥ ऐशापरी द्विजासी ॥ सांगती श्रीगुरु परियेसीं ॥ सुखी असावें आपुल्या गृहासी ॥ पुत्रपौत्रीं नांदावें ॥ ६७ ॥ ऐसा वर लाधोनें ॥ गेला घरीं तो ब्राह्मण ॥ श्रीगुरुकृपा ऐसी जाण ॥ दर्शनमात्रें दैन्य हरे ॥ ६८ ॥ ज्यासी होईल गुरुकृपा ॥ त्यासी कैंचें दैन्य बापा ॥ कल्पवृक्ष-आश्रय करितां ॥ विघ्न कैंचें तया घरीं ॥ ६९ ॥ दैवें उणा असेल नरू ॥ तेणें भजावा श्रीगुरु ॥ तोचि पावेल पैलपारू ॥ पूज्य होय सकळ लोकां ॥ ७० ॥ जो कां भजेल श्रीगुरूतें ॥ इह पर साधे तयातें ॥ अखंड लक्ष्मी सदनातें ॥ अष्टैश्वर्यें नांदती ॥ ७१ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ श्रीगुरुमहिमा आहे ऐसी ॥ भजावें मनोभावेंसीं ॥ कामधेनु तुझे घरीं ॥ ७२ ॥ गंगाधराचा नंदन ॥ सांगे श्रीगुरुचरित्र विस्तारोन ॥ पुढील कथा अमृतपान ॥ ऐका श्रोते हो एक-

चित्तें ॥ ७३ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ विवेकसार अयाचित ॥ विप्रदैन्य-हरण येथ ॥ कथा निरोपिली ॥ ७४ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे विवेकसार अयाचित विप्र-दैन्यहरणं नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ श्रीपादश्रीवल्लभनृसिंहसरस्वती दत्तात्रेयार्पितमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ओंवीसंख्या ॥ ७४ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागला सिद्धाचिया चरणां ॥ करसंपुट जोडूनियां जाणा ॥ विनवीतसे तये वेळीं ॥ १ ॥ जय जया जी योगेश्वरा ॥ भक्तजनमनोहरा ॥ तूंच ज्योती अंधकारा ॥ भवसागरतारक तूं ॥ २ ॥ अज्ञानतिमिररजनींत[1] ॥ निजलों होतों मदोन्मत्त[2] ॥ गुरुचरित्र मज अमृत ॥ प्राशन करविलें दातारा ॥ ३ ॥ त्याणें झालें मज चतें[3] ॥ ज्ञानसूर्यप्रकाश होत ॥ तुझे कृपेनें जागृत ॥ जाहलों स्वामी सिद्धमुनी ॥ ४ ॥ पुढील कथा विस्तारा ॥ कृपा करीं गा दातारा ॥ निरोपावी जी योगेश्वरा ॥ म्हणोनि लागला चरणांसी ॥ ५ ॥ ऐकोनि शिष्याचें वचन ॥ संतोषला सिद्ध आपण ॥ सांगतसे विस्तारोन ॥ गुरुमहिमा अनुपम॥ ॥६॥ शिष्योत्तमा नामांकिता ॥ सांगेन ऐक गुरूची कथा ॥ औदुंबराखालतां ॥ होते श्रीगुरु परियेसा ॥ ७ ॥ ऐकोनि सिद्धाचें वचन ॥ नामधारक करी

१ अज्ञानरूप काळोख्या रात्रींत. २ गुंग. ३ जागेपण.

प्रश्न ॥ अनेक पुण्यवृक्ष त्यजून ॥ का प्रीति औदुंबरीं ॥ ८ ॥ अश्वत्थवृक्ष असे थोर ॥ म्हणोनि सांगती वेद चार ॥ श्रीगुरूसी आवडे औदुंबर ॥ कवण कारण निरोपावें ॥ ९ ॥ सिद्ध म्हणे नामांकिता ॥ सांगेन त्याचिया वृत्तांता ॥ जंधीं[1] नृसिंह अवतार होता ॥ हिरण्यकश्यपवधार्थ ॥ १० ॥ नखें करूनि दैत्यासी ॥ विदारियलें कोपेंसीं ॥ आंतडीं काढोनियां हर्षी ॥ घालितसे माळ गळां ॥ ११ ॥ तया दैत्याचे पोटीं ॥ विष होतें काळकुटीं ॥ जैसा वडवाग्नि सिंधुपोटीं ॥ तैसें विष परियेसा ॥ १२ ॥ विदारण करितां दैत्यासी ॥ वेधलें विष त्या नखांसी ॥ तापलीं नखें परियेसीं ॥ ऐक शिष्या एकचित्तें ॥ १३ ॥ तये समयीं महालक्ष्मी ॥ घेऊनि आली अतिप्रेमीं ॥ औदुंबरफळें नामी ॥ शांतीकारणें[2] नखांसी ॥ १४ ॥ तये वेळीं शीतलार्थ ॥ नखें रोंविलीं औदुंबरांत ॥ विषाग्नि झाला शांत ॥ उग्र नरसिंह शांत झाला

१ जेव्हां. २ शांत होण्याकरितां.

॥ १५ ॥ शांत झाला नरसिंहदेव ॥ देता झाला लक्ष्मीस खेवं ॥ संतोषोनि उभय देव ॥ वर देती तये वेळीं ॥ १६ ॥ तये वेळीं औदुंबरासी ॥ देतो वर हृषीकेशी ॥ सदा सफळ तूंचि होसी ॥ कल्पवृक्ष तुझें नाम ॥ १७ ॥ जे जन भजती भक्तींसीं ॥ काम्य होत त्वरितेसी ॥ तुज देखतां परियेसीं॥ उग्र विष शांत होय ॥ १८ ॥ जे सेविती मनुष्यलोक ॥ कामना करूनि अनेक ॥ फळप्राप्ति होय निकें ॥ पापावेगळा होय नरू ॥ १९ ॥ वांझ नारी सेवा करितां ॥ पुत्र होती सत्वरतां ॥ जे जन असती दैन्यपीडिता ॥ सेवितां होती श्रियायुक्त ॥ २० ॥ तुझे छायेसी जळांत ॥ स्नान करितां पुण्य बहुत ॥ भागीरथीचें स्नान करीत ॥ तितुकें पुण्य परियेसा ॥ २१ ॥ तुझे छाये बैसोन ॥ जे जन करिती अनुष्ठान ॥ अनंत फळ होय ज्ञान ॥ कल्पिलें फळ होय तयांसी ॥ २२ ॥ तुज सेवी त्या नरासी ॥ व्याधि न

१ आलिंगन. २ निश्चयेंकरून.

होय कवणे दिवशीं ॥ ब्रह्महत्यादि महादोषी ॥ पुनीत होय परियेसा ॥२३॥ जे जन कल्पोनि मानसीं ॥ तुज सेविती भावेंसीं ॥ कल्पना पुरती भरंवसीं ॥ कल्पवृक्ष तूंचि होसी ॥ २४ ॥ मी सदा वसें तुजपाशीं ॥ लक्ष्मीसहित संतोषीं ॥ म्हणोनि वर देती हर्षीं ॥ नरसिंहमूर्ति तये वेळीं ॥ २५ ॥ ऐसा वृक्ष औदुंबरू ॥ कलियुगीं तोची कल्पतरू ॥ नरसिंहमूर्ति होता उग्रू ॥ शांत झाली तयापासीं ॥ २६ ॥ याकारणें श्रीगुरुमूर्ति ॥ नरसिंहमंत्रें उपासना करिती ॥ उग्र करावया शांति ॥ औदुंबरीं वास करिती ॥ २७ ॥ अवतार अपण तयाचे ॥ स्थान आपुलें असे साचें ॥ शांती करावया उग्रतेचे ॥ म्हणोनि वास औदुंबरीं ॥ २८ ॥ सहज वृक्ष औदुंबरू ॥ कल्पवृक्षसमान तरु ॥ विशेष वास करी गुरु ॥ कल्पिलीं फळें तेथें होतीं ॥ २९ ॥ तया कल्पद्रुमातळीं ॥ होते श्रीगुरु चंद्रमौळी ॥ ब्रह्म

१ शुद्ध.

विष्णु नेत्रभाळी ॥ मनुष्यदेह धरोनियां ॥ ३० ॥ भक्तजनतारणार्थ ॥ पावन करी सर्वतीर्थ ॥ अवतार त्रिमूर्ति श्रीगुरुनाथ ॥ भूमीवरी वर्ततसे ॥ ३१ ॥ वृक्षातळीं अहर्निशीं ॥ श्रीगुरु असती गौप्येंसीं ॥ माध्यान्ह-काळसमयासी ॥ समारंभ होय तेथें ॥ ३२ ॥ अमरेश्वरसन्निधानीं ॥ वसती चौसष्ट योगिनी ॥ पूजा करावया माध्यान्हीं ॥ श्रीगुरूजवळी येती नित्य ॥ ३३ ॥ नमन करूनि भक्तींसीं ॥ नेती आपुल्या मंदिरासी ॥ पूजा करिती विधानेंसीं ॥ गंधपरिमळ सुगंधयुक्त ॥ ३४ ॥ आरोगोनि तया घरीं ॥ पुनरपि येती औदुंबरीं ॥ एखाद्या समयीं द्विजवरी ॥ विस्मय करिती देखूनियां ॥ ३५ ॥ म्हणती अभिनव यति कैसा ॥ न करी भिक्षा ग्रामांत ऐसा ॥ असे सदा अरण्यवासा ॥ कवणेंपरी काळ कंठी ॥ ३६ ॥ पाहूं याचें वर्तमान ॥ एखादा नर ठेवून ॥ नित्य भिक्षा कोठून ॥ पाहूं

१ कपाळावर आहे नेत्र ज्याच्या असा, शंकर. २ भोजन करून.

अंत यतीश्वराचा ॥ ३७ ॥ ऐसें विचारूनि मानसीं ॥ गेले संगमस्थानासी ॥ माध्यान्हसमयीं तयासी ॥ उपजे भय अंतःकरणीं ॥ ३८ ॥ जे पाहों म्हणती गुरूचा अंत ॥ तेचि देखती यमाचा पंथ ॥ ऐसे विप्र मदोन्मत्त ॥ अधोगती तेचि जाती ॥ ३९ ॥ उपजतां भय ब्राह्मणांसी ॥ गेले आपुल्या स्थानासी ॥ तव गंगानुज तडियेसी ॥ होता गृंत्ति राखीत ॥४०॥ त्याणें देखिलें श्रीगुरूसी ॥ योगिनी आल्या पूजेसी ॥ गंगेमध्यें येतां कैसी ॥ वाट झाली जळांत ॥ ४१ ॥ विस्मय करी तो नर ॥ म्हणे कैसा यतीश्वर ॥ द्विभाग झालें गंगानीर ॥ केवीं गेले गंगेंत ॥ ४२ ॥ श्रीगुरुनाथा नमूनि ॥ पूजा करिती योगिनी ॥ भिक्षा तेथें करूनि ॥ आले मागुती बाहेर ॥ ४३ ॥ पहात होता गंगानुज ॥ म्हणे कैसें झालें चोजें ॥ अवतार होईल ईश्वरकाज ॥ म्हणोनि पूजिती देवकन्या ॥ ४४ ॥ येरे

१ शेत. २ आश्चर्य.

दिवशीं मागुती ॥ हातीं घेऊन आरती ॥ देवकन्या ओंवाळिती ॥ श्रीगुरूतें नमुनी ॥ ४५ ॥ पुन्हा गंगाप्रवाहांत ॥ श्रीगुरु निघाले योगिनींसहित ॥ जो कां नर होता पहात ॥ तोही गेला सवेंची ॥ ४६ ॥ नदीतीरीं जातां श्रीगुरु ॥ द्विभाग जाहलें गंगेंत वारू ॥ भीतरीं दिसे अनुपम पुरूं[1] ॥ श्रीरत्नखचित गोपुरेंसीं ॥ ४७ ॥ अमरावतीसमान नगर ॥ जैसें तेज दिनकर ॥ गुरु जाता समस्त पुर[2] ॥ घेउनि आलें आरती ॥ ४८ ॥ ओंवाळून आरती ॥ नेलें आपुल्या मंदिराप्रती ॥ सिंहासन रत्नखचिती ॥ बैसों घातलें तये वेळीं ॥ ४९ ॥ पूजा करिती विधींसीं ॥ उपचारें षोडशीं ॥ अनेकापरी षड्रसेंसीं ॥ आरोगण[3] केलें तये वेळीं ॥ ५० ॥ देखोनियां नरासी ॥ म्हणती तूं कां आलासी ॥ विनवी नर स्वामीसी ॥ सहज आलों दर्शना ॥ ५१ ॥ ऐसें बोलोनि अनन्यशरण ॥ तल्लीन होवोनि

१ मध्यगीं. २ नगर, शहर. ३ भोजन.

अंतःकरण ॥ म्हणे स्वामी गिरिजारमण ॥ होसी त्रिमूर्ति तूंचि एक ॥५२॥
न कळे तुझें स्वरूपज्ञान ॥ संसारमाया वेष्टोन ॥ तूं तारक भवार्ण ॥ उद्धा-
रावें स्वामिया ॥ ५३ ॥ तूं तारक विश्वासी ॥ म्हणोनि भूमीं अवतर-
लासी ॥ अज्ञान म्हणिजे रजनीसी ॥ ज्योतिःस्वरूप तूंचि एक ॥ ५४ ॥
तुझें दर्शन होय ज्यासी ॥ सर्वाभीष्टें होतीं त्यासी ॥ इहपर अनायासीं ॥
जोडे क्षण न लागतां ॥ ५५ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ स्तोत्र करी तो नर
ऐका ॥ संतोषूनि गुरुनायका ॥ आश्वासिलें तये वेळीं ॥ ५६ ॥ श्रीगुरु
म्हणती तयासी ॥ तुझें दैन्य गेलें परियेसीं ॥ जी जी इच्छा मानसीं ॥
सकळाभीष्ट पावसी ॥ ५७ ॥ तुवां पाहिले वर्तमानासी ॥ न सांगावें कवणा-
पाशीं ॥ ज्या दिवशीं प्रकट करिशी ॥ मृत्यु पावशी तत्काळ ॥ ५८ ॥
येणेंपरी तयासी ॥ सांगती श्रीगुरु परियेसीं ॥ आले औदुंबरापासीं ॥
गंगानुज समागमें ॥ ५९ ॥ श्रीगुरुनिरोप घेऊन ॥ गेला गंगानुज आपण ॥



[अ० १९ ] श्रीगुरु म्हणती तयासी । तुझें दैन्य गेलें परियेसीं । जो जी इच्छा मानसीं । सकळाभीष्ट पावसी ॥ ५७ ॥

वृत्तिस्थाना जातां जाण ॥ निधान[1] त्यासी लाधलें[2] ॥ ६० ॥ ज्ञानवंत झाला नर ॥ गुरूचा नित्य अनुचर ॥ धन्य धन्य पुत्रपौत्र ॥ अखिलानंदें वर्ततसे ॥ ६१ ॥ भक्तिभावें श्रीगुरूसी ॥ नमन करी प्रतिदिवशीं ॥ सेवा करी कलत्रेंसीं ॥ एकभावेंकरूनियां ॥ ६२ ॥ वर्ततां एके दिवसीं ॥ आली पौर्णिमा माघमासीं ॥ नमन करुनी श्रीगुरूसी ॥ विनवीतसे तो भक्त ॥ ६३ ॥ म्हणे स्वामी जगद्गुरू ॥ माघस्नान प्रयाग थोरू ॥ म्हणोनि सांगती द्विजवरू ॥ क्षेत्र थोर काशीपुर ॥ ६४ ॥ कैसें प्रयाग काशीस्थान ॥ कैसें वाराणसी भुवन ॥ नेणों आपण ज्ञातिहीन ॥ कृपा करणें स्वामिया ॥६५॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ पंचगंगासंगमेसी ॥ प्रयाग जाणावें भरंवसीं ॥ काशीपुर तें गुरुस्थळ ॥ ६६ ॥ दक्षिणप्रयाग कोल्हापुर ॥ त्रिस्थळी असे मनोहर ॥ जरी पहासी प्रत्यक्षाकार ॥ दावीन तुज चाल आतां ॥ ६७ ॥

१ ठेवा. २ सांपडलें.

बैसले होते व्याघ्राजिनीं[1] ॥ मागें धरीं रे दृढ करूनि ॥ मनोवेगें तत्क्षणीं ॥ गेले प्रयागा प्रातःकाळीं ॥ ६८ ॥ तेथें स्नान करोनि ॥ गेले काशीस माध्यान्हीं ॥ विश्वनाथासी दाखवूनि ॥ सवेंच गेले गयेसी ॥ ६९ ॥ ऐसें त्रिस्थळीं[2] आचरोनि ॥ आले परतोनि अस्तमानीं ॥ येणेंपरी तये स्थानीं ॥ देखता झाला तो नर ॥ ७० ॥ विश्वनाटक श्रीगुरुमूर्ति ॥ प्रकट झाली असे कीर्ति ॥ श्रीगुरु मनीं विचारिती ॥ आतां येथें गौप्य व्हावें ॥ ७१ ॥ ऐसेपरी तये स्थानीं ॥ गुप्त झाले गुरुमुनि ॥ अमरेश्वरातें पुसोनि ॥ निघते झाले तये वेळीं ॥ ७२ ॥ श्रीगुरु निघतां तेथोनि ॥ आल्या चौसष्ट योगिनी ॥ विनविती करुणावचनीं ॥ आम्हां ठेवोनि केवीं जासी ॥ ७३ ॥ नित्य तुझ्या दर्शनासी ॥ तापत्रय हरती क्षणेसी ॥ अन्नपूर्णा तुम्हांपासीं ॥ केवीं राहूं स्वामिया ॥ ७४ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ योगिनी विनविती

१ व्याघ्रचर्मावर. २ प्रयाग, काशी व गया अशी त्रिस्थळी यात्रा.

भक्तींसीं ॥ भक्तवत्सलें संतोषीं ॥ दिधला वर तये वेळीं ॥ ७५ ॥ श्रीगुरु म्हणती तयांसी ॥ सदा असों औदुंबरापासीं ॥ प्रगट जाणें पूर्वेसी ॥ स्थान आमुचें येथेंचि असे ॥ ७६ ॥ तुम्हीं रहावें औदुंबरीं ॥ अमरपूर पश्चिम तीरीं ॥ अन्नपूर्णा निर्धारीं ॥ औदुंबरीं ठेवितों ॥ ७७ ॥ कल्पवृक्ष औदुं-बर ॥ तेथें असा तुम्ही स्थिर ॥ अमरपुर पश्चिम तीर ॥ आम्हां स्थान हेंचि जाणा ॥ ७८ ॥ प्रख्यात होईल स्थान बहुत ॥ समस्त नर पूजा करीत ॥ मनकामना होय त्वरित ॥ तुम्हीं त्यासी साह्य व्हावें ॥ ७९ ॥ तुम्हांसहित औदुंबर ॥ आमुच्या पादुका मनोहर ॥ पूजा करिती जे तत्पर ॥ मन-कामना ॥ पुरती जाणा ॥ ८० ॥ येथें असे अन्नपूर्णा ॥ नित्य करितां आराधना ॥ तेणें होय कामना ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ ८१ ॥ पापविनाश काम्य तीर्थीं ॥ सिद्ध तीर्थीं स्नान करिती ॥ सात वेळां स्नपन करिती ॥ तुम्हांसहित औदुंबरीं ॥ ८२ ॥ साठ वर्षें वांझेसी ॥ पुत्र होती शतायुषी ॥

ब्रह्महत्यादि पाप नाशी ॥ स्नानमात्रें त्या तीर्थीं ॥ ८३ ॥ सोमसूर्य-ग्रहणेसी ॥ अमावास्यासंक्रमणेसी ॥ स्नान करितां भक्तींसीं ॥ अनंत पुण्य असे देखा ॥ ८४ ॥ सोमवारीं अमावास्येसी ॥ व्यतिपातादि पर्व-णीसी ॥ स्नान करितां फळें कैसीं ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ८५ ॥ सुवर्ण-शृंग रौप्यखुरेंसीं ॥ अलंकारुनी धेनूसी ॥ सहस्र कपिला ब्राह्मणांसी ॥ सुरनदीतीरीं दिलें फळ असे ॥ ८६ ॥ भक्तिभावेंकरोनि देखा ॥ अन्न घालितां ब्राह्मणा एका ॥ कोटीभोजन ब्राह्मण ऐका ॥ पुण्य असे परि-येसा ॥ ८७ ॥ औदुंबरवृक्षातळीं ॥ जप करितां मन निर्मळीं ॥ कोटिगुणें फळें आगळीं ॥ होम कल्याऐसेंची ॥ ८८ ॥ रुद्र[1] जपोनि एकादश ॥ करिती पूजा मानस ॥ अतिरुद्र[2] केलें फळसदृश ॥ एकचि पुण्य परियेसा ॥ ८९ ॥ मंदगतीं प्रदक्षणा ॥ करितां पावे अनंत पुण्या ॥ पदोपदीं वाज-

१ एकादशिनी. २ तेराशें एकतीस एकादशिन्या.

पेय यज्ञा ॥ फळ असे परियेसा ॥ ९० ॥ नमन करितां येणेंपरी ॥ पुण्य असे अपरंपरीं ॥ प्रदक्षिणा दोन चारी ॥ करूनि करणें नमस्कार ॥ ९१ ॥ कुष्ठें असे अंगहीन ॥ त्याणें करणें प्रदक्षिणा ॥ लक्ष वेळ करितां जाणा ॥ देवासमान होय देह ॥ ९२ ॥ ऐसें स्थान मनोहरू ॥ सहज असे कल्पतरू ॥ म्हणोनि सांगताती गुरु ॥ चतुःषष्ठि योगिनींसी ॥९३॥ ऐसा निरोप घेऊन ॥ श्रीगुरु निघाले तेथोन ॥ जेथें होतें गाणगापुरभुवन ॥ भीमातीरीं अनुपम ॥ ९४ ॥ विश्वरूप जगन्नाथ ॥ अखिलां ठायीं असे वसत ॥ औदुंबरीं प्रीति बहुत ॥ नित्य तेथें वसतसे ॥ ९५ ॥ गौप्य राहोनि औदुंबरीं ॥ प्रगटरूपें गाणगापुरीं ॥ राहिले श्रीगुरु प्रीतिकरीं ॥ प्रख्यात झाले परियेसा ॥ ९६ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गुरुमहिमा आहे ऐसी ॥ प्रगट झाले बहुवसीं ॥ गाणगापुरीं परियेसा ॥ ९७ ॥ म्हणोनि सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ भक्तिपूर्वक ऐकतां नर ॥

लाभे चतुर्विध पुरुषार्थ ॥ ९८ ॥ गुरुचरित्र कामधेनू ॥ जे ऐकती भक्त-जनू ॥ त्यांचे घरीं निधानू ॥ सकळाभीष्टें पावती ॥ ९९ ॥ इति श्रीगुरु-चरित्रामृत ॥ कल्पवृक्ष औदुंबरीं तेथ ॥ यक्षिणी योगिनी स्थापित ॥ आपण राहिले गुप्तत्वें ॥ १०० ॥ इति श्रीगुरुचरित्रे परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे औदुंबरक्षेत्रवर्णनं नाम एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥ ओंवीसंख्या १०० ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागला सिद्धाचिया चरणां ॥ हस्त जोडूनि विनवी जाणा ॥ भावभक्तींकरूनियां ॥ १ ॥ पुसतसे तये वेळीं ॥ माथा ठेवोनि चरणकमळीं ॥ जय जया जी सिद्धमौळी ॥ विनवी-तसे अवधारा ॥ २ ॥ स्वामी निरोपिलें आम्हांसी ॥ श्रीगुरु आले गाण-गापुरासी ॥ गौप्यरूपें अमरापुरासी ॥ औदुंबरीं असती म्हणतसां ॥ ३ ॥ वर देउनी योगिनींसी ॥ आपण आले प्रगटतेसी ॥ पुढें तया स्थानेसी ॥ कीर्ति विस्तारें निरोपावी ॥ ४ ॥ वृक्ष सांगसी औदुंबरू ॥ निश्चय म्हणसी कल्पतरू ॥ पुढें कवणा झाला वरू ॥ निरोपावें दातारा ॥ ५ ॥ शिष्यव-चन ऐकोनि ॥ संतोषला सिद्धमुनि ॥ सांगतसे विस्तारोनि ॥ औदुंबरस्था-नमहिमा ॥ ६ ॥ सिद्ध म्हणे ऐक बाळा ॥ किती सांगूं गुरूची लीळा ॥ औदुंबरीं सर्वकाळ ॥ वास आपणा असे जाणा ॥ ७ ॥ जया नांव औदुं-

१ वापसी.

वरू ॥ काय पुससी त्या वरू ॥ जेथें वास श्रीगुरू ॥ कल्पिलें फळ देतसे ॥ ८ ॥ अमित झाला तेथें महिमा ॥ सांगावया अशक्य आम्हां ॥ एखादा सांगों दृष्टांत तुम्हां ॥ शिष्योत्तमा नामधारका ॥ ९ ॥ शिरोळनाम ग्रामासीं ॥ विप्र एक परियेसीं ॥ गंगाधर नामेंसीं ॥ वेदरत होता जाणा ॥ १० ॥ त्याची भार्या पतिव्रता ॥ शांत असे सुशीलता ॥ पुत्र होवोनि सवेंच मरतां ॥ कष्टतसे येणेंपरी ॥ ११ ॥ पांच पुत्र तिसी झाले ॥ सर्वेचि पंचत्व[2] पावले ॥ अनेक देव आराधिले ॥ न व्हे[3] स्थिर कवणेंपरी ॥ १२ ॥ दुःख करीतसे नारी ॥ व्रत उपाय अपरंपारी[1] ॥ पूर्वकर्म असे थोरी ॥ स्थिर न होती पुत्र तिचे ॥ १३ ॥ राहणी कर्मविपाकेंसीं ॥ विचार करिती या दोषीं ॥ पुत्रशोक व्हावयासीं ॥ सांगती पातक तये वेळीं ॥ १४ ॥ सांगताती विद्वज्जन ॥ पुत्र न वांचती काय कारण ॥ पूर्वजन्मींचा दोषगुण ॥ विस्तार

१ पुष्कळ. २ मरण. ३ जगेनात.

करिती तये वेळीं ॥ १५ ॥ गर्भपात स्त्रियांसी ॥ जे जन करिती तामसी ॥ पावती वांझ जन्मांतरासी ॥ झाले पुत्र मरती जाणा ॥१६॥ अश्ववध गोवध करी ॥ वांझ होय ज्वरी ॥ एखादा परद्रव्य अपहारी ॥ निपुत्र होय तोचि जाणा ॥१७॥ विप्र म्हणती तियेसी ॥ तुझा पूर्वजन्म दोषी ॥ दिसतसे आम्हांसी ॥ सांगों ऐक एकचित्तें ॥ १८ ॥ शौनकगोत्र द्विजापासीं ॥ ऋण घेतलें द्रव्यासी ॥ मागतां तूं न देसी ॥ कष्टला तो ब्राह्मण ॥ १९ ॥ लोभी होता ब्राह्मण ॥ द्रव्यास्तव दिधला प्राण ॥ आत्महत्या केली त्याणें ॥ तोचि पिशाच झालासे ॥ २० ॥ तो गर्भपात करी तुज ॥ मृत्यु जाहले करी तो द्विज ॥ तुझें कर्म असे सहज ॥ आपली जोडी भोगावी ॥ २१ ॥ ऐकोन ब्राह्मणाचें वचन ॥ विप्रवनिता खेदें खिन्न ॥ अनुतप्त होवोनि अंतःकरण ॥ द्विजचरणीं लागली ॥ २२ ॥ कर जोडोनि तये

१ दुष्ट. २ प्रारब्ध.

वेळीं ॥ विप्रां विनवी करुणा बहाळी ॥ माथा ठेवोनि चरणकमळीं ॥ पुसतसे तयासी ॥ २३ ॥ ऐसी पापिणी दुराचारी ॥ बुडाल्यें पापसागरीं ॥ स्वामी मातें तारीं तारीं ॥ उपाय सांगा म्हणतसे ॥ २४ ॥ ऐसें पापहळाहळीं ॥ बाळकें भक्षिलीं चांडाळीं ॥ औषधी सांगा तुम्हीं सकळी ॥ म्हणोनियां विनवीतसे ॥ २५ ॥ विप्र म्हणती तियेसी ॥ केलें तुवां ब्रह्महत्येसी ॥ अपहारिलें द्रव्यासी ॥ ब्राह्मण पिशाच झाला असे ॥ २६ ॥ जधीं मेला तो द्विजवर ॥ केली नाहीं क्रिया पर ॥ त्याच्या द्रव्याचा अपहार ॥ केला असे जन्मांतरीं ॥ २७ ॥ त्याची करावया उद्धारगति ॥ सोळावें कर्म करावें रीतीं ॥ द्रव्य द्यावें एकशती ॥ तया गोत्रद्विजासी ॥ २८ ॥ तेणें होईल तुज बरवें ॥ एकभावें आचरावें ॥ कृष्णातीरीं असावें ॥ उपवास करावे एक मास ॥ २९ ॥ पंचगंगासंगमासी ॥ तीर्थें

१ पाप हेंच विष. २ उत्तरकार्य. ३ शंभर. ४ त्याच्या ( शौनक ) गोत्रांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणास.

असती बहुवसी ॥ औदुंबरवृक्षासी ॥ आराधावें परियेसा ॥ ३० ॥ पापविनाशीं करुनी स्नान ॥ वेळ सात औदुंबर-स्नपन ॥ अभिषेकोनि गुरुचरण ॥ पुनः स्नान काम्यतीर्थी ॥ ३१ ॥ विधिपूर्वक श्रीगुरुचरणीं ॥ पूजा करावी एकमनीं ॥ येणेंपरी भक्तिनिर्वाणीं ॥ मास एक आचरावें ॥ ३२ ॥ स्थान असे श्रीगुरूचें ॥ श्रीनृसिंहसरस्वतीचें ॥ तुझे दोष जातील साचे ॥ होतील पुत्र शतायुषी ॥ ३३ ॥ मास आचरोनि येणेंपरी ॥ मग विप्रांतें पाचारीं ॥ द्रव्य द्यावें शौनकगोत्रीं ॥ द्विजवरासी एकशत ॥ ३४ ॥ त्याचे नांवें कर्म सकळ ॥ आचरोनि मन निर्मळ ॥ होतील तुझे कष्ट सफळ ॥ श्रीगुरुनाथ तारील पैं ॥ ३५ ॥ गुरुस्मरण करुनी मनीं ॥ तूं जप करीं श्रीगुरुचरणीं ॥ तुझें पाप होईल धुणी ॥ ब्रह्मसमंध परिहरेल ॥३६॥ ऐसें सांगतां द्विजवरीं ॥ ऐकोन सती चिंता करीं ॥ शतद्रव्य आमुचे घरीं ॥ कधीं न मिळे परियेसा ॥ ३७ ॥ कष्ट करूनि आपुल्या

देहीं ॥ उपवासादि पूजा पाहीं ॥ मासोपवास एकभावीं ॥ करीन आपण गुरुसेवा ॥ ३८ ॥ येणेंपरी ती नारी ॥ सांगे आपण निर्धारीं ॥ ऐकोनियां द्विजवरीं ॥ निरोप दिधला तये वेळीं ॥ ३९ ॥ विप्र म्हणती ऐक बाळे ॥ तूतें इतुकें द्रव्य न मिळे ॥ सेवा करीं मननिर्मळें ॥ श्रीगुरुचरणीं आतांची ॥ ४० ॥ निष्कृत्ति[1] तुझिये पापासी ॥ श्रीगुरु करील परियेसीं ॥ औदुंबर-सन्निधानेसी ॥ वास असे निरंतर ॥ ४१ ॥ तो कृपाळू भक्तांसी ॥ निवारील ब्रह्महत्येसी ॥ शक्ति असे तुझी जैसी ॥ द्रव्य वेंचीं[2] गुरुनिरोपें ॥ ४२ ॥ ऐकोनि द्विजाचें वचन ॥ विप्रवनिता संतोषोन ॥ गेली त्वरित ठाकोन ॥ जेथं स्थान श्रीगुरूचें ॥ ४३ ॥ स्नान करोनि संगमासी ॥ विधिपूर्वक पापविनाशीं ॥ सात वेळ स्नानासी ॥ करी औदुंबरप्रदक्षिणा ॥ ४४ ॥ काम्यतीर्थीं करोनि स्नान ॥ पूजीतसे गुरुचरण ॥ करूनी प्रद-

१ नाश. २ खर्च करीं.

क्षिणा नमन ॥ करीतसे उपवास ॥ ४५ ॥ येणेंपरी दिवस तिनी ॥ सेवा करी ती भामिनी ॥ तोचि विप्र आला स्वप्नीं ॥ द्रव्य मागे एकशत॥४६॥ अद्यापि तूं द्रव्य न देसी ॥ घेईन तुझ्या प्राणासी ॥ पुढें तुझ्या वंशासी ॥ वाढों नेदीं सर्वथा ॥ ४७ ॥ वांयां सायास करिसी ॥ पुत्र कैंचा तुझे वंशासी ॥ म्हणोनि कोपें मारावयासी ॥ आला विप्र स्वप्नांत ॥ ४८ ॥ भयचकित विप्रवनिता ॥ औदुंबराआड निघतां ॥ तंव देखिलें श्रीगुरु-नाथा ॥ तयापाठीं निघाली ॥ ४९ ॥ अभय देवोनि नारीसी ॥ निवारिलें ब्राह्मणासी ॥ पुसती श्रीगुरु तयासी ॥ कां मारिशी स्त्रियेतें ॥ ५० ॥ विप्र सांगे श्रीगुरूसी ॥ जन्मांतरीं इणें आपणासी ॥ अपहारिलें द्रव्यासी ॥ प्राण त्यजिला यास्तव ॥ ५१ ॥ स्वामी कृपाळू सर्वांसी ॥ आमुचे शत्रूचा पक्षपात करिसी ॥ तुम्ही यतीश्वर तापसी ॥ पक्षपात करूं नये ॥ ५२ ॥

१ व्यर्थ. २ कष्ट. ३ संन्यासी लोकांमध्यें श्रेष्ठ.

ऐकोनि तयाचें वचन ॥ श्रीगुरु म्हणती कोपोन ॥ उपद्रविसी कां भक्तजन ॥ तूतें शिक्षा करीन मी ॥ ५३ ॥ आम्ही सांगों जेणें रीतीं ॥ जरी ऐकसी हिताचे अर्थीं ॥ तुज होईल सद्गति ॥ पिशाचत्व परिहरेल ॥ ५४ ॥ जें का देईल विप्रवनिता ॥ तुवां अंगिकारावें तत्त्वतां ॥ जरी न ये तुझिया चित्ता ॥ तरी जाईं येथोन ॥ ५५ ॥ रक्षीन आपुल्या भक्तांसी ॥ वंशोवशीं अभिवृद्धेसी ॥ पुनरपि जरी पाहों येसी ॥ तरी शिक्षा करूं जाण पां ॥ ५६ ॥ ऐकोनि गुरूचें वचन ॥ पिशाचें करून नमन ॥ स्वामी देखिले तुझे चरण ॥ उद्धरावें आपणासी ॥ ५७ ॥ जेणेंपरी आपणासी ॥ उद्धार होय सद्गतीसी ॥ कवणेंपरी निरोप देसी ॥ अंगिकारूं स्वामिया ॥ ५८ ॥ येणेंपरी तयासी ॥ गुरु सांगती ब्रियेसी ॥ जें असेल तुजपाशीं ॥ अर्पण करीं तया नांवें ॥ ५९ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ विप्रवनिता भावेंसीं ॥ कर्म केल्यावर दहावे दिवसीं ॥ गति होईल तुजला जाण ॥ ६० ॥

अष्टतीर्थीं स्नान करीं ॥ तया नांवें अवधारीं ॥ सात दिवस येणेंपरी ॥
स्नपन करीं औदुंबरीं ॥ ६१ ॥ ब्रह्महत्या तुझा दोष ॥ गेला त्वरित
निःशेष ॥ कन्या पुत्र पूर्णायुष ॥ होतील म्हणती श्रीगुरु ॥ ६२ ॥ ऐसें
देखोनि जागृतीं ॥ विप्रवनिता भयचकिती ॥ ज्ञानें पाहे श्रीगुरुमूर्ति ॥
न विसंबे मनांत ॥ ६३ ॥ गुरुनिरोपें दहा दिवस ॥ केलें आचरण परि-
येस ॥ ब्रह्महत्या महादोष ॥ गति झाली ब्राह्मणासी ॥ ६४ ॥ येरे[1]
दिवशीं स्वप्नांत ॥ प्रत्यक्ष आले श्रीगुरुनाथ ॥ नारीकेल[2] दोन देत ॥
भरली ओंटी तियेची ॥ ६५ ॥ म्हणे पारणें करावें आतां ॥ पुत्र होती
तुज तत्त्वतां ॥ पुढें त्यांची संतति बहुता ॥ चिंता न करीं मानसीं ॥
॥ ६६ ॥ श्रीगुरुनिरोपें आराधन ॥ केलें दंपत्यें मिळोन ॥ प्रगट झाला
गुरु आपण ॥ संपर्क लोह परिसासी ॥ ६७ ॥ चिंतामणिस्पर्श होतां ॥

१ शेवटचे, २ नारळ.

लोहपाषाणा कांचनता ॥ तैसी ती विप्रवनिता ॥ पापावेगळी त्वरित झाली ॥ ६८ ॥ पुढें तये नारीसी ॥ पुत्रयुग्में शतायुषी ॥ झालें श्रीगुरुकृपेंसीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६९ ॥ व्रतबंध करि जेष्ठ पुत्रासी ॥ समारंभ आनंदेंसीं ॥ चौलकर्म दुजियासी ॥ करूं पहाती मातापिता ॥ ॥ ७० ॥ समारंभ करिती जनकजननी ॥ चौलकर्म करणें मनीं ॥ पुत्रासी वर्षें तीन्हीं ॥ अतिउल्हास मानसीं ॥ ७१ ॥ समारंभ करिती अतिप्रीतीं ॥ करितीं झालीं आइतीं ॥ पूर्व दिवसीं मध्यान्हरात्रीं ॥ आली व्याधि कुमारासी ॥ ७२ ॥ व्याधि असती अनेक ॥ एकाहुनी एक अधिक ॥ तयामध्यें तीव्र दुःख ॥ धनुर्वात तयांमाजी ॥ ७३ ॥ अवयवें अति वांकोनि ॥ दिसे भयानक नयनीं ॥ येणेंपरी दिवस तीनीं ॥ कष्टतसे तो बाळ ॥ ७४ ॥ तये दिवशीं अस्तमानीं ॥ पंचत्व पावला तत्क्षणीं ॥

१ सुवर्णपणा. २ जुळें. ३ तयारी. ४ भयंकर.

शोक करीतसे जननी ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ७५ ॥ आक्रोशोनि भूमीसी ॥ आफळी शिर सत्राणेंसीं ॥ पाषाण घेवोनि हृदयासी ॥ घात करी ती नारी ॥७६॥ देह टाकी धरणीवरी ॥ निर्जीव होवोनि क्षणभरी ॥ आठवी दुःख अपारी ॥ नयनें वारिपूर्ण झालीं ॥ ७७ ॥ प्रेतपुत्रावरी लोळे ॥ आलिंगीतसे बळें ॥ वेष्टोनियां मायाजाळें ॥ प्रलापितसे ती नारी ॥ ७८ ॥ म्हणे ताता पुत्रराया ॥ प्राणरक्षका माझ्या प्रिया ॥ मातें केवीं सोडोनियां ॥ जासी कोठें सांग पां ॥ ७९ ॥ कोठें गेलासी खेळावया ॥ स्तनींचें क्षीरें जातसे वायां ॥ शीघ्र येईं गा ठाकोनियां ॥ पुत्रा माझ्या प्राणप्रिया ॥ ८० ॥ केवीं विसरूं तुझे गुण ॥ पुत्रांमाजी तूं निधान ॥ तुझें गोजिरें बोलणें ॥ केवीं विसरूं पुत्रराया ॥ ८१ ॥ तुझ्या स्वरूपाऐसा सुत ॥ केवीं देखों मी निश्चित ॥ निधान देखती स्वप्नांत ॥ तैसें मज चाळ-

१ आपटून घेई. २ जोरानें. ३ बडबडे; आक्रोश करी. ४ बाप्पा. ५ दूध.

विलें ॥ ८२ ॥ पुत्र व्यालें पांच जाण ॥ त्यांत एक हें निधान ॥ जेव्हां झालें गर्भधारण ॥ तेव्हांपासोनि संतोष ॥ ८३ ॥ डोहळे मज उत्तम होती ॥ कधीं नसे चिंता चित्तीं ॥ अतिउल्हास मजप्रती ॥ पुत्र होईल म्हणोनियां ॥ ८४ ॥ श्रीगुरूनें मातें दिधला वर ॥ पुत्र होतील निर्धार ॥ तेणें मज हर्ष थोर ॥ वरद पिंड होईल हा ॥ ८५ ॥ जंधीं तुज प्रसवलें ॥ अनंत सौख्य लाधलें ॥ प्राणप्रिया तुज पोशिलें ॥ मातें रक्षिसी म्हणोनियां॥८६॥ मज भरंवसा तुझा बहुत ॥ वृद्धापकाळीं पोषक म्हणत ॥ आम्हां सांडोनि जासी उचित ॥ धर्म नव्हे पुत्रराया ॥ ८७ ॥ दुःख झालें मज बहुत ॥ विसरलें बाळा तुज देखत ॥ तूंचि तारक आम्हां सत्य ॥ म्हणोनि विश्वासिलों आम्ही ॥ ८८ ॥ ऐसें नानापरी देख ॥ दुःख करी बहुत शोक ॥ निवारिती सकळ लोक ॥ वायां दुःख कायसें ॥८९॥ देवदानवऋषीश्वरांसी ॥

१ बेव्हां.

होणार न चुके कवणासी ॥ ब्रह्मा लिही ललाटासी ॥ तेंची अढळ जाण पां ॥ ९० ॥ अवतार होती हरिहर ॥ तेही न राहती स्थिर ॥ तुम्ही तरी मनुष्य नर ॥ काय अंढळ तुम्हांतें ॥ ९१ ॥ येणेंपरी सांगती जन ॥ आणिक दुःख आठवी मन ॥ म्हणे मातें दिधलीं जाण ॥ स्थिर म्हणोनि दोन्ही फळें ॥ ९२ ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥ भूमंडळीं महाख्याती ॥ औदुंबरीं सदा वसती ॥ तेणें दिधला पुत्र मज ॥ ९३ ॥ त्याचे बोल केवीं मिथ्या ॥ माझा असे वरद पिता ॥ त्यासी घडे माझी हत्या ॥ पुत्रासवें देईन प्राण ॥ ९४ ॥ म्हणोनि आठवी श्रीगुरूसी ॥ देवा मज गांजिलेंसी ॥ विश्वासिलें तुम्हांसी ॥ सत्य वाक्य तुझें म्हणोनियां ॥ ९५ ॥ सत्यसंकल्प तूंचि होसी ॥ म्हणोनि होत्यें विश्वासीं ॥ घात केला आम्हांसी ॥ विश्वासघातकी केवीं न म्हणें ॥ ९६ ॥ त्रयमूर्ती-अवतार ॥ तूं नृसिंहसरस्वती नर ॥ ध्रुवा बिभीषणा दिधला वर ॥ केवीं सत्य म्हणों आतां

॥ ९७ ॥ तुझिया बोला विश्वासिलें ॥ आतां मातें उपेक्षिलें ॥ मन निष्ठुर केलें ॥ प्राण देईन तुम्हांवरी ॥ ९८ ॥ लोक येती तुझ्या स्थानीं ॥ सेवा करिती निर्वंसोनि ॥ औदुंबरा प्रदक्षिणा करूनी ॥ पुरंश्चरणें करिताती ॥ ९९ ॥ आपण केलें पुरश्चरण ॥ फळ आलें मज साधन ॥ आतां तुजवरी देतें प्राण ॥ काय विश्वास तुझे स्थानीं ॥ १०० ॥ कीर्ति होईल सृष्टींत ॥ आमुचा तुवां केला घात ॥ पुढें तुज भजती भक्त ॥ काय भरंवसा तयांसी ॥ १ ॥ ब्रह्मस्वंदोषें पीडोन ॥ धरिले तुझे चरण ॥ अंगिकारोनि मध्यें त्यजणें ॥ टाकितां कोण धर्म घडे ॥ २ ॥ व्याघ्रातें धेनु भिऊन ॥ जाय आधार म्हणून ॥ तेथेंचि वधिती यवन ॥ तयापरी मज झालें ॥ ३ ॥ कीं एखादा देवळासी ॥ जात असे पूजेसी ॥ तें देऊळ तयासी ॥ मृत्युरूपें वर पडे ॥ ४ ॥ तयापरी आपणासी ॥ झालें स्वामी

१ राहून. २ अनुष्ठानें. ३ ब्राह्मणाचें द्रव्य बुडविलें त्या दोषानें.

परियेसीं ॥ माझ्या प्राणसुतासी ॥ न राखिलें देवराया ॥ ५ ॥ येणेंपरी अहोरात्रीं ॥ दुःख करी ती नारी ॥ उदय जाहला दिनकरी ॥ ती न ऐके कोणाचें ॥ ६ ॥ द्विज मिळोनि सकळी ॥ येती तये स्त्रियेजवळी ॥ वाया दुःख सर्वकाळीं ॥ करिसी तूं मूर्खपणें ॥ ७ ॥ जे जे समयीं होणार गति ॥ ब्रह्मादिकांसी न चुकती ॥ चला जाऊं गंगेप्रती ॥ संस्कार प्रेता करावया ॥ ८ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ आक्रोश थोर करोनि ॥ प्रेत पोटासी धरोनि ॥ दीर्घस्वरें रडतसे ॥ ९ ॥ आपणासहित प्रेतासी ॥ करावें अग्निप्रवेशी ॥ येरवीं नेदीं प्रेतासी ॥ म्हणोनि उरीं बांधीतसे ॥ ११० ॥ लोक म्हणती तियेसी ॥ नव्हेसी तूं स्त्री कर्कशी ॥ प्रेतासवें प्राण देसी ॥ कोण धर्म सांग आम्हां ॥ ११ ॥ न देखों न ऐकों कानीं ॥ पुत्रासवें कोणी गेले प्राणी ॥ वायां बोलती मूर्खपणीं ॥ आत्महत्या महादोष ॥ १२ ॥ नानापरी तियेसी ॥ बोलती लोक परियेसीं ॥ केला नियम निश्चयेंसीं ॥

प्राण त्यजीन पुत्रासवें ॥ १३ ॥ दिवस आला दोन प्रहर ॥ प्रेतास करूं नदा संस्कार ॥ अथवा न ये गंगातीर ॥ ग्रामीं आकांत प्रवर्तला ॥ १४ ॥ इतुकिया अवसरीं ॥ आला एक ब्रह्मचारी ॥ सांगे तीतें सविस्तारीं ॥ आत्मज्ञान तये वेळीं ॥ १५ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व झालें ऐका ॥ ब्रह्मचारी अपूर्विका ॥ बोधिता झाला ज्ञान तिसी ॥ १६ ॥ ब्रह्मचारी नव्हे तोचि गुरु ॥ आला वेषधारी नरू ॥ नृसिंहसरस्वती अवतारू ॥ भक्तवत्सल परियेसा ॥ १७ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ शतायुषी पुत्र होय ॥ १८ ॥ भक्तिपूर्वक श्रवण करिती ॥ व्याधि न होय शरीराप्रती ॥ पूर्णायुषी ते होती ॥ सत्य माना माझे बोल ॥ १९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ विप्रस्त्रियेसी संतान देत ॥ श्रीनृसिंहसरस्वती पोटीं येत ॥ ब्रह्महत्या वारो-

१ ब्रह्मज्ञान.



[अ० २०] इतुकिया अवसरीं । आला एक ब्रह्मचारी । सांगें तीतें विस्तारीं । आत्मज्ञान तये वेळीं ॥ ११५ ॥

नियां ॥ १२० ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्यु-
पाख्याने सिद्धनामधारकसंवादे ब्रह्मसमंधपरिहारो नाम विंशोऽध्यायः
॥ २० ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥१२०॥ ७॥ ॥ ७॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ ब्रह्मचारी कारणिका ॥ उपदेशीं ज्ञान निका ॥ तये प्रेतजननीसी[1] ॥ १ ॥ ब्रह्मचारी म्हणे नारीसी ॥ मूढपणें दुःख करिसी ॥ कोण वांचला धरणीसी ॥ या संसारीं सांग मज ॥ २ ॥ उपजला कोण मेला कोण ॥ उत्पत्ति झाली कोठोन ॥ जळात उपजे जैसा फेण ॥ बुद्बुद[2] राहे कोठें स्थिर ॥ ३ ॥ जैसा देह पंचभूतीं[3] ॥ मिळोनि होय आकृति[4] ॥ वेगळीं होतां पंचभूतीं ॥ अव्यक्त होय देह जाण ॥ ४ ॥ तया पंच भूतांचे गुण ॥ मायापाशीं वेष्टोन ॥ भ्रांति लाविली मी देह म्हणोन ॥ पुत्रमित्रकलत्रमिषें ॥ ५ ॥ सत्त्व रज तमोगुण ॥ तया भूतांपासोन ॥ वेगळालीं केलीं लक्षण ॥ होती ऐका एकचित्तें ॥ ६ ॥ देवत्व होय सत्त्वगुण ॥ रजोगुण मनुष्य जाण ॥ दैत्यांसी तमोगुण ॥ गुणानुसारें कर्मे घडती ॥ ७ ॥ जेणें कर्मे आचरती ॥ सुकृत अथवा दुष्कृति ॥ तैशीच

१ मेलेल्या मुलाची आई. २ बुडबुडा. ३ पृथिव्यादि पाच तत्त्वें. ४ देह.

होय फळप्राप्ति ॥ आपुलें आपण भोगावें ॥ ८ ॥ जैसी गुणाची वासना ॥ इंद्रियें तयाधीन जाणा ॥ मायापाशीं वेष्टोनि गहना ॥ सुखदुःखें लिप्त करिती ॥ ९ ॥ या संसारवर्तमानीं ॥ उपजती जंतु कर्मानुगुणीं ॥ आपुल्या आर्जवापासोनि ॥ सुखदुःखादि भोगिती ॥ १० ॥ कल्पकोटी वरुषें ज्यांसी ॥ असती आयुष्यें देवऋषि ॥ न सुटे कर्म तयासी ॥ मनुष्याचा कवण पाड ॥ ११ ॥ एखादा नर देहाधीन ॥ काळ करी आपुले गुण ॥ कर्म होय अनेक गुण ॥ देहधारी येणेंपरी ॥ १२ ॥ जो असे देहधारी ॥ तयासी विकार नानापरी ॥ स्थिर नव्हे तो निर्धारीं ॥ आपुलें पाप म्हणावया ॥ १३ ॥ या कारणें ज्ञानवंत ॥ संतोष न करी उपजत ॥ अथवा नरा होय मृत्य ॥ दुःख आपण करूं नये ॥ १४ ॥ जधीं गर्भसंभव होता ॥ काय दिसे आकारता ॥ अव्यक्त दिसे व्यक्तता ॥ सर्वांचि होय अव्यक्त पैं ॥ १५ ॥

१ सर्व प्रकारचे प्राणी. २ पूर्वकर्माप्रमाणें.

बुद्बुद निघती जैसे जळीं ॥ सर्वांचि नष्ट तात्काळीं ॥ तैसा देह सर्वकाळीं ॥ स्थिर नव्हे सर्वथा ॥ १६ ॥ जधीं गर्भप्रसव झालें ॥ विनाशी म्हणोनि जाणिलें ॥ कर्मानुबंधें जैसीं फळें ॥ तैसें भोगणें देहासी ॥ १७ ॥ कोणी मरती पूर्ववयेंसी ॥ अथवा मरती वृद्धपणेंसी ॥ आपुले अर्जितीं असती जैशी ॥ तेणेंपरी घडे जाण ॥ १८ ॥ मायापाशीं वेष्टोनि ॥ म्हणती पिता सुत जननी ॥ कलत्र मित्र तेणें गुणीं ॥ आपुलें आपुलें म्हणती मूढ ॥ १९ ॥ निर्मळ देह म्हणों जरी ॥ उत्पत्ति मांसरुधिरीं ॥ मळमूत्रांत अघोरीं ॥ उद्भव झाला परियेसा ॥ २० ॥ कर्मानुसार उपजतांची ॥ ललाटीं लिहितो विरंची ॥ सुकृत अथवा दुष्कृतेंची ॥ भोग भोगणें म्हणोनि ॥ २१ ॥ ऐसें कर्म काळासी ॥ जिंकिलें नाहीं परियेसीं ॥ या कारणें देहासी ॥ नित्यत्व नाहीं परियेसा ॥ २२ ॥ स्वप्नीं निधान दिसे जैसें ॥ कोणीं धरावें भरंवसें ॥ इंद्रजाल गारूड जैसें ॥ स्थिर केवीं मानिजे ॥ २३ ॥ तुझें तूंचि सांग

वहिलें ॥ कोटी वेळा जन्म झाले ॥ मनुष्य किंवा पशुत्व लाधलें ॥ पक्षी अथवा कृमिरूप ॥ २४ ॥ जरी होतीस मनुष्ययोनीं ॥ कोण कोणाची होतीस जननी ॥ कोण कोणाची होतीस गृहिणी ॥ सांग तुझें त्वा निश्चयें ॥ २५ ॥ कवण तुझीं मातापिता ॥ जन्मांतरींचीं सांग आतां ॥ वायां दुःख करिसी वृथा ॥ पुत्र आपुला म्हणोनि ॥ २६ ॥ पंचभूतात्मक देह ॥ चर्म-मांस-अस्थि-मज्जा-समूह ॥ वेष्टोनियां नव देह ॥ मळबद्ध शरीर नांवें ॥२७॥ कैंचा पुत्र कोठें मृत्य ॥ वायां भ्रमोनि कां रडत ॥ सांडोनि द्यावें कैंचें प्रेत ॥ संस्कारिती लौकिकार्थ ॥ २८ ॥ येणेंपरी ब्रह्मचारी ॥ सांगे तत्त्व विस्तारीं ॥ परिसोनियां विप्रनारी ॥ विनवीतसे तयासी ॥ २९ ॥ विप्र-वनिता तये वेळीं ॥ विनवीतसे करुणा बहाळी ॥ स्वामी निरोपिले धर्म सकळी ॥ परी स्थिर नव्हे अंतःकरण ॥ ३० ॥ प्रारब्ध प्रमाण म्हणों जरी ॥ तरी कां भजावा श्रीहरी ॥ परीससंपर्कें लोह जरी ॥ सुवर्ण न होय कोण

बोले ॥ ३१ ॥ आम्ही पहिले दैवहीन ॥ म्हणोनि धरिले श्रीगुरुचरण ॥ अभय दिधलें नाहीं मरण ॥ म्हणोनि विश्वासलों आम्ही ॥ ३२ ॥ एखाद्या नरा येतां ज्वर ॥ धुंडीत जाय वैद्यघर ॥ औषध घेवोनि प्रतिकार ॥ सर्वेचि करिती आरोग्यता ॥ ३३ ॥ एके समयीं मनुष्यासी ॥ आश्रय करिती करुणेंसीं ॥ साह्य होय भरंवसीं ॥ आली आपदा परिहारी ॥ ३४ ॥ त्रयमूर्तींचा अवतार ॥ श्रीनृसिंहसरस्वती असे नर ॥ तेणें दिधला असे वर ॥ केवीं असत्य होय सांगें ॥ ३५ ॥ आराधिलें म्यां तयासी ॥ वर दिधला गा मजसी ॥ त्याचा भरंवसा मानसीं ॥ धरोनि होतें स्वस्थाचित्त ॥ ३६ ॥ विश्वासुनी असतां आपण ॥ केवीं केलें निर्वाण ॥ कैसें झालें माझें मूर्खपण ॥ म्हणोनि स्वामी निरोपिसी ॥ ३७ ॥ या कारणें आपण आतां ॥ प्राण त्यजीन तत्त्वतां ॥ देह समर्पीन श्रीगुरुनाथा ॥ वाढो कीर्ति तयाची ॥ ३८ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ ओळखून भाव मन ॥ सांगे

बुद्धि तीस ज्ञान ॥ उपाय यासी करीं आतां ॥ ३९ ॥ विश्वास केला श्रीगुरूसी ॥ पुत्र लाधला पूर्णायुषी ॥ जरी आला मृत्यु त्यासी ॥ घेवोनि जाय गुरुस्थाना ॥ ४० ॥ जेथें लाधला तुज वर ॥ तेथें ठेवीं कलेवर ॥ पंचगंगाकृष्णातीर ॥ औदुंबरवृक्षातळीं ॥ ४१ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ विश्वास झाला तिचे मनीं ॥ पाठीं शव बांधोनि ॥ घेवोनि गेली औदुंबरा ॥ ४२ ॥ जेथें होत्या गुरुपादुका ॥ आफळी शिर ते बालिका ॥ रुधिरें भरल्या त्या पादुका ॥ आक्रोशें रडे ती नारी ॥ ४३ ॥ समस्त शोकाहुनी अधिक ॥ साहवेना पुत्रशोक ॥ क्षयरोग तोचि एक ॥ मातापितया मृत्युमूळ ॥ ४४ ॥ ऐसें करितां झाली निशी ॥ विप्र मागती प्रेतासी ॥ म्हणती आक्रोश कां हो करिसी ॥ संस्कारोनि जाऊं आतां ॥ ४५ ॥ मनुष्य नाहीं अरण्यात ॥ केवीं राहूं जाऊं म्हणत ॥

१ आपटी.

जाळूं दे वो¹ आतां प्रेत ॥ अहो कर्कशा म्हणे ती ज्ञाती ॥ ४६ ॥ कांहीं केलिया नेदी प्रेत ॥ आपणासवें जाळा म्हणत ॥ पोटीं बांधोनियां प्रेत ॥ लोळतसे पादुकांवरी ॥ ४७ ॥ म्हणती विप्र ज्ञाती लोक ॥ राहों नये रानीं ऐक ॥ तस्कर²बाधा होईल देख ॥ जाऊं आतां घरासी ॥ ४८ ॥ जाऊं स्नान करूनि ॥ उपवास होय आजच्या दिनीं ॥ प्रातःकाळीं येवोनि ॥ दहन करूं म्हणताती ॥ ४९ ॥ आजिचे रात्रीं प्रेतासी ॥ सुटेल वास दुर्गंधीसी ॥ देईल आपोआप दहनासी ॥ त्रासून जाणा कर्कशा ॥ ५० ॥ म्हणोनि निघती सकळ लोक ॥ राहिले तेथें जननीजनक ॥ प्रेत देखोनि करिती शोक ॥ झाली रात्री परियेसा ॥५१॥ निद्रा नाहीं दिवस दोन्ही ॥ शोक करिती जनकजननी ॥ तीन याम³ होतां रजनी ॥ झोंप आली तियेसी ॥ ५२ ॥ देखतसे सुषुप्तीं⁴तें ॥ जटाधारी भस्मोध्दूलित ॥ व्याघ्र-

१ अगो. २ चोरांची पीडा. ३ प्रहर. ४ स्वप्नांत.

चर्म परिधानित ॥ रुद्राक्षमाळा सर्वांगीं ॥ ५३ ॥ योगदंड त्रिशूळ हातीं ॥
आले औदुंबराप्रती ॥ कां हो शोक करिसी सती ॥ आक्रोशोनि
आम्हांवरी ॥ ५४ ॥ काय झालें तुझिया कुमरा ॥ करूं त्यासी प्रतिकारा ॥
म्हणोनि दे तो अभय करा ॥ भक्तवत्सल श्रीगुरु ॥ ५५ ॥ भस्म काढोनि
प्रेतासी ॥ लावीतसे सर्वांगासी ॥ मुख पसरीं म्हणे तिसी ॥ वायुपूर करूं
म्हणे ॥ ५६ ॥ प्राण म्हणे वायु जाण ॥ बाहेर गेला निघोन ॥ घातला
मागुतीं आणून ॥ पुत्र तुझा जीवंत होय ॥ ५७ ॥ इतुकें देखोनि भयच-
कित ॥ झाली नारी जागृत ॥ म्हणे आपणा कैसी भ्रांत ॥ पडिली असे
प्रेतावरी ॥ ५८ ॥ जे कां वसे आपुले मनीं ॥ तैसेंचि दिसे निद्रास्वप्नीं ॥
कैंचा देव नृसिंहमुनि ॥ भ्रांति आपणा लागली असे ॥ ५९ ॥ आमुचें
प्रारब्ध असे उणें ॥ देवावरि बोल काय ठेवणें ॥ अज्ञान आम्ही मूर्खपणें ॥
श्रीगुरूवरी बोल काय ॥ ६० ॥ येणेंपरी चिंता करीत ॥ तंव प्रेतासी

झालें चेत ॥ सर्वांगही उष्ण होत ॥ सर्वसंधीं जीव आला ॥ ६१ ॥ म्हणे प्रेता काय झालें ॥ किंवा भूत संचारलें ॥ मनीं भय उपजलें ॥ ठेवी काढोनि दूर परतें ॥ ६२ ॥ सर्व संधींसी जीव आला ॥ बाळ उठोनि बैसला ॥ म्हणे क्षुधा लागली मला ॥ अन्न दे कीं म्हणे माते ॥ ६३ ॥ रुदन करीतसे तये वेळीं ॥ आला कुमार मातेजवळी ॥ स्तन घालितां मुखकमळीं ॥ क्षीर निघे बत्तीस धारा ॥ ६४ ॥ संतोष भय होऊनि तिसी ॥ संदेह वाटे मानसीं ॥ कडे घेऊनि बाळकासी ॥ गेली आपुल्या पतीजवळी ॥ ६५ ॥ जागृत करुनि पतीसी ॥ सांगे वृत्तांत तयासी ॥ पति म्हणे तियेसी ॥ ऐसें चरित्र श्रीगुरूचें ॥ ६६ ॥ म्हणोनि दंपत्य दोघें जाणा ॥ करोनि औदुंबरीं प्रदक्षिणा ॥ साष्टांग नमुनी चरणा ॥ नाना-परी स्तोत्रें करिती ॥ ६७ ॥ जय जया जी वरदमूर्ती ॥ ब्रह्मा विष्णु शिव-यती ॥ भक्तवत्सला तुझी ख्याति ॥ वासंना पहासी भक्तांची ॥ ६८ ॥

तूं तारक विश्वासी ॥ म्हणोनि भूमीं अवतरलासी ॥ अशक्य तूतें वर्णा-यासी ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ६९ ॥ बाळ जैसें कोपेंसीं ॥ निष्ठुर बोले मातेसी ॥ तैसें अविद्यामायापाशीं ॥ तुम्हां निष्ठुर बोलिलों ॥ ७० ॥ सर्वस्वीं आम्हां क्षमा करणें ॥ म्हणोनि घालिती लोटांगणें ॥ विनवोनिया करुणावचनें ॥ गेलीं स्नानासी गंगेंत ॥ ७१ ॥ स्नान करोनि बाळका-सहित ॥ धुतीं झालीं पादुकांचें रक्त ॥ औदुंबरा स्नपन करीत ॥ लाविती दीप तये वेळीं ॥ ७२ ॥ पूजा करिती भक्तींसीं ॥ मंत्रपूर्वक विधींसीं ॥ शमीपत्र कुसुमेंसीं ॥ पूजा करिती परियेसा ॥ ७३ ॥ नीरांजन तये वेळा ॥ करिती गायन परिबळा ॥ अतिसंतोषें ती अबला ॥ भक्तिभावें स्तुति करीत ॥ ७४ ॥ इतुकें होय तों गेली निशी ॥ उदय झाला दिन-करासी ॥ संस्कारूं म्हणोनि प्रेतासी ॥ आले विप्र ज्ञाती सकळ ॥ ७५ ॥ तंव देखती कुमारासी ॥ विस्मय झाला सकळिकांसी ॥ समाधान करिती



[अ० २१] स्नान करोनी बाळकासहित । धुती झाली पादुकांचें रक्त । औदुंबरा स्नपन करीत । लाविती दीप तये वेळीं ॥ ७२ ॥

हर्षीं ॥ महा आनंद वर्तला ॥ ७६ ॥ ऐसा श्रीगुरुस्थानमहिमा ॥ अखिल लोक लाधले कामा ॥ एकेकाची सांगतां महिमा ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ ७७ ॥ पुत्रप्राप्ति वांझेसी ॥ श्रीप्राप्ति दारिद्र्यासी ॥ आरोग्य होईल रोगियासी ॥ अपमृत्यु न ये जाणा ॥ ७८ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ स्थानमहिमा ऐशी ऐका ॥ अपार असे सांगतां देखा ॥ साधारण निरोपिलें ॥ ७९ ॥ तया औदुंबरातळीं ॥ श्रीगुरु वसे सर्वकाळीं ॥ काम्य होत तात्काळीं ॥ आराधितां नरहरीसी ॥ ८० ॥ भाव असावा आपुले मनीं ॥ पूजा करावी श्रीगुरुचरणीं ॥ जी जी वासना ज्याचे मनीं ॥ त्वरित होय परियेसा ॥ ८१ ॥ हृदयशूळ गंडमाळ ॥ अपस्मार रोग सकळ ॥ परिहरती तात्काळ ॥ श्रीगुरुपादुका अर्चितां ॥ ८२ ॥ जो असेल मंदमति ॥ बधिर मुका चरण नसती ॥ औदुंबरीं सेवा करिती ॥

१ इच्छित.

सुदेह होय सत्य माना ॥ ८३ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ तेथें होय निश्चित ॥ प्रत्यक्ष वसे श्रीगुरुनाथ ॥ औदुंबरीं सनातन ॥ ८४ ॥ तया नांव कल्पतरू ॥ प्रत्यक्ष जाणा औदुंबरू ॥ जें जें मनीं इच्छिती नरू ॥ साध्य होय परियेसा ॥ ८५ ॥ किती वर्णूं तेथील महिमा ॥ सांगतां अशक्य असे आम्हा ॥ श्रीगुरुसरस्वती नामा ॥ प्रख्यात असे परियेसा ॥ ८६ ॥ गंगाधराचा नंदन ॥ सांगे गुरुचरित्र विस्तारोन ॥ भक्तिपूर्वक ऐकती जे जन ॥ सकलाभीष्टें पावती ॥ ८७ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सदा श्रीगुरुचरणीं स्थिर ॥ उतरवी पैलपार ॥ इहसौख्य परगति ॥ ८८ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ गुरुमाहात्म्यपरमामृत ॥ विप्रपुत्र संजीवनामृत ॥ निरोपिलें असे येथें ॥ ८९ ॥ इति श्रीगुरुचरित्र-परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे बाल-संजीवनं नाम एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥ ओंवीसंख्या ॥ ८९ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागे सिद्धाचिया चरणां ॥ कर जोडोनियां जाणा ॥ विनवीतसे परियेसा ॥ १ ॥ जय जया जी योगीश्वरा ॥ शिष्यजनमनोहरा ॥ तूंची तारक भवसागरा ॥ अज्ञानतिमिरा ज्योती तूं ॥ २ ॥ तुझा चरणसंपर्कें[1] होतां ॥ झालें ज्ञान मज आतां ॥ परमार्थवासना तत्त्वतां ॥ झाली तुझे प्रसादें ॥ ३ ॥ दाखविली गुरूची सोय ॥ तेणें सकळ ज्ञान होय ॥ तूंचि तारक योगिराय ॥ परमपुरुषा सिद्धमुनी ॥ ४ ॥ गुरुचरित्रकामधेनु ॥ सांगितलें मज विस्तारोनू ॥ अद्यापि न धाय माझें मनू ॥ आणिक आवडी होतसे ॥ ५ ॥ मागें तुम्हीं निरोपिलें ॥ श्रीगुरु गाणगापुरीं आले ॥ पुढें कैसें वर्तलें ॥ विस्तारावें दातारा ॥ ६ ॥ ऐकोनि शिष्याचें वचन ॥ सांगे सिद्ध संतोषोन ॥ म्हणे शिष्या तूं सगुण ॥ गुरुकृपेचा बाळक ॥ ७ ॥ धन्य धन्य तुझें जीवन ॥

[1] पायाचें दर्शन.

धन्य धन्य तुझें मन ॥ होसी तूंची पूज्यमान ॥ या समस्त लोकांत ॥ ८ ॥ तुवां प्रश्न केलासी ॥ संतोष माझ्या मानसीं ॥ उल्हास होतो सांगावयासी ॥ गुरुचरित्रकामधेनु ॥९॥ पुढें वाढला अनंत महिमा ॥ सांगतां असे अनुपमा ॥ श्रीगुरु आले गाणगाभुवना ॥ राहिले संगमीं गुप्तरूपें ॥ १० ॥ भीमा उत्तरवाहिनीसी ॥ अमरजासंगमविशेषीं ॥ अश्वत्थ नारायण परियेसीं ॥ महावरद स्थान असे ॥ ११ ॥ अमरजा नदी थोर ॥ संगम झाला भीमातीर ॥ प्रयागासमान असे क्षेत्र ॥ अष्टतीर्थें असती तेथें ॥ १२ ॥ तया तीर्थांचें महिमान ॥ अपार असे आख्यान ॥ पुढें तुज विस्तारोन ॥ सांगेन ऐक शिष्योत्तमा ॥ १३ ॥ तया स्थानीं श्रीगुरुमूर्ति ॥ होती गौप्य अतिप्रीतीं ॥ तीर्थमहिमा करणें ख्याति ॥ भक्तजनतारणार्थ ॥ १४ ॥ समस्त तीर्थें श्रीगुरुचरणीं ॥ ऐसें बोलती वेदपुराणीं ॥ त्यासी कायसें तीर्थ गहनी ॥ प्रकाश करी क्षेत्रांसी ॥ १५ ॥ भक्तजनतारणार्थ ॥

तीर्थं हिंडे श्रीगुरुनाथ ॥ गौप्य होतीं कलियुगांत ॥ प्रगट केलीं गुरुनाथें ॥ १६ ॥ तेथील महिमा अनुक्रमेंसीं ॥ सांगों पुढें विस्तारेंसीं ॥ प्रकट केलीं श्रीगुरू कैसीं ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ १७ ॥ ऐसा संगम मनोहर ॥ तेथें वसती श्रीगुरुवर ॥ त्रिमूर्तींचा अवतार ॥ गौप्य होय कवणेंपरी ॥ १८ ॥ सहस्र किरणें सूर्यासी ॥ केवीं रहावेल गौप्येंसीं ॥ आपोआप प्रकाशी ॥ होय सहज गुण तयाचे ॥ १९ ॥ वसती रानीं संगमासी ॥ जाती नित्य भिक्षेसी ॥ तया गाणगापुरासी ॥ मध्यान्हकाळीं परियेसा ॥ २० ॥ तया ग्रामीं द्विजवर ॥ असती एकशत घर ॥ होतें पूर्वीं अग्रहार[1] ॥ वेदपाठक ब्राह्मण असती ॥ २१ ॥ तया स्थानीं विप्र एक ॥ राहत असे सुक्षीण देख ॥ भार्या त्याची पतिसेवक ॥ पतिव्रता-शिरोमणी ॥ २२ ॥ वर्तत असतां दरिद्रदोषी[2] ॥ असे एक वांझ महिषी ॥

१ राजाकडून इनाम मिळालेली जमीन. २ अतिशय भिकारी.

वेसण घातली तियेसी ॥ दंतहीन अतिवृद्ध ॥२३॥ नदीतीरीं मळियासी ॥ क्षारमृत्तिका वहावयासी ॥ नित्य द्रव्य देती त्यासी ॥ मृत्तिका क्षार वहावया ॥ २४ ॥ तेणें द्रव्यें वेरो घेती ॥ येणें रीतीं काळ क्रमिती ॥ श्रीगुरुनाथ अतिप्रीतीं ॥ येती भिक्षेसी त्याचे घरीं ॥२५॥ विप्र लोक निंदा करिती ॥ कैंचा आला यति म्हणती ॥ आम्ही ब्राह्मण असों श्रोती ॥ न ये भिक्षा आमुचे घरीं ॥ २६ ॥ नित्य आमुचे घरीं देखा ॥ विशेष अन्न अनेक शाका ॥ असें त्यजुनि यति ऐका ॥ जातो दरिद्रियाचे घरीं ॥ २७ ॥ ऐसें बोलती विप्र समस्त ॥ भक्तवत्सल श्रीगुरुनाथ ॥ प्रपंचरहित परमार्थ ॥ करणें असे आपुल्या मनीं ॥ २८ ॥ पाहें पां विदुराच्या घरां ॥ प्रीती कैसी शार्ङ्धरा ॥ दुर्योधनराजद्वारा ॥ कधीं न वंचे परियेसा ॥ २९ ॥ सात्त्विकबुद्धीं जे वर्तती ॥ श्रीगुरूची त्यांसी अतिप्रीति ॥

१ धान्य. २ वैदिक ( भिक्षुक ). ३ जाई.

इह सौख्य अपरा गति ॥ देतो आपल्या भक्तांसी ॥ ३० ॥ ऐसा कृपाळू परमपुरुष ॥ भक्तावरी प्रेम हर्ष ॥ त्यांसी दुर्बळ काय दोष ॥ रंका राज्य देऊं शके ॥ ३१ ॥ जरी कोपे एखाद्यासी ॥ भस्म करील परियेसीं ॥ वर देतां दरिद्रियासी ॥ राज्य होय क्षितीचें ॥ ३२ ॥ ब्रह्मदेवें आपुल्या करें ॥ लिहिलीं असती दुष्ट अक्षरें ॥ श्रीगुरुचरणसंपर्कें ॥ दुष्टाक्षरें तीं शुभ होतीं ॥ ३३ ॥ ऐसें ब्रीद श्रीगुरूचें ॥ वर्णूं न शके माझे वाचें ॥ थोर पुण्य त्या ब्राह्मणाचें ॥ श्रीगुरु जाती तया घरा ॥३४॥ वर्तत असतां एके दिवसीं ॥ न मिळे वरू त्या ब्राह्मणासी ॥ घरीं असे वांझ महिषी ॥ नेली नाहीं मृत्तिकेसी ॥ ३५ ॥ तया विप्रमंदिरासी ॥ श्रीगुरु आले भिक्षेसी ॥ महा उष्ण वैशाखमासीं ॥ माध्यान्हकाळीं परियेसा ॥ ३६ ॥ ऐसे श्रीगुरुकृपा-मूर्ति ॥ गेले द्विजगृहाप्रती ॥ विप्र गेला याचकवृत्ती ॥ वनिता त्याची घरीं असे ॥ ३७ ॥ भिक्षा म्हणतां श्रीगुरुनाथ ॥ पतिव्रता आली धांवत ॥

साष्टांगीं दंडवत ॥ करिती झाली तये वेळीं ॥ ३८ ॥ नमन करूनि श्री-
गुरूसी ॥ विनवीतसे भक्तींसीं ॥ आपला पती याचकवृत्तीसी ॥ गेला असे
अन्नधारा ॥ ३९ ॥ उत्कृष्ट धान्य घरीं बहुत ॥ घेवोनि येतील पती
त्वरित ॥ तंववरी स्वामी बैसा म्हणत ॥ पिढें घातलें बैसावया ॥ ४० ॥
श्रीगुरुमूर्तिं हास्यवदन ॥ बैसते झाले शुभासन ॥ तिये विप्रस्त्रियेसी वचन ॥
बोलती क्षीर कां वो न घालिसी ॥ ४१ ॥ तुझे द्वारीं असतां महिषी ॥
क्षीर कां वो न घालिसी भिक्षेसी ॥ आम्हांतें तूं कां चाळविसी ॥ नाहीं
वरू म्हणोनियां ॥ ४२ ॥ श्रीगुरुवचन ऐकोन ॥ विप्रवनिता करी नमन ॥
वांझ महिषी दंतहीन ॥ वृद्धत्व झालें तियेसी ॥ ४३ ॥ उपजतांची
आमुचे घरीं ॥ वांझ झाली दगडापरी ॥ गाभा न वांचे कवणेंपरी ॥ रेडा
म्हणोनि पोशितों ॥ ४४ ॥ याचि कारणें तियेसी ॥ वेसण घातली परि-
येसीं ॥ वाहताती मृत्तिकेसी ॥ तेणें आमुचा योगक्षेम ॥ ४५ ॥ श्रीगुरु



[ अ० २२ ] श्रीगुरुवचन । ऐकोन । विप्रवनिता जातां क्षणः । दुभली क्षीर संतोषोनः । भरणे दोन तये वेळीं ॥ ४८ ॥

म्हणती तियेसी ॥ मिथ्या बोलसी आम्हांसी ॥ त्वरित जावोनियां महिषीसी ॥ दुहूनि आणी क्षीर आम्हां ॥ ४६ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ विश्वास झाला तिचे मनीं ॥ काष्ठपात्र घेवोनि ॥ गेली ऐका दोहावया ॥ ४७ ॥ श्रीगुरुवचन ऐकोन ॥ विप्रवनिता जाता क्षण ॥ दुभली क्षीर संतोषोन ॥ भरणें दोन तये वेळीं ॥ ४८ ॥ विस्मय करी विप्रवनिता ॥ म्हणे ईश्वर हा तत्त्वतां ॥ याचें वाक्य परिसतां ॥ काय नवल म्हणतसे ॥ ४९ ॥ क्षीर घेवोनि घरांत ॥ आली पतिव्रता त्वरित ॥ तापविती झाली अग्नींत ॥ सवेंचि विनवी परियेसा ॥ ५० ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ घालीं हो क्षीर भिक्षेसी ॥ जाणें आम्हां स्वस्थानासी ॥ म्हणोनि निरोपिती तये वेळीं ॥ ५१ ॥ परिसोनि स्वामींचें वचन ॥ घेवोनि आली क्षीरभरण ॥ केलें गुरुनाथें प्राशन ॥ अतिसंतोषेंकरूनियां ॥ ५२ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ वर देती

१ लांकडाचें मांडें. २ मांडीं. ३ दुधानें भरलेलें मांडें.

अतिप्रीतीं ॥ तुझे घरीं अखंडिती ॥ लक्ष्मी राहे निरंतर ॥ ५३ ॥ पुत्र-
पौत्रीं श्रियायुक्त ॥ तुम्ही नांदाल निश्चित ॥ म्हणोनि निघाले त्वरित ॥
संगमस्थानासी आपुल्या ॥ ५४ ॥ श्रीगुरु गेले संगमासी ॥ आला विप्र
घरासी ॥ ऐकता झाला विस्तारेंसीं ॥ महिमा श्रीगुरुमूर्तीचा ॥ ५५ ॥
म्हणे अभिनव झालें थोर ॥ होईल ईश्वरी अवतार ॥ आमुच्या दृष्टीं दिसे
नर ॥ परमपुरुष तोचि सत्य ॥ ५६ ॥ विप्र म्हणे स्त्रियेस ॥ आमुचे गेले
दरिद्रदोष ॥ भेट जाहली श्रीगुरुविशेष ॥ सकळाभीष्टें साधलीं ॥ ५७ ॥
म्हणोनि मनीं निर्धार करिती ॥ भेटी जाऊं कैंचा यति ॥ हातीं घेवोनि
आरती ॥ गेले दंपती संगमासी ॥ ५८ ॥ भक्तिपूर्वक श्रीगुरूसी ॥ गंधा-
क्षताधूपदीपेंसीं ॥ नैवेद्यतांबूलप्रदक्षिणेंसीं ॥ पूजा करिती सद्भावें ॥ ५९ ॥
येणेंपरी द्विजवर ॥ लाधता जाहला जैसा वर ॥ कन्यापुत्र लक्ष्मी स्थिर ॥
पूर्ण आयुष्य झालें जाण ॥ ६० ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ श्रीगुरुकृपा

होय ज्यासी ॥ दैन्य कैसें त्या नरासी ॥ अष्टैश्वर्यें भोगीतसे ॥ ६१ ॥ म्हणे सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकता होय मनोहर ॥ दैन्यावेगळा होय त्वरित ॥ ६२ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ वंध्या महिषी दुग्ध देत ॥ निश्चयाचे बळें सत्य ॥ भाग्य आलें विप्रासी ॥ ६३ ॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे वंध्यामहिषीदोहनं नामद्वाविंशोऽध्यायः॥२२॥ओंवीसंख्या॥६३॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ विनवी शिष्य नामांकित ॥ सिद्ध योगीयातें पुसत ॥ पुढील कथा विस्तारत ॥ निरोपावी दातारा ॥ १ ॥ सिद्ध म्हणे ऐक बाळा ॥ श्रीगुरूची अगम्य लीला ॥ तोचि विप्रें प्रकट केला ॥ जेणें वांझ महिषी दुभिली ॥ २ ॥ तया ग्रामीं येरे दिवसीं ॥ क्षारमृत्तिका वहावयासी ॥ मागों आले तया महिषीसी ॥ द्रव्य देऊं म्हणताती ॥ ३ ॥ विप्र म्हणे तयासी ॥ नेदूं दुभते महिषीसी ॥ दावीतसे सकळिकांसी ॥ क्षीरभरणें दोनी केलीं ॥ ४ ॥ करिती विस्मय सकळ जन ॥ म्हणती वांझ दंतहीन ॥ काल होती नाकीं खूण ॥ वेसणरज्जू[1] अभिनव ॥ ५ ॥ नव्हती गर्भिणी वांझ महिषी ॥ वत्स न होतां दुभे कैसी ॥ वार्ता फांकली विस्तारेंसीं ॥ कळली तया ग्रामाधिपतीस ॥ ६ ॥ विस्मय करुनी तये वेळीं ॥ आला अधिपती तयाजवळी ॥ नमोनियां चरणकमळीं ॥ पुसतसे वृत्तांत ॥ ७ ॥ विप्र म्हणे

[1] दोरी.

तयासी ॥ असे संगमीं संन्यासी ॥ त्याची महिमा आहे ऐशी ॥ होईल ईश्वर-अवतार ॥ ८ ॥ नित्य आमुच्या मंदिरासी ॥ येती श्रीगुरु भिक्षेसी ॥ वरो नव्हती त्या दिवशीं ॥ क्षीर आपण मागितलें ॥ ९ ॥ वांझ म्हणतां रागावोनि ॥ त्वरें क्षीर दोहा म्हणोनि ॥ वाक्य त्याचें निघतां क्षणीं ॥ कामधेनूपरी जाहली ॥ १० ॥ विप्रवचन परिसोनि ॥ गेला राजा धांवोनि ॥ सर्व दळ श्रृंगारोनि ॥ आपुले पुत्रकलत्रांसहित ॥ ११ ॥ लोटांगणें श्रीगुरूसी ॥ घाली राजा भक्तींसीं ॥ नमन केलें साष्टांगेंसीं ॥ एका भावेंकरोनियां ॥ १२ ॥ जय जया जी जगद्गुरू ॥ त्रयमूर्तींचा अवतारू ॥ तुझा महिमा अपरंपारू ॥ अशक्य आम्हां वर्णितां ॥ १३ ॥ नेणों आम्ही मंद-मति ॥ मायामोहअंधवृत्ति ॥ तूं तारक जगज्ज्योती ॥ उद्धरावें आम्हांतें ॥ १४ ॥ अविद्यामायासागरीं[1] ॥ बुडालों असों घोर दरीं ॥ विश्वकर्ता तारीं तारीं ॥

१ अविचारूपी अज्ञानसागरांत.

म्हणोनि चरणीं लागला ॥ १५ ॥ विश्वकर्ता तूंचि होसी ॥ हेलामात्रें[1] सृष्टि रचिसी ॥ आम्हा तूं दिसतोसी ॥ मनुष्यरूप धरोनि ॥ १६ ॥ वर्णावया तुझा महिमा ॥ स्तोत्र करितां अशक्य आम्हां ॥ तूंची रक्षिता केशव्योमा[2] ॥ चिन्मयात्मा जगद्गुरु ॥ १७ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ स्तोत्र करी तो बहु-वसीं ॥ श्रीगुरुमूर्ति संतोषीं ॥ आश्वासिती तये वेळीं ॥ १८ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ तया रायातें पुसती ॥ आम्ही तापसी असों यति ॥ अर-ण्यवास करितसों ॥ १९ ॥ या कारणें आम्हांपासीं ॥ येणें तुम्हां संभ्र-मेंसीं ॥ पुत्रकलत्रसहितेसीं ॥ कवण कारण सांग म्हणती ॥ २० ॥ ऐको-नियां श्रीगुरूचें वचन ॥ राजा विनवी कर जोडून ॥ तूं तारक भक्तजन ॥ अरण्यवास कायसा ॥ २१ ॥ उद्धरावया भक्तजनां ॥ अवतरलासी नारा-यणा ॥ वासना जैसी भक्तजना ॥ संतुष्टावें तेणेंपरी ॥ २२ ॥ ऐशी तुझी

१ सहज लीलेनें. २ शंकर.

श्रीदख्याति ॥ वेदपुराणीं वाखाणिती ॥ भक्तवत्सला श्रीगुरुमूर्ती ॥ विनंती माझी परिसावी ॥ २३ ॥ गाणगापुर महास्थान ॥ स्वामी करावें पावन ॥ नित्य तेथें अनुष्ठान ॥ वास करणें ग्रामांत ॥ २४ ॥ मठ करोनि तये स्थानीं ॥ असावें आम्हां उद्धरोनि ॥ म्हणोनि लागे श्रीगुरुचरणीं ॥ भक्तिपूर्वक नरेश्वर ॥ २५ ॥ श्रीगुरु मनीं विचारिती ॥ प्रगट होणें आली गति ॥ कंचित्काळ येणें रीतीं ॥ वसणें घडे त्या स्थानीं ॥ २६ ॥ भक्तजनतारणार्थ ॥ अवतार धरिती श्रीगुरुनाथ ॥ राजयाचे मनोरथ ॥ पुरवूं म्हणती तये वेळीं ॥ २७ ॥ ऐसें विचारोनि मानसीं ॥ निरोप देती नराधिपासी ॥ जैसी तुझ्या मानसीं ॥ भक्ति असे तैसें करीं ॥ २८ ॥ गुरुवचन ऐकोनि ॥ संतोषोनि नृप मुनी ॥ बैसवोनिया सुखासनीं ॥ समारंभें निघाला ॥ २९ ॥ नानापरींचीं वाद्यें यंत्रें ॥ गीतवाद्यमंगळतुरें ॥ मृदंग टाळ निर्भरें ॥ वाजताती मनोहर ॥ ३० ॥ राव निघे छत्रपताकेंसीं ॥ गजतुरंगश्रृंगारेंसीं ॥



[अ० २३ ] श्रीगुरुमूर्ति तये वेळीं । आले तया वृक्षाजवळीं । ब्रह्मराक्षस तात्काळीं । येवोनि चरणीं लागला ॥ ३८ ॥

आपुले पुत्रकलत्रेंसीं ॥ सर्वे यतीसी घेवोनि ॥ ३१ ॥ वेदघोष द्विजवरी ॥ करिताती नानापरी ॥ वाखाणिती बंदिकारी ॥ ब्रीद तया मूर्तीचें ॥ ३२ ॥ येणेंपरी ग्रामाप्रती ॥ श्रीगुरु आले अतिप्रीतीं ॥ अनेकपरी आरती ॥ घेउनी आले नगरलोक ॥ ३३ ॥ ऐसा समारंभ थोर ॥ करिता झाला नरेश्वर ॥ संतोषोनि श्रीगुरुवर ॥ प्रवेशले नगरांत ॥ ३४ ॥ तया ग्राम-पश्चिमदेशीं ॥ असे अश्वत्थ उन्नतेसी ॥ ओस गृह तयापासीं ॥ असे एक भयंकर ॥ ३५ ॥ तया वृक्षावरी एक ॥ ब्रह्मराक्षस भयानक ॥ त्याचे भयें असे धाक ॥ समस्त प्राण्यां भय त्याचें ॥ ३६ ॥ ब्रह्मराक्षस महाक्रूर ॥ मनुष्यमात्रां करी आहार ॥ त्याचें भय असे थोर ॥ म्हणोनि गृह ओस तेथें ॥ ३७ ॥ श्रीगुरुमूर्ति तये वेळीं ॥ आले तया वृक्षाजवळी ॥ ब्रह्मराक्षस तात्काळीं ॥ येवोनि चरणीं लागला ॥ ३८ ॥ कर जोडूनि श्रीगुरूसी ॥ विनवीतसे भक्तींसीं ॥ स्वामी मातें तारियेसी ॥ घोरांदरीं बुडालों ॥ ३९ ॥

तुझ्या दर्शनमात्रेंसीं ॥ नासलीं पापें पूर्वार्जितेंसीं ॥ तूं कृपाळू सर्वांसी ॥ उद्धरावें आपणातें ॥ ४० ॥ कृपाळू ते श्रीगुरु ॥ मस्तकीं ठेविती करू ॥ मनुष्यरूपें होवोनि येरू ॥ लोळतसे चरणकमळीं ॥ ४१ ॥ श्रीगुरु सांगती तयासी ॥ त्वरित जावें संगमासी ॥ स्नान करितां मुक्त होसी ॥ पुनरावृत्ति नाहीं तुज ॥ ४२ ॥ गुरुवचन ऐकोन ॥ राक्षस करी संगमीं स्नान ॥ कलेवरा सोडूनि जाण ॥ मुक्त झाला तत्क्षणीं ॥ ४३ ॥ विस्मय करिती सकळ लोक ॥ म्हणती होईल मूर्ति येक ॥ हरी अज पिनाक ॥ हाचि सत्य मानिजे ॥ ४४ ॥ श्रीगुरु राहिले तया स्थानीं ॥ मठ केला शृंगारोनि ॥ नराधिपशिरोमणी ॥ भक्तिभावें पूजीतसे ॥ ४५ ॥ भक्तिभावें नरेश्वर ॥ पूजा अर्पी अपरंपार ॥ परोपरी वाद्यगजर ॥ गीतवाद्यमंत्रेंसीं ॥ ४६ ॥ श्रीगुरु नित्य संगमासी ॥ जाती नित्य अनुष्ठानासी ॥ नराधीश भक्तींसीं ॥ सैन्यासहित आपण जाय ॥ ४७ ॥ एखाद्या समयीं श्रीगुरूसी ॥ बैसविती

आपुल्या आंदोलिकेसी ॥ सर्व दळ सैन्येंसीं ॥ घेवोनि जाय वनांतरा ॥ ४८ ॥
माध्यान्हकाळीं परियेसीं ॥ श्रीगुरु येती मठासी ॥ सैन्यासहित आनंदेंसीं ॥
नमन करी नराधिप ॥ ४९ ॥ भक्तवत्सल श्रीगुरुमूर्ति ॥ भक्ताधीन आपण
असती ॥ जैसा संतोष त्याच्या चित्तीं ॥ तेणेंपरी राहाटती ॥ ५० ॥ समा-
रंभ होय नित्य ॥ ऐकती लोक समस्त ॥ प्रगट झाले लोकांत ॥ ग्रामांतरीं
सकळजनीं ॥ ५१ ॥ कुमशी म्हणिजे ग्रामासी ॥ होता एक तापसी ॥
त्रिविक्रमभारती नामेंसीं ॥ तीन वेद जाणतसे ॥ ५२ ॥ मानसपूजा नित्य
करी ॥ सदा ध्यायी नरहरी ॥ त्याणें ऐकिलें गाणगापुरीं ॥ असे नरसिंह-
सरस्वती ॥ ५३ ॥ ऐकतां त्याची चरित्रलीला ॥ मनीं म्हणे दांभिक कळा ॥
हा काय खेळ चतुर्थाश्रमाला ॥ म्हणोनि निंदा आरंभिली ॥ ५४ ॥ ज्ञान-
मूर्ति श्रीगुरुनाथ ॥ सर्वांच्या मनींचें जाणत ॥ यतीश्वर निंदा आपुली
करित ॥ म्हणोनि ओळखिलें मनांत ॥ ५५ ॥ सिद्ध म्हणे नामांकिता ॥

पुढें अपूर्व असे कथा ॥ मन करोनि निर्मळता ॥ एकचित्तें परिस तूं ॥ ५६ ॥
म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥
सकळाभीष्ट पाविजे ॥ ५७ ॥ इति श्रीगुरुचरित्र ॥ गाणगापुरीं पवित्र ॥
ब्रह्मराक्षसा परत्र ॥ निजमोक्ष दीधला ॥ ५८ ॥ इति श्रीगुरुचरित्रे नृसिंहसर-
स्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे राक्षसमुक्तकरणं नाम त्रयोविंशोऽध्यायः
॥ २३ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ ५८ ॥ ॥छ॥ ॥छ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व वर्तलें देखा ॥ विस्तारें कथाकौतुका ॥ निरोपीन तुज आतां ॥ १ ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ निरोपावी दातारा ॥ २ ॥ शिष्यवचन परिसोनि ॥ सांगता झाला सिद्ध मुनि ॥ ऐक तूं वत्सा नामकरणी ॥ गुरुचरित्र अभिनव ॥ ३ ॥ ऐसा त्रिविक्रम महामुनि ॥ जो कां होता कुमशीस्थानीं ॥ निंदा करी सर्व जनीं ॥ दांभिक संन्यासी म्हणोनि ॥ ४ ॥ ज्ञानवंत श्रीगुरुमूर्ति ॥ विश्वाच्या मनींचें ओळखती ॥ नराधिपासी सांगती ॥ निंदा करितो म्हणोनि ॥ ५ ॥ श्रीगुरु म्हणती तये वेळीं ॥ आजची निघावें तात्काळीं ॥ त्रिविक्रमभारतीजवळी ॥ जाणें असे कुमशीस ॥ ६ ॥ ऐकोनि राजा[1] संतोषला ॥ नानालंकार करिता जाहला ॥ हत्ती अश्वपायदळा ॥ शृंगार केला तये वेळीं ॥ ७ ॥ समारंभ

१ राजास.

केला थोरू ॥ आंदोळीं बैसले श्रीगुरु ॥ नानापरी वाद्यगजरू ॥ करूनियां निघाले ॥ ८ ॥ ऐसेंपरी श्रीगुरुमूर्ति ॥ तया कुमशी ग्रामा येती ॥ त्रिविक्रमभारती ॥ करित होता मानसपूजा ॥ ९ ॥ मानसपूजा नरहरीसी ॥ नित्य करी भावेंसीं ॥ स्थिर न होय तया दिवसीं ॥ मानसमूर्ति नरकेसरी ॥ १० ॥ मनीं चिंता करी यति ॥ कां पां न ये मूर्ति चित्तीं ॥ वृथा झाली तपोवृत्ति ॥ काय कारण म्हणतसे ॥ ११ ॥ बहूत काळ आराधिलें ॥ कां पां नरसिंहें उपेक्षिलें ॥ तपफळ वृथा गेलें ॥ म्हणोनि चिंता करितसे ॥ १२ ॥ इतुकें होतां त्या अवसरीं ॥ श्रीगुरूतें देखिलें दुरी ॥ येत होते नदीतीरीं ॥ मानसपूजेच्या मूर्तिरूपें ॥ १३ ॥ सर्व दळ दंडधारी ॥ तयांत एकरूप हरी ॥ भारती देखोनि विस्मय करी ॥ नमन करीत निघाला ॥ १४ ॥ साष्टांग नमन करोनि ॥ जावोनि लागे श्रीगुरुचरणीं ॥ सर्वची रूपें झाला प्राणी॥

दंडधारी यतिरूप ॥ १५ ॥ समस्तरूप एकसरी ॥ दिसताती दंडधारी ॥ कवण लघु कवण थोरी ॥ न कळे तया त्रिविक्रमा ॥ १६ ॥ भ्रांत झाला तये वेळीं ॥ पुनरपि लागे चरणकमळीं ॥ ब्रह्मा विष्णु चंद्रमौळी ॥ त्रिमूर्ति तूं जगद्गुरु ॥ १७ ॥ तुझें न कळे स्वरूपज्ञान ॥ अविद्यामाया वेष्टोन ॥ निजरूप होऊन ॥ कृपा करणें दातारा ॥ १८ ॥ तुझें स्वरूप अवलोकितां ॥ आम्हां अशक्य गुरुनाथा ॥ चर्मचक्षूकरूनि आतां ॥ पाहूं न शकें म्हणतसे ॥ १९ ॥ तूं व्यापक सर्वां भूतीं ॥ नरसिंहमूर्ति झालासी यति ॥ प्रगट नरसिंह सरस्वती ॥ समस्त दिसती यतिरूप ॥ २० ॥ नमूं आतां सांग कवणा ॥ कवणापुढें दाखवूं करुणा ॥ त्रिमूर्ति तूं ओळखसी खुणा ॥ निज-रूपें रहावें स्वामिया ॥ २१ ॥ तप केलें बहुत दिवस ॥ पूजा केली तुझी मानस ॥ आजि आली गा फळास ॥ मूर्ति साक्षात भेटली ॥ २२ ॥ तूं तारक विश्वासी ॥ उद्धराया आम्हांसी ॥ म्हणोनि भूमीं अवतरलासी ॥

दावीं स्वरूप चिन्मय ॥ २३ ॥ ऐसेंपरी श्रीगुरूसी ॥ स्तुति केली भक्तींसीं ॥
श्रीगुरुमूर्ति संतोषी ॥ झाली निजमूर्ति एक ॥ २४ ॥ व्यक्त पाहे तये
वेळीं ॥ दिसों लागलें सैन्य सकळी ॥ तयामध्यें चंद्रमौळी ॥ दिसे श्रीगुरु
भक्तवरद ॥ २५ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ नित्य आमुची निंदा करिसी ॥
दांभिक[1] नांवें आम्हांसी ॥ पाचारिसी[2] मंदमती ॥ २६ ॥ या कारणें तुज-
पासीं ॥ आलों तुझ्या परीक्षेसी ॥ पूजा करिसी तूं मानसीं ॥ श्रीनृसिंह-
मूर्तीची ॥ २७ ॥ दांभिक म्हणजे कवण परी ॥ सांग आतां विस्तारीं ॥
तुझे मनीं वसे हरी ॥ तोचि तुज निरोपी ॥ २८ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें
वचन ॥ यतीश्वर करी नमन ॥ सद्गुरु स्वामी कृपा करून ॥ अविद्यारूप
नासावें ॥ २९ ॥ तूं तारक विश्वासी ॥ त्रयमूर्ति-अवतार तूंचि होसी ॥
मी वेष्टोन मायापाशीं ॥ अज्ञानपणें वर्ततों ॥ ३० ॥ मायामोह-अंधकारीं ॥

१ ढोंगी. २ बोलावितोस.




[ अ० २४ ] ऐकोनि श्रीगुरुचें वचन । यतीश्वर करी नमन । सद्गुरुस्वामी कृपा करून । अविद्यारूप नासावें ॥ २९ ॥

बुडालों अज्ञानसागरीं ॥ न ओळखें परमार्थ विचारीं ॥ दिवांध झालों स्वामिया ॥ ३१ ॥ ज्योतिःस्वरूप तू प्रकाशी ॥ स्वामी मातें भेटलासी ॥ क्षमा करावी बाळकासी ॥ उद्धारावें दातारा ॥ ३२ ॥ अविद्यारूप-समुद्रांत ॥ होतां आपण वहात ॥ न दिसे पैल अंत ॥ बुडतसों स्वामिया ॥ ३३ ॥ ज्ञानतारवीं बैसवोनि ॥ करुणावायु प्रेरूनि ॥ पैलथडीं निज-स्थानीं ॥ पाववीं स्वामी कृपासिंधू ॥ ३४ ॥ तुझी कृपा होय ज्यासी ॥ दुःखदैन्य कैंचें त्यासी ॥ तोचि जिंकील कळिकाळासी ॥ परमार्थी ऐक्य होय ॥ ३५ ॥ पूर्वीं कथा ऐकिली श्रवणीं ॥ महाभारत पुराणीं ॥ दाविलें रूप[1] अर्जुना नयनीं ॥ प्रसन्न होवोनि तयासी ॥ ३६ ॥ तसें तुम्हीं मजला आज ॥ दाविलें स्वरूप निज ॥ अनंत महिमा तुझी चोज ॥ भक्तवत्सला गुरुनाथा ॥ ३७ ॥ जय जया जी जगद्गुरु ॥ तूं तारक भवसागरू ॥ त्रय-

१ विराटरूप.

मूर्तीचा अवतारू ॥ नरसिंहसरस्वती ॥ ३८ ॥ कृतार्थ झालों जी आपण ॥ देखिले आजि तुमचे चरण ॥ न करितां प्रयत्न ॥ भेटला रत्नचिंतामणी ॥ ३९ ॥ जैसी गंगा सगरांवरी ॥ कडें केलें भवसागरीं ॥ जैसा विष्णु विदुराघरीं ॥ आला आपण कृपावंत ॥ ४० ॥ भक्तवत्सला तुझी कीर्ति ॥ आम्हां दाविली प्रचीति ॥ वर्णावया नाहीं मति ॥ अनंतमहिमा जगद्गुरू ॥ ४१ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ करी स्तोत्र बहुवसी ॥ श्रीगुरुमूर्तीं संतोषीं ॥ दिधला वर तये वेळीं ॥ ४२ ॥ वर दे तो त्रिविक्रमासी ॥ तुष्टलों तुझ्या भक्तींसीं ॥ सद्गति होय भरंवसीं ॥ पुनरावृत्ति[1] नाहीं तुज ॥ ४३ ॥ तुज साधला परमार्थ ॥ होईल ईश्वरी ऐक्यार्थ ॥ ऐसें म्हणोनि गुरुनाथ ॥ निघाले आपुल्या निजस्थाना ॥ ४४ ॥ वर देवोनि भारतीसी ॥ राहविलें तेथें कुमशीसी ॥ क्षण न लागतां परियेसीं ॥ आले गाणगापुरासी ॥ ४५ ॥ सिद्ध म्हणे

१ जन्म. २ पुनर्जन्म.

नामधारका ॥ श्रीगुरुमहिमा ऐसा निका ॥ त्रिमूर्ति तोचि ऐका ॥ नररूपें वर्ततसे ॥ ४६ ॥ ऐसा परमपुरुष गुरु ॥ त्यातें जे कोणी म्हणती नरू ॥ तेचि पावती यमपुरू ॥ सप्तजन्मपर्यंत ॥ ४७ ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु ॥ गुरुचि होय गिरिजारमणू ॥ वेदशास्त्रपुराणू ॥ बोलती हे प्रसिद्ध ॥ ४८ ॥ या कारणें श्रीगुरूसी ॥ शरण जावें निश्चयेंसीं ॥ विश्वासावें माझ्या बोलासी ॥ लीन व्हावें श्रीगुरुचरणीं ॥ ४९ ॥ अमृताची आरवटी ॥ घातली असे गोमटी ॥ ज्ञानी जन प्राशिती घोटीं ॥ गुरुचरित्रकामधेनु ॥ ५० ॥ गंगाधराचा नंदन ॥ सांगे गुरुचरित्र विस्तारोन ॥ भक्तिपूर्वक ऐकती जन ॥ लाधती पुरुषार्थ चतुर्विध ॥ ५१ ॥ इति श्रीगुरुचरित्र-परमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे त्रिविक्रमभारतीविश्वरूपदर्शनं नाम चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥ ओंवी-संख्या ॥ ५१ ॥ ॥ ७ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ जय जया जी सिद्धमुनी ॥ तूंचि गुरुशिरोमणी ॥ साक्षी येतसे अंतःकरणीं ॥ बोलिला मातें परमार्थ ॥ १ ॥ ऐसा कृपाळू परमेश्वर ॥ आपण झाला अवतार ॥ येरां दिसतसे नर ॥ तेचि अज्ञानी प्रत्यक्ष ॥ २ ॥ तया त्रिविक्रमभारतीसी ॥ दाविलें रूप प्रत्यक्षेंसीं ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ निरोपावी दातारा ॥ ३ ॥ सिद्ध म्हणे ऐक बाळा ॥ श्रीगुरूची अगम्य लीला ॥ सांगतां न सरे बहुकाळा ॥ साधारण मी सांगतसें ॥ ४ ॥ समस्त लीला सांगतां ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ या कारणें किंचिता ॥ निरोपीतसें बाळका ॥ ५ ॥ पुढें अपूर्व वर्तलें एक ॥ ऐक शिष्या नामधारक ॥ विदुरा नामें नगर एक ॥ होता राजा यवन तेथें ॥ ६ ॥ महाक्रूर ब्रह्मद्वेषी ॥ सदा करी जीवहिंसी ॥ चर्चा करवी ब्राह्मणांसी ॥ वेद म्हणवी आपणापुढें ॥ ७ ॥ विप्रांसी म्हणे यवन ॥ जे कां

१ न कळण्याजोगी. २ पोर्डीशी. ३ वाद.

असती विद्वज्जन ॥ आपुल्या सभेंत येऊन ॥ वेद सर्व म्हणावे ॥ ८ ॥
त्यांतें द्रव्य देईन बहुत ॥ सर्वांमध्यें मान्यवंत ॥ जो कां सांगेल वेदार्थ ॥
विशेष त्याची पूजा करूं ॥ ९ ॥ ऐसें ऐकूनि ज्ञानी. जन ॥ नेणों म्हणती
वेद आपण ॥ जे कां असती मतिहीन ॥ कांक्षा करिती द्रव्याची ॥ १० ॥
जावोनियां म्लेंच्छापुढें ॥ वेदशास्त्र वाचिती गाढें ॥ म्लेंच्छ मनीं असे कुडें ॥
ऐके अर्थ यज्ञकांडाचा ॥ ११ ॥ म्हणे विप्र यज्ञ करिती ॥ पशुहत्या करणें रीती ॥
आम्हां म्लेंच्छांतें निंदिती ॥ पशु वधिती म्हणोनियां ॥ १२ ॥ येणेंपरी
ब्राह्मणांसी ॥ निंदा करी बहुवसीं ॥ योग्यता पाहून द्विजवरांशीं ॥ अपार
द्रव्य देतसे ॥ १३ ॥ येणेंपरी तो यवन ॥ देतो द्रव्य म्हणोन ॥ ऐकते
झाले सकळ जन ॥ देशोदेशीं विप्रवर्ग ॥ १४ ॥ वेदशास्त्रीं निपुण ॥ द्रव्या-
वरी ठेवुनी मन ॥ भेटीसी जाती ब्राह्मण ॥ वेद म्हणती यवनापुढें ॥ १५ ॥

ऐसे मंदमति विप्र ॥ त्यांची जोडी यमपुर ॥ मदोन्मत्त दुराचार ॥ तेच इष्ट कलीचे ॥ १६ ॥ येणेंपरी वर्तमानीं ॥ वर्तत असतां एके दिनीं ॥ मंदभाग्य विप्र दोनी ॥ येवोनि भेटले राया ॥ १७ ॥ वेदशास्त्र अभिज्ञाती ॥ तीन वेद जाणों म्हणती ॥ तया यवनापुढें कीर्ति ॥ आपली आपण सांगती ॥ १८ ॥ विप्र म्हणती रायासी ॥ कोणी नाहीं आम्हांसरसी ॥ वाद करावया वेदांसी ॥ नसती चारी राष्ट्रांत ॥ १९ ॥ असती जरी तुझ्या नगरीं ॥ त्वरित येथें पाचारीं ॥ आम्हांसवें वेद चारी ॥ चर्चा करावी द्विजांनीं ॥ २० ॥ विप्रवचन ऐकोनि ॥ राजा पडला अभिमानीं ॥ आपुल्या नगरचे विप्र आणोनि ॥ समस्तांतें पुसे तो ॥ २१ ॥ राजा म्हणे समस्तांसी ॥ चर्चा करावी तुम्हीं यांसीं ॥ जे जिंकिती तर्केसीं ॥ त्यांसी अपार द्रव्य देऊं म्हणे ॥ २२ ॥ ऐकोनियां ज्ञानी जन ॥ म्हणती म्लेंच्छालागून ॥ आम्हां योग्यता नाहीं जाण ॥ या ब्राह्म-

णांतें केवीं जिंकूं ॥ २३ ॥ आम्हांमध्यें हेचि श्रेष्ठ ॥ विप्र दोघे महासुभट ॥ यांतें करोनि प्रगट ॥ मान द्यावा महाराज ॥ २४ ॥ ऐसें म्हणती द्विज समस्त ॥ ऐकोनि राजा मान देत ॥ वस्त्रें भूषणें देई विचित्र ॥ गजावरी आरूढविले ॥ २५ ॥ आरूढवोनि हस्तीवरी ॥ मिरवा म्हणे आपुल्या नगरीं ॥ नाहीं विप्र यांचे सरी ॥ हेचि राजे विप्रांचे ॥ २६ ॥ आपण राजा यवनांसी ॥ हे दुजे राजे द्विजांसी ॥ ऐसे भूसुर[1] तामसी ॥ म्लेंच्छापुढें वेद म्हणती ॥ २७ ॥ महातामसी ते ब्राह्मण ॥ द्विजांतें करूनियां दूषण ॥ राजे म्हणविती आपण ॥ तया यवनराज्यांत ॥ २८ ॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ विप्र मदांधें व्यापूनि ॥ राजापुढें जावोनि ॥ विनविताती परियेसा ॥ २९ ॥ विप्र म्हणती रायासी ॥ आम्हां योग्यता बहुवसी ॥ न मिळे एखादा वादासी ॥ वृथा झालें शिकोनियां ॥ ३० ॥

१ ब्राह्मण.

आमुचे मनीं बहु आर्ता ॥ करणें वाद वेदशास्त्रीं ॥ निरोप देईं जाऊं आतां ॥ विचारूं तुझ्या राष्ट्रांत ॥ ३१ ॥ जरी मिळेल एखादा नरू ॥ तयासवें चर्चा करूं ॥ न मिळे तैसा द्विजवरू ॥ जयपत्र घेऊं ब्राह्मणांचें ॥ ३२ ॥ राजा म्हणे तयांसी ॥ जावें राष्ट्रीं त्वरितेंसी ॥ पराभवावें ब्राह्मणांसी ॥ म्हणोनि निरोप देता झाला ॥ ३३ ॥ यवनाचे आज्ञेसीं ॥ निघाले द्विजवर तामसी ॥ पर्यटन करितां राज्यासी ॥ गांवोगांवीं विचारिती ॥ ३४ ॥ गांवोगांवीं हिंडती ॥ जयपत्रें लिहून घेती ॥ ऐसी कवणा असे शक्ति ॥ तयांसन्मुख उभें रहावें ॥ ३५ ॥ समस्त नगरें हिंडत ॥ पुढें गेले दक्षिणपंथ ॥ भीमातीरीं असे विख्यात ॥ कुमशी ग्राम उत्तम ॥ ३६ ॥ तेथें होता महामुनि ॥ त्रिविक्रमभारती म्हणुनी ॥ त्यासी येती वेद तिन्ही ॥ अनेकशास्त्रीं अभिज्ञ तो ॥ ३७ ॥ महामुनि कीर्तिमंत ॥ म्हणोनि

सांगती जन समस्त ॥ ऐकती द्विज मदोन्मत्त ॥ गेले तया मुनीपासीं ॥ ३८ ॥ जावोनि म्हणती तयासी ॥ त्रिवेदी ऐसें म्हणविसी ॥ चर्चा करावी आम्हांसी ॥ अथवा द्यावें हारिपत्र ॥ ३९ ॥ विप्रवचन ऐकोनि ॥ म्हणतसे त्रिविक्रममुनि ॥ आम्ही नेणों वेद तिन्ही ॥ अथवा न ये वेद एक ॥ ४० ॥ जरी जाणों वेदशास्त्र ॥ तरी कां होतों अरण्यपात्र ॥ वंदन करिते राजे सर्वत्र ॥ तुम्हांसारखे भोग करितों ॥ ४१ ॥ नेणों म्हणोनि अरण्यवासी ॥ वेष घेतला मीं संन्यासी ॥ आम्ही भिक्षुक तापसी ॥ तुम्हांसमान नव्हे जाणा ॥ ४२ ॥ हारीं अथवा जिंतून ॥ नाहीं तयाचा अभिमान ॥ तुम्ही उत्कृष्ट विद्वज्जन ॥ आम्हांसवें काय वाद ॥४३॥ ऐकोनि मुनीचें वचन ॥ तवेका आले ते ब्राह्मण ॥ आम्हांसवें वाद करण ॥ घाली ऐसा त्रिभुवनीं ॥ ४४ ॥ हिंडत आलों अवघें राष्ट्र ॥

१ हरलों असा लेख. २ रागास.

आम्हांसमान नाहीं नर ॥ म्हणोनि दाखविती जयपत्र ॥ असंख्यात परि-
येसा ॥ ४५ ॥ येणेंपरी आपणांसी ॥ जयपत्र द्यावें विशेषीं ॥ अभिमान
असल्या मानसीं ॥ करीं वाद म्हणताती ॥ ४६ ॥ अनेकपरी ब्राह्म-
णांसी ॥ सांगे मुनि विनयेंसीं ॥ ऐकती ना द्विज महाद्वेषी ॥ मागती
जयपत्र आपुलें ॥ ४७ ॥ त्रिविक्रम महामुनि ॥ आपुले विचारी अंतः-
करणीं ॥ यांतें न्यावें गाणगाभुवनीं ॥ शिक्षा करणें द्विजांतें ॥ ४८ ॥
विप्र मदांधें व्यापिले ॥ अनेक ब्राह्मण धिक्कारिले ॥ त्यांतें करणें उपाय
भले ॥ म्हणोनि योजिलें मनांत ॥ ४९ ॥ त्रिविक्रम म्हणे विप्रांसी ॥ चला
गाणगाभुवनासी ॥ तेथें देईन तुम्हांसी ॥ जयपत्र विस्तारें ॥ ५० ॥ तेथें
असती आपुले गुरु ॥ तयांपुढें पत्र देईन निर्धारू ॥ अथवा तुमच्या
मनींचा भारू ॥ शमन करूं म्हणे देखा ॥ ५१ ॥ ऐशी निगुती करूनि ॥

१ ओझें. २ युक्ति.

निघाला त्रिविक्रम महामुनि ॥ सवें येती विप्र दोनी ॥ आंदोलिकें बैसोनियां ॥ ५२ ॥ मूढ ब्राह्मण अज्ञानी ॥ यतीश्वरा चालवोनि ॥ आपण बैसले सुखासनीं ॥ म्हणोनि अल्पायुषी झाले ॥ ५३ ॥ पावले तया गाणगापुरा ॥ जें कां स्थान गुरुवरा ॥ रम्य स्थान भीमातीरां ॥ वास नरसिंहसरस्वती ॥ ५४ ॥ नमन करूनि श्रीगुरूसी ॥ विनवी मुनि भक्तींसीं ॥ कृपामूर्ति व्योमकेशी ॥ भक्तवत्सला परमपुरुषा ॥ ५५ ॥ जय जया जी जगद्गुरू ॥ निर्गुण तूंचि निर्विकारू ॥ त्रयमूर्तींचा अवतारू ॥ अनाथांचा रक्षक ॥ ५६ ॥ दर्शन होतां तुझे चरण ॥ उद्धरे संसारा भवार्ण ॥ नेणती मूढ अज्ञानजन ॥ अधोगतीचे ते इष्ट ॥ ५७ ॥ सद्गदित कंठ झाला ॥ रोमांच अंगीं उठला ॥ नेत्रीं बाष्प आनंद झाला ॥ माथा ठेवी चरणांवरी ॥ ५८ ॥ नमन करितांचि मुनीश्वरातें ॥ उठविलें श्रीगुरु-

१ पालखींत.

नाथें ॥ आलिंगोनि करुणावक्कें ॥ पुसताती वृत्तांत ॥ ५९ ॥ श्रीगुरु पुसती त्रिविक्रमासी ॥ आलेंत कवणे कार्यासी ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ निरोपावें मुनिवरा ॥ ६० ॥ श्रीगुरूचें वचन ऐकोनि ॥ सांगतसे त्रिविक्रममुनि ॥ मदोन्मत्त विप्र दोनी ॥ आले असती चर्चेसी ॥ ६१ ॥ वेदशास्त्रादि मीमांसें ॥ म्हणती चर्चा करूं हर्षें ॥ वेद चारी जिव्हाग्रीं वसे ॥ म्हणती मूढ विप्र दोनी ॥ ६२ ॥ जरी न करा चर्चेसी ॥ पत्र मागती हारीसी ॥ अनेकापरी तयांसी ॥ सांगतां न ऐकती उन्मत्त ॥ ६३ ॥ म्हणोनि आलों तुम्हांजवळी ॥ तुम्ही श्रीगुरु चंद्रमौळी ॥ तुमचें वाक्य असे[1] बळी ॥ तेणेंपरी निरोपावें ॥ ६४ ॥ मुनिवचन ऐकोनि ॥ श्रीगुरु म्हणती हास्यवदनीं ॥ आले होते विप्र दोनी ॥ त्यांतें पुसती वृत्तांत ॥ ६५ ॥ श्रीगुरु म्हणती विप्रांसी ॥ कवण आलेंत कार्यासी ॥ वाद काय-

[1] नम्रतेनें.

सा आम्हांसीं ॥ लाभ काय वादें तुम्हां ॥६६॥ आम्ही तापसी संन्यासी ॥ आम्हां हारी कायसी ॥ काय थोरी तुम्हांसी ॥ जय होतां यतीसवें ॥६७॥ श्रीगुरुवचन ऐकोनि ॥ बोलताती विप्र दोनी ॥ आलों पृथ्वी हिंडोनि ॥ समस्त विप्र जिंकीत ॥ ६८ ॥ नव्हे कोणी सन्मुख ॥ वेदचर्चापराङ्मुख ॥ म्हणोनि पत्रें अनेक ॥ काढोनियां दाखविलीं ॥६९॥ येणेंपरी आम्हांसी ॥ पत्र देतां कां सायासी ॥ कोप आला त्रिविक्रमासी ॥ घेवोनि आला तुम्हांजवळी ॥ ७० ॥ जरी असाल साभिमान ॥ तुम्हांसहित दोघेजण ॥ वेदशास्त्रादि व्याकरण ॥ चर्चा करूं म्हणती विप्र ॥ ७१ ॥ आम्ही जाणों वेद चारी ॥ न होती कोणी आम्हांसरी ॥ तुम्ही दोघे यतीश्वरी ॥ काय जाणाल वेदान्त ॥७२॥ श्रीगुरु म्हणती विप्रांसी ॥ गर्वें नाश समस्तांसी ॥ देवदानवादिकांसी ॥ गर्वें मृत्यु लाधला जाणा ॥ ७३ ॥ गर्वें बळीसी काय झालें ॥ बाणासुरासी फळ आलें ॥ लंकानाथ कौरव गेले ॥ वैवस्वतक्षेत्रासी



[ अ० २५ ] नव्हे कोणी सन्मुख । वेदचर्चा पराङ्मुख । म्हणोनि पत्रें अनेक । काढोनिया दाखविलीं ॥ ६९ ॥

॥ ७४ ॥ कवण जाणे वेदांत ॥ ब्रह्मादिकां न कळे अंत ॥ वेद असती अनंत ॥ गर्व वृथा तुम्ही करितां ॥ ७५ ॥ विचाराल आपुलें हित ॥ तरी सांडा सर्व भ्रांत ॥ काय जाणतां वेदान्त ॥ चतुर्वेदी म्हणवितां ॥७६॥ श्रीगुरूचें वचन ऐकोनि ॥ गर्वें दाटले बहु मनीं ॥ जाणों आम्ही वेद तीन्ही ॥ सांग संहिता परियेसा ॥ ७७ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ बोलती ब्राह्मण परियेसीं ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ अपूर्व पुढें वर्तलें ॥७८॥ वेद चारी आदि अंतीं ॥ श्रीगुरु ब्राह्मणां निरोपिती ॥ सांगेन ऐका एकचित्तीं ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ ७९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ त्रिविक्रममुनि विख्यात ॥ विप्र जयपत्र मागत ॥ तें चरित्र वर्णिलें ॥ ८० ॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे द्विजप्रशंसा नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ ८० ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणांसी ॥ नका भ्रमूं युक्तीसी ॥ वेदान्त न कळे ब्रह्मयासी ॥ अनंत वेद असती ॥ १ ॥ वेदव्यासासारिखे मुनि ॥ नारायण अवतरोनि ॥ वेद व्यक्त करोनि ॥ व्यास नाम पावला ॥ २ ॥ तेणेंही नाहीं पूर्ण केलें ॥ साधारण सांगितलें ॥ शिष्य होते चौघे भले ॥ प्रख्यात नामें अवधारा ॥ ३ ॥ शिष्यांचीं नामें देखा ॥ सांगेन विस्तारें ऐका ॥ प्रथम पैल दुजा वैशंपायन निका ॥ तिसरा नामें जैमिनी ॥ ४ ॥ चौथा सुमंतू शिष्य ॥ करीन म्हणे विद्याभ्यास ॥ त्यांसी म्हणे वेदव्यास ॥ अशक्य तुम्हा शिकतां ॥ ५ ॥ एक वेद व्यक्त शिकता ॥ पाहिजे दिन-कल्पांता ॥ चारी वेद केवीं वाचितां ॥ अनंत वेद असे महिमा ॥ ६ ॥ ब्रह्मकल्प तिन्ही फिरले ॥ वर्षोवर्षीं वांचले ॥ ब्रह्मचर्य आचरले ॥ वेद पूर्ण शिकों म्हणोनि ॥ ७ ॥ या वेदांचें आद्यंत ॥ सांगेन ऐका एकचित्त ॥ पूर्वीं भारद्वाज विख्यात ॥ ऋषि अभ्यास करित होता ॥ ८ ॥ लवलेश आलें

त्यासी ॥ पुनरपि करी तपासी ॥ ब्रह्मा प्रसन्न झाला परियेसीं ॥ काय मागशील म्हणोनि ॥ ९ ॥ भारद्वाज म्हणे ब्रह्मयासी ॥ स्वामी मज प्रसन्न होसी ॥ वेद शिकेन आद्यंतेंसीं ॥ ब्रह्मचर्य आश्रमीं ॥ १० ॥ वेदान्त मज दावावे ॥ सर्व मातें शिकवावें ॥ ऐसें वरदान द्यावें ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ११ ॥ ब्रह्मा म्हणे भारद्वाजासी ॥ मिती नाहीं वेदांसी ॥ सर्व कैसा शिकों म्हणसी ॥ आम्हांसी वेद अगोचर ॥ १२ ॥ तुज दावितों पहा सकळ ॥ करोनि मन निर्मळ ॥ शक्ति झालिया सर्वकाळ ॥ अभ्यास करीं भारद्वाजा ॥ १३ ॥ ऐसें म्हणोनि ऋषीसी ॥ ब्रह्मा दावी वेदांसी ॥ दिसताती तीन राशी ॥ गिरिरूप होवोनि ॥ १४ ॥ ज्योतिर्मय कोटि-सूर्य ॥ पाहतां ऋषीस वाटे भय ॥ वेदराशी गिरिमय[1] ॥ केवीं शिकूं म्हणतसे ॥ १५ ॥ तिन्ही ब्रह्मकल्पांवरी ॥ आचरले आश्रम चारी ॥ वेद

१ पर्वतप्राय.

शिकले तावन्मात्रीं ॥ एवढे गिरी केवीं शिकों ॥ १६ ॥ म्हणोनि भयभीत झाला ॥ ब्रह्मयाचे चरणीं लागला ॥ म्हणे स्वामी अशक्य केवळा ॥ क्षमा करणें म्हणतसे ॥ १७ ॥ या वेदाचा आद्यंत ॥ आपण पहावया अशक्त ॥ तूंचि जाणसी जगन्नाथ ॥ जें देशी तें घेईन ॥ १८ ॥ तूं शरणागता आधार ॥ माझे मनीं वासना थोर ॥ वेद शिकावे अपार ॥ म्हणोनि आलों तुजपासीं ॥ १९ ॥ वेद देखोनि अमित ॥ भय पावलें चित्त ॥ जें द्याल उचित ॥ तेंचि घेऊं परियेसा ॥ २० ॥ ऐसें वचन ऐकोन ॥ ब्रह्मदेव संतोषोन ॥ देता झाला मुष्टी तीन ॥ अभ्यासावया ॥ २१ ॥ तीन वेदांचें मंत्रजाळ ॥ वेगळें केलें तत्काळ ॥ ऐसे चारी वेद प्रबळ ॥ अभ्यासी भारद्वाज ॥ २२ ॥ अजून पुरतें नाहीं त्यासी ॥ केवीं शिकों पाहती वेदांसी ॥ सांगा तुम्ही परियेसीं ॥ चौघे आचा चारी वेद ॥ २३ ॥ पूर्ण एक एक वेदासी ॥ शिकतां प्रयत्न मोठा त्यासी ॥ सांगेन थोडें तुम्हांसी ॥ व्यक्त करावया

अभ्यास ॥ २४ ॥ शिष्य म्हणती व्यासासी ॥ एक एक वेद आम्हांसी ॥ विस्तारावें आद्यंतेंसीं ॥ शक्त्यनुसार अभ्यास करूं ॥ २५ ॥ ऐसें विनविती चौघेजण ॥ नमूनि व्यासचरण ॥ कृपा करावी जाण ॥ आम्हांलागीं व्यासमुनि ॥ २६ ॥ करुणावचन ऐकोनि ॥ व्यास सांगे संतोषोनि ॥ पैल शिष्य बोलावोनि ॥ ऋग्वेद निरोपित ॥ २७ ॥ एक पैल शिष्योत्तमा ॥ सांगेन ऋग्वेदमहिमा ॥ पठण करीं गा धर्मकर्मा ॥ ध्यानपूर्वक करोनि ॥ २८ ॥ पैल शिष्य म्हणे व्यासासी ॥ बरवें विस्तारावें आम्हांसी ॥ ध्यानपूर्वक लक्षणेंसीं ॥ भेदाभेद निरोपावे ॥२९॥ त्यांत जें अशक्य आम्हांसी ॥ तेंचि शिकों भक्तींसीं ॥ तूं कामधेनु आम्हांसी ॥ कृपा करीं गा गुरुमूर्ती ॥ ३० ॥ व्यास सांगे पैल शिष्यासी ॥ ऋग्वेदध्यान परियेसीं ॥ वर्णरूप व्यक्ति कैसी ॥ भेदाभेद सांगेन ॥ ३१ ॥ ऋग्वेदाचा उपवेद ॥ असे प्रख्यात आयुर्वेद ॥ आत्रि गोत्र असे शुद्ध ॥ ब्रह्मा देवता जाणावी

॥ ३२ ॥ गायत्री छंदासी ॥ रक्तवर्ण परियेसीं ॥ नेत्र पद्मपत्रसदृशी[1] ॥ विस्तीर्ण ग्रीवा कंबुकंठ ॥ ३३ ॥ कुंचकेशी श्मश्रु प्रमाण ॥ द्वयरत्नी दीर्घ जाण ॥ ऋग्वेद असे रूपधारण ॥ मूर्ति ध्यावी येणेंपरी ॥ ३४ ॥ आतां भेद सांगेन ऐका ॥ प्रथम चर्चा श्रावका ॥ द्वितीय चर्चा श्रवणिया ऐका ॥ पराक्रमी दोनी शाखा ॥ ३५ ॥ षट्कर्मशाखा दोनी ॥ सातवा दण्ड म्हणोनि ॥ भेद सप्त निर्गुणी ॥ पांच भेद आणिक असती ॥ ३६ ॥ अश्वलायनी शांखायनी ॥ शाकला बाष्कला दोनी ॥ पांचवी माण्डूका म्हणोनि ॥ असे भेद द्वादश ॥ ३७ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणांसी ॥ व्यासें सांगितलें शिष्यासी ॥ ऐशिया ऋग्वेदासी ॥ द्वादश भेद विस्तारें ॥ ३८ ॥ या कलियुगाभीतरीं ॥ म्हणविसी वेद चारी ॥ कीर्ति मिरवा लोकांतरीं ॥ अध्यापक म्हणोनि ॥ ३९ ॥ तया द्वादश भेदांत ॥ एक शाखा असे

[1] कमळाच्या पानासारखे.

विख्यात ॥ सुलक्षण रूप व्यक्त ॥ कोण जाणे सांग मज ॥ ४० ॥ नारा-
यण व्यासमुनि ॥ शाखा द्वादश विस्तारोनि ॥ सांगितल्या संतोषोनि ॥
पैल शिष्यासी ॥ ४१ ॥ ऋग्वेदाचे भेद असे ॥ सांगितले वेदव्यासें ॥
श्रीगुरु म्हणती हर्षे ॥ मदोन्मत्त द्विजांसी ॥ ४२ ॥ यजुर्वेदविस्तार ॥
सांगेन ऐका अपार ॥ वैशंपायन शिष्य थोर ॥ अभ्यास करी परियेसा
॥ ४३ ॥ व्यास म्हणे शिष्यासी ॥ ऐक एकचित्तेंसीं ॥ सांगतों
यजुर्वेदासी ॥ उपवेद धनुर्वेद ॥ ४४ ॥ भारद्वाज गोत्र जाणा ॥ अधि-
दैवत विष्णु जाणा ॥ त्रिष्टुप् छंदासी तुम्ही म्हणा ॥ आतां ध्यान सांगेन
॥ ४५ ॥ कृशमध्य निर्धारीं ॥ स्थूल ग्रीवा कपाल जरी ॥ कांचनवर्ण मनो-
हरी ॥ नेत्र असती पिंगट ॥ ४६ ॥ शरीर ताम्र आदित्यवर्ण ॥ पांच
अरत्नी दीर्घ जाण ॥ यजुर्वेदा ऐसें ध्यान ॥ वैशंपायना निर्धारीं ॥४७॥
ऐशिया यजुर्वेदासी ॥ असती भेद शायशी ॥ म्हणे व्यास शिष्यासी ॥

सांगेन एकाचिपरी ॥ ४८ ॥ प्रथम चरका आहूरका ॥ तिसरा नाम-कठा ऐका ॥ प्राच्यकठा चतुर्थिका ॥ कपिलकठा पांचवी पैं ॥ ४९ ॥ सहावी असे अरायणीया ॥ सातवी खुर्णी वार्तातवीया ॥ श्वेत म्हणिजे जाण आठवीया ॥ श्वेततर नवमी ॥ ५० ॥ मैत्रायणी असे नाम ॥ शाखा असे हो दशम ॥ तिसी भेद उत्तम ॥ असती सात परियेसा ॥ ५१ ॥ मानवा दुंदुभा दोनी ॥ तिसरा ऐकेया म्हणोनि ॥ वाराहा नाम चतुर्थपर्णी ॥ भेद असे परियेसा ॥ ५२ ॥ हरिद्रवेया जाण पांचवा ॥ श्याम म्हणिजे सहावा ॥ सातवा श्यामायणीया जाणावा ॥ दशम शाखा परियेसा ॥ ५३ ॥ वाजसनेया शाखेसी ॥ भेद असती अष्टादशी ॥ नामें सांगेन परियेसीं ॥ श्रीगुरु म्हणती तयांसी ॥ ५४ ॥ वाजसनेया नाम एका ॥ द्वितीय जाबला निका ॥ बहुधेया नामें तृतीयका ॥ चतुर्थ कण्व परि-येसा ॥ ५५ ॥ माध्यंदिना पांचवेसी ॥ शापिया नाम षष्ठेसी ॥ स्थापायनीया

सप्तमेसी ॥ कापाला अष्टम विख्यात ॥५६॥ पौंड्रवत्सा विख्यात ॥ आवटिका नांवें उन्नत ॥ परमावटिका परम ख्यात ॥ एकादश भेद जाणा ॥ ५७ ॥ पाराशर्या द्वादशी ॥ वैद्येया नामें त्रयोदशी ॥ चतुर्दश भेद पुससी ॥ वैनेया म्हणती तयातें ॥ ५८ ॥ औंधेया नामें विशेषीं ॥ जाण शाखा पंचदशी ॥ गालवा म्हणिजे षोडशी ॥ बैजवा नाम सप्तदशी ॥ ५९ ॥ कात्यायनी विशेषी ॥ जाण शाखा अष्टादशी ॥ वाजसनीय शाखेसी ॥ भेद असती अष्टादश ॥ ६० ॥ तैत्तिरीय शाखा भेद दोनी ॥ व्यास सांगे विस्तारोनि ॥ औख्या काण्डिकेया म्हणोनि ॥ यांसी भेद पांच असती ॥ ६१ ॥ आपस्तंबी असे थोर ॥ शाखा असे मनोहर ॥ यज्ञादि कर्में आचार ॥ विज्ञान असे तयांत ॥ २६ ॥ दुसरा जाण बौधायनी ॥ सत्याषाढी अघनाशनी ॥ हिरण्यकेशी म्हणोनि ॥ चौथा भेद परियेसा ॥ ६३ ॥ औधेयी म्हणोनि नांव ॥ भेद असे पांचवा ॥ अनुक्रमें पढावा ॥ म्हणे व्यास

शिष्यासी ॥ ६४ ॥ षडंगें असतां विशेषें ॥ नामें तयांचीं सांगेन ऐकें ॥
शिक्षा व्याकरण कल्पें ॥ निरुक्त छंद ज्योतिष ॥ ६५ ॥ यांतें उपांगें
असती आणिक ॥ आणि त्यांचीं नामें तूं ऐक ॥ प्रतिपद अनुपद देख ॥
छंद तिसरा परियेसा ॥ ६६ ॥ भाषाधर्म पंचम ॥ मीमांसा न्याय सप्तम ॥
कर्मसंहिता अष्टम ॥ उपांगें हीं जाणावीं ॥ ६७ ॥ परिशिष्टें अष्टाविंश ॥
असती एका विशेष ॥ विस्तार करुनी परियेस ॥ व्यास सांगे शिष्यासी
॥ ६८ ॥ पूर्वीं होत्या वेदराशी ॥ शिकतां अशक्य मानवांसी ॥ म्हणोनि
लोकोपकारासी ॥ ऐसा केला विस्तार ॥६९॥ शाखाभेद येणेंपरी ॥ विस्तार
केला प्रकारीं ॥ जितके मति उच्चारी ॥ तितुके शिकों म्हणोनि ॥ ७० ॥
येणेंपरी विस्तारीं ॥ सांगे व्यास परिकरी ॥ वैशंपायन अवधारीं ॥ विन-
वीतसे त्याजवळी ॥ ७१ ॥ यजुर्वेद विस्तारेंसी ॥ निरोपिला आम्हांसी ॥
शाखाभेद क्रमेंसीं ॥ वेगळाले करोनि ॥ ७२ ॥ संदेह होतो आम्हांसी ॥

मूळ शाखा कोण कैशी ॥ विस्तारोनि प्रीतींसीं ॥ निरोपावें स्वामिया ॥ ७३ ॥ व्यास म्हणे शिष्यासी ॥ बरवें पुसिलें आम्हांसी ॥ या यजुर्वे-दासी ॥ मूळ तुम्हां सांगेन ॥ ७४ ॥ मंत्र ब्राह्मण संहिता ॥ मिळोनि पढतां मिश्रिता ॥ तोचि मूळ प्रख्याता ॥ यजुर्वेद जाणिजे ॥ ७५ ॥ आणिक असे एक खूण ॥ संहिता मिळोनि ब्राह्मण ॥ तोचि यजुर्वेद मूळ जाण ॥ वरकड शाखा पल्लव ॥ ७६ ॥ यज्ञादि कर्मक्रियेसी ॥ हें मूळ गा परियेसीं ॥ अभ्यास करीं गा निश्चयेंसीं ॥ म्हणे व्यास शिष्यातें ॥ ७७ ॥ ऐकोनियां व्यासवचन ॥ वैशंपायन म्हणे कर जोडून ॥ यजुर्वेदमूळ विस्तारोन ॥ निरोपावें स्वामिया ॥ ७८ ॥ व्यास म्हणे शिष्यासी ॥ सांगेन एक विस्ता-रेंसीं ॥ ग्रंथत्रय असती ज्यासी ॥ अभ्यास करीं म्हणतसे ॥ ७९ ॥ सप्त अष्टकसंहितेसी ॥ एकाएकाचे विस्तारेंसीं ॥ सांगेन तुज भरंवसीं ॥ म्हणे व्यास शिष्यातें ॥ ८० ॥ प्रथम इषेत्वा प्रश्नासी ॥ अनुवाक असती चतु-

दशी ॥ आठ अधिक विसांसी ॥ पन्नासा असती ॥ ८१ ॥ अपऊर्ध्व प्रश्नासी ॥ अनुवाक असती चतुर्दशी ॥ चारी अधिक तिसांसी ॥ पन्नासा तुम्हीं जाणाव्या ॥८२॥ देवस्यत्वा प्रश्नासी ॥ अनुवाक असती एकादशी ॥ एक अधिक तिसांसी ॥ पन्नासा असती ॥ ८३ ॥ आददेनामा प्रश्न चतुर्थ ॥ षद्चत्वारिंशत् अनुवाक विख्यात ॥ पन्नासा जाण तयांत ॥ वेदाधिक पन्नास ॥ ८४ ॥ देवासुर नामक प्रश्नासी ॥ अनुवाक असती एकादशी ॥ असती एकावन्न पन्नासी ॥ पंचम प्रश्नांत अवधारा ॥ ८५ ॥ संत्वासिंचा इति प्रश्न ॥ द्वादश अनुवाक असती पूर्ण ॥ पन्नासा असती एकावन्न ॥ असती सहावे प्रश्नासी ॥ ८६ ॥ पाकयज्ञ नामक प्रश्न ॥ त्रयोदशीं अनुवाकीं संपन्न ॥ पन्नासा असती एकावन्न ॥ सप्तम प्रश्न विस्तार ॥ ८७ ॥ अनुमत्य इति प्रश्नासी ॥ अनुवाक जाणा द्वाविंशती ॥ द्विचत्वारिंशत् पन्नासा असती ॥ प्रथम अष्टक येणेंपरी ॥ ८८ ॥ प्रथम अष्टक परियेसीं ॥

संख्या सांगेन संहितेसी ॥ अनुवाक असती ख्यातीसी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ८९ ॥ एकशत आणि चत्वारिंशत् वरी ॥ अधिक त्यावरी तीन निर्धारीं ॥ अनुवाक असती परिकरी ॥ अंतःकरणीं धरावे ॥ ९० ॥ पन्नासा असती त्यासी ॥ त्रिशताधिक बेचाळिशी ॥ प्रथम अष्टकीं परियेसीं ॥ म्हणोनि सांगे व्यासमुनि ॥ ९१ ॥ द्वितीय अष्टकाचा विचार ॥ सांगेन तो परिकर ॥ प्रथम प्रश्नाचें नाम थोर ॥ वायव्य असें म्हणावें ॥ ९२ ॥ प्रथम प्रश्नांत विशेष ॥ अनुवाक जाण एकादश ॥ पंचषष्ठी असती पन्नास ॥ एकचित्तें परियेसा ॥ ९३ ॥ पुढें असे द्वितीय प्रश्न ॥ नाम असे प्रजापती गहन ॥ द्वादश अनुवाक असती जाण ॥ एकसप्तति पन्नासा ॥ ९४ ॥ आदित्या नामक प्रश्नास ॥ अनुवाक जाणा चतुर्दश ॥ षट् अधिक पंचाशत ॥ पन्नासा तुम्हीं पढाव्या ॥ ९५ ॥ पुढील प्रश्न देवामनुष्या ॥ अनुवाक जाणा चतुर्दशा ॥ अष्ट अधिक चत्वारिंशा ॥ पन्नासा

तुवां जाणिजे ॥ ९६ ॥ म्हणतां जाय महा पाप ॥ प्रश्न असे विश्वरूप ॥ द्वादश अनुवाक स्वरूप ॥ चारी अधिक सप्तती पन्नासा ॥ ९७ ॥ समिधा नाम प्रश्नास ॥ निरुतें अनुवाक द्वादश ॥ सप्तती पन्नासा असती त्यास ॥ एकचित्तें परियेसा ॥ ९८ ॥ ऐसे द्वितीय अष्टकासी ॥ षष्ठ प्रश्न परियेसीं ॥ पांच अधिक सप्ततीसी ॥ अनुवाक तुम्हीं जाणावे ॥ ९९ ॥ पन्नासांची गणना ॥ सांगेन तुज विस्तारोन ॥ तीन शतांवरी अशीती जाण ॥ अष्ट अधिक परियेसा ॥ १०० ॥ तिसरा अष्टक सविस्तर ॥ सांगेन तुम्हां परिकर ॥ वैशंपायन शिष्य थोर ॥ गुरुमुखें ऐकतसे ॥ १ ॥ तिसऱ्या अष्टकाचा प्रश्न प्रथम ॥ नाम प्रजापतिरकाम ॥ अनुवाक त्या एकादशोत्तम ॥ द्विचत्वारिंशत् पन्नासा त्यासी ॥ २ ॥ द्वितीय प्रश्नास असे जाण ॥ नाम यो वै पवमान ॥ एकादश अनुवाक

१ व्यापक, महत्त्वाचा.

जाण ॥ षट्‌चत्वारिंशत् पन्नासा त्यासी ॥ ३ ॥ तृतीय प्रश्ना बरवीयासी ॥ नाम असे अग्ने तेजस्वी ॥ अनुवाकांची एकादशी ॥ षट्‌चत्वारिंशत् पन्नासा त्यासी ॥ ४ ॥ चौथा प्रश्न विवात्यांत ॥ एकादश अनुवाक ख्यात ॥ षट्‌-चत्वारिंशत् पन्नासा त्यांत ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५ ॥ पुढें असे प्रश्न पंचम ॥ म्हणावें नाम पूर्णा प्रथम ॥ अनुवाक अकरा उत्तम ॥ षड्विंशति पन्नासा त्यासी ॥ ६ ॥ ऐसे तृतीयाष्टकासी ॥ अनुवाक पंचपंचाशत् त्यासी ॥ द्विशत अधिक सहा त्यासी ॥ पन्नासा असती अवधारा ॥ ७ ॥ चौथ्या अष्टकाचा प्रथम प्रश्न ॥ नामें असे युंजान ॥ एकादश अनुवाक खूण ॥ षट्‌चत्वारिंशत् पन्नासा ॥ ८ ॥ प्रश्नास संज्ञा विष्णोःक्रम ऐसी ॥ एकादश अनुवाक परियेसीं ॥ अष्ट अधिक चत्वारिंशतीसी ॥ पन्नासा त्यांत विस्तार ॥ ९ ॥ तिसरे प्रश्ना उत्तम ॥ जाणा तुम्हीं अपांत्वा नाम ॥ त्रयोदश अनुवाक उत्तम ॥ षट्‌त्रिंशत् पन्नासा त्यासी ॥ ११० ॥ चौथा

प्रश्न रश्मिरसी ॥ अनुवाक असती द्वादशी ॥ सप्ताधिक त्रिंशत् त्यासी ॥ पन्नासा असती तुम्ही जाणा ॥ ११ ॥ नमस्ते रुद्र उत्तम ॥ प्रश्न होय जाण पंचम ॥ एकादश अनुवाक जाण ॥ सप्ताधिक वीस पन्नासा ॥ १२ ॥ अश्मन्नूर्ज प्रश्नास ॥ नव अनुवाक परियेस ॥ षट्चत्वारिंशत् पन्नासा त्यास ॥ एकचित्तें परियेसा ॥ १३ ॥ प्रश्न अग्नाविष्णूसी ॥ अनुवाकांची जाण पंचदशी ॥ एक न्यून चाळिसांसी ॥ पन्नासा त्यासी विस्तारें ॥ १४ ॥ ऐसे चतुर्थ अष्टकासी ॥ सप्त प्रश्न परियेसीं ॥ अनुवाक असती त्र्यायशी ॥ द्विशतांवर एक उण्या अशीति पन्नासा ॥ १५ ॥ पंचमाष्टका प्रथम प्रश्न ॥ नामें सावित्राणी जाण ॥ पन्नासा षष्ठी एका ऊण ॥ एकादश अनुवाक ख्याति ॥ १६ ॥ विष्णुमुखा प्रश्नासी ॥ अनुवाक असती द्वादशी ॥ चतुःषष्ठी पन्नासा त्यासी ॥ श्रीगुरु म्हणती द्विजांतें ॥ १७ ॥ तिसरा प्रश्न उत्सन्नयज्ञ ॥ अनुवाक द्वादश धरा खूण ॥ पन्नासांसी द्वय

न्यून ॥ पन्नासा असती परियेसीं ॥ १८ ॥ चौथा प्रश्न देवासुरा ॥
अनुवाक असती त्यासी बारा ॥ षष्ठींत दोन उण्या करा ॥ पन्नासा
असती परियेसा ॥१९॥ यदेके नामें प्रश्न ॥चतुर्विंशति अनुवाक खूण ॥ दोन
अधिक षष्ठी जाण ॥ पन्नासा असती ॥ परियेसा ॥ १२० ॥ हिरण्यवर्मा
षष्ठ प्रश्न ॥ त्रयोविंशति अनुवाक जाण ॥ षष्ठीमध्यें सहा न्यून ॥ पन्नासा
असती परियेसा ॥ २१ ॥ यो वा आ यथा नामें प्रश्न ॥ षड्विंशति अनु-
वाक जाण ॥ षष्ठीमध्यें द्वय न्यून ॥ पन्नासा असती परियेसा ॥२२॥ पंच-
माष्टक संहितेसी ॥ सप्त प्रश्न परियेसीं ॥ अनुवाक एकशत त्यासी ॥
वीस अधिक विस्तारें ॥ २३ ॥ त्रीणि अधिक चतुःशत ॥ पन्नासा असती
जाणा विख्यात ॥ मन करूनि सावचित ॥ ऐका म्हणे तये वेळीं ॥ २४ ॥
षष्ठाष्टक संहितेसी ॥ प्रथम प्रश्न परियेसीं ॥ प्राचीनवंश नाम त्यासी ॥
एकादश अनुवाक जाणा ॥ २५ ॥ अधिक सहा सप्ततीसी ॥ पन्नासा

त्यासी परियेसीं ॥ विस्तार करूनि शिष्यासी ॥ सांगतसे व्यासदेव ॥२६॥ यदुभव नाम प्रश्नासी ॥ अनुवाक जाणा एकादशी ॥ एक उणा षष्ठीसी ॥ पन्नासा असती परियेसीं ॥ २७ ॥ तिसरा प्रश्न चात्वाल ॥ एकादशी अनु-वाकीं माळ ॥ पन्नासा षष्ठीवरी द्वय स्थूळ ॥ तिसरा प्रश्न परियेसीं ॥ २८ ॥ चवथा प्रश्न यज्ञेन ॥ एकादश अनुवाक जाण ॥ पन्नासा एक अधिक पंचा-शत पूर्ण ॥ एकचित्तें परियेसा ॥ २९ ॥ इंद्रोवृत्र नाम प्रश्न ॥ एकादश अनुवाक जाण ॥ द्विचत्वारिंशत् पन्नासा खूण ॥ पंचम प्रश्नीं परियेसा ॥ ॥ १३० ॥ सुवर्गाय नाम प्रश्नासी ॥ अनुवाक असती एकादशी ॥ त्रीणि अधिक चत्वारिंशती ॥ पन्नासा असती परियेसा ॥ ३१ ॥ सहावे अष्टकीं परिपूर्ण ॥ त्यासी सहा अधिक असती पूर्ण ॥ षष्ठी अनुवाक असती जाण ॥ त्रयस्त्रिंशदधिकत्रिशत पन्नासा ॥ ३२ ॥ सप्तमाष्टकाचा प्रश्न ॥ नामें असे प्रजनन ॥ अनुवाक वीस असती खूण ॥ द्विपंचाशत पन्नासा त्यास ॥ ३३ ॥

साध्या म्हणती जो द्वितीय प्रश्न ॥ विंशती अनुवाक जाण ॥ पन्नास
पन्नासा परिपूर्ण ॥ एकचित्तें परियेसा ॥ ३४ ॥ प्रजवेवानाम प्रश्नासी ॥
अनुवाक वीस परियेसीं ॥ द्विचत्वारिंशत् पन्नासा त्यासी ॥ श्रीगुरु म्हणती
तयांसी ॥ ३५ ॥ बृहस्पती नामक प्रश्न ॥ द्वाविंशति अनुवाक जाण ॥
त्रीण्यधिक पन्नासां खूण ॥ पन्नासा असती अवधारा ॥ ३६ ॥ प्रश्न असे
पांचवा जाण ॥ गावोवा नामें उत्तम ॥ पंचविंशति अनुवाक पूर्ण ॥ चतुः
पंचाशत् पन्नासा त्यासी ॥ ३७ ॥ सप्तमाष्टक संहितेसी ॥ अनुवाक असती
परियेसीं ॥ एकशत सप्त त्यासी ॥ अनुवाक असती विस्तार ॥ ३८ ॥
द्विशतावरी अधिकेसी ॥ एकावन असती पन्नासी ॥ सप्तमाष्टक असे सुरसी ॥
एकचित्तें परियेसा ॥ ३९ ॥ अष्टमाष्टक संहितेसी ॥ षट् शताधिक अष्टच-
त्वारिंशतीसी ॥ मुख्य प्रश्न चत्वारिंशत् भरंवशीं ॥ अनुवाक असती वि-
स्तारें ॥ १४० ॥ द्विउणें शतद्वय सहस्र दोनी ॥ पन्नासा तूं जाण मनीं ॥

पठण करा म्हणोनि ॥ व्यास सांगे शिष्यासी ॥ ४१ ॥ तीन अष्टक ब्राह्मणांत ॥ असती जे जाण विख्यात ॥ सांगेन ऐक एकचित्त ॥ म्हणे व्यास शिष्यासी ॥ ४२ ॥ प्रथमाष्टक ब्राह्मणासी ॥ प्रश्न आठ परियेसीं ॥ नामें त्याचीं ऐका ऐशीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ४३ ॥ प्रथम प्रश्न संधत्त ॥ नाम असे विख्यात ॥ अनुवाक दहा विस्तृत ॥ अशीति दशक मनोहर ॥ ४४ ॥ उद्धन्य नाम दुसरा प्रश्न ॥ सहा अनुवाक दशक पन्नास जाण ॥ वाजपेय अनुसंधान ॥ देवासुरा प्रश्न तिसरा ॥ ४५ ॥ त्यासी दशक अनुवाक जाण ॥ पंच अधिक षष्ठि दशक जाण ॥ चौथा उभये नाम प्रश्न ॥ दश अनुवाक मनोहर ॥ ४६ ॥ संवत्सरगणित सहा अधिका ॥ त्यासी जाणा तुम्ही दशका ॥ पांचवा नामें अग्नेक्त्तिका ॥ प्रश्न असे अवधारा ॥ ४७ ॥ त्यासी अनुवाक द्वादश ॥ सांगेन ऐका दशक ॥ दोन अधिक षष्ठि विशेष ॥ एकचित्तें परियेसा ॥ ४८ ॥ सहावा प्रश्न अनुमत्य ॥

अनुवाक दहा प्रख्यात ॥ पांच अधिक सप्तातिक ॥ दशक त्यासी अवधारा ॥ ४९ ॥ सप्तम प्रश्ना धरीं खूण ॥ नाम त्या एकद्वाब्राह्मण ॥ दश अनुवाक आहेत जाण ॥ चतुःषष्ठी दशक त्यासी ॥ १५० ॥ आठवा वरुणस्य नाम प्रश्न ॥ अनुवाक त्यासी दहा जाण ॥ सप्त अधिक तीस खूण ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ५१ ॥ प्रथम अष्टक ब्राह्मणासी ॥ प्रश्न आठ परियेसीं ॥ अष्टसप्तति अनुवाक त्यासी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५२ ॥ एक उणें पांचशत ॥ दशक आहेत विख्यात ॥ वैशंपायन ऐकत ॥ गुरुमुखेंकरोनि ॥ ५३ ॥ दुसरा अष्टक ब्राह्मणास ॥ प्रथम प्रश्न आंगिरस ॥ अनुवाक जाणा एकादश ॥ साठी दशक मनोहर ॥ ५४ ॥ प्रजापतिरकांड ॥ प्रश्न दुसरा हा गोड ॥ एकादश अनुवाक दृढ ॥ त्रिसप्तति दशक त्यासी ॥ ५५ ॥ कांड ब्रह्मवादिन ॥ एकादश अनुवाक जाण ॥ दशक आहे तो पन्नास पूर्ण ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५६ ॥ जुष्टो नाम प्रश्न ऐक ॥

त्यासी अनुवाक अष्टादशक ॥ वैशंपायन किष्ठाक ॥ गुरुमुखें ऐकतसे ॥ ५७ ॥ प्रश्न प्राणोरक्षती ॥ अष्ट अनुवाक त्यासी ख्याति ॥ पंच अधिक चत्वारिंशती ॥ दशक तुम्हीं ओळखिजे ॥ ५८ ॥ स्वादित्वा नामें षष्ठम ॥ प्रश्न असे उत्तम ॥ अनुवाक असती वीस खूण ॥ षट् अधिक अशीति दशक त्यासी ॥ ५९ ॥ सप्तम प्रश्न त्रिवृत्तास ॥ अनुवाक असती अष्टादश ॥ सहा अधिक षष्ठीस ॥ दशक त्यासी मनोहर ॥ १६० ॥ अष्टम प्रश्न पीवोन ॥ अनुवाक असती नऊ जाणा ॥ अशीतीशी एक उणा ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ६१ ॥ द्वितीय अष्टक ब्राह्मणासी ॥ आठ प्रश्न परियेसीं ॥ वेद उणे शतक त्यासी ॥ अनुवाक असती मनोहर ॥ ६२ ॥ चार शतां उपरी ॥ तीन उणे सप्तति निर्धारी ॥ दशक आहेती विस्तारी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६३ ॥ तृतीयाष्टक ब्राह्मणासी ॥ प्रश्न असती द्वादशी ॥ नामें त्याचीं परियेसीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ ६४ ॥ प्रथम प्रश्न विख्यात ॥

नाम अग्निर्नः पातु ॥ सहा अनुवाक विख्यातु ॥ एक अधिक षष्ठी दशक ॥ ६५ ॥ तृतीयस्य द्वितीय प्रश्न ॥ अनुवाक असती दहा जाण ॥ पंचाशीतिक दशक खूण ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६६ ॥ तिसरा प्रश्न प्रत्युष्ट ॥ अनुवाक असती एकादश ॥ एका उणे ऐशीं दशक ॥ एकचित्तें अवधारा ॥ ६७ ॥ चौथा प्रश्न ब्राह्मणेसी ॥ अनुवाक एक परियेसी ॥ एका उणे विसांसी ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ६८ ॥ पंचम प्रश्न नाम सत्य ॥ चतुर्दश अनुवाक विख्यात ॥ एक उणे तीस दशक ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६९ ॥ सहावा प्रश्न अंजंती ॥ पंचदश अनुवाक ख्याति ॥ सात अधिक त्रिंशती ॥ दशक त्यासी जाणावे ॥ १७० ॥ अच्छिद्रसर्वान्वा नाम प्रश्न ॥ चतुर्दश अनुवाक जाण ॥ तीस अधिक शत खूण ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ७१ ॥ प्रश्न अश्वमेधासी ॥ सांग्रहण्य ख्यातीसी ॥ अनुवाक असती त्रयोदशी ॥ एक्याण्णव दशक ॥ ७२ ॥ प्रजापतिरकाम ॥ अश्वमेध असे

उत्तम ॥ त्रयोविंशाति अनुवाक नेम ॥ चारी अधिक अशीति दशक त्यासी ॥ ७३ ॥ संज्ञान म्हणती काठक ॥ अनुवाक दहांशीं एक अधिक ॥ एका उणे पन्नास दशक ॥ एकचित्तें परियेसा ॥ ७४ ॥ दुसरा लोकोसिकाठक ॥ दश अनुवाक असती ऐक ॥ तयांमध्यें दोनी अधिक षष्ठी दशक ॥ व्यास म्हणे शिष्यासी ॥ ७५ ॥ द्वादश प्रश्न तुम्यासी ॥ अनुवाक नव परियेसीं ॥ सहा अधिक पन्नासासी ॥ दशक त्यासि मनोहर ॥ ७६ ॥ तिसरे अष्टक ब्राह्मणासी ॥ सप्त चत्वारिंशत् एक शत अनुवाकासी ॥ सात शत द्व्यशीति दशकासी ॥ विस्तार असे परियेसा ॥ ७७ ॥ तिनी अष्टक ब्राह्मणासी ॥ प्रश्न सांगेन परियेसीं ॥ अष्ट अधिक विसांसी ॥ एकचित्तें अवधारा ॥ ७८ ॥ त्रीणि शत विसांसी ॥ एक अधिक परियेसीं ॥ अनुवाक आहेती विस्तारेंसीं ॥ परत ब्राह्मणासी परियेसा ॥ ७९ ॥ दशक संख्या विस्तार ॥ सप्तशत अधिक सहस्र ॥ अष्टचत्वारिंशती उत्तर ॥ अधिक असती परियेसा ॥ १८० ॥ आतां सांगेन अरण ॥ त्यासी असती दहा प्रश्न ॥ विस्तारो-

नियां सांगेन ॥ एकचित्तें अवधारा ॥ ८१ ॥ अरणाचा भद्रनाम प्रथम प्रश्न ॥ द्वात्रिंशत् अनुवाक असे खूण ॥ एक शतक तीस जाण ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ८२ ॥ स्वाधाय ब्राह्मणासी ॥ अनुवाक वीस परियेसीं ॥ चतुर्विंशाति दशक त्यासी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ८३ ॥ चित्तीं म्हणिजे प्रश्नासी ॥ अनुवाक जाण एकविंशतीसी ॥ दोन अधिक पन्नासासी ॥ दशक त्यासी विस्तार ॥ ८४ ॥ ऐसा थोर चवथा प्रश्न ॥ नाम तया मंत्र-ब्राह्मण ॥ द्विचत्वारिंशत् अनुवाक जाण ॥ द्विषष्ठी दशक त्यासी ॥ ८५ ॥ श्रेष्ठ ब्राह्मण प्रश्नासी ॥ ॥ अनुवाक जाण द्वादशी ॥ आठ अधिक शतासी ॥ दशक तुम्हीं जाणावे ॥ ८६ ॥ पितृमेद असे प्रश्न ॥ द्वादश अनुवाक परिपूर्ण ॥ सप्तविंशती दशक जाण ॥ एकचित्तें परियेसा ॥ ८७ ॥ शिक्षा नाम प्रश्नासी ॥ अनुवाक असती द्वादशी ॥ तीन अधिक विसांसी ॥ दशक त्यासी मनोहर ॥ ८८ ॥ ब्रह्मविदा असे प्रश्न ॥ अनुवाक

त्यासी नऊ जाण ॥ दशक चतुर्दश असे खूण ॥ व्यास म्हणे शिष्यांसी ॥ ८९॥ भृगुवें असे प्रश्न ॥ अनुवाक त्यासी दहा जाण ॥ पंचदश दशक जाण ॥ एकचित्तें परियेसा ॥ १९० ॥ दशम प्रश्न नारायण ॥ अनुवाक तीस असती खूण ॥ एकशत वेद जाण ॥ दशक त्यासी परियेसा ॥ ९१ ॥ दाहा प्रश्न अरणासी ॥ अनुवाक जाण परियेसीं ॥ दोनी पूर्ण द्विशतासी ॥ संख्या असे परियेसा ॥ ९२ ॥ पंचशता उपरी ॥ नवपंचाशत विस्तारीं ॥ दशक जाणा मनोहरी ॥ म्हणे व्यास शिष्यातें ॥ ९३ ॥ ऐसे ग्रंथ तयांसी ॥ प्रश्न असती च्यायशी ॥ नव षष्ठी अधिक एकशत सहस्रासी ॥ अनुवाक जाण मनोहर ॥ ९४ ॥ पन्नासी दशक विस्तार ॥ सांगेन तुम्हां प्रकार ॥ द्वय-शत दोनों सहस्र ॥ द्वय उणे पन्नास जाण ॥ ९५ ॥ द्वयसहस्र त्रय शत ॥ सप्त अधिक उन्नत ॥ दशकीं जाण विख्यात ॥ ग्रंथत्रय परिपूर्ण ॥ ९६ ॥ ऐशीया यजुर्वेदासी ॥ भेद असती शायशी ॥ त्यांत एक भेदासी ॥ एवढा

असे विस्तार ॥ ९७ ॥ येणेंपरी व्यासमुनि ॥ वैशंपायना विस्तारोनि ॥
सांगता झाला म्हणोनि ॥ श्रीगुरु म्हणती द्विजांसी ॥ ९८ ॥ तिसरा शिष्य
जैमिनी ॥ त्यास सांगे व्यासमुनि ॥ सामवेद विस्तारोनि ॥ निरोपित
अवधारा ॥ ९९ ॥ उपवेद गांधर्व अत्र ॥ काश्यपाचें असे गोत्र ॥ रुद्र दे-
वता परम पवित्र ॥ जगती छंद म्हणावा ॥२००॥ नित्यस्रग्वी असे जाणा ॥
शुचि वस्त्र प्रावरणा ॥ मन शांत इंद्रियदमना ॥ शमीदण्ड धरिला असे
॥ १ ॥ कांचननयन श्वेतवर्ण ॥ सूर्यासारिखे किरण ॥ षडरत्नी दीर्घ जाण ॥
सामवेद रूप असे॥ २ ॥ याच्या भेदा नाहीं मिती ॥ अखिल सहस्र बोलती ॥
ऐसी कोणा असे शक्ति ॥ सकळासी शिकूं म्हणावया ॥ ३ ॥ एका नारा-
यणावांचोनि ॥ समस्त भेद नेणे कोणी ॥ ऐक शिष्या जैमिनी ॥ सांगें
तुज किंचित ॥ ४ ॥ प्रथम आसुरायणीया ॥ दुसरे वासुरायणीया ॥ वार्ता-
न्तरेया म्हणोनियां ॥ तिसरा भेद परियेसा ॥ ५ ॥ प्रांजली असे भेद एक ॥

ऋङ्ग्वैनविधा एक ॥ आणि प्राचीन योग्यशाखा ॥ असे सहावा परियेसा ॥ ६ ॥ ज्ञानयोग सप्तम ॥ राणायणीया असे ज्या नाम ॥ यासी भेद दश जाण ॥ आहेत ऐका एकचित्तें ॥ ७ ॥ राणायणीया सांख्यायनी ॥ तिसरा शाठ्या म्हणोनि ॥ मुद्गल नाम जाणोनि ॥ चौथा भेद परियेसा ॥ ८ ॥ खल्वला महाखल्वला ॥ सप्तम नामें लाङ्गला ॥ अष्ट भेद कैथुमा ॥ गौतमा म्हणे परियेसा ॥ ९ ॥ दशम शाखा जैमिनी ॥ ऐसे भेद विस्तारोनि ॥ सांगितलें व्यासमुनीं ॥ श्रीगुरु म्हणती द्विजांसी ॥ २१० ॥ पूर्ण सामवेदासी ॥ कोण जाणे क्षितीसी ॥ तीनवेदी म्हणविसी ॥ मदोन्मत्त होवोनियां ॥ ११ ॥ सूत म्हणे शिष्यांसी ॥ सांगे व्यास अतिहर्षी ॥ अथर्वण वेदासी ॥ निरोपिलें परियेसा ॥ १२ ॥ अथर्वण वेदासी ॥ उपवेद असे परियेसीं ॥ मंत्रशास्त्र निश्चयेंसीं ॥ वैतान असे गोत्र ॥ १३ ॥ आधिदैवत इंद्र त्यासी ॥ अनुष्टुप् छंदेसी ॥ तीक्ष्ण चंड क्रूरेसी ॥ कृष्ण वर्ण असे जाण ॥ १४ ॥

कामरूपी क्षुद्र कर्म ॥ स्वदार असे त्यासी नाम ॥ विश्वसृजक साध्यकर्म ॥ जलमूर्ध्नींगालव ॥ १५ ॥ ऐसें रूप तयासी ॥ भेद नव परियेसीं ॥ सुमंतु नाम शिष्यासी ॥ सांगतसे श्रीव्यास ॥ १६ ॥ पैप्पला भेद प्रथम ॥ दुसरा भेद दान्ता नाम ॥ प्रदांत भेद सूक्ष्म ॥ चौथा भेद स्तोता जाण ॥ १७ ॥ औता नाम असे ऐका ॥ ब्रह्मदा यशदा शाखा ॥ सातवा भेद शाखा ऐका ॥ शौनकी म्हणती ॥ १८ ॥ अष्टम वेददर्शी भेदासी ॥ चरणविद्या नवमेसी ॥ पांच कल्प परियेसीं ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥१९॥ ऐसें चौघां शिष्यांस ॥ सांगत असे वेदव्यास ॥ प्रकाश केला क्षितीस ॥ भरतखंडीं परियेसा ॥ ॥ २२० ॥ या भरतखंडांत ॥ पूर्वीं होतें पुण्य बहुत ॥ वर्णाश्रमधर्म आचरत ॥ होते लोक परियेसा ॥ २१ ॥ या कलियुगाभीतरीं ॥ कर्म सांडिलें द्विजवरीं ॥ लोपले वेद निर्धारीं ॥ गुप्त जाहले क्षितीसी ॥ २२ ॥ कर्मभ्रष्ट झाले द्विज ॥ म्लेंच्छां सांगती वेदबीज ॥ सत्त्व गेलें सहज ॥ मंदमती झाले जाण ॥ २३ ॥

पूर्वीं होतें महत्त्व ॥ ब्राह्मणासी दैवत्व ॥ वेदबळें नित्यत्व ॥ भूसूर म्हणती त्या काजा ॥ २४ ॥ पूर्वीं राजे याच कारणीं ॥ पूजा करिती विप्रचरणीं ॥ सर्व देतां दक्षिणादानीं ॥ ते अंगिकार न करिती ॥२५॥ वेदबळें विप्रांसी ॥ त्रिमूर्ति वश होते त्यांसी ॥ इंद्रादि सुरवरांसी ॥ भय होतें विप्रांचें ॥ २६ ॥ कामधेनु कल्पतरु ॥ विप्रवाक्यें होत थोरू ॥ पर्वत करिती तृणाकारू ॥ तृणा पर्वत परत्वें ॥ २७ ॥ विष्णु आपण परियेसीं ॥ पूजा करी विप्रांसी ॥ आपुलें दैवत म्हणे त्यांसी ॥ वेदसत्त्वेंकरोनियां ॥ २८ ॥ श्लोक ॥ देवाधीनं जगत्सर्वं मंत्राधीनं च दैवतं ॥ ते मंत्रा ब्राह्मणाधीना ब्राह्मणो मम दैवतं ॥ २९ ॥ ऐसें महत्त्व द्विजांसी ॥ पूर्वीं होतें परियेसीं ॥ वेदमार्ग त्यजोनि सुरसी ॥ अज्ञानमार्गें रहाटती ॥ २३० ॥ हीन यातीपुढें ऐका ॥ वेद म्हणती मूर्ख देखा ॥ त्यांच्या पाहूं नये मुखा ॥ ब्रह्मराक्षस होताती ॥३१॥

१ जमिनींवरील देव ( ब्राह्मण ).

तेणें सत्त्व भंगलें ॥ हीन यातीतें सेविलें ॥ अद्यापि क्रय करिती मोलें ॥ वेद भ्रष्ट करिताती ॥३२॥ ऐशा चारी वेदांसी ॥ शाखा असती परियेसीं ॥ कोणें जाणावें क्षितीसी ॥ सकळ गोप्य होऊनि गेले ॥ ३३ ॥ चतुर्वेदी म्हणविसी ॥ लोकांसवें चर्चा करिसी ॥ काय जाणसी वेदांसी ॥ अखिल भेद आहेत जाण ॥ ३४ ॥ ऐशामध्यें काय लाभ ॥ घेऊं नये द्विजक्षोभ ॥ कोणीं केला तूतें बोध ॥ जाइं म्हणती येथून ॥ ३५ ॥ आपुली आपण स्तुति करिसी ॥ जयपत्रें दाखविसी ॥ त्रिविक्रम यतीपासीं ॥ पत्र मागसी लिहुनी ॥ ३६ ॥ आमुचे बोल ऐकोनि ॥ जावें तुम्हीं परतोनि ॥ वायां गर्वें भ्रमोनि ॥ प्राण आपुला देऊं नका ॥ ३७ ॥ ऐसें श्रीगुरू विप्रांसी ॥ सांगती बुद्धि हितासी ॥ न ऐकती विप्र तामसी ॥ म्हणती चर्चा करूं ॥ ३८ ॥ चर्चा जरी न करूं येथें ॥ हारी दिसेल आम्हांतें ॥ सांगती लोक राजयातें ॥ महत्त्व आमुचें उरे केवीं ॥ ३९ ॥ सिद्ध म्हणे नामांकिता ॥ ऐसे विप्र मदो-



[ अ० २६ ] आमुचे बोल ऐकोनी । जावें तुम्हीं परतोनी । वायां गर्वें भ्रमोनी । आपुला प्राण देऊं नका ॥ २३७ ॥

न्मत्ता ॥ नेणती आपुले हिता ॥ त्यांसी मृत्यु जवळी आला ॥ २४० ॥ गंगाधराचा नंदनू ॥ सांगे गुरुचरित्र कामधेनू ॥ वेदविवरण ऐकतां साधनू ॥ होय समाधान श्रोते जना ॥ ४१ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ चारी वेदांचा मथितार्थ ॥ उकलोनि दाविला यथार्थ ॥ म्हणे सरस्वती गंगाधर ॥ २४२ ॥

इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे वेदविस्तारकथनं नाम षड्विंशोऽध्यायः॥ २६॥ ओंवीसंख्या २४२

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागे सिद्धाचिया चरणां ॥ विनवीतसे वचना ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ १ ॥ जय जया जी सिद्ध योगी ॥ तूं तारक आम्हां जगीं ॥ ज्ञानप्रकाश करणेलागीं ॥ दिलें दर्शन चरणांचें ॥ २ ॥ चतुर्वेद विस्तारेंसीं ॥ श्रीगुरु निरोपिती विप्रांसी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ विस्तारावी दातारा ॥ ३ ॥ शिष्यवचन ऐकोनि ॥ सांगता झाला विस्तारोनि ॥ ऐक शिष्या नामकरणी ॥ अनुपम महिमा श्रीगुरूची ॥ ४ ॥ किती प्रकारें विप्रांसी ॥ श्रीगुरु सांगती हितासी ॥ न ऐकती द्विज तामसी ॥ म्हणती वाद कां पत्र देणें ॥ ५ ॥ ऐसें उत्तर ऐकोनि कानीं ॥ कोप करिती श्रीगुरु मनिं ॥ जैसें तुमचे अंतःकरणीं ॥ तैसें सिद्धी पाववूं म्हणती ॥ ६ ॥ सर्पाचे पेटारियासी ॥ कोरूं जातां मूषक कैसी ॥ जैसा पतंग दीपासी ॥ करी आपुला आत्मघात ॥ ७ ॥ तैसे विप्र मदोन्मत्त ॥ श्रीगुरुमूर्ती न ओळखत ॥ बळें आपुलें प्राण देत ॥ दिवाधवत्

द्विज देखा ॥ ८ ॥ इतुकें वर्ततां ते अवसरीं ॥ श्रीगुरु देखती नरासी दूरी ॥ शिष्यासी म्हणती पाचारीं ॥ कवण जातो मार्गस्थ ॥ ९ ॥ श्रीगुरु-वचन ऐकोनि ॥ गेले सेवक धांवोनि ॥ त्या नरातें पाचारोनि ॥ आणिला गुरुसन्मुख ॥ १० ॥ गुरु पुसती त्यासी ॥ जन्म कवण जातीसी ॥ तो वृत्तांत सांग मजसी ॥ म्हणोनि पुसती तये वेळीं ॥ ॥ ११ ॥ श्रीगुरुवचन ऐकोन ॥ सांगे आपण जातिहीन ॥ मातंग नाम म्हणोन ॥ स्थान आपुलें बहिर्ग्रामीं ॥ १२ ॥ तूं कृपाळू सर्वां भूतीं ॥ म्हणोनि पाचारिलें प्रीतीं ॥ आपण झालों उद्धारगति ॥ म्हणोनि दंडवत् नमन करी ॥ १३ ॥ ऐसे कृपाळू परमपुरुष ॥ दृष्टि केली सुधारस ॥ लोहासी लागतां परिस ॥ सुवर्ण होतां काय वेळ ॥ १४ ॥ तैसें तया पतितावरी ॥ कृपा केली नर-हरीं ॥ दंड देवोनि शिष्या-करीं ॥ रेखा सप्त काढविल्या ॥ १५ ॥ श्रीगुरु म्हणती पतितासी ॥ एक रेखा लंघीं रे ऐसी ॥ आला नर वाक्यासरसीं ॥

झालें ज्ञान आणिक तया ॥ १६ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ कवणे कुळीं जन्मलासी ॥ पतित म्हणे किरातवंशीं ॥ नाम आपुलें वनराखा ॥ १७ ॥ दुसरी रेखा लंघितां ॥ ज्ञान झालें मागुता ॥ बोलूं लागला अनेक वार्ता ॥ विस्मय करिती तये वेळीं ॥ १८ ॥ तिसरी रेखा लंघीं म्हणती ॥ त्यासी झाली ज्ञातिस्मृति ॥ म्हणे गंगापुत्र निश्चितीं ॥ वास तटीं गंगेच्या ॥ १९ ॥ लंघितां रेखा चवथी ॥ म्हणे आपण शूद्रजाती ॥ जात होतों आपुले वृत्तीं ॥ स्वामी मातें पाचारिलें ॥ २० ॥ लंघितां रेखा पांचवेसी ॥ झालें ज्ञान आणिक तयासी ॥ जन्म झाला वैश्यवंशीं ॥ नाम आपुलें सोमदत्त ॥ २१ ॥ सहावी लंघितां ॥ म्हणे आपण क्षत्रिय ख्याता ॥ नाम आपुलें विख्याता ॥ गोदावरी म्हणोनि ॥ २२ ॥ सातवी रेखा लंघितांक्षण ॥ अग्रजाती विप्र आपण ॥ वेदशास्त्रादि व्याकरण ॥ अध्यापक नाम आपुलें ॥ २३ ॥ श्रीगुरु म्हणाति तंयासी ॥ वेदशास्त्रीं अभ्यास म्हणसी ॥ आले

विप्र चर्चेसी ॥ वाद करीं त्यांसवें ॥ २४ ॥ अभिमंत्रोनि विभूति ॥ त्याचे सर्वांगीं प्रोक्षिती ॥ प्रकाशली ज्ञानज्योती ॥ त्या नरा परियेसा ॥ २५ ॥ जैसें मानस सरोवरास ॥ वायस जातां होती हंस ॥ तैसा गुरुहस्तस्पर्श ॥ पतित झाला ज्ञानराशी ॥ २६ ॥ नरसिंहसरस्वती जगद्गुरु ॥ त्रयमूर्तींचा अवतारू ॥ अज्ञानी लोक म्हणती नरू ॥ तेचि जाती अधःपाता ॥ २७ ॥ येणेंपरी पतितासी ॥ ज्ञान झालें आसमासी ॥ वेदशास्त्र सांगेंसीं ॥ म्हणों लागला तये वेळीं ॥ २८ ॥ जे आले चर्चेस विप्र ॥ भयचकित झाले फार ॥ जिव्हा तुटोनि झाले बधिर ॥ हृदयशूळ तात्काळीं ॥ २९ ॥ विप्र थरथरां कांपती ॥ श्रीगुरुचरणीं लोळती ॥ आमुची आतां काय गति ॥ जगज्ज्योती स्वामिया ॥ ३० ॥ श्रीगुरुद्रोही झालों जाण ॥ धिक्कारिले ब्राह्मण ॥ तूं अवतार गौरीरमण ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ३१ ॥ वेष्टोनियां मायापाशीं ॥ झालों आपण महातामसी ॥ नोळखों तुझ्या स्वरूपासी ॥ क्षमा करणें स्वामिया ३२ ॥ तूं कृपाळू सर्वां भूतीं ॥ आमुचे दोष नाणीं चित्तीं ॥ आम्हां द्यावी उद्धारगति ॥




[ अ० २७ ] अभिमंत्रोनी विभूती । त्याचे सर्वांगा प्रोक्षितां । प्रकाशली ज्ञानज्योती । त्या नरा परियेसा ॥०२५०॥

म्हणोनि चरणीं लागती ॥ ३३ ॥ एखादे समयीं लीलेसी ॥ पर्वत करसी तृणासरसी ॥ पर्वत पाहसी कोपेंसीं ॥ भस्म होय निर्धारीं ॥ ३४ ॥ तूंचि सृष्टि स्थापिसी ॥ तूंचि सर्वांचें पोषण करिसी ॥ तूंचि कर्ता प्रळयासी ॥ त्रिमूर्ति जगद्गुरू ॥ ३५ ॥ तुझा महिमा वर्णावयासी ॥ मति नाहीं आम्हांसी ॥ उद्धरावें दीनासी ॥ शरणागता वरप्रदा ॥ ३६ ॥ ऐसें विप्र विनविती ॥ श्रीगुरु त्यासी निरोप देती ॥ तुम्हीं क्षोभविला भारती ॥ त्रिविक्रम महामुनि ॥ ३७ ॥ आणिक केले बहुत दोषी ॥ निंदिलें सर्व विप्रांसी ॥ पावाल जन्म ब्रह्मराक्षसी ॥ आपुली जोडी भोगावी ॥ ३८ ॥ आपुलें आर्जव आपणापासीं ॥ भोगिजे पुण्यपापासी ॥ निष्कृति न होतां क्रियमाणासी ॥ गति नाहीं परियेसा ॥ ३९ ॥ श्रीगुरुवचन ऐकोनि ॥ लागती विप्र दोघे चरणीं ॥ कधीं उद्धरों भवार्णवीं ॥ म्हणोनियां विनविती ॥ ४० ॥ श्रीगुरुनाथ कृपामूर्ति ॥ त्या विप्रांतें निरोप देती ॥ ब्रह्मराक्षस व्हाल मख्याति ॥

संवत्सर बारापर्यंत ॥ ४१ ॥ अनुतप्त झालिया कारण ॥ शांतिरूप असाल जाण ॥ जो कां शुकनारायण ॥ प्रथम वाक्य म्हणतसां ॥ ४२ ॥ तुमचें पाप शुद्ध होतां ॥ द्विज येईल पर्यटतां ॥ पुढील वाक्य तुम्हां सांगतां ॥ उद्धारगति होईल ॥ ४३ ॥ आतां जावें गंगेसी ॥ स्थान बरवें बैसावयासी ॥ म्हणोनि निरोपिती त्यांसी ॥ गेले विप्र ते वेळीं ॥ ४४ ॥ निघतां ग्रामाबाहेरी ॥ हृदयशूळ अपरंपारी ॥ जातां क्षण नदीतीरीं ॥ विप्र पंचत्व पावले ॥ ४५ ॥ आपण केल्या कर्मासी ॥ प्रयत्न नाहीं आणिकासी ॥ ऐसे विप्र तामसी ॥ आत्मघातकी तेचि जाणा ॥ ४६ ॥ श्रीगुरुवचन येणेंपरी ॥ अन्यथा नव्हे निर्धारीं ॥ झाले राक्षस द्विजवरी ॥ बारा वर्षीं गति पावले ॥ ४७ ॥ विप्र पाठविले गंगेसी ॥ मागें कथा वर्तली कैसी ॥ नामधारक शिष्यासी ॥ सिद्ध सांगे अवधारा ॥ ४८ ॥ पतित झाला महाज्ञानी ॥ जातिस्मरण सप्तजन्मीं ॥ पूर्वापर विप्र म्हणोनि ॥ निर्धार केला मनांत

॥ ४९ ॥ नमन करून श्रीगुरूसी ॥ विनवी पतित भक्तीसीं ॥ अज्ञानमाया- तिमिरासी ॥ ज्योतिरूप जगद्गुरू ॥ ५० ॥ विप्र होतों पूर्वीं आपण ॥ केवीं झालों जातिहीन ॥ सांगावें जी विस्तारोन ॥ त्रिकाळज्ञान अंतर- साक्षी ॥ ५१ ॥ जन्मांतरीं आपण देख ॥ पाप केलें महादोष ॥ कीं विरोधिले विनायक ॥ नृसिंहसरस्वती सांग पां ॥ ५२ ॥ ऐसें वचन ऐकोनी ॥ सांगती गुरु प्रकाशूनि ॥ म्हणोनि सांगती सिद्धमुनि ॥ नामधारक शिष्यासी ॥ ५३ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्र विस्तार ॥ पुढील कथा ऐकतां नर ॥ पतित होय ब्रह्मज्ञानी ॥ ५४ ॥ ऐसी पुण्यपावन कथा ॥ ऐकतां उद्धार अनाथा ॥ पावे चतुर्विध पुरुषार्था ॥ निश्चयेंसीं जाण पां ॥ ५५ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपा- ख्याने सिद्धनामधारकसंवादे मदोन्मत्तविप्रशापकथनं नाम सप्तविंशोऽ- ध्यायः ॥ २७ ॥ ओंवीसंख्या ॥ ५५ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ पुढील कथा सांग आम्हांसी ॥ उल्हास माझे मानसीं ॥ गुरुचरित्र अतिगोड ॥ १ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ कथा असे अतिविशेष ॥ ऐकतां जाती सर्व दोष ॥ ज्ञानज्योतिप्रकाशें ॥ २ ॥ श्रीगुरु म्हणती पतितासी ॥ आपुलें पूर्वजन्म पुससी ॥ सांगेन ऐक परियेसीं ॥ चांडालजन्म होणार गति ॥ ३ ॥ पुण्य-पापांची गति ॥ आपुलें आर्जव भोगिती ॥ कर्मविपाकीं असे ख्याति ॥ नीचश्रेष्ठकर्मानुसारी ॥ ४ ॥ विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र वर्ण ॥ यांचेपासाव चांडाळ वर्ण ॥ उपजला असतां ज्ञातिहीन ॥ जातीविभाग कर्मापरी ॥ ५ ॥ विप्रस्त्रियेपासीं देखा ॥ शूद्र जाय व्यभिचारिका ॥ पिंड उपजे तो चांडा-लिका ॥ सोळावी जाती चांडाल ॥ ६ ॥ हें मूळ उत्पत्तीचें लक्षण ॥ नाना दोषांचें आचरण ॥ तेणें हीन जन्म घेणें ॥ विप्रादि चारी वर्णांसी ॥ ७ ॥ या दोषाचा विस्तार ॥ सांगतों कीं सविस्तर ॥ विप्रें करितां अनाचार ॥

जन्म हीनजातीं पावे ॥ ८ ॥ गुरु अथवा माता पिता ॥ सांडोनि जाय तत्त्वतां ॥ चांडालजन्म होय निरुत्ता ॥ सोडितां कुलस्त्रियेसी ॥ ९ ॥ कुल-देवता सोडोनि एका ॥ पूजा करी आणिका ॥ तो होय चांडाळ देखा ॥ सदा अनृत बोले नर ॥ १० ॥ सदा जीवहिंसा करी ॥ कन्याविक्रय मनो-हरी ॥ लटिकेंचि आपण प्रमाण करी ॥ तोही जन्मे चांडालयोनीं ॥ ११ ॥ शूद्रहस्तें करी भोजन ॥ अश्वविक्रय करी ब्राह्मण ॥ तोही चांडाल होय जाण ॥ सदा शूद्रसंपर्कें ॥ १२ ॥ शूद्रस्त्रीसीं सदा संग ॥ नित्य असे दासी-योग ॥ गृहभांडीं आतळती त्याग ॥ तेणें देवपितृकर्मं करी ॥ १३ ॥ तोही पावे हीनयोनी ॥ जो कां अग्नि घाली रानीं ॥ गायवांसरांसी विघ-डोनि ॥ वेगळीं करी तोही होय चांडाल ॥ १४ ॥ सोडी आपुल्या जन-नीतें ॥ आणि मारी लेंकरांतें ॥ वेगळीं करी आपुल्या सत्तें ॥ तोही जन्मे

१ वेश्यागमन. २ शिवताव.

चांडाल ॥ १५ ॥ बैलावरी विप्र बैसे ॥ शूद्रान्न जेवी हर्षें ॥ चांडाल होय भरंवसें ॥ ऐसें म्हणती श्रीगुरु ॥ १६ ॥ विप्र तीर्थास जावोन ॥ श्राद्धादि न करी जाण ॥ परान्न प्रतिग्रह घेणें ॥ तो होयं चांडाल ॥ १७ ॥ षट्-कर्मेंरहित विप्र देखा ॥ कपिला गाईचें दुग्ध ऐका ॥ न करितां अभि-षेका ॥ क्षीरपान जो करी ॥ १८ ॥ तोही पावे चांडालयोनी ॥ तुळसी-पत्रें ओरपोनि ॥ पूजा करी देवांलागोनि ॥ शालिग्राम शूद्रें भजलिया ॥ १९ ॥ न सेवीच मातापितां ॥ त्यजी त्यांसी न प्रतिपाळितां ॥ चांडाल होय जन्मतां ॥ सप्तजन्मीं कृमि होय ॥ २० ॥ पहिली एक स्त्री असतां ॥ दुजी करोनी तिसी त्यजितां ॥ होय जन्म त्यासी पतिता ॥ आणिक सांगेन एक नवल ॥ २१ ॥ श्रमोनि अतिथि आला असतां ॥ वेद म्हण-वोनि अन्न घालितां ॥ जन्म पावे हा तत्त्वतां ॥ चांडालयोनीं परियेसा

१ दान.

॥ २२ ॥ योग्य विप्रांतें निंदिती ॥ आणिक जाती पूजिती ॥ चांडाल-योनीं जाती ॥ वृत्तिलोप केलिया ॥ २३ ॥ तळीं विहिरी फोडी मोडी ॥ शिवालयीं पूजा तोडी ॥ ब्राह्मणांचीं घरें मोडी ॥ तोही जन्मे पतितकुळीं ॥ २४ ॥ स्वामिस्त्रियेसीं ॥ शत्रुमित्रविश्वासस्त्रीसीं ॥ जो करी व्यभिचा-रासी ॥ तोही जन्मे पतितागृहीं ॥ २५ ॥ दोघी स्त्रिया जयासी ॥ त्यांत ठेवी प्रपंचेंसीं ॥ अतिथि आलिया अस्तमानासी ॥ ग्रास न दे तोही पतित होय ॥ २६ ॥ त्रिसंध्यासमयीं देखा ॥ जो विप्र जेवी अविवेका ॥ भाक देउनी फिरे निका ॥ तो जन्मे चांडालयोनीं ॥ २७ ॥ राजे देती भूमि-दान ॥ आपण घेती हिरोन ॥ संध्याकालीं करी शयन ॥ तोही होय चांडाल ॥ २८ ॥ वैश्वदेवकालीं अतिथीसी ॥ जो करी दुष्टोत्तरेंसी ॥ अन्न न देई तयासी ॥ कुक्कुटजन्म होवोनि उपजे ॥ २९ ॥ गंगातीर्थांची निंदा

१ उपजीविकेच्या साधनाचा उच्छेद. २ आवडनावड.

करी ॥ एकादशीस भोजन करी ॥ स्वामीस सोडी समरीं ॥ चांडालयोनीं तया जन्म ॥ ३० ॥ स्त्री संभोगी पर्वणीसीं ॥ अथवा हरिहरादिवशीं ॥ वेद शिकवी शूद्रासी ॥ चांडालयोनीं जन्म पावे ॥ ३१ ॥ मृत्युदिवसीं न करी श्राद्ध ॥ केलें पुण्य सांगे प्रसिद्ध ॥ वांटेकरांसी करी भेद ॥ चांडालयोनीं जन्म पावे ॥ ३२ ॥ ग्रीष्मकालीं अरण्यांत ॥ पोई घालिती ज्ञानवंत ॥ तेथें विघ्न जो करीत ॥ तोही जन्मे चांडलयोनीं ॥ ३३ ॥ नाडीभेद न कळतां वैद्यकी ॥ जाणोनि औषधें दे आणिकीं ॥ तो होय महापातकी ॥ चांडालयोनींत संभवे ॥ ३४ ॥ जारण मारण मोहनादि ॥ मंत्र जपती कुबुद्धि ॥ जन्म चांडाल होय त्रिशुद्धी ॥ वेदमार्ग त्यजितां विप्रें ॥ ३५ ॥ श्रीगुरूसी नर म्हणे कोण ॥ हरिहरांतें निंदे जाण ॥ अन्य देवतांचें करी पूजन ॥ तो नर पतित होय ॥ ३६ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र ॥ आपुलें

कर्म त्यजूनि मंद ॥ आणिक कर्म आचरे सदा ॥ तोही होय चांडाल ॥३७॥ शूद्रापासूनी मंत्र शिके ॥ त्यासी घडती सर्व पातकें ॥ गंगोदक क्षीरोदकें ॥ श्वानचर्मीं घातले परी ॥ ३८ ॥ विधवा स्त्रीशीं संग करी ॥ शिव्या देऊन अतिथि जेववी घरीं ॥ श्राद्धदिनीं पिंड न करी ॥ चांडालयोनीं तो जन्मे ॥ ३९ ॥ माता पिता गुरु द्वेषी ॥ तो जन्मे चांडालयोनीसी ॥ आणिक जन्म पापवंशीं ॥ उपजोनि येती परियेसा ॥ ४० ॥ गुरूची निंदा करी हर्षीं ॥ सदा असे विप्रद्वेषी ॥ वेदचर्चा करी बहुवशी ॥ तो होय ब्रह्मराक्षस ॥ ४१ ॥ भजे आपण एक दैवत ॥ दुजे देव निंदा करीत ॥ तो होय अप-स्मारित ॥ दरिद्ररूपें पीडतसे ॥ ४२ ॥ माता पिता गुरु वर्जोन ॥ वेगळा होय स्त्री आपण ॥ बेरडाचे पोटीं उपजोन ॥ रोगी होऊन राहतसे ॥ ४३ ॥ सदा वेद दूषी आपण ॥ अवमानीत ब्राह्मण ॥ कर्मभ्रष्ट होय आपण ॥ मूत्र-कृच्छ्ररोगी होय ॥ ४४ ॥ लोकांचें वर्मकर्म आपण ॥ सदा करी उच्चारण ॥

हृदयरोगी होय जाण ॥ महाकष्ट भोगीतसे ॥ ४५ ॥ गर्भपात करी स्त्रियेसी॥ वांझ होवोनि उपजे परियेसीं ॥ पुत्र झालिया मरती त्वरेसीं ॥ गर्भपात करूं नये ॥४६॥ धर्मशास्त्रादि पुराण ॥ सांगतां नायके जाण ॥ आणिक जेवितां दृष्टि आपण ॥ बहिरट होवोनि उपजे ॥४७॥ पतितासवें करी इष्टती॥गर्दभ-जन्म पावती ॥ त्यांसी रस औषध घेती ॥ मृगयोनीं जन्मे तो ॥ ४८ ॥ ब्रह्महत्या केली जरी ॥ क्षयरोगी होय निर्धारीं ॥ सुरापानी ओळ्खा परी ॥ श्यामदंत उपजेल ॥ ४९ ॥ अश्ववध गोवध करितां ॥ वांझ ज्वरी होय निश्चितां ॥ सर्वेचि होय अनुतप्तता ॥ दोष कांहीं नाहीं त्यासी ॥५०॥ विश्वास-घातकी नरासीं ॥ जन्म होय ऐसा त्यासी ॥ अन्न जेवितां वांति उर्वशी ॥ अन्नवैरी तो होय ॥ ५१ ॥ सेवक एकाचा चाळवोन ॥ घेवोनि जाती जे जन ॥ त्यांसी होय जाण बंधन ॥ कारागृह भोगीतसे ॥ ५२ ॥ सर्पजाती

१ पतिवांजवळन. २ दारू पिणारा. ३ काळ्या दांतांचा.

मारी नर ॥ सर्पयोनी पुढें निर्धार ॥ ऐसे दोष अपार ॥ आतां तस्करप्रक-
रण सांगेन ॥ ५३ ॥ स्त्रियांतें चोरूनि घेउनी जाय ॥ मतिहीन जन्म होय॥
सदा क्लेशी आपण होय ॥ अंतीं जाय नरकासी ॥ ५४ ॥ सुवर्ण चोरी करी
नर ॥ प्रमेहव्याधि होय निर्धार ॥ पुस्तक चोरितां नर ॥ अंध होउनी उपजे
देखा ॥ ५५ ॥ वस्त्रचोरी करी जरी ॥ स्वत्री रोगी होय निर्धारीं ॥ गण-
द्रव्यचोरी करी ॥ गंडमाळा होती तया ॥ ५६ ॥ श्वासोच्छ्वासीं असेल नर
जरी ॥ त्याची वस्तु करी चोरी ॥ सदा वसे बंधन घरीं ॥ ब्रह्मांडपुराणीं
बोलिलें असे ॥ ५७ ॥ परद्रव्य-अपहार देखा ॥ परदत्तापहार विशेषा ॥
परद्वेषी नर ऐका ॥ अपुत्री होउनी उपजे ॥५८॥ अन्नचोरी केलिया देखा॥
गुल्मव्याधि होय ऐका ॥ धान्य करील तस्करिका ॥ रक्तांग होय दुर्गंध
शरीर ॥ ५९ ॥ कां एखादा तैल चोरी ॥ तोही दुर्गंधी पावे शरीरीं ॥

१ समुदायाचें धन.

परस्त्रीब्रह्मस्व अपहारी ॥ ब्रह्मराक्षसजन्म पावे ॥ ६० ॥ मोतीं माणिक रत्नें देखा ॥ चोरी करी नर ऐका ॥ हीनजातीसी जन्म निका ॥ पावे नर अवधारा ॥ ६१ ॥ पत्रशाखादि फळें चोरी ॥ खरूजी होय अपरंपारी ॥ रक्तांगी होय निर्धारीं ॥ गोचिड होय तो नर ॥६२॥ कांस्य लोह कार्पास लवण ॥ तस्करितां नरा जाण ॥ श्वेतकुष्ठ होय निर्गुण ॥ विचारोनि रहाटावें ॥ ६३ ॥ देवद्रव्यापहारी देखा ॥ देवकार्यनाश अपहार देखा ॥ पंडुरोगी तो निका ॥ फळचोरी विद्रूपी ॥ ६४ ॥ परनिक्षेपचोरी करी देखा ॥ करितां होय सदा शोका॥धनतस्कर उष्ट्र ऐका॥जन्म पावे अवधारा ॥६५॥ फळचोरी होय वनचर॥जलचोरही होय कावळा थोर॥गृहोपकरणें तस्कर॥ काकजन्म तो पावे ॥ ६६ ॥ मधुतस्कर अवधारीं ॥ जन्म पावे होय घारी॥ गोरस करी चोरी ॥ कुष्ठी होय परियेसा ॥ ६७ ॥ श्रीगुरु म्हणती पति-

तासी ॥ जन्म पावे ऐसिया दोषीं ॥ आतां सांगेन व्यभिचारप्रकरणेसी ॥ शांतिपर्वीं बोलिलें असे ॥ ६८ ॥ परस्त्री आलिंगिया देखा ॥ शतजन्म श्वान निका ॥ पुढें मागुती सप्तजन्मिका ॥ भोगी दुःखा अवधारा ॥६९॥ परस्त्रीयोनी पाहे दृष्टीनें ॥ जन्मे तो अंधत्वपणें ॥ बंधुभार्यासंपर्क करणें ॥ गर्दभजन्म तो पावे ॥ ७० ॥ तोही जन्म सोडोनि ॥ निघोनि जाय सर्पयोनीं ॥ पुनः नरकीं जावोनि ॥ नाना कष्ट भोगीतसे ॥ ७१ ॥ सखीभार्यासवें ऐका ॥ मातुळस्त्री असे विशेखा ॥ येखादा करी संपर्का ॥ श्वानयोनीं जन्म पावे ॥ ७२ ॥ परस्त्रियांचें वदन ॥ न करावें कदा अवलोकन ॥ कुबुद्धीं करितां निरीक्षण ॥ चक्षुरोगी होउनी उपजे ॥ ७३ ॥ आपण असे शूद्रजाति ॥ विप्रस्त्रीशीं करी रति ॥ तीं दोघेंही कृमि होती ॥ हें निश्चित अवधारा ॥ ७४ ॥ सदा शूद्रसंपर्क करी ॥ याची स्त्री व्यभिचारी ॥ जन्म

१ मित्र. २ पहाणें.

पावे हो कुतरी ॥ महादोष बोलिलासे ॥ ७५ ॥ ऐसें तया पतिताप्रती ॥ श्रीगुरु आपण निरोपिती ॥ ऐकत होता त्रिविक्रमभारती ॥ प्रश्न केला श्रीगुरूसी ॥ ७६ ॥ स्वामी निरोपिले धर्म सकळ ॥ ऐकतां होय मन निर्मळ ॥ जरी घडलें एक वेळ ॥ पाप जाय कवणेपरी ॥ ७७ ॥ श्रीगुरु म्हणती त्रिविक्रमासी ॥ प्रायश्चित असे पापासी ॥ पश्चात्ताप होय ज्यासी ॥ पाप नाहीं सर्वथा ॥७८॥ पाप असे थोर केलें ॥ अंतःकरणीं असे खोंचलें ॥ त्यासी प्रायश्चित्त भलें ॥ कर्मविपाकीं बोलिलें ॥७९॥ प्रायश्चित्ताचीं विधानें ॥ सांगेन ऐका स्थिर मनें ॥ अनेक ऋषींचीं वचनें ॥ तीं सांगेन ऐका तुम्ही ॥ ८० ॥ प्रथम व्हावा ब्रह्मदंड[1] ॥ तेणें होय पापखंड ॥ गोदानें सालंकृत अखंड ॥ अशक्त तरी द्रव्य द्यावें ॥ ८१ ॥ निष्क अथवा अर्धनिष्क ॥ सूक्ष्म पाप पाव निष्क ॥ स्थूलसूक्ष्म असेल पातक ॥ तेणें विधीं द्रव्य द्यावें

१ पद्धती.

॥ ८२ ॥ अज्ञानकृत पापासी ॥ पश्चात्तापें शुद्धि परियेसीं ॥ गुरुसेवा तत्परेंसी ॥ केलिया गुरु निवारी ॥ ८३ ॥ नेणतां पाप केलियासी ॥ प्रायश्चित्त असे परियेसीं ॥ प्राणायाम द्विशतेसी ॥ पुण्यतीर्थीं दहा स्नानें ॥ ८४ ॥ तीन गुंजा सुवर्ण द्यावें ॥ नदी आचरावें दोन गांवें ॥ सौम्य पातक याचि भावें ॥ जाती पापें परियेसीं ॥ ८५ ॥ स्त्रीपुरुष दोघांत एक ॥ करितीं पुण्यपाप दोष ॥ दोघेंही पडती दोषांत ॥ दोघें आचरावें प्रायश्चित्त ॥ ८६ ॥ आणिक एक असे प्रकार ॥ जेणें पाप होय दूर ॥ गायत्रीजप दहा सहस्र ॥ करावा तेणें वेदमंत्र ॥ ८७ ॥ याचें नांव गायत्रीकृच्छ्र ॥ महादोषी करी पवित्र ॥ ऐसें करावें विचित्र ॥ श्रीगुरु सांगती त्रिविक्रमासी ॥ ८८ ॥ प्राजापत्यकृच्छ्र देखा ॥ असे विधि अतिविशेषा ॥ भोजन करावें भुक्त एका ॥ अथवा अयाचित भिक्षा ॥ ८९ ॥ उपवास करावे तीन दिवस ॥ स्मरावें गुरुचरणांस ॥ येणें जाती सौम्य दोष ॥ जे आपणासी सामान्य

॥ ९० ॥ अतिकृच्छ्र असे एक ॥ एकाचितें मुनि ऐक ॥ दोष असती सामान्यक ॥ अज्ञानेंच केलिया ॥ ९१ ॥ अन्न घ्यावें संप्तविंशति ग्रास ॥ सकाळीं बारा रात्रीं पंचदश ॥ अथवा दोनी अष्टग्रास ॥ अयाचित अन्न घ्यावें ॥९२॥ ऐसे सौम्य पातकासी ॥ विधि असती परियेसीं ॥ मास एक नेमेंसीं ॥ अंजुली एक जेवावें ॥ ९३ ॥ उपवास तीन करावे देखा ॥ प्रकार सांगेन आणिका ॥ तीन दीन उपोषका ॥ घृतपारणें करावें ॥ ९४ ॥ तीन दिवस घृत घेवोनि ॥ क्षीर घ्यावें दिवस तीनी ॥ तीन दिवस वायु भक्षोनि ॥ पुनः क्षीर एक दिवस ॥ ९५ ॥ एखादा असेल अशक्त ॥ तयासी असे एक व्रत ॥ तीळ गुळ लाह्या पीठ ॥ उपवास एक करावा ॥ ९६ ॥ पर्णकृच्छ्र करा ऐसी ॥ पर्णोदक घ्यावें प्रतिदिवशीं ॥ करावे तितके उपवासी॥ पश्चात्तापें प्राशन कीजे ॥ ९७ ॥ कमल बिल्व अश्वत्थ ॥ कुशोदक बिंदुवे

१ सत्तावीस.

नित्य ॥ पान करावे सत्य ॥ पर्णकृच्छ्र परियेसा ॥ ९८ ॥ आणिक एक प्रकार ॥ करी चांद्रायण-आचार ॥ कुक्कुटांडप्रमाण[1] आहार ॥ ग्रास घ्यावे वर्धमानी ॥ ९९ ॥ अमावास्येसी एक ग्रास ॥ पौर्णिमेसी पंचदश ॥ कृष्ण-पक्षीं उतरत ॥ दुसरें मासीं हविष्यान्न ॥ १०० ॥ आपलें पाप प्रगटूनी ॥ उच्चारावें सभास्थानीं ॥ पश्चात्तापें जळूनि ॥ पाप जाय अवधारा ॥ १ ॥ आतां सांगेन तीर्थकृच्छ्र ॥ यात्रा करावी पवित्र ॥ वाराणसी श्वेतपर्वत ॥ स्नानमात्रें पापें जाती ॥ २ ॥ वरकड तीर्थी गेलियासी ॥ गायत्रीजप सहस्रेसी ॥ पाप जाय त्वरेंसीं ॥ अगस्तीवचन बोलिलें असे ॥ ३ ॥ समुद्र-सेतुबंधेसी ॥ स्नान केलिया परियेसीं ॥ भ्रूणहत्यापाप नाशी ॥ कृतघ्नादि पातकें ॥ ४ ॥ विधिपूर्वक शुचीसी ॥ जप कोटी गायत्रीसी ॥ ब्रह्महत्यापाप नाशी ॥ ऐकें त्रिविक्रम एकचित्तें ॥ ५ ॥ लक्ष गायत्री जप केलिया ॥

१ कोंबड्याचें अंडें. ( त्याच्या एवढा. )

सुरापानपाप जाय लया ॥ सुवर्णचोरी केलिया ॥ सात लक्ष जपावें ॥ ६ ॥ अष्ट लक्ष गुरुतंल्पगासी ॥ गायत्री जपतां पाप नाशी ॥ आतां सांगेन परियेसीं ॥ वेदाक्षरें पाप दूर ॥ ७ ॥ पवमानसूक्त चत्वारी ॥ पठण करितां ब्रह्महत्या दूरी ॥ इंद्रमित्र अवधारीं ॥ एक मास जपावें ॥ ८ ॥ सुरापानादि पातकें ॥ जातील येणें सूक्तकें ॥ शुनःशेपा नाम सूक्तें ॥ सुवर्णहर पाप जाय ॥ ९ ॥ पवमानशन्नसूक्त ॥ पठण करितां हविष्योक्त ॥ मास एक पठत ॥ गुरुतंल्पगादिक हरती ॥ ११० ॥ पंच मास सहा मास ॥ मिताहार करुनी पुरुष ॥ पुरुषसूक्तें कर्मनाश ॥ पंच महापापें नासती ॥ ११ ॥ त्रिमधू म्हणजे मंत्रसूक्त ॥ सुवर्णात्रीनास मंत्र ॥ जपावे नाचिकेत ॥ समस्त पातकें प्रायश्चित्त ॥ १२ ॥ नारायणपन्न देखा ॥ जपावें भक्तिपूर्वका ॥ नाशी पंच महापातका ॥ प्रीतिपूर्वक जपावें ॥ १३ ॥ त्रिपदा नाम गायत्रीसी ॥ ज-

१ गुरुभार्येशीं गमन.

पती जे भक्तींसीं ॥ अघमर्षण त्रिरावृत्तेसी ॥ सप्त जन्म पाप जाय ॥ १४ ॥
अपांमध्यें पन्नासी ॥ तद्विष्णो नाम सूक्तेसी ॥ जपती जे जन भक्तीसीं ॥
सप्त जंन्म पाप जाय ॥ १५ ॥ आणिक असे विधान देखा ॥ अज्ञानकृत
दोषादिकां ॥ अनुतप्त होवोनि विशेषा ॥ पंचगव्य प्राशन कीजे ॥ १६ ॥
गोमूत्र गोमय क्षीर ॥ दधि घृत कुशसार ॥ विधिमंत्रें घ्यावें निर्धार ॥
पहिले दिनीं उपवास ॥ १७ ॥ नीलवर्ण गोमूत्र ॥ कृष्णगोमय पवित्र ॥
ताम्र गायत्रीचें क्षीर ॥ श्वेतधेनूचें दधि घ्यावें ॥ १८ ॥ कपिला गाईचें तूप
बरवें ॥ ऐसें पंचगव्य बरवें घ्यावें ॥ एकेकाचें क्रम भावें ॥ सांगेन सर्व अव-
धारा ॥ १९ ॥ गोमूत्र घ्यावें पाव शेर ॥ अंगुष्ठपर्व गोमय पवित्र ॥ क्षीर
पावणे दोन शेर ॥ दधि तीन पाव घ्यावें ॥ १२० ॥ घृत घ्यावें पाव शेर ॥
तितुकेंचि मिळवावें कुशनीर ॥ घेतां मंत्र उच्चार ॥ विस्तारोन सांगेन ॥ २१ ॥

१ दर्भोदक. २ वजन.

कुशांसहित सहा रसें ॥ एकेकासी मंत्र पृथक् असे ॥ प्रथम मंत्र इरावती असे ॥ इदं विष्णु दुजा देखा ॥ २२ ॥ मानस्तोक मंत्र तिसरा ॥ प्रजापति चतुर्थ अवधारा ॥ पंचम गायत्री उच्चारा ॥ सहावी व्याहृति प्रणवपूर्वका ॥ ॥ २३ ॥ ऐसें मंत्रोनि पंचगव्य ॥ प्यावें अनुतप्त एकभाव ॥ अस्थिगत चर्म-गत पूर्व ॥ पापें जाती अवधारा ॥ २४ ॥ गाई न मिळतां इतुके जिन्नसीं ॥ कपिला गाय मुख्य परियेसीं ॥ दर्शनमात्रें दोष नाशी ॥ कपिला गाई उत्तम ॥ २५ ॥ पंचमहापातक नांवें ॥ ब्रह्महत्या सुरापान जाणावें ॥ स्वर्ण-स्तेय गुरुतल्पग जाणावें ॥ पांचवा त्यांसवें मिळालेला ॥ २६ ॥ चौघे पात-की देखा ॥ पांचवा तयां मिळतां देखा ॥ त्यांसहित पंचमहापातका ॥ आहेती पापें परियेसा ॥ २७ ॥ सुरापानी ब्रह्मघातकी ॥ सुवर्णस्तेय गुरु-तल्पकी ॥ पांचवा महापातकी ॥ जो सानुकूळ मिळे तो ॥ २८ ॥ ऐसें पातक घडे त्यासी ॥ प्रायश्चित्त परियेसीं ॥ श्रीगुरुसंतोषीं ॥ अनुग्रहें पुनीत

॥ २९ ॥ एखादा मिळेल शास्त्रज्ञ ॥ स्वधर्माचारें अभिज्ञ ॥ त्याच्या अनुग्रहें पापघ्न ॥ पुनीत होय अवधारा ॥ १३० ॥ ऐसें श्रीगुरु त्रिविक्रमासी ॥ प्रायश्चित्त सांगती परियेसीं ॥ सकल विप्र संतोषी ॥ ज्ञानप्रकाशें होती ॥ ॥ ३१ ॥ श्रीगुरु म्हणती पतितासी ॥ पूर्वीं तूं विप्र होतासी ॥ माता पिता गुरु दूषी ॥ तेणें होय चांडालजन्म ॥ ३२ ॥ आतां सांगतों ऐक ॥ स्नानसंगमीं मास एक ॥ केलिया दोष जाती निःशंक ॥ पुनः विप्रजन्म होसी ॥ ३३ ॥ पतित म्हणे स्वामीसी ॥ तव दर्शन जाहलें आम्हांसी ॥ कावळा जातां मानसासी ॥ राजहंस तो होतसे ॥ ३४ ॥ तैसें तव दर्शनमात्रें ॥ पवित्र झालीं सकळ गात्रें ॥ तारावें आतां त्वां कृपापात्रें ॥ शरणागतासी ॥ ३५ ॥ परिस लागतां लोखंडासी ॥ सुवर्ण होय तत्क्षणेसी ॥ सुवर्ण मागुती लोहासी ॥ केवीं मिळे स्वामिया ॥ ३६ ॥ तव दर्शनसुधारसीं ॥ आपण झालों ज्ञानराशी ॥ अभिमंत्रोनि आम्हांसी विप्रांमध्यें मिळवावें ॥

॥ ३७ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ गुरु बोलती हांसोन ॥ तव देह जाति-हीन ॥ विप्र केवीं म्हणतील ॥ ३८ ॥ पतिताच्या गृहासी ॥ उपजोनि तूं वाढलासी ॥ ब्रह्मत्व केवीं पावसी ॥ विप्र निंदा करितील ॥ ३९ ॥ पूर्वीं ऐसा विश्वामित्र ॥ क्षत्रियवंशी गाधिपुत्र ॥ तपोबळें म्हणवी पवित्र ॥ म्हणे तो विप्र आपणां ॥ १४० ॥ ब्रह्मयाचीं शत वर्षें ॥ तप केलें महाक्लेशें ॥ त्याचे बळें म्हणवीतसे ॥ ब्रह्मऋषी आपणां ॥ ४१ ॥ इंद्रादि सुरवरांसी ॥ विनविता झाला परियेसीं ॥ आपणातें ब्रह्मर्षि ॥ म्हणा ऐसें बोलतसे ॥४२॥ देव म्हणती तयासी ॥ आम्हां गुरु वसिष्ठ ऋषि ॥ जरी तो बोले ब्रह्मऋषि ॥ तरी आम्ही अंगिकारूं ॥ ४३ ॥ मग त्या वसिष्ठासी ॥ विनवी विश्वामित्र ऋषि ॥ विप्र म्हणा आपणासी ॥ केलें तप बहुकाळ ॥ ४४ ॥ वसिष्ठ म्हणे विश्वामित्र ॥ क्षत्रिय तपास अपात्र ॥ देह टाकोनि मग पवित्र ॥ विप्रकुळीं जन्मावें ॥ ४५ ॥ मग तुझा होईल व्रतबंध ॥ होईल गायत्रीप्रबोध ॥ तधीं

तुवां होसी शुद्ध ॥ ब्रह्मऋषि नाम तुझें ॥४६॥ कांहीं केल्या न म्हणे विप्र ॥ मग कोपला विश्वामित्र ॥ वसिष्ठाचे शत पुत्र ॥ मारिता झाला तये वेळीं ॥ ४७ ॥ ब्रह्मज्ञानी वसिष्ठ ऋषि ॥ नव्हे कदा तामसी ॥ अथवा न म्हणे ब्रम्हऋषि ॥ तया विश्वामित्रासी ॥ ४८ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ विश्वामित्र कोपेंसीं ॥ हातीं घेउनी पर्वतासी ॥ घालूं आला वसिष्ठावरी ॥ ४९ ॥ विचार करीत मागुती मनीं ॥ जरी वधीन वसिष्ठमुनि ॥ आपणातें न म्हणे कोणी ॥ ब्रह्मऋषि म्हणोनियां ॥ १५० ॥ इंद्रादि देव समस्त ऋषि ॥ म्हणती वसिष्ठवाक्यासरसी ॥ आपण म्हणों ब्रह्मऋषि ॥ अन्यथा नाहीं म्हणोनियां ॥५१॥ ऐशा वसिष्ठमुनीस ॥ मारितां यासी फार दोष॥म्हणोनि टाकी गिरिवरास ॥ भूमीवरी परियेसा ॥ ५२ ॥ अनुतप्त झाला अंतःकरणीं॥ वसिष्ठें तें ओळखूनि ॥ ब्रह्मऋषि म्हणोनि ॥ पाचारिलें तये वेळीं ॥ ५३ ॥ संतोषोनि विश्वामित्र ॥ म्हणे बोल बोलिला पवित्र ॥ म्हणे घरीं

अन्नमात्र ॥ तुम्हीं ध्यावें स्वामिया ॥ ५४ ॥ संतोषोनि वसिष्ठ ॥ तयालागीं बोलत ॥ म्हणे शरीर हें निभ्रांत ॥ सूर्यकिरणीं पचवावें ॥ ५५ ॥ विश्वामित्रें अंगिकारिलें ॥ सूर्यकिरणें देहा जाळिलें ॥ सहस्रकिरणीं तापलें ॥ देह सर्व भस्म झाला ॥ ५६ ॥ विश्वामित्र महामुनि ॥ अतिसामर्थ्य अनुष्ठानीं ॥ पहिला देह जाळोनि ॥ नूतन देह धरियेला ॥५७॥ ब्रह्मर्षि तेथोन ॥ विश्वामित्र झाला जाण ॥ सकाळांसी मान्य ॥ महाराज ॥ ५८ ॥ मग म्हणती सकळ मुनि ॥ विश्वामित्र ब्रह्मज्ञानी ॥ ब्रह्मऋषि म्हणोनि ॥ झाला त्रिभुवनीं प्रख्यात ॥ ५९ ॥ या कारणें तव देह ॥ विसर्जावा जन्म इह ॥ अनुतप्त[1] तव भाव ॥ ब्रह्मकुल भाविसी ॥ १६० ॥ ऐसें त्या पतितासी ॥ बोधितां गुरु परियेसीं ॥ लाधलें सुख त्यासी ॥ त्याच्या मानसीं न ये कांहीं ॥ ६१ ॥ निधान सांपडे दरिद्र्यासी ॥ तो कां

[1] पश्चात्तापानें झालेला.

सांडील संतोषीं ॥ अमृत सांपडतां रोग्यासी ॥ कां सांडील जीवित्व ॥६२॥ एखादें ढोर उपवासी ॥ पावे तृणविढांरासी[1] ॥ तेथोनि जावया त्यासी ॥ मन नव्हे सर्वथा ॥ ६३ ॥ तैसें त्या पतितासी ॥ लागलें ध्यान गुरूसी ॥ न जाय आपुल्या मंदिरासी ॥ विप्र आपणा म्हणतसे ॥ ६४ ॥ इतुकें होतां ते अवसरीं ॥ आलीं त्याचीं पुत्रनारी ॥ म्हणों लागले अपस्मारी ॥ म्हणोनि आलों धांवत ॥ ६५ ॥ जवळ येता स्त्रियेसी ॥ स्पर्शों नको म्हणे तिसी ॥ कोपेंकरोनि मारावयासी ॥ जात असे तो पतित ॥ ६६ ॥ दुःख करी ती भार्या ॥ दुरुनी नमे गुरुपायां ॥ पति मातें सोडोनियां ॥ जातो आतां काय करूं ॥ ६७ ॥ कन्या पुत्र मज बहुत ॥ तयां कोण पाळित ॥ आम्हां सांडोनि जातो किमर्थ ॥ सांगा तयासी स्वामिया ॥ ६८ ॥ जरी न सांगाल स्वामी त्यासी ॥ त्यजीन प्राण पुत्रासरसीं ॥ येरवीं आपणातें कोण

1 गवताच्या राशींजवळ.

पोषी ॥ अनाथ मी स्वामिया ॥ ६९ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ गुरु बोलती हांसोन ॥ त्या नरातें बोलावून ॥ सांगताती परियेसा ॥ १७० ॥ गुरु म्हणती पतितासी ॥ जावें आपुल्या घरासी ॥ पुत्रकलत्र क्षोभतां दोषी ॥ तूंतें केवीं गति होय ॥७१॥ या संसारीं जन्मोनियां ॥ संतोषवावें इंद्रियां ॥ मग पावे धर्मकाया ॥ तरीच तरे भवार्णव ॥ ७२ ॥ या कारणें पूर्वीच जाणा ॥ न करावी आपण अंगना ॥ करोनि तिसी त्यजितां जाणा ॥ महादोष बोलिजे ॥ ७३ ॥ सूर्य-भूमी-साक्षींसीं ॥ तुवां वरिलें स्त्रियेसी ॥ तीस त्यागितां महादोषी ॥ तूंतें नव्हे गति जाण ॥ ७४ ॥ श्रीगुरुवचन ऐकोन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ केवीं होऊं जातिहीन ॥ ज्ञान होवोनि मागुती ॥ ७५ ॥ श्रीगुरु मनीं विचारिती ॥ याचे अंगीं असे विभूति ॥ प्रक्षाळावें लुब्धका-हातीं ॥ अज्ञानत्व पावेल ॥ ७६ ॥ ऐसें मनीं विचारूनि ॥ सांगती शिष्यासी बोलावोनि ॥ एका लुब्धका पाचारोनि ॥ आणा अति-

त्वरेंसीं ॥ ७७ ॥ तया ग्रामीं द्विज एक ॥ करी उदीम वाणिक ॥ तयातें पाचारिती ऐक ॥ तया पतितासन्निध ॥ ७८ ॥ श्रीगुरु म्हणती त्यासी ॥ उदक घेवोनि हस्तेंसीं ॥ स्नपन करीं गा पतितासी ॥ होय आसक्त संसारीं ॥ ७९ ॥ आज्ञा होतां ब्राह्मण ॥ आला उदक घेऊन ॥ त्यावरी घालितां तत्क्षण ॥ गेली विभूति धुवोनि ॥१८०॥ विभूति धूतां पतिताचें ॥ झालें अज्ञान मन त्याचें ॥ मुख पाहतां स्त्री-पुत्रांचें ॥ धांवत गेला त्यांजवळी ॥८१॥ आलिंगोनियां पुत्रांसी ॥ भ्रांति म्हणे त्यांसी ॥ कां आलों या स्थळासी ॥ तुम्ही आलां कवण कार्या ॥ ८२ ॥ ऐसा मनीं विस्मय करीत ॥ निघोनि घरा गेला पतित ॥ सांगितला वृत्तांत ॥ विस्मय सर्व करिताती ॥ ८३ ॥ इतुकें झालें कौतुक ॥ पहाती नगरलोक ॥ विस्मय करिंती सकळिक ॥ म्हणती अभिनव काय झालें ॥ ८४ ॥ त्रिविक्रमभारती मुनि ॥ जो कां होता गुरुसन्निधानीं ॥ पुसतसे विनवोनि ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ८५ ॥



[ अ० २८ ] आज्ञा होतां ब्राह्मण । आला उदक घेऊन । त्यांवरी घालितां तत्क्षण । गेली विभूति धुवोनी ॥ १८० ॥

त्रिविक्रम म्हणे श्रीगुरूसी ॥ होतो संदेह मानसीं ॥ निरोप द्यावा कृपेंसीं ॥ विनंती एक अवधारा ॥ ८६ ॥ महापतित जातिहीन जाण ॥ तयातें दिधलें दिव्यज्ञान ॥ अंग धुतां तत्क्षण ॥ गेलें ज्ञान केवीं त्याचें ॥ ८७ ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ निरोपावें कृपेंसीं ॥ म्हणोनि लागला चरणांसी ॥ भावभक्तींकरोनियां ॥ ८८ ॥ ऐसें पुसे त्रिविक्रम यति ॥ श्रीगुरु तया निरोपिती ॥ त्याचे अंगाची विभूति ॥ धुतां गेलें ज्ञान त्याचें ॥ ८९ ॥ ऐसें विभूतीचें महिमान ॥ माहात्म्य असे पावन ॥ सांच होय ब्रह्म पूर्ण ॥ भस्ममहिमा अपार ॥ १९० ॥ गुरुवचन ऐकोनि ॥ विनवीतसे त्रिविक्रम मुनि ॥ देव गुरुशिरोमणि ॥ भस्ममहिमा निरोपावा ॥ ९१ ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ भस्ममहिमा परियेसीं ॥ गुरु सांगती विस्तारेंसीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ ९२ ॥ म्हणोनि सरस्वतीगंगाधर ॥ गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ९३ ॥ पुढील कथा पावन ॥ सांगे सिद्ध विस्ता-

रोन ॥ महाराष्ट्रभाषेंकरून ॥ सांगे सरस्वती गुरुदास ॥ ९४ ॥ इति श्रीगुरु-चरित्रामृत ॥ कर्मविपाक भावार्थ ॥ अत्यंत ज्ञान प्रशंसत ॥ विमोचित पुनः केलें ॥ ९५ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्यु-पाख्याने सिद्धनामधारकसंवादे कर्मविपाककथनं नाम अष्टाविंशोऽध्यायः ॥ २८ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ॥ ओंवीसंख्या ॥ १९५ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ मागें कथा निरोपिलीसी ॥ भस्ममाहात्म्य श्रीगुरूसी ॥ पुसिलें त्रिविक्रमभारतीनें ॥ १ ॥ पुढें कथा कवणेंपरी ॥ झाली असे गुरुचरित्री ॥ निरोपावी सविस्तारीं ॥ सिद्धमुनि कृपासिंधू ॥ २ ॥ ऐसें विनवी शिष्यराणा ॥ ऐकोनि सिद्ध प्रसन्नवदना ॥ सांगतसे तये क्षणां ॥ भस्ममाहात्म्य परियेसा ॥ ३ ॥ श्रीगुरु म्हणे त्रिविक्रमासी ॥ भस्ममाहात्म्य पुससी ॥ एकचित्त करुनी मानसीं ॥ सावध होवोनि ऐक पां ॥ ४ ॥ पूर्वापार कृतयुगीं ॥ वामदेव म्हणिजे योगी ॥ प्रसिद्ध गुरु तो जगीं ॥ वर्तत होता भूमीवरी ॥ ५ ॥ शुद्ध बुद्ध ब्रह्मज्ञानी ॥ गृह दारा[1] विवर्जुनी ॥ कामक्रोधादि त्यजुनी ॥ हिंडत होता मंहीवरी[2] ॥ ६ ॥ संतुष्ट निःस्पृह मौनी ॥ भस्म सर्वांगीं लावोनि ॥ जटाधारी असे मुनि ॥ वल्कल वस्त्र व्याघ्राजिन ॥७॥ ऐसा मुनि भूमंडळात ॥

---

१ पत्नी. २ पृथ्वीवर.

नाना क्षेत्र हिंडत ॥ पावला क्रौंचारण्यांत ॥ जेथें संचार राक्षसांचा ॥८॥ तया स्थानीं असे एक ॥ ब्रह्मराक्षस भयानक ॥ मनुष्यादि जीवानिक ॥ भक्षीतसे परियेसा ॥ ९ ॥ ऐशा अघोर वनांत ॥ वामदेव गेला हिंडत ॥ ब्रह्मराक्षस अवचित ॥ गेला धांवोनि भक्षावया ॥ १० ॥ ब्रह्मराक्षस क्षुधाक्रांत ॥ तयासी भक्षूं धांवत ॥ करकरां दांत खात ॥ मुख पसरोनि जवळी आला ॥ ११ ॥ राक्षस येतां देखोनि ॥ वामदेव निःशंक मनीं ॥ उभा असे महाज्ञानी ॥ पातला राक्षस तयाजवळी ॥ १२ ॥ राक्षस मनीं संतोषित ॥ ग्रास बरवा लाधला म्हणत ॥ भक्षावया कांक्षा बहुत ॥ येवोनि धरिला आलिंगोनि ॥ १३ ॥ आलिंगितां तयासी ॥ भस्म लागलें राक्षसासी ॥ झालें ज्ञान तयासी ॥ जातिस्मरण जन्मांतरींचें ॥ १४ ॥ पातक गेलें जळोनि ॥ राक्षस झाला ब्रह्मज्ञानी ॥ जैसें लागता चिंतामणि ॥

१ वस्ती.




[अ० २९ ] ऐशा अघोर वनांत । वामदेव गेला हिंडत । ब्रह्मराक्षस अवचित । गेला धांवोनि भक्षावया ॥ १० ॥

लोह सुवर्ण होतसे ॥ १५ ॥ मानससरोवरीं जैसा ॥ काक होय राजहंस ॥ अमृत पाजितां मनुष्यास ॥ देवत्व होय ज्यापरी ॥ १६ ॥ जैशी का जांबूनदांत ॥ मृत्तिका घालिता कनक होत ॥ तैसा पापी जाहला पुनीत ॥ योगियाचे अंगस्पर्शें ॥ १७ ॥ समस्त मिळती मनकामना ॥ दुर्लभ सत्पुरुष-दर्शना ॥ स्पर्श होतां गुरुचरणा ॥ पापावेगळा होय नर ॥ १८ ॥ ब्रह्म-राक्षस भयानक ॥ काय सांगों त्याची भूक ॥ गजतुरंग मनुष्य लोक ॥ सकळ आहार करीतसे ॥ १९ ॥ इतुकें भक्षितां त्यासी ॥ न जाय भूक परियेसीं ॥ तृषाक्रांत समुद्रासी ॥ प्राशितां तृषा न जाय ॥ २० ॥ ऐसा पापी राक्षस ॥ होतां मुनि-अंगस्पर्श ॥ गेली क्षुधा आक्रोश ॥ झाला ज्ञानी परियेसा ॥ २१ ॥ राक्षस ज्ञानी होवोनि ॥ लागला मुनीश्वराचे चरणीं ॥ त्राहि त्राहि गुरुशिरोमणि ॥ तूंचि साक्षात् ईश्वर ॥ २२ ॥ तारीं तारीं मुनीश्वरा ॥ बुडालों घोर सागरां ॥ उद्धरीं मज दातारा ॥

जगदीश्वरा कृपासिंधु ॥ २३ ॥ तव दर्शनमात्रेंसीं ॥ जळोनि गेल्या पापराशी ॥ तूं कृपाळू भक्तांसी ॥ तारीं तारीं गुरुराया ॥ २४ ॥ येणेंपरी मुनीश्वरास ॥ विनवीतसे ब्रह्मराक्षस ॥ वामदेव कृपासमरस ॥ पुसों लागला तये वेळीं ॥२५॥ वामदेव म्हणे त्यासी ॥ तूं कोण कोणाच्या वंशीं ॥ ऐशिया घोर वनासी ॥ राहिलासी कां या ठायां ॥ २६ ॥ ऐकोनि ऐसें वचन ॥ ब्रह्मराक्षस करी नमन ॥ विनवीतसे कर जोडोन ॥ ऐक त्रिविक्रम मुनिराया ॥ २७ ॥ राक्षस म्हणे तये वेळीं ॥ मज ज्ञान झालें सकळी ॥ जातिस्मरण अंतकाळीं ॥ पूर्वापरीचें स्वामिया ॥ २८ ॥ तयामध्यें माझे दोष ॥ उत्कृष्ट जन्म पंचवीस ॥ त्यांचा दिसतसे प्रकाश ॥ ऐका स्वामी वामदेवा ॥ २९ ॥ पूर्वजन्मीं पंचविशीं ॥ होतों राजा यवन देशीं ॥ दुर्जय नाम आपणासी ॥ दुराचारीं वर्तलों जाण ॥ ३० ॥ मीं मारिले बहूत लोक ॥ प्रजेसी दिधलें बहू दुःख ॥ स्त्रिया वरिल्या अनेक ॥

राज्यमदेंकरोनियां ॥ ३१ ॥ वरिल्या स्त्रिया अमित ॥ अन्य भोगिल्या नाहीं गणित ॥ एक दिवस घेवोनि रतिसुख ॥ पुनरपि न भोगीं तियेसी ॥ ३२ ॥ एके दिवशीं एकीसी ॥ रति देवोनि त्यजीं तिसी ॥ ठेवीं अंतर्गृहासी ॥ पुनरपि ते न देखें नयनीं ॥ ३३ ॥ ऐसें अनेक स्त्रियांसी ॥ ठेविलें अंतर्गृहासीं ॥ मातें शापिती अहर्निशीं ॥ दर्शन नेदीं म्हणोनि ॥ ३४ ॥ सकळ राव जिंकोनि ॥ आणिल्या स्त्रिया धरोनि ॥ एक दिन भोगुनी ॥ ठेविल्या अंतर्गृहासीं ॥ ३५ ॥ जेथें स्त्रिया सुरूप असती ॥ बळें आणोन दे रति ॥ संतोषें ज्या न येती ॥ तयां द्रव्य देवोनि आणवीं ॥ ३६ ॥ विप्र होते जे माझे देशीं ॥ ते जाऊनि राहिले अन्य ठायासीं ॥ मी भोगीं त्यांचे स्त्रियांसी ॥ उन्मत्तपणें परियेसा ॥ ३७ ॥ पतिव्रता सुवासिनी ॥ विधवा मुख्य करोनि ॥ त्याही भोगीं उन्मत्तपणीं ॥ रजस्वला न सांडिल्या ॥३८॥ विवाह न होतां कन्येसी ॥ बलात्कारें भोगीं त्यांसी ॥

येणेंपरी समस्त देशीं ॥ उपद्रविलें मदांधपणें ॥ ३९ ॥ ब्राह्मणस्त्रिया तीन शत ॥ चार शत क्षत्रिया विख्यात ॥ वैश्यस्त्रिया षट्शत ॥ शूद्रास्त्रिया सहस्त्र जाण ॥ ४० ॥ एक शत चांडाळिणी ॥ सहस्त्र वरिल्या पुलिंदिनी ॥ पंचशत स्त्रिया डोंबिणी ॥ रजकिणी वरल्या शत चारी ॥ ४१ ॥ असंख्यात वारवनिता ॥ भोगिल्या म्यां उन्मत्तता ॥ तथापि माझे मनीं तृप्तता ॥ नाहीं झाली स्वामिया ॥ ४२ ॥ इतुक्या स्त्रिया भोगून ॥ तृप्त नव्हे माझें मन ॥ विषयासक्त मद्यपान ॥ करीं नित्य उन्मत्त मी ॥ ४३ ॥ वर्ततां येणेंपरी देखा ॥ व्याधिष्ठ झालों यक्ष्मादिका ॥ परराजे येऊनि ऐका ॥ राज्य सर्व हारिलें ॥ ४४ ॥ मग जाणा आपणासी ॥ मरण आलें परियेसीं ॥ मग नेलें यमापाशीं ॥ नरकामध्यें घातलें ॥ ४५ ॥ देवांचीं सहस्त्र वर्षें देखा ॥ दहा वेळ फिरलों ऐका ॥ पितरांसहित नरका ॥ भोगिले

१ भिल्लिणी.

नरक येणेंपरी ॥ ४६ ॥ पुढें जन्मलों प्रेतवंशीं ॥ विरूप देह आपणासी ॥ सहस्र शिश्नें अंगासी ॥ लागलीं असती परियेसा ॥ ४७॥ येणेंपरी दिव्य शत ॥ वर्षें कष्टलों क्षुधाक्रांत ॥ पुनः यमपंथ ॥ नाना कष्टें कष्टलों ॥४८॥ दुजा जन्म आपणासी ॥ व्याघ्र झालों जीवहिंसी ॥ अजगर जन्म तृतीयेसी ॥ चवथा झालों लांडगा ॥ ४९ ॥ पांचवा जन्म आपणासी ॥ ग्रामसूकर परियेसीं ॥ सहावा जन्म परियेसीं ॥ सरडा होवोनि जन्मलों ॥ ५० ॥ सातव्या जन्मीं झालों श्वान ॥ आठवा जंबुक मतिहीन ॥ नववा जन्म रोहिहरण ॥ दहावा झालों ससाणा देखा ॥ ५१ ॥ मर्कट जन्म एकादश ॥ सांबर झालों मी द्वादश ॥ मुंगूस झालों मी त्रयोदश ॥ चतुर्दश वायस पैं ॥ ५२ ॥ जन्म आपण पंचदशीं ॥ जांबवंत झालों क्लेशी ॥ रानकुक्कुट षोडशीं ॥ जन्म पावलों परियेसा ॥ ५३ ॥

१ कोल्हा. २ आखल.

सप्तदशजन्मीं आपण ॥ गर्दभ झालों अक्षहीन[1] ॥ मार्जारयोनि भोगून ॥ आलों अष्टादशेसी ॥ ५४ ॥ एकुणिसाव्या जन्मासी ॥ मंडूक झालों परियेसीं ॥ कांसवजन्म विंशतीसी ॥ एकविसावा मत्स्य झालों ॥ ५५ ॥ बाविसावा जन्म थोर ॥ झालों तस्कर उंदीर ॥ दिवांध झालों बधिर ॥ उलूक[2] झालों तेविसावा ॥ ५६ ॥ जन्म चतुर्विंशतीसी ॥ झालों कुंजर[3] तामसी ॥ पंचविसाव्या जन्मासी ॥ ब्रह्मराक्षस आपण देखा ॥ ५७ ॥ क्षुधाक्रांत अहर्निशीं ॥ कष्टतों मी परियेसीं ॥ निराहार अरण्यवासी ॥ वर्ततसें स्वामिया ॥ ५८ ॥ तुम्हा देखतां अंतःकरणीं ॥ वासना झाली भक्षीन म्हणोनि ॥ यालागीं आलों धांवोनि ॥ पापरूपी आपण देखा ॥ ५९ ॥ तुमचा अंगस्पर्श होतां ॥ जातिस्मरण आलें आतां ॥ सहस्र जन्मींची दुष्कृतता ॥ दिसतसे स्वामिया ॥ ६० ॥ मातें आतां जन्म पुरे ॥ तव

१ आंधळा २ घुबड. ३ हत्ती.

अनुग्रहें मी तरें ॥ घोरांदर संसार नुरे ॥ यातायाती कडे करीं ॥ ६१ ॥ तूं तारक विश्वासी ॥ म्हणोनि मातें भेटलासी ॥ तव चरणमहिमा ऐशी ॥ स्पर्श होतां ज्ञान झालें ॥ ६२ ॥ भूमीवर नर असती ॥ तैसा नव्हेसी तूं यति ॥ तव महिमा दिसे ख्याति ॥ निरोपावें दातारा ॥ ६३ ॥ महापापी दुराचारी ॥ आपण असें वनांतरीं ॥ तव अंगस्पर्शमात्रीं ॥ ज्ञान अखिल झालें मज ॥ ६४ ॥ कैसा महिमा तुझे अंगीं ॥ ईश्वर होशील कीं जगीं ॥ आम्हां उद्धरावयालागीं ॥ आलासि स्वामी वामदेवा ॥ ६५ ॥ ऐसें म्हणतां राक्षसीं ॥ वामदेव सांगे संतोषीं ॥ भस्ममहिमा आहे ऐशी ॥ माझे अंगीं परियेसा ॥ ६६ ॥ सर्वांग[1] माझें भस्मांकित ॥ तुझे अंगीं लागलें किंचित ॥ त्याणें झालें तुज चेत ॥ ज्ञानप्रकाश जन्मांतरींचा ॥ ६७ ॥ भस्ममहिमा अपरंपार ॥ ब्रह्मादिकां अगोचर ॥ याचि कारणें ईश्वर ॥ भूषण करी

१ सर्व.

सर्वांगीं ॥ ६८ ॥ ईश्वरें वंदिलें ज्या वस्तूसी ॥ वर्णितां अशक्य आम्हांसी ॥ तोचि शंकर व्योमकेशी ॥ जाणे भस्ममहिमान ॥ ६९ ॥ तूं जरी पुससी आम्हासी ॥ सांगेन दृष्टांत परियेसीं ॥ आम्हीं देखिला दृष्टींसीं ॥ अपार महिमा भस्माचा ॥ ७० ॥ विप्र एक द्रविडदेशीं ॥ आचारहीन परियेसीं ॥ सदा रत शूद्रिणीसी ॥ कर्मभ्रष्ट[1] वर्तत होता ॥ ७१ ॥ समस्त मिळोनि विप्र जाती ॥ त्या द्विजासी बहिष्कारिती ॥ मातापिता दायाद गोत्री ॥ त्यागिती त्यासी बंधुवर्ग[2] ॥ ७२ ॥ येणेंपरी तो ब्राह्मण ॥ प्रख्यात झाला आचारहीन ॥ शूद्रिणीतें वरून ॥ होता काळ क्रमूनियां ॥७३॥ ऐसा पापी दुराचारी ॥ तस्करविद्येनें उदर भरी ॥ आणिक स्त्रियांशीं व्यभिचार करी ॥ उन्मत्तपणें परियेसीं ॥ ७४ ॥ वर्ततां ऐसा एके दिवशीं ॥ गेला होता व्यभिचारासी ॥ तस्करविद्या करितां निशीं ॥ वधिलें त्यासी एकें शूद्रें ॥७५॥

---

१ कर्मभ्रष्ट. २ भाऊबंद.

मग तया प्रेतासी ॥ ओढोनि नेलें तेच निशीं ॥ टाकिलें बहिर्ग्रामेंशीं ॥ अघोर स्थळीं परियेसा ॥ ७६ ॥ श्वान एक तये नगरीं ॥ बैसलें होतें भस्मावरी ॥ क्षुधाक्रांत ते अवसरीं ॥ हिंडत गेलें प्रेतघाणीं ॥ ७७ ॥ देखोनि तया प्रेतासी ॥ श्वान गेला भक्षावयासी ॥ प्रेतावरी बैसून हर्षी ॥ क्षुधानिवारण करीत होता ॥ ७८ ॥ भस्म होतें श्वानपोटीं ॥ तें लागलें प्रेताचे ललाटीं ॥ वक्षस्थळीं बहुवटीं ॥ लागलें भस्म परियेसा ॥ ७९ ॥ प्राण त्यागितां द्विजवर ॥ नेत होते यमकिंकर ॥ नानापरी करीत मार ॥ यमपुरा नेताती ॥ ८० ॥ कैलासपुरींचे शिवदूत ॥ देखोनि आले तें प्रेत ॥ भस्म अंगीं उज्ज्वलित ॥ म्हणती यातें कोणीं नेलें ॥ ८१ ॥ यातें योग्य शिवपुर ॥ केवीं नेताती यमकिंकर ॥ म्हणोनि धांवती वेगवक्र ॥ यमकिंकरा मारावया ॥ ८२ ॥ शिवदूत येतां देखोनि ॥ यमदूत जाती पळोनि ॥ तया

द्विजातें सोडोनि ॥ जाती आपुले यमपुरा ॥ ८३ ॥ जावोनि सांगती यमासी ॥ गेलों होतों भूमीसी ॥ आणित होतों पापियासी ॥ अघोर रूपें-करूनियां ॥ ८४ ॥ तें देखोनि शिवदूत ॥ धांवत आले मारूं म्हणत ॥ हिरोनि घेतलें प्रेत ॥ वधित होते आम्हांसी ॥ ८५ ॥ आतां आम्हां काय गति ॥ कधीं जावों ना त्या क्षितीं ॥ आम्हां शिवदूत मारिती ॥ म्हणूनि विनविती यमासी ॥ ८६ ॥ ऐकोनि दूतांचें वचन ॥ यम निघाला कोपून ॥ गेला त्वरेंकरून ॥ शिवदूतांजवळी तो ॥ ८७ ॥ यम म्हणे शिवदूतांसी ॥ कां मारिलें मम किंकरांसी ॥ हिरोनि घेतलें पापियासी ॥ शिवपुरा केवीं नेतां ॥ ८८ ॥ याचें पाप असे प्रबळ ॥ सरित्सिंकता[1] गणवेल ॥ त्याहुनि अधिक केवळ ॥ अघोररूप असे देखा ॥ ८९ ॥ नव्हे योग्य शिवपुरासी ॥ न्यावया हा विमानेंसीं ॥ केवीं नेतां मूढपणेंसीं ॥ म्हणोनि यम कोपला ॥९०॥

---

१ नदीच्या कांठचे वाळुचे कण.

ऐकोनि यमाचें वचन ॥ शिवदूत सांगती विस्तारोन ॥ प्रेतकपाळीं लांछन[1] ॥ होतें भस्म परियेसा ॥९१॥ वक्षःस्थळीं भाळासी ॥ बाहूमूळीं करकंकणेसी ॥ भस्म लागतां प्रेतासी ॥ केवीं आतळेती[2] दूत तुझे ॥ ९२ ॥ आम्हां आज्ञा ईश्वराची ॥ भस्मांकित तनु ज्याची ॥ नित्य वस्ती असे त्याची ॥ कैलास-पदीं शाश्वत ॥ ९३ ॥ भस्म कपाळीं लागत ॥ केवीं आतळती तव दूत ॥ तात्काळीं होतों वधित ॥ परी धर्में सोडिलें ॥९४॥ पुढें आपुल्या दूतांसी ॥ बुद्धि सांगा तुम्ही ऐसी ॥ ज्यांवरी भस्म परियेसीं ॥ त्यांतें तुम्हीं नाणावें ॥ ९५ ॥ भस्मांकित नरासी ॥ दोष न लागती परियेसीं ॥ तो योग्य होय स्वर्गासी ॥ म्हणोनि सांगती शिवदूत ॥ ९६ ॥ शिवदूतांचें वचन ऐकोन ॥ यमधर्म गेला परतोन ॥ आपुल्या दूतां पाचारोन ॥ सांगतसे परियेसा ॥ ९७ ॥ यम सांगे आपुल्या दूतां ॥ भूमिवरी जावोनि आतां ॥ जे का

१ चिन्ह. २ स्पर्श करितां.

असती भस्मांकिता ॥ त्यातें तुम्हीं नाणावें ॥ ९८ ॥ अनेक परी दोष जरी ॥ केले असती अपरंपारी ॥ त्यातें नाणिजे आमुच्या पुरीं ॥ त्रिपुंड्रिक नरासी ॥ ९९ ॥ रुद्राक्षमाळा ज्याच्या गळां ॥ असेल तिलक त्रिपुंड्री टिळा ॥ त्यातें तुम्ही नातळा ॥ आज्ञा असे श्रीशिवाची ॥ १०० ॥ वामदेव म्हणे राक्षसासी ॥ या विभूतीची महिमा ऐशी ॥ आम्ही लावितों भक्तींसीं ॥ देवादिकां दुर्लभ ॥ १ ॥ पाहें पां ईश्वर प्रीतींसीं ॥ सदा लावितों भस्मासी ॥ ईश्वरें वंदिल्या वस्तूसी ॥ कोण वर्णूं शके सांग पां ॥ २ ॥ ऐकोनि वामदेवाचें वचन ॥ ब्रह्मराक्षस करी नमन ॥ उद्धरीं गा जगजीवन ॥ ईश्वर तूंचि वामदेवा ॥ ३ ॥ तव चरण मज भेटले ॥ सहस्र जन्मींचें ज्ञान झालें ॥ कांहीं पुण्य होतें केलें ॥ त्या गुणें भेटलासी ॥ ४ ॥ आपण पूर्वी राज्य करितां ॥ केलें पुण्य स्मरलें आतां ॥ तळें बांधिलें रानीं तत्त्वतां ॥ दिल्ही वृत्ति विप्रांसी ॥ ५ ॥ इतुकें पुण्य आपणासी ॥

घडलें होतें परियेसीं ॥ वरकड केल्या दोषराशी ॥ राज्य करितां स्वामिया ॥ ६ ॥ जधीं नेलें यमपुरासी ॥ यमें पुसिलें चित्रगुप्तासी ॥ माझें पुण्य त्या यमासी ॥ सांगितलें चित्रगुप्तें ॥ ७ ॥ तधीं मातें यमधर्में आपण ॥ सांगितलें होतें पुण्य ॥ पंचविंशति जन्मीं जाण ॥ फळ येईल म्हणोनि ॥ ८ ॥ त्या पुण्यापासून ॥ जोडले हे तव चरण ॥ करणें स्वामी उद्धारण ॥ जगद्गुरू स्वामिया ॥ ९ ॥ या भस्माचें महिमान ॥ लावावयाचें विधान ॥ कवण मंत्रें अवधारण ॥ विस्तारोनि सांग पां ॥ ११० ॥ वामदेव म्हणे राक्षसासी ॥ विभूतिधारण मज पुससी ॥ सांगेन तें विस्तारेंसीं ॥ एकचित्तें ऐक पां ॥ ११ ॥ पूर्वीं मंदराचलपर्वतीं ॥ क्रीडेसी गेले उमापती ॥ कोटि रुद्रगणांसहिती ॥ बैसले होते वोळंगेसी ॥ १२ ॥ तेतीस कोटी देवांसहित ॥ देवेंद्र दर्शनासी येत ॥ अग्नि वरुण देवांसहित ॥ कुबेर वायु आले तेथें ॥ १३ ॥

१ कामकें. २ सभेंत.

गंधर्व यक्ष चित्रसेन ॥ खेचर पन्नग विद्याधरण ॥ किंपुरुष सिद्ध साध्य जाण ॥ आले गुह्यक सभेसी ॥ १४ ॥ देवाचार्य बृहस्पति ॥ वसिष्ठ नारद तेथें येती ॥ अर्यमादि पितर येती ॥ आले ईश्वर-वोळंगेसी ॥ १५ ॥ दक्षादि ब्रह्म येर सकळ ॥ आलें समस्त ऋषिकुळ ॥ उर्वश्यादि अप्सरामेळ ॥ आले ईश्वरसभेसी ॥ १६ ॥ चंडिकासह शक्ति देखा ॥ आदित्यादि द्वादशका ॥ अष्ट वसू मिळोन ऐका ॥ आले ईश्वरसभेसी ॥ १७ ॥ अश्विनौ देव परियेसीं ॥ विश्वेदेव मिळून द्वादशी ॥ आले ईश्वरसभेसी ॥ ऐक ब्रह्मराक्षसा ॥ १८ ॥ भूतपति महाकाळ ॥ नंदिकेश्वर महानीळ ॥ कांठीकर दोघे प्रबळ ॥ पार्षद उभे असती ॥ १९ ॥ वीरभद्र संकर्षण ॥ मणिभद्र षट्कर्ण ॥ वृकोदर देवमान्य ॥ कुंभोदर आला तेथें ॥ १२० ॥ कुंभोदर मंडोदर ॥ विकटकर्ण कर्णधार[1] ॥ धारकेत महावीर ॥ भूतनाथ तेथें आला ॥ २१ ॥ भृंगी रिटी

1 द्वारपाल

भूतनाथ ॥ नानारूपी गुण समस्त ॥ नानावर्ण मुख्य ख्यात ॥ नानाऽवय-वींशिर दूत ॥२२॥ रुद्रगणरूपें कैसीं ॥ सांगेन ऐक विस्तारेंसीं ॥ कित्येक कृष्णवर्ण ऐसीं ॥ श्वेत पीत धूम्रवर्ण ॥ २३ ॥ हिरवें ताम्र सुवर्णवर्ण ॥ लोहित चित्रविचित्र जाण ॥ मंडूकासारिखें असे वदन ॥ रुद्रगण आले तेथें ॥ २४ ॥ नानाआयुध-शस्त्रेंसीं ॥ नाना वाहनें भूषणेंसीं ॥ व्याघ्रमुखें कित्येकांसी ॥ कितीं सूकरगजमुखी ॥ २५ ॥ कित्येकां वक्रमुख ॥ कित्येक श्वान-शृगालमुख ॥ उष्ट्रवदन किती एक ॥ किती शरभमेंरुंडवत् वदन ॥२६॥ सिंहमुख कित्येक ॥ किती घोर बकमुख ॥ कितीएकांसी मुख एक ॥ दोनमुख गण देखा ॥ २७ ॥ चतुर्मुख कितीएक ॥ चतुर्भुज कित्येक ॥ किती एक हीनमुख ॥ ऐसे तेथें गण येती ॥ २८ ॥ एकहस्त द्विहस्तेंसीं ॥ पांच सहा हस्तकेसीं ॥ पाद नाहीं कितीएकांसी ॥ बहुपाद किती जाणा ॥ २९ ॥ कर्ण नाहीं कित्येकांसी ॥ एककर्ण अभिनवेसी ॥ बहुकर्ण परियेसीं ॥

ऐसे गण येती तेथें ॥१३०॥ कित्येकां नेत्र एक ॥ किती चार नेत्र मुख ॥ कित्येक स्थूळ कुब्जक ॥ ऐसे गण ईश्वराचे ॥ ३१ ॥ ऐशापरीच्या गणासहित ॥ बैसला शिव मूर्तिमंत ॥ सिंहासन रत्नखचित ॥ सप्त प्रभावळीचें ॥ ३२ ॥ आरक्त एक प्रभावळी ॥ तियेवरी रत्नें जडलीं ॥ अनुपम दिसे निर्मळी ॥ सिंहासनीं परियेसा ॥ ३३ ॥ दुसरी देखा प्रभावळी ॥ हेमवर्णें पिवळी ॥ मिरवी रत्नबहाळी ॥ सिंहासनीं शंकराचे ॥ ३४ ॥ तिसरी एक प्रभावळी ॥ नीलवर्ण सोज्ज्वळी ॥ तीं असतीं कुसरिलीं ॥ सिंहासनीं ईश्वराचे ॥ ३५ ॥ चवथी प्रभावळी ॥ रत्नाखचित असे कमळीं ॥ आरक्तवर्ण असे जडली ॥ सिंहासनीं ईश्वराचे ॥ ३६ ॥ वैडूर्य रत्नखचित ॥ मुक्तें जडलीं बहुत ॥ पांचवी प्रभावळी विख्यात ॥ सिंहासनीं ईश्वराचे ॥ ३७ ॥ सहावी जे कां प्रभावळी ॥ पुष्परागांचिया वेली ॥ मुक्ताफळांचिया जाळी ॥ सिंहासनीं ईश्व-राचे ॥ ३८ ॥ सातवी जी कां प्रभावळी ॥ अनेक रत्नें तिये जडलीं ॥

विश्वकर्म्यांनें निर्मिली ॥ अपूर्व देखा त्रिभुवनांत ॥ ३९ ॥ ऐशिया सिंहासनावरी ॥ बैसला असे त्रिपुरारी ॥ कोटिसूर्य तेजासरी ॥ भासतसे परियेसा ॥ १४० ॥ महाप्रळयसमयासी ॥ सप्तार्णवामिळणी जैसी ॥ तैसा या श्वासोच्छ्वासीं ॥ ईश्वर बैसलासे ॥ ४१ ॥ भाळनेत्र ज्वाळमाळा ॥ संवर्ताग्नि[1] जटामंडळा ॥ कपाळीं चंद्र षोडशकळा ॥ शोभतसे सदाशिव ॥ ४२ ॥ तक्षक देखा वामकर्णीं ॥ वासुकी दक्षिणकर्णीं ॥ दोघांचिया नयनीं ॥ तेज फांकलें ॥ ४३ ॥ नीळकंठ आपण ॥ नागहार आभरण ॥ सर्पांचे करीं कंकण ॥ मुद्रिकाही त्यांचिया ॥ ४४ ॥ मेखलासूत्र सर्पाचें ॥ चर्म परिधान व्याघ्राचें ॥ शोभा देह दर्पणाचे ॥ ऐशियापरी दिसतसे ॥ ४५ ॥ कर्कोटक-पद्माचीं ॥ केलीं नूपुरें तयांचीं ॥ पौर्णिमे प्रभा चंद्राची ॥ तैसा शुभ्र दिसतसे ॥ ४६ ॥ म्हणोनि कर्पूरगौर म्हणती ॥ ध्यानीं ध्याइजे पशुपती ॥

१ प्रळयकाळचा अग्नि

ऐसा भोळा चक्रवर्ती ॥ बैसला ते सभेंत ॥ ४७ ॥ रत्नमुकुट असे शिरीं ॥ नागेंद्र तो केयूरीं[1] ॥ कुंडलाची दीप्ति थोरी ॥ दिसतसे ईश्वरू ॥ ४८ ॥ कंठीं सर्पांचे हार ॥ नीलकंठ मनोहर ॥ सर्वांगीं सर्पालंकार ॥ शोभतसे ईश्वरू ॥ ४९ ॥ शुभ्र कमळीं आर्चिला ॥ कीं चंदनें असे लेपिला ॥ कर्पूर-कर्दळेंसीं लेपिला ॥ तैसा दिसे ईश्वरू ॥ १५० ॥ दशभुजा ईश्वरासी ॥ एक एक आयुधेसी ॥ बैसलासे सभेसी ॥ सर्वेश्वर शंकरू ॥ ५१ ॥ एके हातीं त्रिशूळ देखा ॥ दुसरे हातीं डमरू सुरेखा ॥ येरे हातीं खड्ग निका ॥ शोभतसे ईश्वरू ॥ ५२ ॥ पाणिमात्र एका हातीं ॥ धनुष्यबाणें कर शोभती ॥ खट्वांग फरश एके हातीं ॥ त्रिशूळादिकें मिरवीतसे ॥ ५३ ॥ भृंगासन कमळ देखा ॥ धरिलेंसे पिनाका ॥ दशभुजीं दिसे निका ॥ बैसलासे सभेसी ॥ ५४ ॥ पंचवक्त्र सर्वेश्वर ॥ एकेक मुखाचा विस्तार ॥ दिस-

[1] बाहूंवर.

तसे सालंकार ॥ सागेन ऐका श्रोतेजन ॥ ५५ ॥ कलंकाविण चंद्र जैसा ॥ किंवा क्षीर[1]फेन परियेसा ॥ भस्मभूषित रूपें तैसा ॥ दिसे मन्मथ[2]दाहक ॥ ५६ ॥ चंद्रसूर्याग्नि नेत्र ॥ नागहार कटीसूत्र ॥ दिसे मूर्ति पवित्र ॥ सर्वेश्वरू परियेसा ॥ ५७ ॥ शुभ्र टिळक कपाळीं ॥ बरवा शोभे चंद्रमौळी ॥ हास्यवदन ओष्ठ पोंवळीं ॥ बैसलासे श्रीशंकर ॥ ५८ ॥ दुजें मुख उत्तरेसी ॥ शोभत असे विस्तारेंसीं ॥ ताम्रवर्ण करकमळेंसीं ॥ अपूर्व दिसतसे परियेसा ॥ ५९ ॥ जेवीं डाळिंबीचें फूल ॥ किंवा प्रभात[3]रविमंडळ ॥ तैसें शोभे मुखकमळ ॥ शंकराचें परियेसा ॥ १६० ॥ तिसरें मुख पूर्वदिशेसी ॥ गंगार्धचंद्राशिरेंसीं ॥ जटाबंधन परियेसीं ॥ केलें सर्प वेष्टोनियां ॥ ६१ ॥ एक मुख दक्षिणेसी ॥ विक्राळ दाढा दारुणेसी ॥ मिरवे नीळ वर्णेंसीं ॥ दिसतसे शंकरू ॥ ६२ ॥ मुखांतूनि ज्वाला निघती ॥ जैशा कां वेदश्रुति ॥

१ दुधाचा फेन. २ शंकर. ३ सकाळचा सूर्य.

रुंडमाळा शोभती ॥ सर्पवेष्टित परियेसा ॥ ६३ ॥ पांचवें असे जें वदन ॥ व्यक्ताव्यक्त[1] दिसे जाण ॥ साकार निराकार सुजाण ॥ सगुण निर्गुण ईश्वर ॥ ६४ ॥ सलक्षण निर्लक्षण ॥ ऐसें शोभतसे वदन ॥ परब्रह्म वस्तु जाण ॥ सर्वेश्वर पंचमुख ॥ ६५ ॥ काल व्याल सर्प बहुत ॥ कंठीं माळा मिरवित ॥ चरण मिरवे आरक्त[2] ॥ कमळापरी ईश्वराचे ॥ ६६ ॥ चंद्रासारिखीं नखें देखा ॥ मिरविती चरणीं पादुका ॥ अलंकार सर्प ऐका ॥ शोभतसे ईश्वर ॥ ६७ ॥ व्याघ्रांबर प्रावर्ण[3] ॥ सर्वांगीं सर्पवेष्टण ॥ गांठीं बांधिली असे जाण ॥ नागबंधेंकरोनियां ॥ ६८ ॥ नाभीं चंद्रावळी शोभे ॥ हृदयीं कटाक्ष रोम उभे ॥ परमार्थलाभा लाभे ॥ भक्तजनमनोहर ॥ ६९ ॥ ऐसा रुद्र महाभोळा ॥ सिंहासनीं आरूढला ॥ पार्वतीसहित शोभला ॥ बैसला असे परमेश्वर ॥ १७० ॥ पार्वतीचा शृंगारू ॥ नानापरीचे अलंकारू ॥ मिरवि-

१ स्पष्ट व अस्पष्ट. २ सतेज. ३ वस्त्र.

तसे मनोहरू ॥ सर्वेश्वरी परियेसा ॥ ७१ ॥ कनकचंपकगोरटी ॥ मोतियांचा हार कंठीं ॥ रत्नखाचित मुकुटीं ॥ नागबंदी दिसतसे ॥ ७२ ॥ नानापरीच्या पुष्पजाति ॥ मुकुटावरी शोभती ॥ तेथें भ्रमर आलापिती ॥ परिमळालागीं परियेसा ॥ ७३ ॥ मोतियांची थोर जाळी ॥ शोभतसे मुकुटाजवळी ॥ रत्नें असती जडलीं ॥ शोभायमान दिसतसे ॥ ७४ ॥ नासिक बरवें सरळ ॥ तेथें मिरवे मुक्ताफळ ॥ त्यावरी रत्न सोज्ज्वळ ॥ जडलें असे शोभायमान ॥ ७५ ॥ अधरोष्ठ प्रवाळसरसी ॥ दंतपंक्ति रत्नें जैशीं ॥ ऐसी माता मिरवे कैसी ॥ महामाया परियेसा ॥ ७६ ॥ कानीं तानवडीं भोंवया ॥ रत्नखचित मिरविलीया ॥ अलंकार माहामाया ॥ ल्याइलीसे जगन्माता ॥ ७७ ॥ पीतवर्ण चोळी देखा ॥ कुचतटीं शोभे निका ॥ एकावळीं रत्नें अनेका ॥ कंठीं हार शोभतसे ॥ ७८ ॥ कालव्याल सर्प थोर ॥ स्तनपान करिती मनोहर ॥ कैसें भाग्य त्यांचें थोर ॥ त्या सर्पांचें परि-

येसा ॥ ७९ ॥ आरक्त वस्त्र नेसली ॥ जैसें डाळिंब पुष्पवेली ॥ किंवा कुंकुमें मिरविली ॥ गिरिजा माता परियेसा ॥ १८० ॥ बाहुदंड सरळ सुरेखा ॥ करीं कंकण मुंद्रिका ॥ मुक्ताकंचुकी देखा ॥ ल्याइलीसे अपूर्व ॥ ८१ ॥ चरण शोभती बरवे ॥ नूपुरयुक्त स्वभावें ॥ असें पार्वतीचें ध्यान ध्यावें ॥ म्हणती देवगण समस्त ॥ ८२ ॥ अष्टमीच्या चंद्रासरिसा ॥ मिरवे टिळक कपाळीं तैसा ॥ त्रिपुंड्र टिळा शुभ्र जैसा ॥ मोतियांचा परियेसा ॥ ८३ ॥ नानापरीचे अलंकार ॥ अनेकपरीचे शृंगार ॥ कोण वर्णूं शके पार ॥ जगन्माता देवीचा ॥ ८४ ॥ ऐसा शंभु उमेसहित ॥ बैसलासे सभेंत ॥ तेतीस कोटी परिवारेंत ॥ इंद्र आला वोळंगेसी ॥ ८५ ॥ आले समस्त सुरवर ॥ देवऋषि सनत्कुमार ॥ आले तेथें वेगवक्र ॥ त्या ईश्वरसभेसी ॥ ८६ ॥ सनत्कुमार तये वेळीं ॥ लागतसे चरणकमळीं ॥ साष्टांग नमोनि

१ आंगठी. २ परिवारासह.

माळीं ॥ विनवीतसे शिवासी ॥ ८७ ॥ जय जया जी उमाकांता ॥ जय जया जी विघ्नकर्ता ॥ त्रिभुवनीं तूंचि दाता ॥ चतुर्विध पुरुषार्थातें ॥ ८८ ॥ समस्त धर्म आपणासी ॥ निरोपिले परियेसीं ॥ भवार्णवीं तरावयासी ॥ पापक्षयाकारणें ॥ ८९ ॥ आणिक एक आम्हां देणें ॥ मुक्ति होय अल्प-गुणें ॥ चारी पुरुषार्थ जेणें गुणें ॥ अनायासें साधिजे ॥ १९० ॥ एरवीं सकल पुण्यासी ॥ करणें कष्ट आसमासीं ॥ हितार्थ सर्व मानवांसी ॥ निरोपावें स्वामिया ॥ ९१ ॥ ऐसें विनवी सनत्कुमार ॥ मनीं संतोषोनि ईश्वर ॥ सांगता झाला कर्पूरगौर ॥ सनत्कुमार मुनीसी ॥ ९२ ॥ ईश्वर म्हणे तये वेळीं ॥ ऐका हो ऋषि सकळी ॥ धर्म घडे तात्काळीं ॥ ऐसें पुण्य सांगेन ॥ ९३ ॥ वेदशास्त्रसंमतेसी ॥ असे धर्म परियेसीं ॥ अनंत पुण्य त्रिपुंड्रासीं ॥ भस्मांकित परियेसा ॥ ९४ ॥ ऐकोनियां सनत्कुमार ॥ कवण विधीं लाविजे

१ सहज. २ पुष्कळ.

नर ॥ कवण स्थानीं द्रव्य परिकर ॥ शक्ति कवण देवता असे ॥ ९५ ॥
कवण कर्तृत्व किं प्रमाण ॥ कवण मंत्र लाविजे आपण ॥ सांगा स्वामी
विस्तारोन ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ९६ ॥ ऐसी विनंती ऐकुनी ॥
सांगे शंभु विस्तारोनि ॥ गोमय द्रव्य देवताग्नि ॥ भस्म करणें परियेसां ॥९७॥
पुरातन यज्ञस्थानीं ॥ जी असेल मेदिनी[1] ॥ पुण्य बहुत लावितां क्षणीं ॥
तेथील भस्म परियेसा ॥ ९८ ॥ सद्योजातादि मंत्रेंसीं ॥ घ्यावें भस्म तळ-
हस्तासी ॥ अभिमंत्रावें भस्मासी ॥ अग्निरिति करोनियां ॥ ९९ ॥ मान-
स्तोकेति मंत्रेंसीं ॥ संमर्दावें अंगुष्ठेसी ॥ त्र्यंबकादि मंत्रेंसीं ॥ शिरीं लाविजे
परियेसा ॥ २०० ॥ त्र्यायुषेति मंत्रेंसीं ॥ लाविजे ललाटभुजांसी ॥ त्याचि
मंत्रें परियेसीं ॥ स्थानीं स्थानीं लाविजे ॥ १ ॥ मध्यांगुष्ठ अनामिकांगु-
ळींसीं ॥ लाविजे प्रथम ललाटेसी ॥ प्रतिलोम अंगुष्ठेंसीं ॥ मध्यरेखा काढिजे

[1] भूमि.

॥२॥ त्रिपुंड्र येणेंपरी ॥ लाविजे तुम्हीं परिकरी ॥ एक एक रेषा विस्तारीं ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ३ ॥ तीन रेषा स्थानीं स्थानीं ॥ लावावें त्याच मंत्रांनीं ॥ अधिक न लाविजे भ्रुवांहूनी ॥ भ्रूसमान लाविजे ॥ ४ ॥ नव देवता विख्यातेसी ॥ आहेत एकेक रेखेसी ॥ अकार गार्हपत्यासी ॥ भूरात्मा रजोगुणें ॥ ५ ॥ ऋग्वेद आणि क्रियाशक्ति ॥ प्रातःसवन असे ख्याति ॥ महादेव देव म्हणती ॥ प्रथम रेखेचा येणेंपरी ॥ ६ ॥ दुसऱ्या रेखेच्या देवता ॥ सांगेन ऐका विस्तारता ॥ उकार दक्षिणाग्नि देवता ॥ नभः सत्त्व जाणिजे ॥ ७ ॥ यजुर्वेद म्हणती त्यासी ॥ माध्यंदिन सवन परियेसीं ॥ इच्छाशक्ति अंतरात्म्यासी ॥ महेश्वर देवता जाण ॥ ८ ॥ तिजी रेखा मधिलेसी ॥ मकार आहवनीय परियेसीं ॥ परमात्माप्रकृतीसी ॥ ज्ञानशक्ति तयासी ॥ ९ ॥ तृतीय सवन त्यासी ॥ अधिदेवता इंद्र त्यासी ॥

१ भिंवयांच्या आकाराचें.

शिवशक्ति निर्धारेंसीं ॥ तीन रेखा येणेंपरी ॥ २१० ॥ ऐसें नमस्कारोनि ॥ त्रिपुंड्र लाविजे भस्मेंकरोनि ॥ महेश्वराची प्रीति म्हणोनि ॥ वेदशास्त्रें वाखाणिती ॥ ११ ॥ ब्रह्मचारी गृहस्थासी ॥ वानप्रस्थ यतीश्वरासी ॥ समस्त लाविजे हर्षी ॥ भस्मांकित त्रिपुंड्र ॥ १२ ॥ मुक्तिकाम जे लाविती ॥ त्यासी नाहीं पुनरावृत्ति ॥ जें जें मनीं संकल्पिती ॥ लाभती चारी पुरुषार्थ ॥ १३ ॥ क्षत्रिय वैश्य शूद्र त्रिविधांसी ॥ गोहत्यादि पातकी यांसी ॥ वीर-हत्यादि आत्महत्येंसीं ॥ शुद्धात्मा करी भस्मांकित ॥ १४ ॥ महापातकी आपण ॥ उपपातक करी जाण ॥ भस्म लावितां तत्क्षण ॥ पुण्यात्मा तो होय ॥ १५ ॥ विधिपूर्वक मंत्रेंसीं ॥ जे लाविती भक्तींसीं ॥ त्यांची महिमा अपारेसी ॥ वंद्य होय देवलोकीं ॥ १६ ॥ नेणे जरी मंत्रविधि ॥ तेणें लाविजे भावबुद्धीं ॥ त्याची महिमा अपारनिधि ॥ एकचित्तें परियेसा ॥ १७ ॥ परद्रव्यापहार देखा ॥ परस्त्रीगमन ऐका ॥ असे पापी परनिंदका ॥

तोही पावन होय जाणा ॥ १८ ॥ परक्षेत्रहरण देखा ॥ परपीडन करी जो कां ॥ सस्यं आरांम तोडी पताका ॥ तोही होय पुनीत ॥१९॥ दहन केलें गृहासी ॥ असत्यवादी परियेसीं ॥ पैशून्यपण पापियासी ॥ वेदविक्रय पापी जाण ॥ २२० ॥ कूटसाक्षी वृत्तित्यागी ॥ कौटिल्य करी पोटालागीं ॥ ऐसीं पापें सदा भोगी ॥ तोही होय पुनीत ॥ २१॥ गाई भूमि हिरण्यदान ॥ महिषी तीळ कंबळ जाण ॥ घेतलें असेल वस्त्रान्न ॥ तोही पुनीत परियेसा ॥ २२ ॥ धान्यदान जलादिदान ॥ जो घेई नीचापासून ॥ त्याणें करणें भस्मधारण ॥ तोही पुनीत होय जाण ॥ २३ ॥ कन्या विधवा अन्य स्त्रियेंसीं ॥ घडला संग जयासी ॥ अनुतप्त होवोनि परियेसीं ॥ भस्म लावितां पुनीत ॥ २४ ॥ दासी वेश्या भुजगणेंसीं ॥ वृषलस्त्री रजस्वलेंसीं ॥ केलें असेल जो कां दोषी ॥ तोही पुनीत होय जाणा ॥ २५ ॥ रस मांस लव-

१ दुसऱ्याचें शेत हरण करणें. २ धान्य. ३ बाग. ४ चहाडी. ५ शूद्रस्त्री.

णादिका ॥ केला असेल विक्रय देखा ॥ पुनीत होय भस्मसंपर्का ॥ त्रिपुंड्र लावितां परियेसा ॥ २६ ॥ जाणोनि अथवा अज्ञानता ॥ पापें घडलीं असंख्याता ॥ पवित्रत्व भस्म लावितां ॥ पुण्यात्मा होय जाणा ॥ २७ ॥ नाशील सर्व पापांसी ॥ भस्ममहिमा आहे ऐशी ॥ शिवनिंदक पापियासी ॥ नरकभोग परियेसा ॥ २८ ॥ शिवद्रव्यापहारिल्यासी ॥ निंदा करी शिव-भक्तांसी ॥ नव्हे निष्कृति त्यासी ॥ पापावेगळा नोहे जाण ॥ २९ ॥ रुद्राक्षमाळा ज्याच्या गळां ॥ लाविला त्रिपुंड्र भाळां ॥ अन्यजाति होय केवळा ॥ तोही पूज्य तिहीं लोकीं ॥ २३० ॥ जितुकीं तीर्थें[1] भूमीवरी ॥ असती क्षेत्रें नानापरी ॥ स्नान केलें पुण्य सरी ॥ भस्म लावितां परियेसा ॥ ३१ ॥ मंत्र असती कोटी शत ॥ पंचाक्षरादि विख्यात ॥ अनंत अगम्य[2] असे मंत्र ॥ जपिलें फळ भस्मांकितां ॥ ३२ ॥ इहलोकीं अखिल सुख ॥

१ तीर्थांत. २ न माहित असणारे.

होय आपण शतायुष ॥ व्याधि न होय शरीरास ॥ भस्म लावितां परियेसा ॥ ३३ ॥ पूर्वजन्मसहस्त्रांतीं ॥ आणिकही बहुतीं ॥ भस्मधारणें पापें जाता ॥ बेचाळीस वंशादि ॥ ३४ ॥ अष्टैश्वर्यें नरासी ॥ दिव्य शरीर तेजोराशी ॥ ज्ञान होय भरंवशीं ॥ देहांतीं मुक्त होईल ॥ ३५ ॥ बैसोनियां विमानीं ॥ दिव्य स्त्रिया येवोनि ॥ सेवा करिती येणें गुणीं ॥ घेऊनि जाती स्वर्गासी ॥ ३६ ॥ विद्याधर सिद्धजन ॥ गंधर्वादि देवगण ॥ इंद्रादि लोकपाल जाण ॥ वंदिती सर्व तयासी ॥ ३७ ॥ अनंतकाळ तया स्थानीं ॥ सुखें असती संतोषोनि ॥ मग जाय तेथोनि ॥ ब्रह्मलोकीं शाश्वत ॥ ३८ ॥ एकशत कल्पवरी ॥ रहाती ब्रह्मलोकीं स्थिरी ॥ तेथोनि जाती वैकुंठपुरीं ॥ विष्णुलोकीं परियेसा ॥ ३९ ॥ तीन ब्रह्मकल्पवरी ॥ रहाती नर वैकुंठपुरीं ॥ मग पार्वती कैलासशिखरीं ॥ अक्षय काळ तेथें रहाती ॥ २४० ॥ शिव-

१ देव.

सायुज्य होय तयांसी ॥ संदेह सोडोनि मानसीं ॥ लावावें त्रिपुंड्र भस्मासी ॥ सनत्कुमारादिक ऋषि सकळ ॥ ४१ ॥ वेद शास्त्र उपनिषदांत ॥ सार पाहिलें पुराणांत ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ भस्मधारणें होय जाणा ॥ ४२ ॥ ऐसें त्रिपुंड्रमहिमान ॥ सांगितलें शिवें विस्तारून ॥ म्हणोनि लावा तुम्ही सकळ जन ॥ सनत्कुमारादि ऋषीश्वर ॥ ४३ ॥ सांगोनियां सनत्कुमारासी ॥ ईश्वर गेले कैलासासी ॥ सनत्कुमार महाऋषि ॥ गेला ब्रह्मलोकाप्रती ॥ ४४ ॥ वामदेव महामुनि ॥ सांगती ऐसें विस्तारोनि ॥ ब्रह्मराक्षसें संतो-षोनि ॥ नमन केलें चरणांसी ॥४५॥ वामदेव म्हणे राक्षसासी ॥ भस्ममहिमा आहे ऐशी ॥ माझिया अंगस्पर्शीं ॥ ज्ञान तुज प्रकाशिलें ॥४६॥ ऐसें म्हणोनि संतोषीं ॥ अभिमंत्रोनियां भस्मासी ॥ देता झाला राक्षसासी ॥ वामदेव तये वेळीं ॥४७॥ ब्रह्मराक्षस त्या वेळीं ॥ लावितां त्रिपुंड्रक कपाळीं ॥ दिव्यदेह झाला बळी ॥ तेजोमूर्ति परियेसा ॥४८॥ दिव्य अवयव झाले त्यासी ॥ जैसा

सूर्यसंकाशी ॥ आनंदरूप झाला परियेसीं ॥ ब्रह्मराक्षस तये वेळीं ॥ ४९ ॥ नमन करूनि योगियासी ॥ केली प्रदक्षिणा भक्तींसीं ॥ विमान आलें तत्क्षणेसी ॥ सूर्यसंकाशपरि देखा ॥ २५० ॥ दिव्य विमानीं बैसवोनि ॥ स्वर्गीं नेला तेच क्षणीं ॥ वामदेव महामुनि ॥ परम लोक तया दिधला ॥ ५१ ॥ वामदेव महादेव ॥ मनुष्यरूप तसे स्वभाव ॥ प्रत्यक्ष तो शांभव ॥ भक्तां तारूं हिंडतसे ॥ ५२ ॥ त्रैमूर्तीचा अवतारू ॥ वामदेव सर्वेश्वरू ॥ करावया जगदुद्धारू ॥ हिंडत होता भूमीवरी ॥ ५३ ॥ भस्ममाहात्म्य असे थोरू ॥ विशेष हस्तस्पर्श गुरू ॥ ब्रह्मराक्षस पावला पारू ॥ उद्धार झाला तयाचा ॥ ५४ ॥ समस्त मंत्र असती ॥ गुरुवीण साध्य न होती ॥ वेदशास्त्रें वाखाणिती ॥ नास्ति तत्त्वं गुरोः परम् ॥ ५५ ॥ सूत म्हणे ऋषेश्वरांसी ॥ भस्ममहिमा आहे ऐसी ॥ गुरुहस्तें आहे विशेषी ॥ तस्माद्गुरु तारक ॥ ५६ ॥

१ शंकर.

येणेंपरी त्रिविक्रमासी ॥ सांगती श्रीगुरु विस्तारेंसीं ॥ त्रिविक्रमभारती हर्षी ॥ चरणांवरी माथा ठेवी ॥५७॥ नमन करूनी श्रीगुरूसी ॥ निघाले आपुल्या स्थानासी ॥ झालें ज्ञान तयासी ॥ गुरूचेनि उपदेशें ॥ ५८ ॥ येणेंपरी सिद्धमुनि ॥ सांगता झाला विस्तारोनि ॥ ऐक शिष्या नामकरणी ॥ भक्तिभावें करोनियां ॥ ५९ ॥ म्हणोनि सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्र-विस्तार ॥ भक्तिभावें ऐकती नर ॥ चारी पुरुषार्थ पावती ॥ २६० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ भस्ममहिमा विख्यात ॥ वामदेव कृपावंत ॥ होऊनि राक्षस उद्धरिला ॥ २६१ ॥ इति श्रीगुरुचरित्रकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे भस्ममहिमावर्णनं नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥ ओंवीसंख्या ॥ २६१ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागतसे सिद्धाचिये चरणां ॥ विनवीतसे कर जोडूनि जाणा ॥ भक्तिभावेंकरूनि ॥ १ ॥ जय जया जी सिद्धमुनि ॥ तूंचि तारक भवार्णीं ॥ अज्ञानतिमिर नासोनि ॥ ज्योतिः-स्वरूप तूंचि होसी ॥ २ ॥ अविद्यामायासागरीं ॥ बुडालों होतों महापुरीं ॥ तव कृपा झालियावरी ॥ तारिलें मातें स्वामिया ॥ ३ ॥ तुवां दाविला निज पंथ ॥ जेणें जोडे परमार्थ ॥ विश्वपाळक गुरुनाथ ॥ तूंचि होसी स्वामिया ॥ ४ ॥ गुरुचरित्र सुधारस ॥ त्वां पाजिला आम्हांस ॥ तृप्त नव्हे गा मानस ॥ तृषा आणिक होतसे ॥ ५ ॥ त्वां केलें उपकारासी ॥ उत्तीर्ण नव्हे वंशोवंशीं ॥ निजरूप आम्हांसी ॥ दाविलें कीं सिद्धमुनि ॥ ६ ॥ मागें कथा निरोपिलीसी ॥ अभिनव लीला दाविसी ॥ पतिताकरीं विख्यातीसी ॥ वेद चारी बोलविले ॥ ७ ॥ त्रिविक्रम मुनीश्वरासी ॥ बोधिलें ज्ञान

१ उतराई.

प्रकाशीं ॥ पुढें कथा वर्तली कैशी ॥ विस्तारावी दातारा ॥ ८ ॥ ऐकोनि शिष्याचें वचन ॥ संतोषले सिद्ध जाण ॥ प्रेमभावें आलिंगोन ॥ आश्वासिलें तये वेळीं ॥ ९ ॥ धन्य धन्य शिष्यमौळी ॥ तुज लाधलें अभीष्ट सकळी ॥ गुरूची कृपा तात्काळी ॥ झाली आतां परियेसा ॥ १० ॥ धन्य धन्य तव वाणी ॥ वेध लागला गुरुचरणीं ॥ तूं तरलासी भवार्णी ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ११ ॥ तुवां पुसिला वृत्तांत ॥ संतोष झाला आजी बहुत ॥ श्रीगुरुमहिमा ख्यात ॥ अगम्य असे सांगतां ॥ १२ ॥ एकेक महिमा सांगतां ॥ विस्तारेल बहु कथा ॥ संक्षेपमार्गें तुज आतां ॥ निरोपितों परियेसीं ॥ १३ ॥ पुढें असतां वर्तमानीं ॥ तया गाणगाग्रामभुवनीं ॥ महिमा होतसे नित्यदिनीं ॥ प्रख्यातरूपें जाण पां ॥ १४ ॥ त्रिमूर्तीचा अवतार ॥ झाला नरसिंहसरस्वती नर ॥ महिमा त्याचा अपरंपार ॥

१ न समजण्यासारखा.

सांगतां अगम्य परियेसा ॥ १५ ॥ तया स्थानीं असतां गुरु ॥ ख्याति झाली अपरंपारू ॥ प्रकाशत्व चहूं राष्ट्रीं थोरू ॥ समस्त येती दर्शना ॥ १६ ॥ महिमा त्या मूर्तीची ॥ सांगतां आम्हां शक्ति कैंची ॥ काया धरूनि मनुष्याची ॥ चरित्र केलें भूमीवरी ॥ १७ ॥ भक्त येती यात्रेसी ॥ एकभावें भक्तींसीं ॥ श्रीगुरुदर्शनमात्रेंसीं ॥ सकळाभीष्टें पावती ॥ १८ ॥ दीन होती श्रियायुक्त ॥ वांझेसी होय पुत्र त्वरित ॥ कुष्ठें असे जो पीडित ॥ सुवर्ण होय देह त्याचा ॥ १९ ॥ अंक्षहीना अक्ष येती ॥ बधिर कर्णीं ऐकती ॥ अपस्मारादि रोग जाती ॥ श्रीगुरुचरणदर्शनें ॥ २० ॥ परीस लागतां लोहासी ॥ सुवर्ण होय तात्काळेंसी ॥ श्रीगुरुकृपा होय ज्यांसी ॥ सकळाभीष्टें पावती ॥ २१ ॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ उत्तरदेशीं माहुरस्थानीं ॥ होता एक विप्र धनी ॥ नांव तया गोपीनाथ ॥ २२ ॥ तया पुत्र होउनी

१ प्रसिद्धी. २ आंधळ्याला.

मरती ॥ करी दुःख अनेक वृत्तीं ॥ दत्तात्रेयासी आराधिती ॥ स्त्रीपुरुष दोघेंजण ॥ २३ ॥ पुढें झाला आणिक सुत ॥ तयाचें नांव ठेविलें दत्त ॥ असती आपण धनवंत ॥ अती प्रीति पुत्रावरी ॥ २४ ॥ एक पुत्र तया घरीं ॥ अति प्रीति तयावरी ॥ झाला पांच संवत्सरी ॥ व्रतबंध केला त्यासी ॥ २५ ॥ वर्षे बारा होतां त्यासी ॥ विवाह करिती प्रीतींसीं ॥ अतिसुंदर नोवरीसी ॥ विचारूनि प्रीतिकरें ॥ २६ ॥ मदनाचे रतिसरसी ॥ रूप दिसे नोवरीसी ॥ मातापिता अतिहर्षीं ॥ पाहोनियां आल्हादती ॥ २७ ॥ दंपत्यें एकचि वयासी ॥ अतिप्रेमें महा हर्षीं ॥ वर्धतां झालीं षोडशी ॥ वर्षें तया विप्रासी ॥ २८ ॥ दोघें सुंदर सुलक्षण ॥ एकावरी एकाचा प्राण ॥ न विसंबिती एक क्षण ॥ अतिप्रेम परियेसा ॥ २९ ॥ ऐसें प्रेम असतां देखा ॥ व्याधि आली त्या बाळका ॥ अनेक औषधें देतां देखा ॥ आरोग्य त्यासी

१ नवराबायको.

न होय ॥ ३० ॥ न रुचे अन्न त्यासी ॥ सदा राहे उपवासी ॥ त्याची भार्या प्रीतींसीं ॥ आपण न घेई अन्न कदा ॥ ३१ ॥ पुरुषावरी आपुला प्राण ॥ करी नित्य उपोषण ॥ पतीस देतां औषध आपण ॥ प्राशन करी परियेसा ॥ ३२ ॥ येणेंपरी तीन वर्षेंसी ॥ व्याधि झाली क्षयासी ॥ पति-व्रता स्त्री कैसी ॥ पुरुषासवें कष्टतसे ॥ ३३ ॥ पुरुषदेह क्षीण झाला ॥ आपण त्यासारखी अबला ॥ तीर्थ घेवोनि चरणकमळा ॥ काळ क्रमी तयाजवळी ॥ ३४ ॥ दुर्गंधि झाला देह त्याचा ॥ जवळी न ये वैद्य साचा ॥ सुमनोभाव पतिव्रतेचा ॥ न विसंबे क्षणभरी ॥३५॥ जितुकें अन्न पतीसी ॥ तितुके ग्रास आपणासी ॥ जें जें औषध त्यासी ॥ आपण तें तें घेतसे ॥ ३६ ॥ मातापिता दायाद[1] गोती ॥ सकळ तिसी निवारिती ॥ पतिव्रता ज्ञानवंती ॥ नायके बोल कवणाचे ॥ ३७ ॥ दिव्यवस्त्रें आभरण ॥ सकळ

१ भाऊबंद.

त्यजूनि भूषण ॥ पुरुषावरी आपुला प्राण ॥ काय सुख म्हणतसे ॥ ३८ ॥ उभयतांचीं मातापिता ॥ महाधनिक तत्त्वतां ॥ पुत्रकन्येसी पाहतां ॥ अति-दुःख करिती परियेसा ॥ ३९ ॥ अनेक जप अनुष्ठान ॥ मंत्रविद्या महा-हवन ॥ अपरिमित ब्राह्मण-॥ भोजन करविती परियेसा ॥ ४० ॥ अनेक-परीचे वैद्य येती ॥ नानारस औषधें देती ॥ शमन न होय कवणें रीतीं ॥ महाव्याधि व्यापिली ॥ ४१ ॥ पुसताती जोशियासी ॥ पूजिती कुळदे-वतेसी ॥ कांहीं केल्या पुत्रासी ॥ आरोग्य कदा न होय ॥ ४२ ॥ वैद्य म्हणती तये वेळीं ॥ नव्हे बरवें यासी अढळीं[1] ॥ राखील जरी चंद्रमौळी ॥ मनुष्ययत्न नव्हे आतां ॥ ४३ ॥ ऐसें ऐकोनि मातापिता ॥ दुःखें दाटोनि करिती चिंता ॥ जय स्वामी जगन्नाथा ॥ दत्तात्रेय गुरुमूर्ति ॥ ४४ ॥ आराधोनि तुम्हांसी ॥ पुत्र लाधलों संतोषीं ॥ पापरूप आपणासी ॥ निधान केवीं

1 निश्चयानें.

जिरेल ॥ ४५ ॥ एकची पुत्र आमचे वंशीं ॥ त्यासी जरी न राखिसी ॥ प्राण देवों तयासरसीं ॥ दत्तात्रेया स्वामिया ॥ ४६ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ दुःख करिती जननीजनका ॥ वारितसे पुत्र ऐका ॥ मातापिता आलिंगोनि ॥ ४७ ॥ म्हणे आपुले भोग सरले ॥ जितकें ऋण तुम्ही लागलें ॥ अधिक घेऊं कैंचें भलें ॥ ऋणानुबंध न चुकेची ॥ ४८ ॥ ऐसें म्हणतां मातापिता ॥ दोघें झालीं मूर्च्छागता ॥ पुत्रावरी लोळतां ॥ महा-दुःखेंकरोनियां ॥ ४९ ॥ म्हणती ताता पुत्रराया ॥ आमुची आशा झाली वायां ॥ पोषिसी आम्हां म्हणोनियां ॥ केला होता निश्चय ॥ ५० ॥ उबगोनि आम्हांसी ॥ केवीं तूं जाऊं पाहसी ॥ वार्द्धक्यपणीं आपणांसी ॥ धर्म केवीं तुज घडे ॥५१॥ ऐकोनियां तयांचें वचन ॥ विनवीतसे आक्रंदोन ॥ करणें ईश्वर आधीन ॥ मनुष्ययत्न न चाले ॥ ५२ ॥ मातापिता यांचें

१ कंटाळून. २ म्हातारपणीं.

ऋण ॥ एक घडीचें स्तनपान ॥ उत्तीर्ण काहीं केल्या न जाण ॥ जन्मांतरीं येऊनियां ॥ ५३ ॥ आपण जन्मलों तुमच्या उदरीं ॥ कष्ट दाविले अतिभारी ॥ सौख्य न देखा निर्धारीं ॥ ऐसा पापी आपण जाणा ॥ ५४ ॥ आतां दुःख न करणें ॥ परमार्थी दृष्टि देणें ॥ जैसें कांहीं असे होणें ॥ ब्रह्मादिकां न चुकेची ॥ ५५ ॥ येणेंपरी जननीजनकां ॥ संबोखितें पुत्र निका ॥ तेणेंपरी स्त्रियेसी एका ॥ सांगतसे परियेसा ॥ ५६ ॥ म्हणे ऐक प्राणेश्वरी ॥ झाले आमुचे दिवस पुरी ॥ मजानिमित्त कष्टलीस भारी ॥ वृथा गेले कष्ट तुझे ॥ ५७ ॥ पूर्वजन्मींचा वैरी आपण ॥ तुजसी होतें माझें ऋण ॥ म्हणोनि दिधले जाण ॥ जन्मांतरींचे कष्ट देखा ॥ ५८ ॥ जरी रहाशी आमुचे घरीं ॥ तुज पोशितील बरवेंपरी ॥ तुज वाटतील कष्ट भारी ॥ जाईं आपुल्या माहेरा ॥ ५९ ॥ ऐसें तुझें सुंदरपण ॥ न लाधे

१ उतराई. २ आश्वासन देत.

आपण दैवहीन ॥ न राहे तुझें अहेवपण ॥ माझें अंग स्पर्शतां ॥ ६० ॥ ऐकतां पतीचें वचन ॥ मूर्च्छा आली तत्क्षण ॥ चरणीं मस्तक ठेवून ॥ दुःख करी तये वेळीं ॥ ६१ ॥ म्हणे स्वामी प्राणेश्वरा ॥ तुम्ही मज कां ओन्हेरां ॥ तुम्हांसारिखी दातारा ॥ आणिक नाहीं गति मज ॥ ६२ ॥ जेथें असेल तुमचा देहो ॥ तेथें सवेंचि असों आपण पाहों ॥ मनीं न करावा संदेहो ॥ समागमें येईन मी ॥ ६३ ॥ ऐशीं दोघांचीं बोलणीं ॥ ऐकोनियां जनकजननी ॥ देह टाकोनियां धरणीं ॥ दुःख करिती आक्रोशें ॥ ६४ ॥ उठवूनियां श्वशुरासी ॥ संबोखितसे सासूसी ॥ न करावी चिंता मानसीं ॥ पति आपुला वांचेल ॥ ६५ ॥ विनवीतसे तये वेळीं ॥ आम्हां राखील चंद्रमौळी ॥ पाठवा एखादिया स्थळीं ॥ पति आपुला वांचेल ॥ ६६ ॥ सांगती लोक महिमा-ख्याति ॥ श्रीगुरु नरसिंहसरस्वती ॥ गाण-

१ त्यागितां.

गापुरीं वास करिती ॥ तया स्वामी पहावया ॥ ६७ ॥ त्याचे दर्शनमात्रेंसीं ॥ आरोग्य होईल पतीसी ॥ आम्हां पाठवा त्वरेंसीं ॥ म्हणोनि चरणीं लागली ॥ ६८ ॥ मानवलें समस्तांसी ॥ मातापिताश्वशुरांसी ॥ निरोप पुसून समस्तांसी ॥ निघतीं झालीं तये वेळीं ॥ ६९ ॥ त्या रोगिया करोनि डोली ॥ घेवोनि निघाली ती बाळी ॥ विनवीतसे तये वेळीं ॥ आपुलिया सासूश्वशुरांसी ॥ ७० ॥ स्थिर करोनि अंतःकरण ॥ सुखें रहावें दोघेंजण ॥ पतिं असे माझा प्राण ॥ राखील आमुची कुळदेवता ॥ ७१ ॥ म्हणोनि सासूश्वशुरासी ॥ नमन करी प्रीतींसीं ॥ आशिर्वाद देती हर्षीं ॥ अहेवपण स्थिर होय ॥ ७२ ॥ तव दैवें तरी आतां ॥ आमुचा पुत्र वांचो तत्त्वतां ॥ म्हणोनि बोलती उभयतां ॥ आशीर्वाद देती क्षणोक्षणीं ॥ ७३ ॥ येणेंपरी पतीसहित ॥ होती झाली मार्गस्थ ॥ किंचित्काळ मार्ग क्रमित ॥ आली

१ पसंत पडलें. २ तरुण स्त्री.

गाणगापुरासी ॥ ७४ ॥ मार्ग क्रमितां रोगियासी ॥ अधिक झाला त्रिदोषी ॥ उतरतां ग्रामदेशीं ॥ अतिसंकट ओढवलें ॥ ७५ ॥ विचारिती श्रीगुरूसी ॥ गेले होते संगमासी ॥ जावें म्हणोनि दर्शनासी ॥ निघतीं झालीं तये वेळीं ॥ ७६ ॥ पतिव्रता तये वेळीं ॥ आली आपुले पती- जवळी ॥ पहाती जाहली अंतकाळीं ॥ प्राण गेला तत्क्षणीं ॥ ७७ ॥ आकांत करी ते नारी ॥ लोळतसे धरणीवरी ॥ भोंसकोनि घ्यावया घेतां सुरी ॥ वारिती मग जन लोक ॥ ७८ ॥ आफळी शीर भूमीसी ॥ हाणी ऊर पाषाणेंसीं ॥ केश मोकळे आक्रोशीं ॥ प्रलापीतसे ते नारी ॥७९॥ हा हा देवा काय जहालें ॥ कां मज गाईसी गांजिलें ॥ आशा करोनियां आलें ॥ राखिसी प्राण म्हणोनियां ॥ ८० ॥ पूजेसी जातां देऊळांत ॥ पुढें देऊळ करी घात ॥ ऐशी कानीं न ऐकूं मात ॥ दृष्टांत झाला आपणासी ॥ ८१ ॥

१ आपटी. २ गोष्ट.

उष्णकाळीं तापोनि नरु ॥ ठाकोनि जाय छायातरु ॥ वृक्षचि पडे घात थोरू ॥ त्यापरी झालें मज ॥ ८२ ॥ तृषेंकरूनि पीडित ॥ जाय मनुष्य गंगेंत ॥ संधीं सुसरी करी घात ॥ त्याचिपरी झालें मज ॥ ८३ ॥ व्याघ्र-भयें पळे धेनु ॥ जाय आधार म्हणोनु ॥ तेथें वधीतसे यवनु ॥ तयापरी झालें मज ॥ ८४ ॥ ऐशी पापीण दैवहीन ॥ आपुल्या पतीचा घेतला प्राण ॥ मातापितयांसी त्यजून ॥ घेवोनि आल्यें विदेशीं[1] ॥ ८५ ॥ येणेंपरी करितां दुःख ॥ पाहों आले ग्रामलोक ॥ संबोधिती सकळिक ॥ अनेका परींकरोनिया ॥ ८६ ॥ वारिती नारी सुवासिनी ॥ कां वो दुःख करिसी झणी ॥ विचार करीं वो अंतःकरणीं ॥ होणार न चुके सकळिकां ॥८७॥ ऐसें म्हणती नगरनारी ॥ तिजला दुःख झालें भारी ॥ आठवीतसे परो-परीं ॥ आपुलें जन्मकर्म सकळ ॥ ८८ ॥ ऐका हो तुम्ही मायबहिणी ॥

[1] परदेशांत.

आतां कैसीं वांचूं प्राणीं ॥ पतीस आल्यें घेवोनि ॥ याची आस करोनियां ॥ ८९ ॥ आतां कवणा शरण जाऊं ॥ राखेल कोण माझा जीवू ॥ प्राणेश्वर त्यजूनि केवूं ॥ वांचूं म्हणतसे ते नारी ॥ ९० ॥ बाळपणीं गौरीसी ॥ पूजा केली शंकरासी ॥ विवाह होतां परियेसीं ॥ मंगळागौरी पूजिली ॥ ९१ ॥ चुडे कंकणाचे आशेनी ॥ पूजा केली म्यां भवानी ॥ सांगती मातें सुवासिनी ॥ अनेकपरी व्रतादिकें ॥ ९२ ॥ जें जें सांगती मातें व्रत ॥ तें तें केलें अखंडित्त ॥ सर्व झालें आतां व्यर्थ ॥ रुसली गौरी आपणावरी ॥ ९३ ॥ आतां माझ्या हळदीसी ॥ चोर पडले गळेसरीसी ॥ समस्त दिधलें वन्हीसी ॥ कांकण कंचुकी परियेसा ॥ ९४ ॥ कोठें गेलें माझें पुण्य ॥ वृथा पूजिला गौरीरमण ॥ कैसें केलें मज निर्वाणें ॥ ऐका मायबहिणी हो ॥ ९५ ॥ केवीं राहूं आतां आपण ॥ पति माझा होता प्राण ॥

१ कशी. २ पूर्णपणें निराश.

लोकांसारिखा नव्हे जाण ॥ प्राणेश्वर परियेसा ॥ ९६ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ पतिव्रता करी दुःखा ॥ पतीचे पहातसे मुखा ॥ अनेक दुःख अधिक करी ॥ ९७ ॥ आलिंगोनि प्रेतासि ॥ रुदन करी बहुवसीं ॥ आठवी आपुल्या पूर्व दिवसीं ॥ पूर्वस्नेह तये वेळीं ॥ ९८ ॥ म्हणे पुरुषा प्राणेश्वरा ॥ कैसें त्यजिलें वरा ॥ उबगे आलांती तुम्ही भारा ॥ म्हणोनि मातें उपेक्षिलें ॥ ९९ ॥ कैसी आपण दैवहीन ॥ घटा खापरा लागतां भिन्न ॥ होतासि तूं निधान ॥ आयुष्य उणें तुझें जहालें ॥ १०० ॥ तुमच्या मातापित्यांसी ॥ सांडोनि आणिलें परदेशीं ॥ जेणेंपरी श्रावणासी ॥ वधिलें राजा दशरथें ॥ १ ॥ तैसीं तुमचीं जनकजननीं ॥ तुम्हां आणिलें त्यजूनि ॥ तुमची वार्ता[1] ऐकोनि ॥ दोघे प्राण त्यागितील ॥ २ ॥ तिन्ही हत्या भरंवसीं[2] ॥ घडल्या मज पापिणीसी ॥ वैरिणी मी तुम्हांसी ॥ पति-

१ मृत्यूची बातमी. २ खचित.

घातकी सत्य जाणा ॥ ३ ॥ ऐशी पापिणी चांडाळी ॥ निंदिती लोक सकळी ॥ प्राण घातले कीं मीं बळीं ॥ पतिघातकी सत्य म्हणती मज ॥ ४ ॥ स्त्री नव्हे मी तुमची वैरी ॥ जैसी तिखट शस्त्रापरी ॥ वधिली तुमचे शरीरीं ॥ घेतला प्राण आपण ॥ ५ ॥ मातापिता बंधु सकळी ॥ जरी असती तुम्हांजवळी ॥ मुख पाहती अंतकाळीं ॥ तयांसि विघ्न म्यां केलें ॥ ६ ॥ वृद्ध सासूसासऱ्यांस ॥ पोसाल म्हणोन होती आस ॥ पुरला नाहीं त्यांचा सोस¹ ॥ त्यांतें सांडोनि केवीं जाशी ॥ ७ ॥ एकुलते एक तुम्ही त्यांसी ॥ उबगलेती पोसायासी ॥ आम्हां कोठें ठेवूनि जासी ॥ प्राणेश्वरा दातारा ॥ ८ ॥ आतां आपण कोठें जावें ॥ कोणीं मातें पोसावें ॥ न सांगतां बरवें ॥ निघोनि जासी प्राणेश्वरा ॥ ९ ॥ तूं माझा प्राणेश्वरु ॥ तुझें महत्त्व केवीं विसरूं ॥ लोकांसारिखा नव्हेसी नरू ॥ प्रतिपाळिलें

---

१ मुद्दाम. २ हेतु.

प्रियभावें ॥ ११० ॥ कधीं नेणें पृथक्‌शयन ॥ वामहस्त उसेंवीण ॥ आतां फुटलें अंतःकरण ॥ केवीं वांचूं प्राणेश्वरा ॥ ११ ॥ किती आठवूं तुझे गुण ॥ पति नव्हेसी माझा प्राण ॥ सोडोनि जातोसी निर्वाण ॥ कवणें परीनें तुम्ही ॥ १२ ॥ आतां कवणा घरीं जाणें ॥ कवण घेतील मम पोसणें ॥ बालविधवा म्हणोनि घेणें ॥ जन अपवाद ठेविती ॥ १३ ॥ एखादी बुद्धि न सांगतां ॥ त्यजिला प्राण आत्मनाथा ॥ कोठें जावें आपण आतां ॥ केशवपन करूनि ॥ १४ ॥ तव प्रेमें होतें भरल्यें ॥ मातापित-यांतें विसरल्यें ॥ त्यांच्या गृहीं नाहीं गेल्यें ॥ बोलावणीं नित्य येतीं ॥ १५ ॥ केवीं जावों त्यांचिया घरा ॥ उपेक्षिसी प्राणेश्वरा ॥ दैन्यवृत्तीं दातारा ॥ चित्त त्यांचें केवीं धरूं ॥ १६ ॥ जोंवरी होतासी तूं छत्र ॥ तों सर्वां ठायीं मी पवित्र ॥ मानिती सकळ इष्टमित्र ॥ आतां निंदा करतील ॥ १७ ॥ सासू-श्वशुरापासीं जाण ॥ माझें मुख पहातां मरण ॥ गृह जहालें वो अरण्य ॥



[ अ० ३० ] भस्मांकित जटाधारी । रुद्राक्षभूषणें अलंकारी । त्रिशूल धरिला असे करीं । येवोनी जवळी उभा ठेला ॥ १२१ ॥

तुम्हांवीण प्राणेश्वरा ॥ १८ ॥ घेवोनि आल्यें आरोग्यासी ॥ येथें ठेवोनि तुम्हांसी ॥ केवीं जावें घरासी ॥ राक्षसिणी पापिणी ॥ १९ ॥ ऐसें आठवोनि अनेकपरी ॥ दुःख करी अपरंपारी ॥ इतुकें होता ते अवसरीं ॥ आला तेथें सिद्ध² एक ॥१२०॥ भस्मांकित जटाधारी ॥ रुद्राक्षभूषणें अलंकारीं ॥ त्रिशूळ धरिला असे करीं ॥ येवोनि जवळी उभा ठेला ॥ २१ ॥ संबोखित³ असे तये वेळीं¹ ॥ कां वो प्रलय करिसी स्थूळीं ॥ जैसें लिहिलें असे कपाळीं ॥ त्याचपरी होतसे ॥ २२ ॥ पूर्वजन्मींचें तपफळ ॥ लागलें देहासी सकळ ॥ वायां रडसी निर्फळ ॥ शोक आतां करूं नको ॥ २३ ॥ आठ दिवस जरीं तूं रडसी ॥ न येती प्राण प्रेतासी ॥ जैसें लिहिलें ललाटेसी ॥ तयापरी घडे जाण ॥ २४ ॥ मूढपणें दुःख करिसी ॥ समस्त मरणार तूं जाणसी ॥ कवण वांचला धरित्रीसी⁴ ॥ सांगें आपणा म्हणतसे

१ वेळीं. २ साधु. ३ विचारीत. ४ पृथ्वीवर.

॥ २५ ॥ आपुला म्हणसी प्राणेश्वर ॥ कोठें उपजला तो नर ॥ तुझा जन्म झाला येर ॥ कवण तुझे मातापिता ॥ २६ ॥ पूर येतां गंगेप्रती ॥ नानापरीचीं काष्ठें वाहतीं ॥ येऊनि एके ठायीं मिळतीं ॥ फांकती आणिक चहूंकडे ॥ २७ ॥ पाहें पां एक वृक्षावरी ॥ येती पक्षी अपरंपारी ॥ क्रमूनियां प्रहर चारी ॥ जाती मागुति चहूंकडे ॥ २८ ॥ तैसा संसार जाण नारी ॥ कोण जन्मला आहे स्थिरीं ॥ मायामोहें कलत्रपुत्रीं ॥ पति म्हणसी आपुला ॥ २९ ॥ गंगेमध्यें जैसा फेण ॥ तैसाचि हा देह जाण ॥ स्थिर नव्हे या कारणें ॥ शोक वृथा करूं नको ॥ १३० ॥ पंचभूतात्मक देह ॥ तत्संबंधीं गुण पाहें ॥ आपुलें कर्म जैसें आहे ॥ तैसे गुण उद्भवती ॥ ३१ ॥ गुणानुबंधें कर्में घडतीं ॥ कर्मासारिखी फळप्राप्ति ॥ मायामोह याचि रीतीं ॥ मायामयसंबंधें ॥ ३२ ॥ मायासंबंध मायागुण ॥ उपजे सत्त्व रज तमोगुण ॥ येणेंचि रीतीं तिन्ही जाण ॥ त्रिगुणात्मक अवधारा

॥ ३३ ॥ याचि संसार वर्तमानीं ॥ समस्त कर्मांचे आधीन प्राणी ॥ सुख-दुःख आपुल्या गुणीं ॥ भोगिजे आपुल्या आर्जव ॥ ३४ ॥ कल्पकोटी दिवसांवरी ॥ देवांसी आयुष्य आहे जरी ॥ त्यांसी काळ न चुके परी ॥ मनुष्याचा पाड काय ॥ ३५ ॥ काळ सकळां कारण ॥ कर्माधीन देह जाण ॥ म्हणोनि कल्पावें अस्थिरपण ॥ पंचभूतात्मक देहासी ॥ ३६ ॥ काळ कर्माधीन गुण ॥ पंचभूतात्मक देह जाण ॥ उपजतां संतोष मन ॥ मेलिया दुःख न करावें ॥ ३७ ॥ गर्भीं जर्थी येतांचि नर ॥ नाश असे त्याचे बरोबर ॥ जैसें कर्म गुण येर ॥ मरण जनन परियेसा ॥ ३८ ॥ कवणा मृत्यु पूर्ववयासी ॥ कवणा मृत्यु वार्धक्येसी ॥ जैसें आर्जव ज्यासी ॥ त्याचि परी घडतसे ॥ ३९ ॥ पूर्वजन्मार्जितासरसीं ॥ भोगणें असे सुख-दुःखासी ॥ कलत्रपुत्र अतिहर्षीं ॥ पापपुण्यवश जाणा ॥ १४० ॥ आयुष्य

१ लहानपणीं.

सुख² दुःख ॥ पापपुण्यांनुसार लेख ॥ ललाटीं लिहिलें सुखदुःख ॥ अढळ असे सर्वांसी ॥ ४१ ॥ एखादिया कर्मासी ॥ लंघिजेल पुण्यबळेंसीं ॥ देव-दानवमनुष्यांसी ॥ काळ न चुके सर्वथा ॥ ४२ ॥ संसार म्हणजे स्वप्ना-परी ॥ इंद्रजाल अवधारीं ॥ मिथ्या जाण तयापरी ॥ दुःख आपण करूं नये ॥ ४३ ॥ शतसहस्रकोटी जन्मीं ॥ तूं कोणाची होतीस भामिनी ॥ वायां दुःख करिसी साजणी ॥ मूर्खपणेंकरोनियां ॥ ४४ ॥ पंचभूतात्मक शरीर ॥ त्वचा शिरा मांस रुधिर ॥ मेद मज्जा अस्थि नर ॥ विष्ठा मूत्र श्लेष्म संधी ॥ ४५ ॥ ऐशा शरीरघोरांत ॥ पाहतां काय असे स्वार्थ ॥ मळमूत्र भरलें रक्त ॥ तयाकारणें शोक करिसी ॥ ४६ ॥ विचार पाहें पुढें आपुला ॥ कोणें परी मार्ग भला ॥ संसारसागर पाहिजे तरला ॥ तैसा मार्ग पाहें बाळे ॥ ४७ ॥ येणेंपरी तियेसी ॥ बोधिता झाला तापसी ॥ ज्ञान झालें तियेसी ॥

२ पत्नी. २ तपस्वी.

सांडिला शोक तये वेळीं ॥ ४८ ॥ कर जोडोनि तये वेळीं ॥ माथा ठेविला चरणकमळीं ॥ विनवीतसे करुणा बाहाळी ॥ उद्धरावें स्वामी म्हणोनि ॥ ४९ ॥ कवण मार्ग आपणासी ॥ जैसा स्वामी निरोप देसी ॥ जनक-जननी तूं आम्हांसी ॥ तारीं तारीं म्हणतसे ॥ १५० ॥ कवणें प्रकारें आपण ॥ तरेन मी भवार्ण ॥ तुझा निरोप मी करीन ॥ म्हणोनि चरणीं लागली ॥ ५१ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ सांगे योगी प्रसन्नवदन ॥ बोल-तसे विचारून ॥ आचरण स्त्रियेचें ॥ ५२ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ त्याचे वचनीं विस्तार ॥ ऐकतां होय पाप दूर ॥ सकळाभीष्टें साधतीं ॥ ५३ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ विप्र रोगी झाला मृत ॥ तयासी पावला गुरुनाथ ॥ तारावयाकारणें ॥ १५४ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे मृतद्विजभार्याशोको नाम त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३० ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥१५४॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व झालें ऐका ॥ योगेश्वर कारणिका ॥ सांगे स्त्रियांचे धर्म सकळ ॥ १ ॥ योगेश्वर म्हणती स्त्रियेसी ॥ आचार स्त्रियांचे पुससी ॥ सांगेन तुज विस्तारेंसीं ॥ भवसागर तरावया ॥ २ ॥ पति असतां कवण धर्म ॥ अथवा मेलिया काय कर्म ॥ उभयपक्षीं विस्तारोन ॥ सांगेन ऐक एकचित्तें ॥ ३ ॥ कथा स्कंदपुराणांत ॥ काशीखंडीं विस्तृत ॥ स्त्रियांचे धर्म बहुत ॥ एकचित्तें ऐकावे ॥ ४ ॥ अगस्ति ऋषि महामुनि ॥ जो कां होता काशीभुवनीं ॥ लोपामुद्रा महाज्ञानी ॥ त्याची भार्या परियेसा ॥ ५ ॥ पतिव्रताशिरोमणि ॥ दुजी नव्हती आणिक कोणी ॥ असतां तेथें वर्तमानीं ॥ झालें अपूर्व परियेसा ॥ ६ ॥ त्या अगस्तीच्या शिष्यांत ॥ विंध्य नामें असे विख्यात ॥ पर्वतरूपें असे वर्तत ॥ होता भूमीवरी देखा ॥ ७ ॥ विंध्याचळ म्हणिजे गिरि ॥ अपूर्व वनें त्यावरी ॥ शोभायमान महाशिखरीं ॥ बहु रम्य परियेसा ॥ ८ ॥

ब्रह्मर्षि नारदमुनि ॥ हिंडत गेला तये स्थानीं ॥ संतोष पावला पाहोनि ॥ स्तुति केली तये वेळीं ॥ ९ ॥ नारद म्हणे विंध्यासी ॥ सर्वांत श्रेष्ठ तूं होसी ॥ सकळ वृक्ष तुजपासीं ॥ मनोरम्य स्थळ तुझें ॥ १० ॥ परी एक असे उणें ॥ मेरूसमान नव्हेसी जाणें ॥ स्थळ स्वल्प या कारणें ॥ महत्त्व नाहीं परियेसा ॥ ११ ॥ ऐसें म्हणतां नारदमुनि ॥ विंध्याचळ कोपोनि ॥ वाढता झाला ते क्षणीं ॥ मेरूपरी होईन म्हणे ॥ १२ ॥ वाढे विंध्याचळ देखा ॥ सूर्यमंडळासम्मुखा ॥ क्रमांतरें वाढतां ऐका ॥ गेला स्वर्गभुवनासी ॥ १३ ॥ विंध्याद्रीच्या दक्षिण भागासी ॥ अंधकार अहर्निशीं ॥ सूर्यरश्मी न दिसे कैशीं ॥ यज्ञादि कर्मे राहिलीं ॥१४॥ ऋषि समस्त मिळोनि ॥ विनवूं आले इंद्रभुवनीं ॥ विंध्याद्रीची करणी ॥ सांगते झाले विस्तारें ॥ १५ ॥ इंद्र कोपे तये वेळीं ॥ गेला तया ब्रह्मयाजवळी ॥ सांगितला वृत्तांत सकळी ॥ तया विंध्य पर्वताचा ॥ १६ ॥ ब्रह्मा म्हणे इंद्रासी ॥ आहे कारण

आम्हांसी ॥ अगास्ति असे पुरीं काशी ॥ त्यासी दक्षिण दिशे पाठवावें ॥ १७ ॥ दक्षिण दिशा भूमीसी ॥ अंधार पडिला परियेसीं ॥ या कारणें अगस्तीसी ॥ दक्षिण दिशे पाठवावें ॥ १८ ॥ अगस्तीचा शिष्य देखा ॥ विंध्याचळ आहे जो कां ॥ गुरु येतां सम्मुखा ॥ नमितां होई दंडवत ॥१९॥ सांगेल अगस्ति शिष्यासी ॥ वाढों नको म्हणेल त्यासी ॥ गमन करितां शिखरेंसीं ॥ भूमीसमान करील ॥२०॥ या कारणें तुम्हीं आतां ॥ काशी पुरा जावें तत्त्वतां ॥ अगस्तीतें नम्रतां ॥ दक्षिणेसी पाठवावें ॥ २१ ॥ येणेंपरी इंद्रासी ॥ सांगे ब्रह्मदेव हर्षी ॥ निरोप घेऊन वेगेंसीं ॥ निघता झाला अमरनाथ ॥ २२ ॥ देवासहित इंद्र देखा ॥ सवें बृहस्पति [१]एका ॥ सकळ ऋषि मिळोनि देखा ॥ आले काशीभुवनासी ॥ २३ ॥ अगस्तीच्या आश्रमासी ॥ पातले समस्त इंद्र ऋषि ॥ देवगुरु महाऋषि ॥ बृहस्पति सवें

१ इंद्र.

असे ॥ २४ ॥ देखोनियां अगास्ति मुनि ॥ सकळांतें अभिवंदोनि ॥ अर्घ्य-
पाद्य देउनी ॥ पूजा केली भक्तीनें ॥२५॥ देव आणि बृहस्पति ॥ अगस्ती-
ची करिती स्तुति ॥ आणिक सर्वेचि आणिती ॥ लोपामुद्रा पतिव्रता
॥२६॥ देवगुरु बृहस्पति ॥ सांगे पतिव्रताख्याति ॥ पूर्वीं पतिव्रता बहुती ॥
लोपामुद्रासरी नव्हती ॥ २७ ॥ अरुंधती सावित्री सती ॥ अनसूया पति-
व्रती ॥ शांडिल्याची पत्नी होती ॥ पतिव्रता विख्यात ॥ २८ ॥ लक्ष्मी
आणि पार्वती ॥ शातरूपा स्वयंभूपत्नी ॥ मेनिका अतिविख्याती ॥ हिम-
वंताची प्राणेश्वरी ॥ २९ ॥ सुनीति ध्रुवाची माता ॥ संज्ञादेवी सूर्यकांता ॥
स्वाहादेवी विख्याता ॥ यज्ञपुरुषप्राणेश्वरी ॥ ३० ॥ यांहूनि आणिक
ख्याता ॥ लोपामुद्रा पतिव्रता ॥ ऐका समस्त देवगण म्हणतां ॥ बृहस्पति
सांगतसे ॥ ३१ ॥ पतिव्रतेचें आचरण ॥ सांगे गुरु विस्तारोन ॥ पुरुष
जेविता प्रसाद जाण ॥ मुख्य भोजन स्त्रियेसी ॥ ३२ ॥ आणिक सेवा



[ अ० ३१ ] देव आणि बृहस्पति । अगस्तीची करिती स्तुति । आणिक सर्वेचि विनविती । लोपामुद्रा पतिव्रता ॥ २६ ॥

ऐशी करणें ॥ पुरुष देखोनि उभें राहणें ॥ आज्ञेविण बैसों नेणे ॥ अवज्ञा न करणें पतीची ॥ ३३ ॥ दिवस अखंड सेवा करणें ॥ अतिथि येतां पूजा करणें ॥ पतिनिरोपावीण न जाणें ॥ दानधर्म न करावा ॥ ३४ ॥ पतीची सेवा निरंतरीं ॥ मनीं भाविजे हाचि हरि ॥ शयनकाळीं सर्व रात्रीं ॥ सेवा करावी भक्तींसीं ॥ ३५ ॥ पति निद्रिस्त झाल्यावरी ॥ आपण शयन कीजे नारी ॥ चोळी तानवडें ठेवावीं दुरी ॥ तेणें पुरुषशरीर स्पर्शूं नये ॥ ३६ ॥ स्पर्शे चोळी पुरुषासी ॥ हानि होत अयुष्यासी ॥ घेऊं नये नांव त्यासी ॥ पती-आयुष्य उणें होय ॥ ३७ ॥ जागृत न होतां पति ऐका ॥ पुढें उठीजे सती देखा ॥ करणें सडासंमार्जन निका ॥ करणें निर्मळ मंगलप्रद ॥ ३८ ॥ स्नान करूनि त्वरित ॥ पूजूनि घ्यावें पतितीर्थ ॥ चरणीं मस्तक ठेवोनि यथार्थ ॥ शिवासमान भावावें ॥ ३९ ॥ असतां ग्रामीं गृहीं पुरुष ॥ सर्व शृंगार करणें हर्ष ॥ ग्रामा गेलिया पुरुष ॥ श्रृंगार आपण

करूं नये ॥ ४० ॥ पति निष्ठुर बोले जरी ॥ आपण कोप कदा न करी ॥ क्षमा म्हणोनि चरण धरी ॥ राग न धरी मनात ॥ ४१ ॥ पति येता बाहेरूनी ॥ सामोरी जाय तेक्षणीं ॥ सकळ कामें त्यजूनि ॥ सम्मुख जाय पतिव्रता ॥ ४२ ॥ काय निरोप म्हणोनि ॥ पुसावें ऐसें वंदोनि ॥ जें वसे पतीच्या मनीं ॥ त्याचपरी रहाटे ॥ ४३ ॥ पतिव्रतेचें ऐसें लक्षण ॥ सांगेन ऐका देवगण ॥ बहिर्द्वारीं[1] जातां जाण ॥ अनेक दोष परियेसा ॥ ४४ ॥ बहिर्द्वारीं जाणें जरी ॥ पाहूं नये नर नारीं ॥ सर्वांच्चि परतावें लवकरी ॥ आपुले गृहीं असावें ॥ ४५ ॥ जरी पाहे बहिर्द्वारीं ॥ उलूकयोनीं[2] जन्मे नारी ॥ याच प्रकारें निर्धारीं ॥ पातिव्रत्य लोपामुद्रेचें ॥ ४६ ॥ लोपामुद्रा पतिव्रता ॥ बाहेर न वचे सर्वथा ॥ प्रातःकाळ जो कां होतां ॥ सडासंमार्जन करीतस ॥ ४७ ॥ देवउपकरणीं उजळोनि ॥ गंधाक्षतादि करूनि ॥ पुष्पवाती पंचवर्णीं ॥ रंगमाळा देवांसी ॥ ४८ ॥ अनुष्ठानाहूनि पति येतां ॥

---

१ घराच्या बाहेर. २ घुबड.

सकळ आर्यतीं करी तत्त्वतां ॥ धरोनि पतीच्या चित्ता ॥ पतीसवें रहाटे ती ॥ ४९ ॥ पुरुषाचें उच्छिष्ट भोजन ॥ मनोभावें करणें आपण ॥ नसतां पुरुष ग्रामीं जाण ॥ घ्यावा अतिथिधेनुप्रसाद ॥ ५० ॥ अतिथींसी घालावें अन्न ॥ अथवा धेनूतें पुजोन ॥ भोजन करावें सगुण ॥ पतिव्रता परियेसा ॥ ५१ ॥ गृह निर्मळ निरंतर करी ॥ निरोपावेगळा धर्म न करी ॥ व्रतोपवास येणेंपरी ॥ निरोपावेगळें न करी जाणा ॥ ५२ ॥ उत्साह होतां नगरांत ॥ कधीं पाहूं न म्हणत ॥ तीर्थयात्राविवाहार्थ ॥ कधींही न वचे परियेसा ॥ ५३ ॥ पुरुष संतोषी असतां जरी ॥ दुश्चित्त नसावी त्याची नारी ॥ पुरुष दुश्चित्त असतां जरी ॥ आपण संतोषी असों नये ॥ ५४ ॥ रजस्वला झालिया देखा ॥ बोलों नये मौनादिका ॥ नायकावे वेद ऐका ॥ मुख पुरुषा दाखवूं नये ॥ ५५ ॥ ऐसे चारी दिवसांवरी ॥ आचरावें तिये

१ तयारी.

नारी ॥ सुस्नात होतां ते अवसरीं ॥ पुरुषमुख अवलोकिजे ॥ ५६ ॥ जरी नसे पुरुष भवनीं ॥ त्याचें रूप ध्यावें मनीं ॥ सूर्यमंडळ पाहोनि ॥ घरांत जावें पतिव्रतें ॥५७॥ पुरुषआयुष्यवर्धनार्थ ॥ हळदीकुंकुम लाविजे ख्यात ॥ सेंदूर काजळ कंठसूत्र ॥ फणी माथां असावी ॥ ५८ ॥ तांबूल घ्यावें सुवासिनीं ॥ असावी तिचे माथां वेणी ॥ करीं कंकणें तोडर चरणीं ॥ पुरुषांसमीप येणेंपरी ॥ ५९ ॥ न करी इष्टत्व शेजारणीशीं ॥ रजकस्त्रीकुंटिणीसी ॥ जैनस्त्रीद्रव्यहीनेंसीं ॥ इष्टत्व करितां हानि होय ॥ ६० ॥ पुरुषनिंदक स्त्रियेसीं ॥ न बोलावें तियेसीं ॥ बोलतां दोष घडे तिसीं ॥ पतिव्रतालक्षण ॥ ६१ ॥ सासू श्वशुर नणंद बहिणी ॥ दीर भावांतें त्यजुनी ॥ राहतां वेगळेपणीं ॥ श्वानजन्म पावती ॥ ६२ ॥ अंग धुवों नये नग्नपणें ॥ उखळमुसळीं न बैसणें ॥ पाईं विरवल्यावीण जाणें ॥ फिरूं नये पतिव्रतें ॥६३॥

१ परटीण.

जातें उंबऱ्यावरी देखा ॥ बैसों नये वडिलांसम्मुखा ॥ पतिव्रतालक्षण ऐका ॥ येणेंपरी असावें ॥ ६४ ॥ पतिसवें विवाद ॥ करितां पावे महा-खेद ॥ पतिअंतःकरणीं उद्वेग ॥ आपण कदा करूं नये ॥ ६५ ॥ जरी असे अभाग्य पुरुष ॥ नपुंसक जरी असे देख ॥ असे व्याधिष्ठ अविवेक ॥ तरी देवासमान मानावा ॥६६॥ तैसा पुरुष असेल जरी ॥ तोचि मानावा हरि ॥ त्याचे बोलणें रहाटे तरी ॥ परमेश्वरा प्रिय होय ॥ ६७ ॥ पतीचे मनीं जी आवडी ॥ तैसींच ल्यावीं लेणीं लुगडीं ॥ पति दुश्चित्त[1] असतां घडी ॥ आपण शृंगार करूं नये ॥ ६८ ॥ सोपस्कार[2] पाहिजे जरी ॥ न सांगावें आपण नारी ॥ असतां कन्या पुत्र जरी ॥ तयांमुखीं सागावें ॥ ६९ ॥ जरी नसेल जवळी कोण ॥ वस्तूची दाखवावी खूण ॥ अमुक पाहिजे म्हणोन ॥ निर्धार करोनि न सांगिजे ॥ ७० ॥ जितुकें मिळालें

१ खिन्नता. २ पदार्थ.

पतीसी ॥ संतुष्ट असावें मानसीं ॥ समर्थ पाहोनि कांक्षेंसीं ॥ पतिनिंदा करूं नये ॥ ७१ ॥ तीर्थयात्रे जाती लोक ॥ म्हणूनि न गावें कौतुक ॥ पुरुषाचें पादोदक ॥ तेंचि तीर्थ मानावें ॥ ७२ ॥ भागीरथीसमान देख ॥ पतिचरणतीर्थ अधिक ॥ पतिसेवा करणें मुख ॥ त्रयमूर्ति संतुष्टती ॥७३॥ व्रत करणें असेल मनीं ॥ तें पुरुषा करावें पुसोनि ॥ आत्मबुद्धीं करितां कोणीं ॥ पति-आयुष्य उणें होय ॥ ७४ ॥ आणिक जाय नरकाप्रती ॥ पति घेवोनि सांगाती ॥ ऐसें बोलती वेदश्रुति ॥ बृहस्पति सांगतसे ॥७५॥ पतीस क्रोधें उत्तर देती ॥ श्वानयोनीं जन्म पावती ॥ जंबुक होवोनि भुंकती ॥ ग्रामासन्निध येऊन ॥ ७६ ॥ नित्य नेम करणें नारी ॥ पुरुष-उच्छिष्ट भोजन करी ॥ पाद प्रक्षालोनि तीर्थधारीं ॥ घेवोनि तीर्थ जेवावें ॥ ७७ ॥ पति प्रत्यक्ष शंकर ॥ काम्य होती मनोहर ॥ पावे ती वैकुंठपूर ॥

१ स्वतःचे विचारानें.

पतिसहित स्वर्गभुवना ॥ ७८ ॥ जावों नये वनभोजनासी ॥ अथवा शेजारी-गृहासी ॥ इष्टसोयरे म्हणोनि हर्षीं ॥ प्रतिदिनीं न जावें ॥ ७९ ॥ आपुला पुरुष दुर्बल किती ॥ समर्थांची न करावी स्तुति ॥ पति असतां अनाचार-रीतीं ॥ आपण निंदा करूं नये ॥ ८० ॥ कैसा तरी आपुला पति ॥ आपण करावी त्याची स्तुति ॥ तोचि म्हणावा लक्ष्मीपति ॥ एकभावेंकरोनियां ॥ ८१ ॥ सासुश्वशुरपुरुषांपुढें ॥ नेटें[1] बोलों नये गाढें ॥ हांसों नये त्यांपुढें ॥ पतिआयुष्य उणें होय ॥ ८२ ॥ सासूश्वशुर त्यजून आपण ॥ वेगळें असूं म्हणे कवण ॥ ऋक्षयोनीं जन्मोन ॥ अरण्यांत हिंडेल ॥ ८३ ॥ पुरुष कोपें मारी जरी ॥ मनीं म्हणे हा मरो नारी ॥ जन्म पावेल योनीं व्याघ्रीं ॥ महाघोर अरण्यांत ॥ ८४ ॥ परपुरुषांतें नयनीं पाहे ॥ उपजतां वरडोळी होय ॥ पुरुषा वंचूंनि[2] विशेष खाय ॥ ग्रामसूकर होय ती ॥ ८५ ॥ तोही

१ जोरानें. २ ठकवून.

जन्म सोडोनि ॥ उपजे वागुळाचे योनीं ॥ आपुली विष्ठा आपण भक्षुनी ॥ वृक्षावरी लोंबतसे ॥ ८६ ॥ पतिसन्मुख निष्ठुर वचनीं ॥ उत्तर देती कोपोनि ॥ उपजे मुकी होऊनि ॥ सप्तजन्म दरिद्री ॥ ८७ ॥ पुरुष दुजी पत्नी करी ॥ तिसीं आपण वैर धरी ॥ सप्तजन्मांवरी ॥ दुर्भाग्यता होय अवधारा ॥८८ ॥ पुरुषावरी दुसरिया ॥ दृष्टि ज्या करिती आवडियां ॥ पतिताघरीं जन्म पावोनियां ॥ दुःखें सदा दारिद्य भोगिती ॥ ८९ ॥ पुरुष येतां बाहेरुनी ॥ सन्मुख जावें भामिनीं ॥ उदकें पाद प्रक्षालुनी ॥ विंझणा वारिजे श्रमहार ॥ ९० ॥ पांदसंवाहन भक्तींसीं ॥ मृदु वाक्य बोलिजे पतीसी ॥ पुरुष होतां संतोषी ॥ त्रिमूर्ति संतोषती ॥ ९१ ॥ काय देती माता पिता ॥ नेदी इष्टवर्ग बंधु भ्राता ॥ इहपराची जोडी देता ॥ पुरुष नारीचा देव जाण ॥ ९२ ॥ गुरु देव तीर्थें समस्तीं ॥ सर्व जाणावा

१ पत्नीनें. २ पाय चेपणें.

आपुला पति ॥ ऐसा निश्चय ज्यांच्या चित्तीं ॥ पतिव्रता त्याचि जाणा ॥ ९३ ॥ जीव असतां शरीरासी ॥ पवित्र होय समस्तांसी ॥ जीव जातां क्षणें केसी ॥ कदा प्रेता नातळती ॥ ९४ ॥ तैसा पति प्राण आपला ॥ पति नसतां अशुचि तिला ॥ या कारणें पतिच सकळा ॥ प्राण आपुला जाणावा ॥९५॥ पति नसतां स्त्रियेसी ॥ सर्व अमंगळ परियेसीं ॥ विधवा म्हणजे प्रेता-सरसी ॥ अपत्य नसतां अधिक जाण ॥ ९६ ॥ ग्रामास जातां परियेसीं ॥ विधवा भेटतां सन्मुखेंसीं ॥ मरण सांगे सत्य त्यासी ॥ पुत्रासी अशुभ नव्हे जाणा ॥ ९७ ॥ माता विधवा असे जरी ॥ पुत्रासी मंगळ शकुन करी ॥ पुत्राविण विधवा नारी ॥ नमन तिसी करूं नये ॥ ९८ ॥ तिच्या आशीर्वादें आपण ॥ मंगळ होय सत्य जाण ॥ तिचा हो कां शाप मरण ॥ तिसीं कोणीं बोलूं नये ॥ ९९ ॥ या कारणें पतिव्रता ॥ बरवें पुरुषासवें जातां ॥ सर्व वैभव देहासहिता ॥ केवीं जाई परियेसा ॥ १०० ॥

चंद्रासवें चांदणी जैसी ॥ मेघासवें वीज कैसी ॥ मावळतां सवेंचि जातसे ॥ पतीसवें तैसें जावें ॥ १ ॥ सहगमन करणें मुख्य जाण ॥ थोर धर्मश्रुतीचें वचन ॥ पूर्वज बेचाळिस उद्धरण ॥ पतिव्रताधर्मानें ॥२॥ पुरुष प्रेत झालियावरी ॥ सहगमना जातां ते नारी ॥ एकेक पाउलीं निर्धारीं ॥ अश्वमेधसहस्रपुण्य ॥ ३ ॥ पापी पुरुष असेल जाण ॥ त्यासी आलें जरी मरण ॥ यमदूत नेती बांधून ॥ नरकाप्रती परियेसा ॥४॥ पतिव्रता त्याची नारी ॥ जरी सहगमन करी ॥ जैसी सर्पासी नेत घारी ॥ तैसी पतीतें स्वर्गा नेई ॥ ५ ॥ सहगमन केलियावरी ॥ पाहूनि यमदूत पळती दुरी ॥ पतीसी सोडोनि सत्वरी ॥ जाती यमदूत आपले पुरासी ॥ ६ ॥ पतिव्रताशिरोमणी ॥ बैसविती विमानीं ॥ पाववितीं स्वर्गभुवनीं ॥ देवांगना ओंवाळिती ॥ ७ ॥ यमदूत त्वरें पळती ॥ काळाची न चाले ख्याती ॥ पतिव्रता देख-

१ सती जाणें

तांचि चित्तीं ॥ भय वाटे म्हणताती ॥ ८ ॥ सूर्य भितो देखून तियेसी ॥ तपतो तेजें मंदेंसीं ॥ अग्नि भिउनी शांतीसी ॥ उष्ण तिसी होऊं न शके ॥ ९ ॥ नक्षत्रें भीति पाहतां तियेसी ॥ आपुलें स्थान घेईल ऐशी ॥ जाय स्वर्गभुवनासी ॥ पतीसहित परियेसा ॥ ११० ॥ येणेंपरी स्वर्गभुवनीं ॥ जाय नारी संतोषोनि ॥ आपुलें पतीस घेऊनि ॥ राहे स्वर्गी निरंतर ॥ ११ ॥ तीन कोटि रोमें तिसी ॥ स्वदेह देतां अग्नीसी ॥ त्याचीं फळें असतीं कैशीं ॥ एकचित्तें ऐकावें ॥ १२ ॥ एकेक रोम रोमासी ॥ स्वर्गी राहे शतकोटि वर्षीं ॥ पुरुषासवें स्वानंदेंसीं ॥ पतिव्रता राहे तेथें ॥ १३ ॥ ऐसें पुण्य सहगमनासी ॥ कन्या व्हावी ऐशी वंशीं ॥ बेचाळीस कुळें कैसीं ॥ घेऊन जाय स्वर्गातें ॥ १४ ॥ धन्य तिचीं मातापिता ॥ एकवीस कुळें उद्धरितां ॥ धन्य पुरुषवंश ख्याता ॥ बेचाळीस उद्धारिले ॥ १५ ॥ ऐसें

१ प्रकाशतो. २ केंस.

पुण्य सहगमनासी ॥ पतिव्रतेच्या संगतीसी ॥ आणिक सांगेन विस्तारेंसीं ॥
देवगुरु म्हणतसे ॥ १६ ॥ असेल नारी दुराचारी ॥ अथवा व्यभिचारकर्म
करी ॥ त्याचें फळ अतिघोरीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ १७ ॥ उभय कुळें
बेचाळिस ॥ जरी असतील स्वर्गास ॥ त्यांसी घेउनि नरकास ॥ प्रेमें जाय
परियेसा ॥ १८ ॥ अंगावरी रोम किती ॥ तितुकीं कोटि वर्षे ख्याती ॥
नरकामध्यें पचे निरुती ॥ तिचें फळ ऐसें असे ॥ १९ ॥ भूमिदेवी ऐसें
म्हणे ॥ पतिव्रतेच्या पवित्र चरणें ॥ आपणावरी चालतां क्षणें ॥ पुनीत[2]
मी म्हणतसे ॥ १२० ॥ सूर्य चंद्र ऐसें म्हणती ॥ आपुलीं किरणें ज्योती ॥
जरी पतिव्रतेवरी पडती ॥ तरी आपण पावन होऊं ॥ २१ ॥ वायु आणि
वरुण ॥ प्रतिव्रतेचिया स्पर्शाकारणें ॥ पावन होऊं म्हणोन ॥ स्पर्शे पुनीत
होती ते ॥ २२ ॥ घरोघरीं स्त्रिया असती ॥ काय करावी लावण्यसंपत्ति ॥

१ कुजत पडे. २ शुद्ध.

जिचेनि वंश उद्धरती ॥ तैसी स्त्री असावी कीं ॥ २३ ॥ ज्याचे घरीं पति-व्रता ॥ दैवें आगळा तो तत्त्वंतां ॥ करावें सुकृतें जन्मशतां ॥ तरीच लाभे तैशी सती ॥ २४ ॥ चतुर्विध पुरुषार्थ देखा ॥ स्त्रियेच्या संगतीं लाधे लोकां ॥ पतिव्रता सती अधिका ॥ पुण्यानुसार लाभे जना ॥ २५ ॥ ज्याचे घरीं नाहीं सती ॥ पुण्यें त्यासी कांहीं न घडती ॥ यज्ञादि कर्मे ख्याती ॥ सती असतां होतीं जाण ॥ २६ ॥ सती नसे ज्याचे घरीं ॥ त्यासी अरण्य नाहीं दूरी ॥ वृथा जन्मोनि संसारीं ॥ कर्मबाह्य तोचि जाणा ॥ २७ ॥ ऐसी सती मिळे ज्यासी ॥ समस्त पुण्य होय त्यासी ॥ पुत्रसंतान परलोकासी ॥ साधन होय सतीचेनी ॥ २८ ॥ स्त्रियेवीण असेल नर ॥ तयासी न साधे कर्माचार ॥ कर्महीन देव पितर ॥ कर्माहि नव्हे कदा ॥ २९ ॥ पुण्य जोडे गंगास्नानीं ॥ त्याहूनि पतिव्रतादर्शनीं ॥ महा-

१ खरोखरी. २ पुण्य.

पापी होय पावन ॥ सप्तजन्म पुनीत ॥ १३० ॥ पतिव्रतेचा आचार ॥ सांगे पतिव्रतेसी योगेश्वर ॥ म्हणे सरस्वती गंगाधर ॥ सांगे बृहस्पति देवगुरु ॥ ३१ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गुरुचरित्र पुण्यराशी ॥ ऐकतां पावती सद्गतीसी ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥३२॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ पतिव्रतानिरूपण विख्यात ॥ ऐकतां होय पुनीत ॥ जें जें चिंतिलें पाविजे ॥ ३३ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे पतिव्रताऽऽख्यानं नाम एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ॥ ओंवीसंख्या ॥ १३३ ॥ ॥ छ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ पतिव्रतेचिया रीति ॥ सांगे देवां बृहस्पति ॥ सहगमनीं फळश्रुति ॥ येणेंपरी निरोपिली ॥ १ ॥ विधवापणाचा आचारू ॥ सांगता झाला देववरू ॥ पुसताती ऋषेश्वरू ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ २ ॥ जवळी असतां आपुला पति ॥ त्यातें मरण झालिया प्राप्ति ॥ काय करावें त्याचे सतीं ॥ सहगमन केवीं करावें ॥ ३ ॥ अथवा असेल गरोदरी ॥ असे तीतें कन्याकुमरी ॥ काय करावें तिये नारीं ॥ म्हणून विनविती गुरूसी ॥ ४ ॥ ऐकोनि देवांचें वचन ॥ सांगता झाला विस्तारोन ॥ एकचित्तेंकरून ॥ ऐका श्रोते सकळ ॥ ५ ॥ पति जवळी असे जरी ॥ सहगमनीं जावें तिये नारीं ॥ असतां आपण गरोदरी ॥ करूं नये सहगमन ॥ ६ ॥ स्तनपानी असतां कुमारू ॥ तिणें करितां पाप थोरू ॥ पुरुष मेला असेल दुरू ॥ सहगमन करूं नये ॥ ७ ॥ तिणें असावें विधवापणें ॥ विधिपूर्वक आचरणें ॥ सहगमनासमानें ॥ असे पुण्य परियेसा ॥ ८ ॥ विधवापणाचा

१ सती जाणें.

आचारू ॥ करितां असे पुण्य थोरू ॥ निवर्ततां आपुला भ्रतारू ॥ केशवपन करावें ॥ ९ ॥ ज्या कां विधवा केश राखिती ॥ त्यांची ऐका फलश्रुति ॥ केश पुरुषासी बाधिती ॥ नरकापरी परियेसा ॥ १० ॥ यास्तव करणें केशवपन ॥ करावें तिणें नित्य स्नान ॥ एक वेळा भोजन ॥ करावें तिणें परियेसा ॥ ११ ॥ एक धान्याचें अन्न ॥ करावें तिणें भोजन ॥ तीन दिवस उपोषण ॥ करावें तिणें भक्तीनें ॥ १२ ॥ पांच दिवस पक्षमासास ॥ करावा तिणें उपवास ॥ अथवा चांद्रायणग्रास ॥ भोजन करणें परियेसा ॥ १३ ॥ चंद्रोदय त्रिजेसी ॥ एक ग्रास तया दिवसीं ॥ चढते घ्यावे पंधरा दिवसीं ॥ पौर्णिमेसी भोजन ॥ १४ ॥ कृष्णपक्षीं येणेंपरी ॥ ग्रास घ्यावे उतरत नारी ॥ अमावास्या येतां जरी ॥ एक ग्रास जेवावा ॥ १५ ॥ शक्ति नाहीं जियेसी ॥ एकान्न जेवावें परियेसीं ॥ अथवा फल-आहारेंसीं ॥ अथवा शाका-आहार देखा ॥ १६ ॥ अथवा घ्यावें क्षीर मात्र ॥ कधीं न

१ मेल्यावरं. २ परिणाम.

घ्यावें अपवित्र ॥ जेणें राहे प्राणमात्र ॥ श्वासोच्छ्वास चाले ऐसें ॥ १७ ॥ शयन करितां मंचकावरी ॥ पुरुष घाली रौरव घोरीं ॥ भोगी नरक निरंतरी ॥ पतींसहित परियेसा ॥ १८ ॥ करूं नये मंगलस्नान ॥ अथवा देहमर्दन ॥ गंध परिमल तांबूल जाण ॥ पुष्पादि तिणें वर्जावें ॥ १९ ॥ पुत्रावीण असे नारी ॥ करणें तर्पण पुत्रापरी ॥ तीळ दर्भ कुशधारी ॥ गोत्रनाम उच्चारावें ॥ २० ॥ विष्णुपूजा करावी नित्य ॥ आपुला पुरुष हा निश्चित ॥ पुरुष आठवोनि चित्त ॥ विष्णुस्थानीं मानिजे ॥ २१ ॥ पुरुष असतां जेणेंपरी ॥ पतिनिरोपें आचार करी ॥ तेणेंचि रीतीं विष्णु अवधारीं ॥ त्याचे निरोपें आचरावें ॥ २२ ॥ तीर्थयात्रा उपासव्रत ॥ विष्णुनिरोपें करावें निश्चित ॥ अथवा गुरु द्विज विख्यात ॥ त्यांचे निरोपें आचरावें ॥ २३ ॥ आपण असतां सुवासनी ॥ ज्या वस्तूची प्रीति अंतःकरणीं ॥ तैशी वस्तू द्यावी धणी ॥ विद्वज्जनविप्रांसी ॥ २४ ॥ वैशाख माघ

कार्तिकमास ॥ अनेक स्नानीं आचारविशेष ॥ माघस्नान तीर्थास ॥ विष्णु-
स्मरणें करावें ॥ २५ ॥ वैशाखीं जळकुंभदान ॥ कार्तिकीं दीप-आरा-
धन ॥ ब्राह्मणां द्यावें घृतदान ॥ यथाशक्त्या दक्षिणेसी ॥ २६ ॥ माघमासीं
तिळघृतेंसीं ॥ द्यावें दान विप्रांसी ॥ अरण्यांत वैशाखमासीं ॥ पोई घालिजे
निर्मळोदकें ॥ २७ ॥ शिवालयीं ईश्वरावरी ॥ गळती ठेविजे निर्मळ वारीं ॥
गंध परिमळ पूजा करी ॥ तेणें पुण्य अगाध ॥ २८ ॥ विप्राचिया घरोघरीं ॥
उदक घालिजे शक्त्यनुसारीं ॥ अन्न द्यावें निर्धारीं ॥ अतिथिकाळीं परियेसा
॥ २९ ॥ तीर्थयात्रे जात्या लोकां ॥ त्यांतें द्याव्या छत्रपादुका ॥ येतां आपल्या
गृहांतिका ॥ पादप्रक्षालन करावें ॥ ३० ॥ वारा घालावा विंझणेंसीं ॥ वस्त्र
द्यावें परिधानासी ॥ गंध तांबूल परिमळासी ॥ कर्पूरवेलैादि परियेसा
॥ ३१ ॥ जलपात्र द्यावें शक्तींसीं ॥ गुडपान आम्रपानेंसीं ॥ द्राक्षें कर्दळी-

१ पतीच्या आज्ञेनें. २ जेवणाचे वेळीं. ३ कापूर, एलची वगैरे.

फळेंसीं ॥ ब्राह्मणा द्यावें मनोहर ॥ ३२ ॥ जें जें दान द्यावें द्विजां ॥ पतीच्या नांवें अर्पिजे वोजा ॥ संकल्पून पुरुषकाजा ॥ धर्म करणें येणेंपरी ॥ ३३ ॥ कार्तिकमासीं जवान्न ॥ अथवा जेविजे एकान्न ॥ वृंताकें माषें मसूर लवण ॥ तैलादि मधु वर्जावें ॥ ३४ ॥ वर्जावें कांस्यपात्र ॥ आणिक वर्जावें द्विदलमात्र ॥ मनीं असावें पवित्र ॥ एकाग्रेंसीं परियेसा ॥ ३५ ॥ पलाशपात्रीं भोजन करावें ॥ शुचि उद्यापन करावें ॥ जें जें व्रत धरावें ॥ त्यातें उजवावें तत्त्वतां ॥ ३६ ॥ घृतभरित कांस्यपात्र ॥ विप्रा द्यावें पवित्र ॥ भूमिशयन केलें व्रत ॥ मंचक द्यावा विप्रासी ॥ ३७ ॥ जे जे वस्तू त्यजिली आपण ॥ ते ते द्यावी ब्राह्मणालागून ॥ रसद्रव्यें एकमास जाण ॥ त्याग करावीं परियेसा ॥ ३८ ॥ त्यजूनियां दधि क्षीर ॥ उद्यापन आचार मनोहर ॥ असलिया शक्त्यनुसार ॥ धेनु द्यावी सालंकृत ॥ ३९ ॥

१ वांगें. २ उडदांची डाळ. ३ उद्यापन करावें.

विशेषें[1] असे आणिक व्रत ॥ दीपदान असे ख्यात ॥ वर्णितां महिमा अनंत ॥ देवांसी म्हणे बृहस्पति ॥४०॥ दीपदान भाग सोळा ॥ वरकड नसती धर्म सकळा ॥ या कारणें अनंतफळा ॥ दीपदान करावें ॥४१॥ माघस्नान माघमासीं ॥ करणें सूर्योदयासी ॥ येणेंपरी एक मासीं ॥ आचरावें भक्तीनें ॥ ४२ ॥ लाडू तिळ खर्जुरेंसीं ॥ करूनि पक्वान्नें ब्राह्मणांसी ॥ द्यावीं तिणें भक्तींसीं ॥ दक्षिणेसहित जाणा ॥ ४३ ॥ शर्करा मिरें एलेंसीं ॥ तळून अपूप घृतेंसीं ॥ दान द्यावें यतीसी ॥ भोजन द्यावें अतितां ॥ ४४ ॥ हेमंतऋतु होतां जाण ॥ व्हावया शीतनिवारण ॥ काष्ठें द्यावीं विप्रांकारणें ॥ वस्त्रें द्यावीं द्विजांसी ॥ ४५ ॥ पर्यंक द्यावा सुषुप्तीसी ॥ एकाद्या भल्या ब्राह्मणासी ॥ चित्र रक्त वस्त्रेंसीं ॥ कंबळ द्यावें विप्रवर्गा ॥ ४६ ॥ व्हावया शीतनिवारण ॥ औषध द्यावें उष्ण उष्ण ॥ तांबूलदान परिपूर्ण ॥ द्यावें एळाकर्पूरेंसीं ॥ ४७ ॥ गृहदान द्यावें विप्रांसी ॥ सांवत्सरिक श्राद्धेंसीं ॥ जातां तीर्थ-

[1] वेळची.

यात्रेसी ॥ पादरक्षा देईजे ॥ ४८ ॥ गंध परिमळ पुष्पेंसीं ॥ पूजा करावी केशवासी ॥ रुद्राभिषेक विधींसीं ॥ अभिषेकावा गौरीहर ॥ ४९ ॥ धूप दीप नैवेद्येंसीं ॥ पूजा करावी षोडशी ॥ प्रीति बहू शंकरासी ॥ दीपमाळा उजळितां ॥ ५० ॥ आणिक सुगंध गंधेंसीं ॥ तांबूलदान विधींसीं ॥ कर्पूरलवंगादि विविधेंसीं ॥ भक्तिभावें अर्पिजे ॥ ५१ ॥ आपुला पुरुष ध्यावोनि मनीं ॥ नारायण तो म्हणोनि ॥ पूजा करावी एके मनीं ॥ भक्तिभावें परियेसा ॥ ५२ ॥ नेमें असावें तिये नारीं ॥ न बैसावें बैलावरी ॥ लेवूं नये चोळी करीं ॥ श्वेतवस्त्र नेसावें ॥ ५३ ॥ रक्त कृष्ण चित्र वस्त्र ॥ लेतां ज़ाण दोष बहुत ॥ आणिक असे व्रत ॥ पुत्राचे बोलें वर्तावें ॥ ५४ ॥ आत्मा[1] वै पुत्र नाम ॥ म्हणून बोलती वेदागम ॥ पतीपासून पुत्रजन्म ॥ पुत्र-आज्ञेंत असावें ॥ ५५ ॥ ऐसा आचार विधवेसी ॥ असे शास्त्रपुराणेसी ॥

१ आपण तोच पुत्र.

जरी आचरती भक्तांसीं ॥ सहगमनाचें फळ असे ॥ ५६ ॥ पापी जरी पति असला ॥ असेल पूर्वीं निवर्तला ॥ नरकामध्यें वास केला ॥ पापरूपें भुंजंत ॥ ५७ ॥ विधवापणें येणेंपरी ॥ आचरण करी जे नारी ॥ मरण होतां अवसरी ॥ घेवोनि पति स्वर्गीं जाय ॥ ५८ ॥ जितुक्या परी बृहस्पति ॥ सांगे समस्त देवांप्रती ॥ लोपामुद्रेची केली स्तुति ॥ पतिव्रताशिरोमणि ॥ ५९ ॥ जितुक्या पतिव्रता नारी ॥ समस्त भागीरथीसरी ॥ त्यांचे पुरुष शंकरापरी ॥ पूजा करावी दोघांची ॥ ६० ॥ ऐसें बृहस्पतीचें वचन ॥ सांगितलें मनीं विस्तारोन ॥ ऐक बाळे तव मन ॥ ज्यावरी प्रीति तेंचि करीं ॥ ६१ ॥ दुःख सकळ त्यजोनि ॥ मम बोल ठेवीं मनीं ॥ सांगितलें तुजलागोनि ॥ परलोकसाधन ॥ ६२ ॥ धैर्य जरी असेल तुजसी ॥ सहगमन करीं पतीसरसीं ॥ विधवापणें आचार करिसी ॥ तेंही पुण्य तितु-

केंची ॥ ६३ ॥ जे आवड तुझे मनीं ॥ सांग माये विस्तारोनि ॥ हस्त मस्तकीं ठेवूनि ॥ पुसतसे प्रेमभावें ॥ ६४ ॥ ऐकोनि तया अवसरीं ॥ केलें नमन तिये नारीं ॥ विनवीतसे करुणोत्तरीं ॥ भक्तिभावेंकरूनियां ॥ ६५ ॥ जय जया जी योगीश्वरा ॥ तूंचि पिता सहोदरा ॥ माझा प्राण मनोहरा ॥ जनक जननी तूंचि होसी ॥ ६६ ॥ आल्यें आपण परदेशांत ॥ जवळी नाहीं बंधुभ्रात ॥ भेटलेती तुम्ही परमार्थ ॥ अंतकाळीं सोयरा ॥ ६७ ॥ सांगितले तुम्हीं आचार दोनी ॥ कष्ट बहु विधवापणीं ॥ अशक्य आम्हां न ठांके स्वामी ॥ असाधारण असे दातारा ॥ ६८ ॥ तारुण्यपण मजसी ॥ लावण्य असे देहासी ॥ निंदापवाद शरीरासी ॥ घडेल केवीं वर्तमान ॥ ६९ ॥ संतोष होतो माझे मनीं ॥ पुण्य अपार सहगमनीं ॥ पतीसवें संतोषोनि ॥ जाईन स्वामी निर्धारें ॥ ७० ॥ म्हणूनि मागुती नमस्कारी ॥

१ झेंप. २ कठीण.

माथा ठेवी चरणांवरी ॥ स्वामी मातें तारीं तारीं ॥ भवसागरीं बुडतसें ॥ ७१ ॥ करुणाकृपेचा सागर ॥ उठवीतसे योगेश्वर ॥ देता झाला अभय-कर ॥ म्हणे पतीसवें जावें ॥ ७२ ॥ तोचि ठाव पुरुषासी ॥ जाय माते सांगतेसी ॥ सांगेन तुज विशेषीं ॥ ऐक माते एकचित्तें ॥ ७३ ॥ आलींत तुम्ही दर्शनीं ॥ श्रीगुरुभेटीलागोनि ॥ आरोग्य होईल म्हणोनि ॥ भक्ति-भावेंकरूनियां ॥ ७४ ॥ होणार झाली ब्रह्मकरणी ॥ काळासी जिंकिलें नाहीं कोणीं ॥ जैशी ईश्वरनिर्वाणी ॥ तैसेपरी होतसे ॥ ७५ ॥ ब्रह्मलि-खित न चुके जाण ॥ जें जें भोगणें असेल आपण ॥ तैसें घडे श्रुति-वचन ॥ दुःख कोणीं करूं नये ॥ ७६ ॥ हरिश्चंद्र राजा देखा ॥ डोंबा-घरीं वाहे उदका ॥ बळी अजिंक्य ऐका ॥ तोही गेला पाताळा ॥ ७७ ॥ सहस्रकोटि वर्षें ज्यासी ॥ आयुष्य असे रावणासी ॥ काळ तयाप्रती

---

१ ईश्वराची इच्छा.

ग्रासी ॥ दुर्योधना काय झालें ॥ ७८ ॥ भीष्मदेव इच्छामरणी ॥ तेही पडले रणांगणीं ॥ परिक्षिति सर्पाभेणीं ॥ लपतां काय झालें तया ॥ ७९ ॥ अनंत अवतार येणेंपरी ॥ होऊनि गेले संसारीं ॥ देव दानव येणेंपरी ॥ सकळ काळाआधीन ॥ ८० ॥ या कारणें काळासी ॥ कोणीं जिंकिलें नाहीं क्षितीसी ॥ सकळ देवदानवांसी ॥ काळ जिंकी निर्धारें ॥ ८१ ॥ काळा जिंकिता नाहीं कोणी ॥ एका श्रीगुरूवांचोनि ॥ भाव असे ज्याचे मनीं ॥ त्यासी प्रत्यक्ष असे जाणा ॥ ८२ ॥ आतां तुम्हीं ऐसें करणें ॥ जावें त्वरित सहगमनें ॥ अंतकाळ होतां क्षणें ॥ श्रीगुरुदर्शना जाय म्हणे ॥८३॥ म्हणोनि भस्म तये वेळीं ॥ लाविता झाला कपाळीं ॥ रुद्राक्ष चारी तत्काळीं ॥ देता जहाला तये वेळीं ॥ ८४ ॥ योगी बोले तियेसी ॥ रुद्राक्ष बांधीं कंठासी ॥ दोनी प्रेतकर्णांसी ॥ बांधोनि दहन करावें ॥ ८५ ॥ आणिक एक सांगेन तुज ॥ गुरुदर्शना जाईं सहज ॥ रुद्रसूक्त म्हणती द्विज ॥ गुरुचरण प्रक्षाळितां

॥ ८६ ॥ तेंचि तीर्थ घेवोनि ॥ आपुला देह प्रोक्षोनि ॥ प्रेतावरी आणोनि ॥ प्रोक्षण करावें भक्तीनें ॥ ८७ ॥ मग जावें सहगमनेसी ॥ वाणें द्यावीं सुवासिनींसी ॥ अनेक द्रव्यें वेंचूनि हर्षीं ॥ विप्रां तोषवावें बहुत ॥ ८८ ॥ ऐशा परी तियेसी ॥ सांगोनि गेला तापसी ॥ पतिव्रता भावेंसीं ॥ करी आयंतीं त्या वेळीं ॥८९॥ भले ब्राह्मण बोलावूनि ॥ षोडश कर्मे आचरोनि ॥ प्रेता प्रायश्चित्त देवोनि ॥ औपासन करवितातीं ॥ ९० ॥ सुस्नात होवोनि आपण ॥ पीतांबर नेसोन ॥ सर्वाभरणें लेवोन ॥ हळदी कुंकूं लावितसे ॥ ९१ ॥ औपासन प्रेतासी ॥ करवितातीं विधींसीं ॥ प्रेत बांधोनि काष्ठेंसीं ॥ घेवोनि गेले गंगेंत ॥ ९२ ॥ अग्नि घेऊनि तळहातेसी ॥ निघाली पतिव्रता कैसी ॥ आनंद बहु मानसीं ॥ प्रेतापुढें जातसे ॥ ९३ ॥ सोळा वरुषांचें तारुण्यपण ॥ सुंदर रूप लावण्य ॥ ल्याइलीसे आभरणें ॥ लक्ष्मी-

१ तयारी. २ डोलवितात.

सरसी दिसतसे ॥ ९४ ॥ मिळोनियां नगरनारी ॥ पाहों आल्या सहस्र चारी ॥ माथा तुकविती¹ सकळी ॥ पतिव्रता म्हणोनियां ॥ ९५ ॥ एक म्हणती काय नवल ॥ पूर्ववयेसी² असे बाळा ॥ काय दैव पूर्वफळ ॥ पती-सवें जातसे ॥ ९६ ॥ देखिलें नाहीं पतीचें मुख ॥ नाहीं जहालें कीं बाळक ॥ कैसा जीव झाला एक ॥ आनंदरूपें जातसे ॥ ९७ ॥ म्हणती शिकवा इसी ॥ वायां कां हो जीव देसी ॥ परतूनि जाईं माहेरासी ॥ आपुल्या मातापित्याजवळी ॥ ९८ ॥ एक म्हणती ज्ञानवंता ॥ सत्य नारी पतिव्रता ॥ बुद्धि दे गा जगन्नाथा ॥ सकळ स्त्रियां ऐसीच ॥ ९९ ॥ धन्य इचीं मातापिता ॥ बेचाळीस उद्धरले आतां ॥ प्रेतापुढें चालतां ॥ एकैक पाउला अश्वमेधफळ ॥ १०० ॥ येणेंपरी नदीतीरासी ॥ गेली नारी पती-सरसीं ॥ कुंड केलें अग्नीसी ॥ काष्ठें शेणी अपरिमित ॥ १ ॥ अग्निकुंडस-

---

१ डोलवतात. २ तरुण.

न्निधेसी ॥ ठेविलें तया प्रेतासी ॥ बोलावोनि सुवासिनींसी ॥ देती झाली वाण देखा ॥ २ ॥ सुपें चोळी कुंकमेंसीं ॥ हळदी काजळ परियेसीं ॥ तोडर कंठसूत्रेंसीं ॥ सुवासिनींसी देतसे ॥ ३ ॥ गंधपुष्पादि परिमळेंसीं ॥ पूजा केली सुवासिनींसी ॥ द्रव्य दीधलें अपारेसी ॥ समस्त ब्राह्मणां तये वेळीं ॥ ४ ॥ नमन करोनि समस्तांसी ॥ निरोप मागतसे हर्षी ॥ आपण जातें माहेरासी ॥ लोभ असों द्यावा म्हणतसे ॥ ५ ॥ माझा पिता शूल[1]पाणी ॥ उमा गौरी अंतःकरणीं ॥ आम्हां बोलाविलें सगुणीं ॥ प्रेमभावें-करूनियां ॥ ६ ॥ आली श्रावणीं दिपवाळी ॥ आम्ही जातों मातेजवळी ॥ पतीसहित मनें निर्मळीं ॥ जातें लोभ असों द्यावा ॥ ७ ॥ समागमें लोक आपुले ॥ होते जे कां सवें आले ॥ त्यांसी सांगतसे बाळे ॥ परतोनि जावें ग्रामासी ॥ ८ ॥ पुसतां श्वशुरमामेसी ॥ त्यांतें न सांगावें परियेसीं ॥

[1] शंकर.

प्राण देतील आम्हांसी ॥ हत्या तुम्हां घडेल ॥ ९ ॥ त्यांसी तुम्हीं सांगावें ऐसें ॥ क्षेम आहे तीर्थवासें ॥ भीमातीरस्थान ऐसें ॥ श्रीगुरूचे सन्निधानीं ॥ ११० ॥ आलों श्रीगुरुदर्शनासी ॥ आरोग्य झालें पतीसी ॥ राहिलों आपण संतोषीं ॥ म्हणोनि सांगा घरीं आमुचे ॥ ११ ॥ ऐसें सांगा श्वसुरमामींसी ॥ आमुचे मातापितयादिकांसी ॥ इष्टजन सोयरियांसी ॥ सांगा येणेंपरी तुम्ही ॥ १२ ॥ ऐसें वचन ऐकोन ॥ दुःख पावले सकळ जन ॥ आपण असे हास्यवदन ॥ प्रेताजवळी उभी देखा ॥ १३ ॥ अग्निकुंडीं तये क्षणीं ॥ घालिताती काष्ठ शेणी ॥ तों आठवण झाली झणी ॥ योगेश्वराचा उपदेश ॥ १४ ॥ मग रुद्राक्ष काढोनियां दोनी ॥ बांधिले प्रेताचिया श्रवणीं[1] ॥ कंठसूत्रीं दोन ठेवोनि ॥ पुसतसे ब्राह्मणांसी ॥ १५ ॥ विनवीतसे द्विजांसी ॥ संकल्प केला म्यां मानसीं ॥ श्रीगुरुमूर्ति आहे कैशी ॥ आपल्या दृष्टीं पाहीन

१ कानांत. २ बेत.

॥ १६ ॥ दृष्टीं देखोनियां स्वामीसी ॥ त्वरित येईन अग्निकुंडापासीं ॥ आज्ञा झालिया वेगेंसीं ॥ त्वरित येईन म्हणतसे ॥ १७ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ बोलताती विद्वज्जन ॥ दहन होतां अस्तमान ॥ त्वरित जाउनी तुम्हीं यावें ॥ १८ ॥ पुसोनियां विप्रांसी ॥ निघाली नारी संगमासी ॥ जेथें होता हृषीकेशी ॥ श्रीनरसिंहसरस्वती ॥ १९ ॥ सर्व येती नरनारी ॥ विप्रमेळा नानापरी ॥ कौतुक पाहती मनोहरी ॥ पतिव्रता स्त्रियेचें ॥ १२० ॥ जातां मार्गीं स्तोत्रें करी ॥ म्हणे स्वामी नरकेसरी ॥ अभाग्य आपुलें पूर्वा-परी ॥ म्हणोनि आम्हां अव्हेरिलें ॥ २१ ॥ तूंचि दाता सर्वेश्वर ॥ शरणा-गतांचा आधार ॥ ऐसें तुझें ब्रीद थोर ॥ कामीं आपण न लाधेंची ॥२२॥ हेळामात्रें त्रिभुवनासी ॥ रची स्वामी रजोगुणें सृष्टीसी ॥ सत्त्वगुणें सृष्टीसी ॥ प्रतिपाळिसी तूंचि स्वामी ॥ २३ ॥ तमोगुणें निश्चयेंसीं ॥ प्रलय समस्त

१ स्तुति. २ प्रतिज्ञा. ३ लाभलेंनें.

जीवांसी ॥ त्रिगुण तूंचि होसी ॥ त्रिमूर्ति तूंचे देवा ॥ २४ ॥ तुजपासीं सर्व सिद्धि ॥ ओलंघिती तव विधी ॥ देखिली आमुची कुडी बुद्धि ॥ जाणोनि मातें अव्हेरिलें ॥ २५ ॥ एखादा नर बाधा करी ॥ जाणोनि सांगती राजद्वारीं ॥ क्षण न लागतां अवसरीं ॥ राजा साह्य करी तयांचें ॥ २६ ॥ रोग होता मनुष्यासी ॥ जाऊनिया वैद्यापासीं ॥ औषध करी तात्काळेंसीं ॥ आरोग्य तया होतसे ॥ २७ ॥ तूं त्रिमूर्तीचा अवतार ॥ ख्याति झाली अपरंपार ॥ सर्व भक्तजनां आधार ॥ म्हणोनि सेविती सकळ जन ॥ २८ ॥ अपराध आपण काय केले ॥ भेटीसी वीस गांवें आलें ॥ मातापिता विसरलें ॥ तुझ्या ध्यानें स्वामिया ॥ २९ ॥ होसी तूंचि मातापित्ता ॥ म्हणोनि आल्यें धांवतां ॥ भेटी होतां आरोग्यता ॥ पतीस व्हावी म्हणोनियां ॥ १३० ॥ आपुले समान असती नारी ॥ त्या

नांदती पुत्रपौत्रीं ॥ आपण झाल्यें दगडापरी ॥ पुत्र नाहीं आपणासी ॥ ३१ ॥ पति आपुला सदा रोगी ॥ कैंचा पुत्र आपणालागीं ॥ तरी याचि काम्यालागीं ॥ निघोनि आल्यें स्वामिया ॥ ३२ ॥ आरोग्य होईल पतीसी ॥ पुत्र होतील आपणासी ॥ आशा धरून मानसीं ॥ आल्यें स्वामी कृपासिंधु ॥ ३३ ॥ पुरले माझे मनोरथ ॥ आरोग्य झाला प्राणनाथ ॥ पुत्र झाले बहुत ॥ नवल झालें स्वामिया ॥ ३४ ॥ मनोरथ पावला सिद्धीसी ॥ म्हणोनि आल्यें पुसावयासी ॥ जातें आतां परलोकासी ॥ कीर्ति तुझी घेवोनि ॥ ३५ ॥ ऐशा परी ध्यान करित ॥ आली अमरजासंगमीं त्वरित ॥ वृक्ष असे अश्वत्थ ॥ देखती झाली स्वामिया ॥ ३६ ॥ उभी ठाकोनियां दुरी ॥ तया साष्टांग नमन करी ॥ श्रीगुरु म्हणे त्या अवसरी ॥ सुवासिनी होय ध्रुव ॥ ३७ ॥ ऐसें म्हणतां मागुती ॥ नमन करी एकभक्तीं ॥ पुन-

१ निरंतर.



[ अ० ३२ ] ऐसें म्हणतां मागुती । नमन करी एकभक्ती । पुनरपि स्वामी तेणेंचि रीतीं । अष्टपुत्रा होय म्हणतसे ॥ ३८ ॥

रपि स्वामी तेणेंच रीतीं ॥ अष्टपुत्रा होय म्हणतसे ॥ ३८ ॥ ऐसें ऐको-
नियां वचन ॥ हास्य करिती सकळ जन ॥ सांगताती विस्तारोन ॥ गुरू-
लागीं सत्वर ॥ ३९ ॥ विप्र म्हणती स्वामीसी ॥ इचा पति पंचत्वासी ॥
पावला परं धामासी ॥ सुवासिनी केवीं होय ॥ १४० ॥ प्रेत नेलें स्मशा-
नासी ॥ ही आली सहगमनासी ॥ निरोप घ्यावया तुम्हांपासीं ॥ आली
असे स्वामिया ॥ ४१ ॥ तुमचा निरोप घेवोनि ॥ अग्निकुंडा जावोनि ॥
समागमें पतिशयनीं ॥ दहन करणें तियेसी ॥४२॥ ऐकोनि त्याचें वचन ॥
श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ इचें स्थिर अहेवपण[1] ॥ मरण केवीं घडे ईसी
॥ ४३ ॥ गुरु म्हणती जा वेळीं ॥ आणा प्रेत आम्हांजवळी ॥ प्राण गेला
कवणे वेळीं ॥ पाहूं म्हणती अवधारा ॥ ४४ ॥ श्रीगुरु म्हणती द्विजांसी ॥
आमुचे बोल जहाले इसी ॥ अहेवपण स्थिर इसी ॥ संदेह न धरावा मनांत

1 सौभाग्य.

॥ ४५ ॥ या बोलाचा निर्धारू ॥ करील आतां कर्पूरगौरू ॥ नका प्रेत संस्कारूं ॥ आणा प्रेत आम्हांजवळी ॥ ४६ ॥ श्रीगुरुचा निरोप होतां ॥ आणों गेले धांवत प्रेता ॥ पहाती लोक कौतुका ॥ अभिनव म्हणताती ॥ ४७ ॥ इतुकें होतां ते अवसरीं ॥ आले विप्र तेथवरी ॥ पूजा करिती मनोहरी ॥ श्रीगुरूची भक्तीनें ॥ ४८ ॥ रुद्रसूक्त म्हणोनि ॥ अभिषेक करिती श्रीगुरुचरणीं ॥ षोडशोपचारीं विस्तारोनि ॥ पूजा करिती भक्तीनें ॥ ४९ ॥ तीर्थपूजा नानापरी ॥ पूजा करिती उपचारीं ॥ इतुकीया अवसरीं ॥ घेउनी आले प्रेतासी ॥ १५० ॥ प्रेत आणोनियां देखा ॥ ठेविलें श्रीगुरुसन्मुखा ॥ श्रीगुरु म्हणती विप्रलोकां ॥ सोडा वस्त्र दोर त्याचे ॥ ५१ ॥ चरणतीर्थ त्या वेळीं ॥ देती तयां विप्रांजवळीं ॥ प्रोक्षा म्हणती तात्काळीं ॥ प्रेत सर्वांगीं स्नपन करा ॥ ५२ ॥ श्रीगुरुनिरोपें ब्राह्मण ॥

प्रेतासी करिती तीर्थस्नपन ॥ अमृतदृष्टींसीं आपण ॥ पाहती प्रेत अवधारा ॥ ५३ ॥ पाहतां सुधादृष्टींकरून ॥ प्रेत झालें संजीवन ॥ उठोनि बैसे तत्क्षण ॥ अंग मुरडीत परियेसा ॥ ५४ ॥ नग्न म्हणुनी लाजत ॥ प्रेत झालें सावधचित्त ॥ नवें वस्त्र नेसत ॥ येवोनि बैसे एकीकडे ॥ ५५ ॥ बोलावोनि स्त्रियेसी ॥ पुसतसे विस्तारेंसीं ॥ कोठें आणिलें मजसी ॥ यतीश्वर कोण सांगें ॥ ५६ ॥ इतुके लोक असतां ॥ कां वो तूं न करसी चेता ॥ निद्रा आली मदोन्मत्ता ॥ म्हणोनि सांगें स्त्रियेसी ॥ ५७ ॥ ऐकून पतीचें वचन ॥ सांगती झाली विस्तारून ॥ उभीं राहून दोघेंजण ॥ नमन करिती श्रीगुरूसी ॥ ५८ ॥ चरणीं माथा ठेवून ॥ स्तोत्र करिती दोघेंजण ॥ पहाती लोक सर्व जन ॥ महा आनंद प्रवर्तला ॥ ५९ ॥ म्हणती पापरूपी आपण ॥ पाप केलें दारुण ॥ पापापासाव अनुसंधान ॥ जन्म

१ सावध. २ संबंध.

जहालों परियेसीं ॥ १६० ॥ दुर्बुद्धीनें वर्तलों ॥ पापसागरीं बुडालों ॥ तुझें चरण विसरलों ॥ त्रयमूर्ती जगद्गुरू ॥ ६१ ॥ सकळ जीवमात्रांसी ॥ राक्षता शंकर तूं होसी ॥ ख्याति तव त्रिभुवनासी ॥ शरणागतां रक्षिसी ॥ ६२ ॥ त्राहि त्राहि जगद्गुरू ॥ विश्वमूर्ति परात्परू ॥ ब्रह्मा विष्णू शंकरू ॥ सच्चिदानंदस्वरूप तूं ॥ ६३ ॥ त्राहि त्राहि विश्वकर्ता ॥ त्राहि त्राहि जगद्धर्ता ॥ कृपासागरा जगन्नाथा ॥ भक्तजनविश्रामा ॥ ६४ ॥ जय जया जी गुरुमूर्ति ॥ जटाजूट पशुपति ॥ अवतरलासी तूं क्षितीं ॥ मनुष्यदेह धरूनियां ॥ ६५ ॥ त्राहि त्राहि पिनाकपाणि ॥ त्राहि देवा तूं शिरोमणि ॥ भक्तजण पाळोनि ॥ रक्षितोसी निरंतर ॥ ६६ ॥ सर्वां भूतीं तूंचि वससी ॥ नमन तुझे चरणांसी ॥ मज ऐसें गमलासी ॥ मातारूप वर्तत तूं ॥ ६७ ॥ त्रिभुवनीं तव करणी ॥ माथा ठेविला तुझे चरणीं ॥ निश्चय केला माझे

१ विश्वाचा कारभार.

मनीं ॥ पूनर्जन्म नव्हे आतां ॥ ६८ ॥ विश्वकारण करिसी ॥ हेळामात्रें सृष्टि रचिसी ॥ मज ऐसें गमलासी ॥ अज्ञानरूपें वर्तत ॥ ६९ ॥ तुझें न ऐके एखादा जरी ॥ कोपशी त्वरित त्यावरी ॥ माझे मनीं येणंपरी ॥ निष्कलंक तूं दिसतोसी ॥ १७० ॥ क्रोध नाहीं तुझे मनीं ॥ आनंदमूर्ति तूंचि सहस्रगुणीं ॥ भक्तजना संरक्षणीं ॥ कृपासागर स्वामिया ॥ ७१ ॥ जीवमात्रा कृपा करिसी ॥ शरणागतांतें रक्षिसी ॥ इहपर सौख्यातें देसी ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ ७२ ॥ तूंचि करुणेचा सागरू ॥ चिन्मात्रा अगोचरू ॥ श्रीनरसिंहसरस्वती गुरु ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ७३ ॥ ऐसीं नाना-परीसी ॥ स्तोत्रें केलीं श्रीगुरूसी ॥ श्रीगुरुमूर्ति संतोषी ॥ आश्वासिती तये वेळीं ॥ ७४ ॥ अष्ट पुत्र पूर्णायुषी ॥ होतील सत्य तुजसी ॥ हो कां श्रीमंत अतिहर्षी ॥ गेले तुमचे पूर्वदोष ॥ ७५ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ लभ्य झाले तुम्हांसी यथार्थ ॥ सांडोनि संदेह त्वरित ॥ सुखें असा म्हणती गुरु

॥ ७६ ॥ इतुकें होतां ते अवसरीं ॥ मिळाल्या होत्या नरनारी ॥ जयजयकार अपरंपारी ॥ प्रवर्तला तये वेळीं ॥ ७७ ॥ नमन करिती सकळ जन ॥ स्तोत्र करिताती गायन ॥ करिताती निरांजन ॥ जयजयकार प्रवर्तला ॥ ७८ ॥ तयामध्यें विप्र एक ॥ होता धूर्त कुबुद्धिक ॥ आपुले मनीं आणोनि तर्क ॥ श्रीगुरूसी पुसतसे ॥ ७९ ॥ विप्र म्हणे श्रीगुरूसी ॥ विनंती स्वामी परियेसीं ॥ संशय आमुचे मानसीं ॥ होत आहे स्वामिया ॥ १८० ॥ वेदशास्त्रें पुराणें ॥ बोलताती सनातनें ॥ ब्रह्मलिखित सत्य जाणें ॥ म्हणोनि वाक्य निर्धारीं पां ॥ ८१ ॥ घडला नाहीं अपमृत्यु यासी ॥ दिवामरण परियेसीं ॥ आला कैसा जीव यासी ॥ ब्रह्मलिखित सत्य मिथ्या ॥ ८२ ॥ न कळे याच्या अभिप्राया ॥ निरोपावें गुरुराया ॥ गुरु म्हणती हांसोनियां ॥ तया मूर्ख ब्राह्मणासी ॥ ८३ ॥ गुरु म्हणती तयासी ॥ सांगेन

१ झाला. २ कबाड.

तुज विस्तारेंसीं ॥ पुढील जन्माच्या आयुष्यासी ॥ उसनें घेतलें परियेसा ॥ ८४ ॥ आम्हीं तया ब्रह्मदेवासी ॥ मागून घेतलें करुणेंसीं ॥ पुढले जन्मीं परियेसीं ॥ वर्षें तीस संख्या पैं ॥ ८५ ॥ भक्तजन रक्षावयासी ॥ मागून घेतलें ब्रह्मदेवासी ॥ म्हणून सांगती विस्तारेंसीं ॥ तया विप्रवर्गातें ॥ ८६ ॥ तटस्थ झाले सकळ जन ॥ सांगावें करिती नमन ॥ गेलें आपुलिया भुवन ॥ ख्याति झाली चहूं राष्ट्रं ॥ ८७ ॥ पतिव्रता पतीसहित ॥ स्नान केलें संगमांत ॥ अंतःकरणीं संतोष बहुत ॥ पूजा करिती भक्तींसीं ॥ ८८ ॥ अपार द्रव्य वेंचोनि ॥ विप्र तोषवोनि आराधनीं ॥ सूर्य जातां अस्तमानीं ॥ येती गुरूच्या मठासी ॥८९॥ स्त्रीपुरुष नमस्कार ॥ करिताती वारंवार ॥ पूजासामग्री उपचार ॥ आरती करिती श्रीगुरूसी ॥ १९० ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व वर्तलें तें ऐका ॥ कथा असे अपूर्व

१ घरीं.

देखा ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ ९१ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्र विस्तार ॥ ऐकतां पावन मनोहर ॥ सकळाभीष्टें पावती ॥ ९२ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ उठविलें विप्राचें प्रेत ॥ सौभाग्य देवोनि अद्भुत ॥ परम तयासी तोषविलें ॥ १९३ ॥ इति श्रीगुरुचरितामृतपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे प्रेतसंजीवनं नाम द्वात्रिंशोऽध्यायः ॥ ३२ ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ ॥ ओंवीसंख्या ॥ १९३ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥



[ अ० २३ ] सिद्ध म्हणे ऐक बाळीं । दुजे दिनीं प्रातःकाळीं । दंपत्यें दोघे गुरुजवळीं । येवोन बैसती वंदोन ॥ ४ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागे सिद्धाचिया चरणां ॥ विनवीतसे भाकूनि करुणा ॥ भक्तिभावेंकरोनि ॥ १ ॥ म्हणे स्वामी सिद्ध-मुनि ॥ पूर्वकथानुसंधानीं ॥ पतीसह सुवासिनी ॥ आली श्रीगुरुसमागमें ॥ २ ॥ श्रीगुरु आले मठासी ॥ पुढं कथा वर्तली कैशी ॥ विस्तारोनि कृपेंसीं ॥ निरोपावी स्वामिया ॥ ३ ॥ सिद्ध म्हणे ऐक बाळी ॥ दुजे दिनीं प्रातःकाळीं ॥ दंपत्यें दोघें गुरूजवळी ॥ येवोन बैसती वंदोन ॥ ४ ॥ विनाविताती कर जोडोनि ॥ आम्हां शोक घडल्या दिनीं ॥ एके यतीनें येवोनि ॥ बुद्धिवाद[1] सांगितला ॥ ५ ॥ रुद्राक्ष चारी आम्हांसी ॥ देतां बोलिला परियेसीं ॥ कानीं बांधोनि प्रेतासी ॥ दहन करा म्हणितलें ॥ ६ ॥ तें आणिक एक बोलिले ॥ रुद्रसूक्त असे भलें ॥ अभिषेकिती विप्रकुळें ॥ तें तीर्थ आणावें ॥ ७ ॥ आणोनियां प्रेतावरी ॥ प्रोक्षीं[2] तुम्ही भावें करीं ॥

१ चांगला उपदेश. २ शिंपा.

दर्शना जावें सत्वरी ॥ श्रीनृसिंहसरस्वती स्वामीचे ॥ ८ ॥ ऐसें सांगोनि आम्हांसी ॥ आपण गेला परियेसीं ॥ रुद्राक्ष राहिले मजपासीं ॥ पति-श्रवणीं स्वामिया ॥ ९ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ श्रीगुरु सांगती हांसोन ॥ रुद्राक्ष दिल्हे आम्हीं जाण ॥ तव भक्ति देखोनियां ॥ १० ॥ भक्ति अथवा अभक्तांसीं ॥ रुद्राक्ष धारण करणारासी ॥ पापें न लागतीं परियेसीं ॥ उंच अथवा नीचातें ॥ ११ ॥ रुद्राक्षांचा महिमा ॥ सांगितला अनुपमा ॥ सांगेन विस्तारून तुम्हां ॥ एकचित्तें परियेसा ॥ १२ ॥ रुद्राक्षधारणें पुण्य ॥ मिति[1] नाहीं अगण्य ॥ आणिक नाहीं देवास मान्य ॥ श्रुतिसंमत परियेसा ॥ १३ ॥ सहस्रसंख्या जो नर ॥ रुद्राक्षमाळा करी हार ॥ स्वरूपें होय तोचि रुद्र ॥ समस्त देव वंदिती ॥ १४ ॥ सहस्र जरी न साधती ॥ दोहीं बाहीं[2] षोडशती ॥ शिखेसी एक ख्याति ॥ चतुर्विंशति दोहीं करीं ॥ १५ ॥

१ सीमा. २ दंडांस.

कंठां बांधा बत्तीस ॥ मस्तकीं बांधा चत्वारिंश ॥ श्रवणद्वयीं द्वादश ॥ धारण करावे परियेसा ॥ १६ ॥ कंठीं अष्टोत्तरशत एक ॥ माळा करा सुरेख ॥ रुद्रपुत्रसमान ऐक ॥ येणें विधीं धारण केलियां ॥ १७ ॥ मोतीं पोंवळीं स्फटिकेंसीं ॥ रौप्य वैडूर्य सुवर्णेंसीं ॥ मिळोनि रुद्राक्षमाळेसी ॥ करावें धारण परियेसा ॥ १८ ॥ याचें फळ असे अपार ॥ रुद्राक्षमाळा अति थोर ॥ जे मिळती समयानुसार ॥ रुद्राक्ष धारण करावे ॥ १९ ॥ ज्याचे गळां रुद्राक्ष असती ॥ त्यासी पापें नातळती[1] ॥ तया होय सद्गति ॥ रुद्रलोकीं अखंडित ॥ २० ॥ रुद्राक्षमाळा धरोनि ॥ जप करिती अनुष्ठानीं ॥ अनंत फळ असे जाणीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ २१ ॥ रुद्राक्षाविणें जो नर ॥ वृथा जन्म जाणा घोर ॥ ज्याचे कपाळीं नसे त्रिपुंड्र ॥ जन्म वायां परियेसा ॥ २२ ॥ रुद्राक्ष बांधोनि मस्तकेसी ॥ अथवा दोन्ही श्रवणांसी ॥ स्नान

१ स्पर्शत नाहींत.

करितां नरासी ॥ गंगास्नानफळ असे ॥ २३ ॥ रुद्राक्ष ठेवोनि पूजेसी ॥ अभिषेक करावा श्रीरुद्रेंसीं ॥ लिंगपूजा समानेसी ॥ फळ असे निर्धारा ॥ २४ ॥ एकमुख पंचमुख ॥ एकादश असतीं मुख ॥ चतुर्दशादि कौतुक ॥ मुखें असतीं परियेसा ॥ २५ ॥ हे उत्तम मिळती जरी ॥ अथवा असती नानापरी ॥ धारण करावे प्रीतीकरीं ॥ पावे चतुर्विध पुरुषार्थ ॥ २६ ॥ यांचें पूर्वील आख्यान ॥ विशेष असे अति गहन ॥ ऐकतां पापें पळोन ॥ जातीं त्वरित परियेसा ॥ २७ ॥ राजा काश्मीरदेशासी ॥ भद्रसेन नामें परियेसीं ॥ त्याचा पुत्र सुधर्म नामेंसीं ॥ प्रख्यात असे अवधारा ॥ २८ ॥ त्या राजाचा मंत्रीसुत ॥ नाम तारक विख्यात ॥ दोघे कुमार ज्ञानवंत ॥ परमसखे असतीं देखा ॥ २९ ॥ उभयतां एके वयासी ॥ एके स्थानीं विद्याभ्यासी ॥ क्रीडा विनोद अति प्रीतींसीं ॥ वर्तती देखा संतोषें ॥ ३० ॥

१ चमत्कारिक.

क्रीडास्थानीं सहभोजनीं ॥ असती दोघे संतोषोनि ॥ ऐसे कुमार महाज्ञानी ॥ शिवभजक परियेसा ॥ ३१ ॥ सर्वदेहा अलंकार ॥ रुद्राक्षमाळा सुंदर ॥ भस्मधारण त्रिपुंड्र ॥ टिळा असे परियेसा ॥ ३२ ॥ रत्नाभरणें सुवर्ण ॥ लेखिती लोहासमान ॥ रुद्रामाळांवांचून ॥ न घेती देखा अलंकार ॥३३॥ मातापिता बंधुजन ॥ आणोनि देती रत्नाभरण ॥ टाकोनि देती कोपोन ॥ लोह पाषाण म्हणती त्यांसी ॥ ३४ ॥ वर्ततां ऐसें एके दिवसीं ॥ तया राजमंदिरासी ॥ आला पराशर ऋषि ॥ जो कां त्रिकाळज्ञ असे देखा ॥ ३५ ॥ ऋषि आला देखोन ॥ राजा सन्मुख जाऊन ॥ साष्टांगीं नमन करून ॥ अभिवंदिला तये वेळीं ॥ ३६ ॥ बैसवोनि सिंहासनीं ॥ अर्घ्य पाद्य देवोनि ॥ पूजा केली विधानीं ॥ महानंदें तये वेळीं ॥ ३७ ॥ कर जोडोनि मुनिवरासी ॥ विनवी राव भक्तीसीं ॥ पिसें[1] लागलें पुत्रांसी ॥

[1] समजताव.

काय करावें म्हणतसे ॥ ३८ ॥ रत्नाभरणें अलंकार ॥ न घेती भूषण परिकर ॥ रुद्राक्षमाळा कंठीं हार ॥ सर्वाभरणें तींच करिती ॥ ३९ ॥ शिकविल्या नायकती ॥ कैंचें यांचे मतीं ॥ स्वामी त्यांतें बोधिती ॥ तरीच ऐकती कुमार ॥ ४० ॥ भूतभविष्यवर्तमानीं ॥ त्रिकाळज्ञ तुम्ही मुनि ॥ यांचा अभिप्राय विस्तारोनि ॥ निरोपावा[1] दातारा ॥ ४१ ॥ ऐकोनि रायाचें वचन ॥ पराशरा हर्ष जाण ॥ निरोपितसे हांसोन ॥ म्हणे विचित्र असे देखा ॥४२॥ तुझ्या आणि मंत्रिसुताचे ॥ वृत्तांत असती विस्मयाचे ॥ सांगेन ऐक विचित्र साचे ॥ म्हणोनि निरोपी तया वेळीं ॥ ४३ ॥ पूर्वीं नंदीनाम नगरीं ॥ अति लावण्य सुंदरी ॥ होती एक वेश्या नारी ॥ जैसें तेज चंद्रकांति ॥ ४४ ॥ जैसा चंद्र पौर्णिमेसी ॥ तैसें छत्र असे तिसी ॥ सुखासन सुवर्णेंसीं[2] ॥ शोभायमान असे देखा ॥ ४५ ॥ हिरण्यमयं तिचें भवन[3] ॥

१ सांगावा. २ सुवर्णमय. ३ घर.

पादुका सुवर्णाच्या जाण ॥ नानापरी आभरणें[1] ॥ विचित्र असती परियेसा ॥४६॥ पर्यंक रत्नखचित देखा ॥ वस्त्राभरणें अनेका ॥ गोमहिषी दास्यादिका ॥ बहुत असती परियेसा ॥४७॥ सर्वाभरणें तीस असती ॥ जैसी दिसे मन्मथ-रति ॥ नवयौवना सोमकांति ॥ अतिसुंदर लावण्य ॥४८॥ गंध कुंकुम कस्तुरी ॥ पुष्पें असती नानापरी ॥ अखिल भोग तिच्या घरीं ॥ ख्याति असे तया ग्रामीं ॥४९॥ धनधान्यादि संपत्ति ॥ कोटिसंख्या नाहीं मिति ॥ ऐशियापरी नांदती ॥ वारवनिता[2] तये नगरीं ॥ ५० ॥ असोनि वारवनिता ॥ म्हणवी आपणा पतिव्रता ॥ धर्म करी असंख्याता ॥ अन्नवस्त्रें ब्राह्मणांसी ॥ ५१ ॥ नाट्यमंडप तिचे द्वारीं ॥ रत्नखचित नानापरी ॥ उभारिला अतिकुसरी ॥ सदा नृत्य करी तेथें ॥ ५२ ॥ सखिवर्गासह नित्य ॥ नृत्य करी मनोरथ ॥ कुक्कुट[3] मर्कट[4] विनोदार्थ ॥ बांधिले असती मंडपीं ॥ ५३ ॥ तया मर्कट-

१ दागिने. २ वेश्या. ३ कोंबडा. ४ माकड.

कुक्कुटासी ॥ नृत्य शिकवी विनोदेंसीं ॥ रुद्राक्षमाळाभूषणेंसीं ॥ गळां रुद्राक्ष बांधिले ॥ ५४ ॥ तया मर्कटकुक्कुटांसी ॥ नामें ठेविलीं सदाशिव ऐसीं ॥ वर्ततां एके दिवसीं ॥ अभिनव झालें परियेसा ॥ ५५ ॥ शिवव्रत म्हणिजे एक ॥ वैश्य आला महाधानिक ॥ रुद्राक्षमाळा-भस्मांकित ॥ प्रवेशला तिचे घरीं ॥ ५६ ॥ त्याचे सव्य करीं देखा ॥ रत्नखचित लिंग निका ॥ तेजें फांके चंद्रार्का ॥ विराजमान दिसतसे ॥ ५७ ॥ तया वैश्यासी देखोनि ॥ नेलें वेश्यें वंदूनि ॥ नाट्यमंडपीं बैसवोनि ॥ उपचार केले नानापरी ॥५८॥ तया वैश्याचे करीं ॥ जें कां होतें लिंग भारी ॥ रत्नखचित सूर्यापरी ॥ दिसतसे तयाचें ॥ ५९ ॥ देखोनि लिंग रत्नखचित ॥ वारवनिता विस्मय करीत ॥ आपुल्या सखीस म्हणत ॥ ऐसी वस्तु पाहिजे आम्हां ॥ ६० ॥ पुसावें तया वैश्यासी ॥ जरी देईल मोल्येंसीं ॥ अथवा देईल रतीसी ॥ होईन कुलस्त्री तीन दिवस ॥ ६१ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ पुसती

वेश्यासी सखी जाण ॥ जरी कां द्याल लिंगरत्न ॥ देईल रति दिवस तीनी ॥ ६२ ॥ अथवा द्याल मोल्येंसीं ॥ लक्षसंख्यादि द्रव्यासी ॥ जें कां वसे तुमचे मानसीं ॥ निरोपावें वेश्येप्रती ॥ ६३ ॥ ऐकोनि सखियांचें वचन ॥ म्हणे वैश्य हांसोन ॥ देईन लिंग मोहन ॥ रतिकांक्षा करुनी ॥ ६४ ॥ तुमची मुख्य वारवनिता ॥ जरी होईल माझी कांता ॥ दिवस तीन पतिव्रता ॥ होवोनि असणें मनोभावें ॥ ६५ ॥ म्हणोनियां मुख्य वनितेसी ॥ पुसतसे वैश्य तिसी ॥ व्यभिचारिणी नाम तुजसी ॥ काय सत्य तुझे बोल ॥ ६६ ॥ तुम्हां कैंचे धर्म कर्म ॥ बहु पुरुषांचा संगम ॥ पतिव्रता कैंचें नाम ॥ तुज असे सांग मज ॥ ६७ ॥ प्रख्यात तुमचा कुळाचार ॥ सदा करणें व्यभिचार ॥ नव्हे तुमचें मन स्थिर ॥ एका पुरुषासवें नित्य ॥ ६८ ॥ ऐकोनि वैश्याचें वचन ॥ वारवनिता बोले आपण ॥ दिनत्रय सत्य जाण ॥ होईन तुमची कुलस्त्री ॥ ६९ ॥ द्यावें मातें लिंग-

रत्न ॥ रतिप्रसंगीं तुमचें मन ॥ संतोषवीन अतिगहन ॥ तनमनधनेंसीं ॥७०॥
वेश्य म्हणे तियेसी ॥ प्रमाण द्यावें आम्हासी ॥ दिनत्रय दिवानिशीं ॥
वागावें पत्नीधर्मकर्में ॥ ७१ ॥ तये वेळीं वारवनिता ॥ लिंगावरी ठेवी
हाता ॥ चंद्र सूर्य साक्षी करिता ॥ झाली पत्नी तयाची ॥ ७२ ॥ इतुकिया
अवसरीं ॥ लिंग दिलें तियेचे करीं ॥ संतोष जहाली ती नारी ॥ करीं
कंकण बांधिलें ॥ ७३ ॥ लिंग देवोनि वेश्येसी ॥ बोले वैश्य परियेसीं ॥
माझ्या प्राणासमानेसी ॥ लिंग असे जाण तुवा ॥ ७४ ॥ या कारणें
लिंगासी ॥ जतन करणें परियेसीं ॥ हानि होतां यासी ॥ प्राण आपुला
देईन ॥ ७५ ॥ ऐसें वैश्याचें वचन ऐकोन ॥ अंगिकारिलें आपण ॥ म्हणे
लिंग करीन जतन ॥ प्राणापरी परियेसा ॥ ७६ ॥ ऐसीं दोघें संतोषित ॥
बैसले होते मंडपांत ॥ दिवस जातां अस्तंगत ॥ म्हणती जाऊं मंदिरा

१ आणभाक.

॥ ७७ ॥ संभोगसमयीं लिंगासी ॥ न ठेवावें जवळिकेसी ॥ म्हणे वैश्य तियेसी ॥ तये वेळीं परियेसा ॥ ७८ ॥ ऐकोनि वैश्याचें वचन ॥ मंडपीं ठेविलें लिंगरत्न ॥ मध्यस्तंभीं बैसवोन ॥ गेली अंतर्गृहांत ॥ ७९ ॥ क्रीडा करिती दोघेंजण ॥ होते ऐका एक क्षण ॥ उठिला अग्नि दारुण ॥ तया नाट्यमंडपीं ॥ ८० ॥ अग्नि लागतां मंडप ॥ भस्म झाला जैसा धूप ॥ वैश्य करितसे प्रलाप ॥ देखोनि तये वेळीं ॥८१॥ म्हणे हा हा काय झालें ॥ माझें प्राणलिंग गेलें ॥ विझविताती अतिप्रबळें ॥ नगरलोक मिळोनि ॥ ८२ ॥ विझवूनियां पहाती लिंगासी ॥ दग्ध झालें परियेसीं ॥ अग्नीं कुक्कुटमर्कटांसी ॥ दहन जहालें परियेसा ॥ ८३ ॥ वैश्य देखोनि तये वेळीं ॥ दुःख करी अतिप्रबळी ॥ प्राणलिंग गेलें जळोनि ॥ आतां प्राण त्यजीन म्हणे ॥ ८४ ॥ म्हणोनियां निघाला बाहेरी ॥ आयतीं केलीं ते

अवसरीं ॥ काष्ठें मिळवोन अपारी ॥ अग्नि केला परियेसा ॥८५॥ लिंग दग्ध झालें म्हणत ॥ अग्निप्रवेश केला त्वरित ॥ नगरलोक विस्मय करित ॥ वेश्या दुःख करीतसे ॥ ८६ ॥ म्हणे हा हा काय झालें ॥ पुरुषहत्यापाप घडलें ॥ लिंग मंडपीं ठेविलें ॥ दग्ध जहालें परियेसा ॥ ८७ ॥ वैश्य माझा प्राणेश्वर ॥ तया हानि जहाली निर्धार ॥ पतिव्रताधर्में सत्वर ॥ प्राण त्यजीन म्हणतसे ॥ ८८ ॥ बोलाविलें विप्रांसी ॥ संकल्पिलें संपदेसी ॥ सहगमन करावयासी ॥ दानधर्म करीतसे ॥ ८९ ॥ वस्त्रें भूषणें भांडारा ॥ देती झाली विप्रवरां ॥ चंदनकाष्ठभारा ॥ चेताविलें अग्नीसी ॥ ९० ॥ आपल्या बंधुवर्गासी ॥ नमोनि पुसे तयांसी ॥ निरोप द्यावा आपणासी ॥ पतीसवें जातसे ॥ ९१ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ दुःख पावले बंधुजन ॥ म्हणती तुझी बुद्धि हीन ॥ काय धर्म करितसे ॥ ९२ ॥ वेश्येच्या मंदिरासी ॥

१ संपत्तीसंबंधीं.

येती पुरुष रतीसी ॥ मिती नाहीं तयांसी ॥ केवीं जहाला तुझा पुरुष ॥ ९३ ॥ कैंचा वैश्य कैंचें लिंग ॥ वायां जाळिसी आपुलें अंग ॥ वाखाणिती धर्म चांग ॥ नूतन पुरुष नित्य घ्यावा ॥ ९४ ॥ ऐसे वैश्य किती येती ॥ त्यांची कैशी होसी सती ॥ हासती नगरलोक ख्याति ॥ काय तुझी बुद्धि सांगें ॥ ९५ ॥ येणेंपरी सकळ जन ॥ वारिताती बंधुजन ॥ काय केलिया नायके जाण ॥ कवणाचेंही ते काळीं ॥ ९६ ॥ वेश्या म्हणे तये वेळीं ॥ आपुला पति वैश्य अढळी ॥ प्रमाण केलें तयाजवळी ॥ चंद्र सूर्य साक्षी असे ॥ ९७ ॥ साक्षी केली म्यां हो क्षिति ॥ दिवस तीन अहोरात्री ॥ धर्मकर्म त्याची पत्नी ॥ जाहलें आपण परियेसा ॥ ९८ ॥ माझा पति जाहला मृत ॥ आपण विनवीतसे सत्य ॥ पतिव्रता धर्म ख्यात ॥ वेदशास्त्र परियेसा ॥ ९९ ॥ पतीसवें जे नारी ॥ सहगमन जाय

१ सीमा.

प्रीतीकरी ॥ एकेक पाउलीं भूमीवरी ॥ अश्वमेधफळ असे ॥ १०० ॥ आपुले माता पिता उद्धरती ॥ एकवीस कुळें पवित्र होती ॥ पतीची जाण तेच रीती ॥ एकवीस कुळें परियेसा ॥ १ ॥ इतुकें जरी न करितां ॥ पातिव्रत्यपणा वृथा ॥ केवीं पाविजे पंथा ॥ स्वर्गाचिया निश्चयें ॥ २ ॥ ऐसें पुण्य जोडिती ॥ काय वांचूनि राहणें क्षितीं ॥ दुःख संसारसागर ख्याति ॥ मरणें सत्य कधीं तरी ॥ ३ ॥ म्हणोनि विनवी सकळांसी ॥ निघाली बाहेर संतोषीं ॥ आली अग्निकुंडापासीं ॥ नमन करी तये वेळीं ॥ ४ ॥ स्मरोनियां सर्वेश्वर ॥ केला सूर्यासी नमस्कार ॥ प्रदक्षिणे उल्हास थोर ॥ करिती झाली तये वेळीं ॥ ५ ॥ नमुनी समस्त द्विजांसी ॥ उभी ठेली अग्निकुंडासी ॥ उडी घातली वेगेंसीं ॥ अभिनंव जहालें तये वेळीं ॥ ६ ॥ सदाशिव पंचवक्र ॥ दशभुजा नामसूत्र ॥ हातीं आयुधें विचित्र ॥

त्रिशूळ डमरू जाण पां ॥ ७ ॥ भस्मांकित जटाधारी ॥ बैसला असे नंदी-
वरी ॥ धरिता झाला वरचेवरी ॥ वेश्येसी तये वेळीं ॥ ८ ॥ तया अग्नि-
कुंडात ॥ न दिसे अग्नि असे शांत ॥ भक्तवत्सल जगन्नाथ ॥ प्रसन्न झाला
तये वेळीं ॥ ९ ॥ हातीं धरुनी तियेसी ॥ कंडे काढी व्योमकेशी ॥ प्रसन्न
होउनी परियेसीं ॥ वर माग म्हणतसे ॥ ११० ॥ ईश्वर म्हणे तियेसी ॥
आलों तुझे परीक्षेसी ॥ धर्मधैर्य पाहावयासी ॥ येणें घडलें परियेसा ॥ ११ ॥
झालों वैश्य आपणची ॥ रत्नलिंग स्वयंभूची ॥ मायाअग्नि केला म्याची ॥
नाट्यमंडप दग्ध केला ॥ १२ ॥ तुझें मन पहावयासी ॥ जहालों अग्नि-
प्रवेशी ॥ तूंची पतिव्रता सत्य होशी ॥ सत्य केलें व्रत आपुलें ॥ १३ ॥
संतोषलों तुझे भक्तींसीं ॥ देईन वर जो मागसी ॥ आयुरारोग्यश्रियेंसीं ॥
जें इच्छिसी तें देईन ॥ १४ ॥ म्हणे वेश्या तये वेळीं ॥ नलगे वर चंद्र-

१ बाहेर. २ शंकर.

मौळी ॥ स्वर्ग भूमि पाताळीं ॥ न घें भोग ऐश्वर्य ॥ १५ ॥ तुझे चरणकमळीं भृंग ॥ होवोनि राहीन महाभाग्य ॥ माझे इष्ट बंधुवर्ग ॥ सकळ तुझे सन्निधेसी ॥ १६ ॥ दासदासी माझे असती ॥ सकळां न्यावें स्वर्गाप्रति ॥ तव सन्निध पशुपति ॥ सर्वदा राहों सर्वेश्वरा ॥ १७ ॥ आम्हां न व्हावी पुनरावृत्ति[1] ॥ न लागे संसार यातायाती ॥ विमोचावें[2] स्वामी त्वरिती ॥ म्हणोनि चरणीं लागली ॥ १८ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ प्रसन्न झाला गौरीरमण ॥ सकळां विमानीं बैसवोन ॥ घेऊन गेला स्वर्गाप्रती ॥ १९ ॥ तिचे नाट्यमंडपात ॥ जो कां झाला मर्कटघात ॥ कुक्कुटसमवेत ॥ दग्ध जहाले परियेसा ॥ १२० ॥ म्हणोनि पराशर ऋषि ॥ सांगतसे रायासी ॥ मर्कटजन्म त्यजूनि हर्षीं ॥ तुझे उदरीं जन्मला ॥ २१ ॥ तुझे मंत्रियाचे कुशीं ॥ कुक्कुट जन्मला परियेसीं ॥ रुद्राक्षधारणफळें ऐसीं ॥ राजकुमार

१ पुनर्जन्म. २ मुक्त करावें.

होऊन आले ॥ २२ ॥ पूर्वसंस्काराकरितां ॥ रुद्राक्षधारणा असे घेतां ॥ दोघे पुत्र ज्ञानवंता ॥ केवळ भक्त ईश्वराचे ॥ २३ ॥ पूर्वजन्मीं अज्ञान असतां ॥ रुद्राक्षधारण केलें नित्या ॥ इतकें पुण्य घडलें म्हणतां ॥ जहाले तुझे कुमार हे ॥ २४ ॥ आतां तरी ज्ञानवंती ॥ रुद्राक्ष धारण करिताती ॥ त्याच्या पुण्या नाहीं मिती ॥ म्हणोनि सांगे पराशरऋषि ॥ २५ ॥ श्रीगुरु म्हणती दंपतीसी ॥ येणेंपरी रायासी ॥ सांगता झाला महाऋषि ॥ पराशर विस्तारें ॥ २६ ॥ ऐकोनि ऋषीचें वचन ॥ राजा विनवी कर जोडून ॥ प्रश्न केला अतिगहन ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ २७ ॥ म्हणोनि सिद्ध विस्तारेंसीं ॥ सांगे नामधारकासी ॥ अपूर्व जहालें परियेसीं ॥ पुढील कथा असे ऐका ॥ २८ ॥ गंगाधराचा नंदनू ॥ सांगे गुरुचरित्रकामधेनू ॥ ऐका श्रोते सावधानू ॥ लाधे चारी पुरुषार्थ ॥ २९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ रुद्राक्षमहात्म्य येथ ॥ सांगितलें निभ्रांत ॥ पुण्यात्मक पावन

जें ॥ १३० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते नृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे रुद्राक्षमाहात्म्यं नाम त्रयस्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३३ ॥ ओंवीसंख्या ॥ १३० ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरु म्हणती दंपतीसी ॥ ऐसा पराशर ऋषि ॥
तया काश्मीर राजासी ॥ रुद्राक्षमाहिमा निरोपी ॥ १ ॥ तया राजकुमा-
राचें ॥ विस्तारोनि सुधांवाचें ॥ सांगितलें पूर्वजन्माचें ॥ चरित्र सर्व ॥२॥
संतोषोनि तो राजा ॥ लागला त्याचे पादांबुजा ॥ कर जोडोनियां वोजा ॥
विनवीतसे परियेसा ॥ ३ ॥ राजा म्हणे ऋषीश्वरासी ॥ स्वामी निरोपिलें
आम्हांसी ॥ पुण्य घडलें आत्मजासी ॥ रुद्राक्षधारणेंकरोनियां ॥ ४ ॥ पूर्व-
जन्मीं अज्ञानेंसीं ॥ रुद्राक्ष बांधिले तिणें वेश्यीं ॥ त्या पुण्यें दशा ऐशी ॥
प्राप्त झाली स्वामिया ॥ ५ ॥ ज्ञानवंत आतां जाण ॥ करिती रुद्राक्ष-
धारण ॥ पुढें यांचें लक्षण ॥ कवणेंपरी वर्ततील ॥ ६ ॥ भूतभविष्य-वर्त-
मानीं ॥ त्रिकाळज्ञ तुम्ही मुनि ॥ सांगा स्वामी विस्तारोनि ॥ माझेनि
मंत्रिकुमराचें ॥ ७ ॥ ऐकोनि रायाचें वचन ॥ सांगे ऋषि विस्तारोन ॥

१ मधुर वाणीनें. २ पुत्राला.

दोघां कुमारकांचें लक्षण ॥ अपूर्व असे परियेसा ॥ ८ ॥ ऋषि म्हणे रायासी ॥ पुत्रभविष्य पुससी ॥ ऐकोनि दुःख पावसी ॥ कवणेंपरी सांगावें ॥ ९ ॥ राव विनवी तये वेळीं ॥ निरोपावें सकळीं ॥ उपाय करिसी तात्काळी ॥ दुःखावेगळा तूंचि करिसी ॥ १० ॥ ऐकोनियां ऋषीश्वर ॥ सांगता झाला विस्तार ॥ ऐक राजा तुझा कुमार ॥ बारा वर्षें आयुष्य असे ॥ ११ ॥ तया बारा वर्षांत ॥ राहिले असती दिवस सात ॥ आठवे दिवसीं येईल मृत्य ॥ तुझ्या पुत्रासी परियेसा ॥ १२ ॥ ऐकोनि ऋषीचें वचन ॥ राजा मूर्च्छित जाहाला तत्क्षण ॥ करिता झाला रुदन ॥ अनेकपरी दुःख करीत ॥ १३ ॥ ऐकोनि राजा तये वेळीं ॥ लागला ऋषीच्या चरणकमळीं ॥ राखें राखें तपोबळी ॥ शरणागत मी तुझा ॥ १४ ॥ नानापरीं गहिंवरत ॥ मुनिव-राचे चरण धरित ॥ विनवीतसे स्त्रियांसहित ॥ काय करावें म्हणोनियां ॥ १५ ॥ दयानिधि ऋषेश्वरु ॥ सांगता झाला विचारु[1] ॥ शरण रिघावें

१ युक्ति.

जगद्गुरु ॥ उमाकांत शिवासी ॥ १६ ॥ मनींचें भय त्यजुनी ॥ असावें आतां शिवध्यानीं ॥ तो राखील शूलपाणी ॥ आधारावें तयांतें ॥ १७ ॥ जिंकावया काळासी ॥ उपाय असे परियेसीं ॥ सांगेन तुम्हां विस्तारेंसीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ १८ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळासी ॥ देव एक व्योमकेशी ॥ निष्कलंक परियेसीं ॥ चिदानंदस्वरूप देखा ॥ १९ ॥ ऐसा देव मूर्तिमंत ॥ रजोरूपें ब्रह्मा सृजत ॥ सृष्टि करणार समर्थ ॥ वेद चारी निर्मिले ॥२०॥ तयां चतुर्वेदांसी ॥ दिधलें तया विरंचीसी ॥ आत्मतत्त्वसंग्रहासी ॥ ठेविलीं होतीं उपनिषदें ॥ २१ ॥ भक्तवत्सल सर्वेश्वर ॥ तेणें दिधलें वेदसार ॥ रुद्राध्याय सुंदर ॥ दिधला तया विरंचीसी ॥ २२ ॥ रुद्राध्यायाची महिमा ॥ सांगतां असे अनुपमा ॥ यातें नाश नाहीं जाणा ॥ अव्यय असे परियेसा ॥ २३ ॥ पंचतत्त्व शिवात्मक ॥ रुद्राध्याय असे विशेख ॥ ब्रह्मयानें

१ शंकर.

चतुर्मुख ॥ विश्व सृजिलें वेदमतें ॥ २४ ॥ तया चतुर्मुखीं देखा ॥ वेद चारी सांगे निका ॥ वदन दक्षिण कर्ण एका ॥ यजुर्वेद निरूपिला ॥२५॥ तया यजुर्वेदांत ॥ उपनिषदसार ख्यात ॥ रुद्राध्याय विस्तारत ॥ सांगे ब्रह्मा मुनिवरांसी ॥ २६ ॥ समस्त देवऋषींसी ॥ मरीचि अत्रि परियेसीं ॥ आणिक सकळ देवांसी ॥ सांगे ब्रह्मा तये वेळीं ॥ २७ ॥ तेंचि ऋषि पुढें देखा ॥ शिकविती आपुले शिष्यादिकां ॥ त्यांचे शिष्यें पुढें ऐका ॥ आपुल्या शिष्या शिकविलें ॥ २८ ॥ पुढें त्यांचे पुत्रपौत्रीं ॥ विस्तार झाला जगत्रीं ॥ शिकविलें ऐका पवित्रीं ॥ रुद्राध्याय भूमीवरी ॥ २९ ॥ त्याहूनि नाहीं आणिक मंत्र ॥ त्वरित तप साध्य होत ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ लाधे त्वरित परियेसा ॥ ३० ॥ नानापरीचीं पातकें ॥ केलीं असतां अनेकें ॥ रुद्रजाप्यें सम्यकें ॥ भस्म होतीं परियेसा । ३१ ॥ आणिक एक नवल केलें ॥ ब्रह्मदेवें-

१ निर्माण केलें.

सृष्टि रचिलें ॥ वेदतीर्थ असे भलें ॥ स्नान पान करावें ॥ ३२ ॥ त्याणें कर्मे परिहरतीं ॥ संसार होय निष्कृति ॥ जे जन श्रीगुरु भजती ॥ ते तरती भवसागर ॥ ३३ ॥ सुकृत अथवा दुष्कृत ॥ जें जें कीजे आपुलें हित ॥ जैसें पेरिलें असे शेत ॥ तेंचि उगवे परियेसा ॥ ३४ ॥ सृष्टिधर्म-प्रवृत्तीसी ॥ ब्रह्में रचिलें परियेसीं ॥ आपुलें वक्षपृष्ठेंसीं ॥ धर्माधर्म उपजवी ॥ ३५ ॥ जे जन धर्म करिती ॥ इह पर सौख्य पावती ॥ जे अधर्मे रहा-टती ॥ पापरूपी तेचि जाणा ॥ ३६ ॥ काम क्रोध लोभ जाण ॥ मत्सर दंभ परिपूर्ण ॥ अधर्माचे सुत जाण ॥ इतुके नरकनायक ॥ ३७ ॥ गुरु[1]-तल्पग सुरापानी ॥ कामुक जे परिपूर्णी ॥ पुल्कस[2]स्वरूप अंतःकरणीं ॥ तेचि प्रधान नरकाचे ॥ ३८ ॥ क्रोधें पितृवधी देखा ॥ मातृवधी असती जे कां ॥ ब्रह्महत्यादि पातका ॥ कन्याविक्रयी जे जन ॥ ३९ ॥ इतुके

१ गुरुपत्नीशीं गमन करणारे. २ अधम.

क्रोधापासूनि ॥ उद्भव झाले म्हणोनि ॥ पुत्र जहाले या कारणीं ॥ क्रोधसुत तयां म्हणती ॥ ४० ॥ देवद्विजस्वहरण[1] देखा ॥ ब्रह्मस्व घेवोनि नेदी जो कां ॥ सुवर्णतस्कर ऐका ॥ लोभपुत्र तया नांव ॥ ४१ ॥ ऐशा पातकांसी ॥ यमें निरूपिलें परियेसीं ॥ तुम्हीं जावोनि मृत्यलोकासी ॥ रहाटी करणें आपुले गुणें ॥ ४२ ॥ तुम्हांसवें भृत्य देखा ॥ देईन सर्व उपपातकां ॥ सकळ पाठवावे नरका ॥ जे जन असती भूमीवरी ॥ ४३ ॥ यमाची आज्ञा घेवोनि ॥ आलीं पातकें मेदिनी ॥ रुद्रजपत्यांतें देखोनि ॥ पळोनि गेलीं परियेसा ॥ ४४ ॥ जावोनियां यमाप्रती ॥ महापातकें विनवितीं ॥ गेलों होतों आम्हीं क्षितीं ॥ भयचकित होउनी आलों ॥ ४५ ॥ जय जया जी यमराया ॥ आम्ही पावलों महाभया ॥ किंकर तुमचे म्हणोनियां ॥ प्रख्यात असे त्रिभुवनीं ॥ ४६ ॥ आम्ही तुमचे आज्ञाधारी ॥

[1] देव व ब्राह्मणांच्या द्रव्याचा अपहार.

निरोपें गेलों धरित्रीं ॥ पोळलों होतों वन्हिपुरीं ॥ रुद्रजप ऐकोनि ॥ ४७ ॥ क्षितीवरी रहावयासी ॥ शक्ति नाहीं आम्हांसी ॥ पाहतां रुद्रजपासी ॥ पोळलों आम्ही स्वामिया ॥ ४८ ॥ ग्रामीं खेटीं नदीतीरीं ॥ वसती द्विज महानगरीं ॥ देवालयीं पुण्यक्षेत्रीं ॥ रुद्रजप करिताती ॥४९॥ कवणेंपरी आम्हां गति ॥ जाऊं न शकों आम्ही क्षितीं ॥ रुद्रजप जन करिताती ॥ तया ग्रामा जाऊं न शकों ॥ ५० ॥ आम्ही जातों नरापासीं ॥ वर्तवितों पातकासी ॥ होती नर महादोषी ॥ मिति नाहीं परियेसा ॥५१॥ प्रायश्चित्तसहस्त्रेंसीं ॥ जो कां नव्हे पुण्यपुरुषी ॥ तैसा द्विज परियेसीं ॥ पुण्यवंत होतसे ॥ ५२ ॥ एखादे समयीं भक्तींसीं ॥ म्हणती रुद्राध्यायासी ॥ तो होतो पुण्यराशि ॥ पाहतां त्यासी भय वाटे ॥ ५३ ॥ तैसा पापी महाघोर ॥ पुण्यवंत होतो नर ॥ भूमीवरी कैसे आचार ॥ आम्हां कष्ट होतसे ॥ ५४ ॥ काळकूट महाविष ॥ रुद्रजाप्य आम्हां दिसे ॥ शक्ति नाहीं

आम्हांसी ॥ भूमीवरी जावया ॥ ५५ ॥ रुद्रजाप्यविषासी ॥ शमन करावया
शक्त होसी ॥ रक्ष गा रक्ष गा आम्हांसी ॥ विनविताती पातकें ॥ ५६ ॥
इतुकें बोलतीं पातकें ॥ ऐकोनि यममाथा तुके ॥ कोपें निघाला तवकें ॥
ब्रह्मलोका तये वेळीं ॥ ५७ ॥ जाऊनियां ब्रह्मयापासीं ॥ विनवी यम
तयासी ॥ जय जया जी कमळवासी ॥ सृष्टिकारी चतुर्मुखा ॥ ५८ ॥
आम्ही तुझे शरणागत ॥ तुझे आज्ञें कार्य करित ॥ पापी नरांतें आणित ॥
नरकालयाकारणें ॥ ५९ ॥ महापातकी नरांसी ॥ आणूं पाठवितों भृत्यांसी ॥
पातकी होय पुण्यराशि ॥ रुद्रजप करूनियां ॥ ६० ॥ समस्त जातीं
स्वर्गासी ॥ महापातकी अतिदोषी ॥ नाश केला पातकांसी ॥ शून्य जहालें
नरकालय ॥ ६१ ॥ नरक शून्य झाले सकळ ॥ माझें राज्य निष्फळ ॥
समस्त जहाले कैवल्यें ॥ उत्पत्ति राहिली स्वामिया ॥ ६२ ॥ यातें उपाय

१ चिडून. २ ओस. ३ ज्ञानी.

करावयासी ॥ देवा तूं समर्थ होसी ॥ राखें राखें आम्हांसी ॥ राज्य गेलें स्वामिया ॥ ६३ ॥ तुम्हीं होउनी मनुष्यासी ॥ स्वामित्व दिधलें भरंवसीं ॥ रुद्राध्यायनिधानेंसीं ॥ कासया साधन दिधलेंत ॥ ६४ ॥ याकारणें मनुष्य-॥ लोकीं नाहीं पापलेश ॥ रुद्रजपें विशेष ॥ पातकें जळतीं अनेक ॥ ६५ ॥ येणेंपरी यम देखा ॥ विनविता झाला चतुर्मुखा ॥ प्रत्युत्तर देतसे ऐका ॥ ब्रह्मदेव यमासी ॥ ६६ ॥ अभक्तीनें दुर्मदेंसीं ॥ रुद्रजप करिती यासी ॥ अज्ञानी लोक तांमसी ॥ उभ्यानी निजूनी पढती नर ॥ ६७ ॥ त्यांतें अधिक पापें घडतीं ॥ ते दंडावे तुवां त्वरिती ॥ जे कां भावार्थें पढती ॥ ते त्वां सर्वदा वर्जावे ॥ ६८ ॥ बाधूं नका तुम्ही ऐका ॥ सांगावें ऐसें पातका ॥ रुद्रजपें पुण्य विशेखा ॥ जे जन पढती भक्तींसीं ॥ ६९ ॥ पूर्वजन्मीं पापें करिती ॥ अल्पायुषी होऊनि उपजती ॥ तया पापा होय

१ क्रोधी. २ विशेष.

निष्कृति ॥ रुद्रजपेंकरूनियां ॥ ७० ॥ तैसें अल्पायुषी नरें ॥ रुद्रजप करितां बरें ॥ पापें जातीं निर्धारें ॥ दीर्घायु होय तो देखा ॥ ७१ ॥ तेजो वर्च बल धृति ॥ आयुरारोग्य ज्ञान संपत्ति ॥ रुद्रजपें वर्धती ॥ ऐक यमा एकचित्तें ॥ ७२ ॥ रुद्रजपमंत्रेंसीं ॥ स्नान करविती ईश्वरासी ॥ तेंचि उदक भक्तींसीं ॥ जे जन करिती स्नान पान ॥ ७३ ॥ त्यांतें मृत्युभय नाहीं ॥ आणिक एक नवल पाहीं ॥ रुद्रजपें पुण्य देहीं ॥ स्थिर जीव पुण्य असे ॥ ७४ ॥ अतिरुद्र जपोनि उदकासी ॥ स्नान केल्या नरांसी ॥ भीतसे मृत्यु त्यांसी ॥ तेही तरती भवार्णवीं ॥ ७५ ॥ शतरुद्र अभिषे-कासी ॥ पूजा करिती महेशासी ॥ ते जन होती शतायुषी ॥ पापनिर्मुक्त परियेसा ॥ ७६ ॥ ऐसें जाणोनि मानसीं ॥ सांगे आपुले दूतांसी ॥ रुद्र जपता विप्रांसी ॥ बाधूं नको म्हणे ब्रह्मा ॥ ७७ ॥ ऐकोनि ब्रह्मयाचे

१ शुद्धि. २ दृढनिश्चयीपणा.

वचना ॥ यम आला आपुले स्थाना ॥ म्हणोनि पराशरें जाणा ॥ निरोपिलें रायासी ॥ ७८ ॥ आतां तुझ्या कुमारासी ॥ उपाय सांगेन परियेसीं ॥ दहासहस्र रुद्रेंसीं ॥ स्नंपन करीं शिवातें ॥ ७९ ॥ दहासहस्र वर्षांवरी ॥ तव पुत्र राज्य करी ॥ इंद्रासमान धुरंधरी ॥ कीर्तिवंत अपार ॥८०॥ त्याचे राज्यश्रियेसी ॥ अपाय नसे निश्चयेंसीं ॥ अकंटक संतोषी ॥ राज्य करी तुझा सुत ॥ ८१ ॥ बोलवावें शत विप्रांसी ॥ जे कां विद्धज्जन परियेसीं ॥ लावावे ज्ञानी अनुष्ठानासी ॥ तात्काळ तुवां रुद्राच्या ॥ ८२ ॥ ऐशा विप्रांकरवीं देखा ॥ शिवासी करीं अभिषेका[1] ॥ आयुष्य वर्धेल कुमारका ॥ सद्यःश्रेय होईल ॥ ८३ ॥ येणेंपरी रायासी ॥ सांगे पराशर ऋषि ॥ रायें महा आनंदेंसीं ॥ आयुष्यवर्धना आरंभ केला ॥ ८४ ॥ ऐसा ऋषि पराशर ॥ उपदेशितांचि द्विजवर ॥ बोलावोनियां सर्व संभार ॥ पुरवीतसे

१ अभिषेक.

ब्राह्मणांसी ॥ ८५ ॥ शतसंख्याक कलशांसी ॥ विधिपूर्वक शिवासी ॥ पुण्य-वृक्षतळेंसी ॥ अभिषेक करवितसे ॥ ८६ ॥ त्याचिया जळें पुत्रासी ॥ स्नान करवी प्रतिदिवशीं ॥ सप्त दिन येणें विधींसीं ॥ आराधिला ईश्वर ॥ ८७ ॥ अवधि जहाली दिवस सात ॥ बाळ पडिला निचेष्टित ॥ पराशरें येवोनि त्वरित ॥ उदकेंसीं सिंचिलें ॥८८॥ तये वेळीं अवचित ॥ वाक्य जहालें अव-श्यत ॥ सर्वांचि दिसे अद्भुत ॥ दंडहस्त महापुरुष ॥ ८९ ॥ महादंष्ट्र भयच-कित ॥ आले होते यमदूत ॥ समस्त द्विजवर रुद्र पढत ॥ मंत्राक्षता देताती ॥ ९० ॥ मंत्राक्षता ते अवसरीं ॥ घातलिया कुमारावरी ॥ दूत पाहती राहूनि दुरी ॥ जवळ येऊं न शकती ॥ ९१ ॥ होते महापाश हातीं ॥ कुमारावरी टाकूं येती ॥ शिवदूत दंडहस्ती ॥ मारूं आले यमदूतां ॥९२॥ भयें चकित यमदूत ॥ पळोनि गेले धांवत ॥ पाठीं लागले शिवदूत ॥ वेद-पुरुषरूप देखा ॥ ९३ ॥ येणेंपरी द्विजवर ॥ तेणें रक्षिला राजकुमार ॥



[ अ० ३४ ] अवघी जहाली दिवस सात । बाळ पडिला निचेष्टित । पराशरें येवोनि त्वरित । उदकेंसीं सिंचिलें ॥ ८८ ॥

आशीर्वाद देती थोर ॥ वेदश्रुतींकरूनियां ॥ ९४ ॥ इतुकियावरी राजकुमार ॥ सावध झाला मन स्थिर ॥ राजयासी आनंद थोर ॥ समारंभ करितसे ॥ ९५ ॥ पूजा करोनि द्विजांसी ॥ देता झाला भोजनासी ॥ तांबूलादि दक्षणेंसीं ॥ संतोषविले द्विजवर ॥ ९६ ॥ संतोषोनि महाराजा ॥ सभा रचित महावोजा ॥ बैसवोनि समस्तां द्विजां ॥ महाऋषीतें सिंहासनीं ॥ ९७ ॥ राजा आपुले स्त्रियेसहित ॥ घालिता झाला दंडवत ॥ येवोनियां बैसला सभेंत ॥ आनंदित मानसीं ॥ ९८ ॥ त्या समयीं ब्रह्मसुत ॥ नारद आला अकस्मात ॥ राजा धांवोनि चरण धरीत ॥ सिंहासनीं बैसवी ॥ ९९ ॥ पूजा करोनि उपचारीं ॥ राजयातें नमस्कारी ॥ म्हणे स्वामी या अवसरीं ॥ कोठोनि येणें झालें पैं ॥ १०० ॥ राजा म्हणे देवऋषी ॥ हिंडतां तुम्ही त्रिभुवनासी ॥ काय वर्तलें विशेषीं ॥ आम्हां-

१ मोठ्या थाटाची.

लागीं निरोपिजे ॥ १ ॥ नारद म्हणे रायासी ॥ गेलों होतों कैलासासी ॥ येतां देखिलें मार्गासी ॥ अपूर्व[1] झालें परियेसा ॥ २ ॥ महामृत्यु दूतांसहित ॥ न्यावया आला तुझे सुत ॥ सर्वेचि येऊनि शिवदूत ॥ तयालागीं पराभविलें ॥ ३ ॥ यमदूत पळोनि जाती ॥ यमापुढें सर्व सांगती ॥ आम्हां मारिलें शिवदूतीं ॥ कैसें करावें क्षितींत ॥ ४ ॥ यम कोपोनि निघाला ॥ वीरभद्रापासीं गेला ॥ म्हणे दूतां कां मार दिला ॥ निरपराधें स्वामिया ॥ ५ ॥ निजकर्मानुबंधेंसीं ॥ राजपुत्र गतायुषी ॥ त्यातें आणितां दूतांसी ॥ कासया शिवदूतीं मारिलें ॥ ६ ॥ वीरभद्र अतिक्रोधी ॥ म्हणे झाला रुद्रविधि ॥ दहा सहस्र वर्षें अवधि ॥ आयुष्य असे राजपुत्रा ॥ ७ ॥ न विचारितां चित्रगुप्ता ॥ वाया पाठविलें दूतां ॥ शोखटें केलें शिवदूतां ॥ जिवें सोडिलें म्हणोनि ॥८॥ बोलावोनि चित्रगुप्ता ॥ आयुष्य विचारीन त्वरिता ॥

[1] आश्चर्य.

म्हणोनि पाठवी दूतां ॥ चित्रगुप्त पाचारिला ॥ ९ ॥ पुसताति चित्रगुप्तासी ॥ काढोनि पाहे पत्रासी ॥ बारा वर्षे आयुष्य परियेसीं ॥ राजकुमारा लिहिलें असे ॥११०॥ तेथेंचि लिहिलें होतें आणिक ॥ द्वादश सहस्र वर्षे लेख ॥ पाहोनि यम साशंकित ॥ म्हणे अपराध आमुचा ॥ ११ ॥ वीरभद्रातें वंदून ॥ यमधर्म गेला परतोन ॥ आम्ही आलों तेथोन ॥ म्हणोनि सांगे नारद ॥ १२ ॥ रुद्रजपें पुण्य करितां ॥ आयुष्य वर्धलें तुझे सुता ॥ मृत्यु जिंकिला तत्त्वतां ॥ पराशरगुरुकृपें ॥ १३ ॥ ऐसें नारद सांगोनि ॥ निघोन गेला तेथोनि ॥ पराशर महामुनीं ॥ निरोप घेतला रायाचा ॥१४॥ समस्त गेले द्विजवर ॥ राजा हर्षें निर्भर ॥ राज्य भोगिलें धुरंधर ॥ पुत्रपौत्रीं महीवरी ॥ १५ ॥ ऐसा रुद्राध्यायमहिमा ॥ पूजा करावी गुरुब्रह्मा ॥ भिणें नलगे काळमहिमा ॥ श्रीगुरु म्हणती दंपतीसी ॥ १६ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ ऐसी कथा विस्तारेंसीं ॥ श्रीगुरु सांगे दंपतीसी ॥ प्रेम-

भावेंकरोनियां ॥ ११७ ॥ या कारणें श्रीगुरूसी ॥ प्रीति थोर रुद्राध्यायासी ॥ पूजा करावी भक्तींसीं ॥ रुद्राध्यायेंकरोनियां ॥ ११८ ॥ म्हणे सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां तरे भवसागर ॥ लाधे चारी पुरुषार्थ ॥ ११९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ रुद्राभिषेकमाहात्म्य तेथ ॥ वर्णिलें असे अद्भुत ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ १२० ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे रुद्राध्यायमहिमावर्णनं नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३४ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ १२० ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक सिद्धासी ॥ विनवीतसे परियेसीं ॥ रुद्रा-ध्याय विस्तारेंसीं ॥ दंपतीसी सांगितला ॥ १ ॥ पुढें काय वर्तलें ॥ विस्ता-रोनि सांगा वहिलें ॥ मन माझें वेधलें ॥ गुरुचरित्र ऐकावया ॥ २ ॥ सिद्ध म्हणे ऐक ताता ॥ अपूर्व असे पुढें कथा ॥ तेचि जाण पतिव्रता ॥ श्रीगु-रूतें विनवीत ॥ ३ ॥ कर जोडोनि गुरूसी ॥ विनवीतसे भक्तींसीं ॥ आम्हां गति पुढें कैसी ॥ कवणेंपरी असावें ॥ ४ ॥ या कारणें आपणासी ॥ एखादा मंत्र उप-देशीं ॥ जेणें होय स्थिर जीवासी ॥ चरणस्मरण सनातन ॥ ५ ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ स्त्रियांसी मंत्र उपदेशीं ॥ पतिभक्तीविणें त्यांसी ॥ उपदेशासी देऊं नये ॥ ६ ॥ देतां उपदेश स्त्रियांसी ॥ विघ्न असे मंत्रासी ॥ पूर्वीं शुक्राचा-र्यासी ॥ झालें असे परियेसा ॥ ७ ॥ ऐसें ऐकतां गुरुवचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ स्त्रिया केवीं मंत्रहीन ॥ शुक्राचार्या कैसें झालें ॥ ८ ॥

१ समाधान.

विस्तारोनि आम्हांसी ॥ सांगा स्वामी कृपेंसीं ॥ म्हणोनि लागली चरणासी ॥ करुणावचनेंकरोनियां ॥ ९ ॥ श्रीगुरु सांगती तियेसी ॥ पूर्वकथा आहे ऐशी ॥ युद्ध देवदैत्यांसी ॥ सदैव होय अवधारा ॥ १० ॥ दैत्यसैन्य पडे रणीं ॥ शुक्र जपे संजीवनी[1] ॥ सकळ सैन्य उठवूनि ॥ पुनरपि युद्धा पाठवीत ॥ ११ ॥ इंद्र वज्रें असुर मारी ॥ शुक्र अमृत जप करी ॥ सर्वेचि येती निशाचरी[2] ॥ देवसैन्य मारावया ॥ १२ ॥ ऐसें होतां एके दिवसीं ॥ इंद्र गेला कैलासासी ॥ सांगे स्थिति शिवासी ॥ शुक्राचार्याची मंत्रकरणी ॥ १३ ॥ कोपोनियां ईश्वर ॥ नंदीस सांगे उत्तर ॥ तुवां जावोनि वेगवक्र ॥ शुक्राचार्या धरोनि आणीं ॥ १४ ॥ स्वामीचें वचन ऐकोनि ॥ नंदी गेला ठाकोनि[3] ॥ होता शुक्र तपध्यानीं ॥ मुखीं धरिला नंदीनें ॥ १५ ॥ नंदी नेत शिवापासीं ॥ आकांत वर्तला दैत्यांसी ॥ ईश्वरें प्राशिलें

१ संजीवनी मंत्र. २ राक्षस. ३ चालून.

शुक्रासी ॥ अगस्तीं सिंधूचियापरी ॥ १६ ॥ ऐसा कित्येक दिवसांवरी ॥ होता शुक्र शिवाचे उदरीं ॥ निघूनि गेला मूत्रद्वारीं ॥ विसर पडला शिवासी ॥ १७ ॥ पूर्वीं होतें शुक्र नांव ॥ ईश्वर-उदरीं झाला उद्भव ॥ नांव पावला भार्गव ॥ पुनः संजीवनी जपे तो ॥१८॥ इंद्र मनीं विचारी ॥ पुरोहितासी पाचारी ॥ कैसा शुक्र जिवंत करी ॥ पुनः दैत्यजनांसी ॥ १९ ॥ त्यासी विघ्न करावें एक ॥ तूं पुरोहित विवेकयुक्त ॥ बुद्धि विचारी अनेक ॥ बृहस्पति गुरुराया ॥ २० ॥ पाहें पां दैत्यांचें दैव कैसें ॥ शुक्रा-सारिखा गुरु विशेषें ॥ देतो जीवासी भरंवसें ॥ दैत्य येती युद्धासी ॥२१॥ तैसा तूं नव्हेस आम्हांसी ॥ आम्हांतें कां उपेक्षिसी ॥ देवगुरु तूं म्हणविसी ॥ बुद्धि करीं शीघ्र आता ॥ २२ ॥ तूं पूज्य सकळ देवांसी ॥ जरी आम्हां कृपा करिसी ॥ शुक्राचार्य काय विशेषीं ॥ तुजसमान नव्हे जाणा ॥२३॥

१ विचारी.

ऐसें नानापरीं देख ॥ इंद्र अमरनायक ॥ पूजा करी उपचारिक ॥ बृहस्पति संतोषला ॥ २४ ॥ गुरु म्हणे इंद्रासी ॥ यासी ऐक तूं उपायासी ॥ षट्कर्णी करावें मंत्रासी ॥ सामर्थ्य राहील शुक्राचें ॥ २५ ॥ एखादा पाठवावा शुक्रापासीं ॥ विद्यार्थी करून त्वरेंसीं ॥ मंत्र शिकेल भरंवशीं ॥ विद्यार्थी-रूपेंकरूनियां ॥ २६ ॥ आपुला पुत्र कच असे ॥ त्यातें पाठवूं विद्याभ्या-सें ॥ मंत्र शिकेल आहे कैसी ॥ संजीवनी अवधारा ॥ २७ ॥ कचातें आणूनि बुद्धियुक्ति ॥ सांगतसे बृहस्पति ॥ तुवां जावें शुक्राप्रती ॥ विद्या-र्थिरूप धरोनि ॥ २८ ॥ आमुची निंदा तेथें करीं ॥ मनोभावें सेवा करीं ॥ संजीवनी कवणेंपरीं ॥ मंत्र शिकें पुत्रराया ॥ २९ ॥ इंद्रादिक देवतांचा ॥ निरोप घेऊनि पितयाचा ॥ शुक्राप्रती गेला कचा ॥ विद्यार्थी-रूप धरोनि ॥ ३० ॥ नमन केलें साष्टांगीं ॥ उभा राहिला करुणांगीं ॥

१ नम्रतेनें.

शुक्र पुसतसे वेगीं ॥ कवण कोठूनि आलासी ॥ ३१ ॥ बोले आपण द्विजकुमार ॥ तुझी कीर्ति ऐकिली थोर ॥ विद्याभ्यासी मनोहार ॥ म्हणोन आलों सेवेसी ॥ ३२ ॥ सेवक होईन तुमचे चरणीं ॥ आलों इच्छेसी धरुनि ॥ तूं भक्तवत्सलशिरोमणि ॥ अनाथाचा प्रतिपालक ॥ ३३ ॥ बोलोनि ऐसें कच वचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ शुक्रकन्या जवळी येऊन ॥ पितयालागीं विनवित ॥ ३४ ॥ पित्यासी म्हणे देवयानी ॥ विप्र भला दिसे नयनीं ॥ यातें तुम्हीं शिष्य करूनि ॥ विद्याभ्यास सांगावा ॥ ३५ ॥ कच सुंदर सुलक्षण ॥ जैसा दिसे कीं मदन ॥ देवयानी करी चिंतन ॥ ऐसा पति व्हावा म्हणे ॥ ३६ ॥ ऐसी वासना धरुनी ॥ पितयातें विनवुनी ॥ शिष्य केला कच सगुणी ॥ शुक्राचार्य विद्या सांगे ॥ ३७ ॥ ऐसा विद्याभ्यास करित ॥ दैत्यकुळी म्हणती निश्चित ॥ देवगणी

1 इच्छा.

आले सत्य ॥ कपटवेषेंकरूनी ॥ ३८ ॥ शिकूनियां विद्येसी ॥ जाऊन शिकवील देवांसी ॥ कुंडें होईल आम्हांसी ॥ तेणें मनीं चिंतावले ॥३९॥ काळ क्रमितां एके दिवसीं ॥ कच पाठविला समिधांसी ॥ दैत्य जाती साह्येसी ॥ तया कचाचे अवधारा ॥ ४० ॥ रानीं जाउनी समागमेंसीं ॥ दैत्यें मारिलें कचासी ॥ समिधा घेवोनि घरासी ॥ दैत्य आपण येते झाले ॥ ४१ ॥ शुक्राचार्यांची कन्या ॥ पितयासी परम मान्या ॥ पितयासी विनवी धन्या ॥ कच कैसा नाहीं आला ॥ ४२ ॥ कच आलियावांचूनी ॥ भोजन न करी देवयानी ॥ ऐसें ऐकतां निर्वाणी ॥ शुक्राचार्य चिंतावला ॥ ४३ ॥ ज्ञानी पाहे मानसीं ॥ मृत्यु झाला असे तयासी ॥ मंत्र जपूनि संजीवनीसी ॥ त्वरित घरीं आणिला ॥ ४४ ॥ आणिक होतां बहुत दिवस ॥ दैत्य करिती अतिद्वेष ॥ गेला होता वनास ॥ पुनरपि तयासी वधियेलें ॥ ४५ ॥ मागुती वांचेल म्हणोनि ॥ चूर्ण करिती छेदोनि ॥

१ वाईट. २ निश्चय.

दाही दिशा टाकुनी ॥ आले घरा पुनरपि ॥ ४६ ॥ दिवस गेला अस्त-मानीं ॥ पुसतसे देवयानी ॥ कच न दिसे म्हणोनि ॥ पितयातें विनवीत ॥ ४७ ॥ कच माझा प्राणसखा ॥ न आणिशी जरी खाईन विखा ॥ दावीं मज तयाचे मुखा ॥ म्हणोनि प्रलाप करीतसे ॥ ४८ ॥ कन्येवरी ममत्व बहुत ॥ तेणें शुक्र ज्ञानें पहात ॥ छिन्नभिन्न केलें म्हणत ॥ मंत्र जपला संजीवनी ॥ ४९ ॥ धन्य मंत्राचें सामर्थ्य ॥ कच आला घरा त्वरित ॥ देवयानी संतोषत ॥ पितयानें आलिंगिली ॥ ५० ॥ दैत्य मनीं विचार करिती ॥ काय केल्या न मरे म्हणती ॥ गुरुकन्येसी याची प्रीति ॥ म्हणूनि गुरु वांचवितो ॥ ५१ ॥ आतां उपाय करूं यासी ॥ उदईक येईल एकादशी ॥ मारुनि मिळवूं पानेंसीं ॥ गुरुमुखीं पाजावें ॥ ५२ ॥ ऐशी निगुंती करोनि ॥ आली एकादशी दिनीं ॥ कचातें बाहेर नेवोनि ॥ मारते

१ शोक. २ ममता. ३ पिण्याच्या पदार्थांत. ४ युक्ति.

जहाले दैत्य शिष्य ॥ ५३ ॥ प्राशन करविती गुरूसी ॥ मिळवूनिया मद्य-
रसीं ॥ स्निग्ध मिळवूनियां बहुवशी ॥ शुक्र गुरूसी देते झाले ॥ ५४ ॥
मागुती पुसे देवयानी ॥ पितयातें विनवुनी ॥ कचासी आणीं म्हणोनि ॥
रुदन करी आक्रोशें ॥ ५५ ॥ शुक्र पहातसे ज्ञानी ॥ न दिसे कच त्रिभु-
वनीं ॥ खेद करीतसे मनीं ॥ कन्यालोभें[१]करोनियां ॥५६॥ विचार करितां
सर्वा ठायीं ॥ दिसूं लागला आपुले देहीं ॥ संदेह पडला शुक्रासी पाहीं ॥
कैसें करावें म्हणोनि ॥ ५७ ॥ कन्येसी म्हणे शुक्र देखा ॥ कच नये आतां
ऐका ॥ माझे उदरीं असे निका ॥ कैसा काढूं तयासी ॥ ५८ ॥ यासी
काढितां आपणासी ॥ मृत्यु होईल परियेसीं ॥ काय अभिलाष असे त्यासी ॥
म्हणोनि कन्येसी पुसतसे ॥ ५९ ॥ पितया विनवी देवयानी ॥ अभिलाष
होता माझे मनीं ॥ भार्या त्याची होउनी ॥ दोघें राहूं तुजपासीं ॥ ६० ॥

१ इच्छा.

हाचि व्हावा माझा पति ॥ ऐसें संकल्पिलें चित्तीं ॥ न उठे जरी पुढती ॥
तरी प्राण त्यागीन ॥ ६१ ॥ संदेह पडला शुक्रासी ॥ बोधिता झाला
कन्येसी ॥ त्यास उठवितां आपणासी ॥ मृत्यु होईल अवधारीं ॥ ६२ ॥
कन्या म्हणे पितयासी ॥ सकळां तूं वांचविसी ॥ आपुला प्राण जाईल
म्हणसी ॥ हें आश्चर्य वाटतसे ॥ ६३ ॥ शुक्र म्हणे देवयानी ॥ मंत्र असे सं-
जीवनी ॥ मजवांचोनि नेणे कोणी ॥ मातें कोण उठवील ॥ ६४ ॥ मंत्र सांगों
नये कवणा ॥ षट्कर्णीं होतां जाईल गुणा ॥ कचाकरितां माझा प्राण ॥
जाईल देखा अवधारीं ॥ ६५ ॥ न ऐके कन्या देवयानी ॥ पित्याचे चरण
धरोनि ॥ विनवीतसे कर जोडोनि ॥ मंत्र आपणातें शिकवावा ॥ ६६ ॥
कचासी तूं सजीव करीं ॥ तुज येईल मृत्यु जरी ॥ पैं मंत्र जपोनि
निर्धारीं ॥ सजीव करीन तुजलागीं ॥ ६७ ॥ शुक्र म्हणे कन्येसी ॥ मंत्र
सांगूं नये स्त्रियांसी ॥ दोष असता परियेसां ॥ वेदशास्त्रसंमत असे ॥६८॥

स्त्रियांसी मंत्र पतिभक्ति ॥ जपूं नये मंत्रयुक्ति ॥ सांगतां दोष आम्हा घडती ॥ मंत्रसामर्थ्य जाईल ॥ ६९ ॥ पितयासी म्हणे देवयानी ॥ सुखें असा मंत्र जपोनि ॥ प्राण जातो म्हणोनि ॥ मूर्च्छागत पडली ते ॥७०॥ शुक्राची कन्येवरी प्रीति ॥ उठवूनि तिसी आलिंगिती ॥ मंत्र तिसी सांगती ॥ संजीवनी अवधारा ॥ ७१ ॥ आपुल्या पोटीं कच होता ॥ तोही होय ऐकता ॥ मंत्र जहाला षट्कर्णता ॥ मग जपला कचानिमित्त ॥ ७२ ॥ शुक्राचे पोटांतुनी ॥ कच निघाला फोडुनी ॥ मंत्र जपे ती देवयानी ॥ पितयातें उठविलें ॥ ७३ ॥ तीन वेळां मंत्र जपतां ॥ कचें पाठ केला तत्त्वतां ॥ संतोष करी मनीं बहुता ॥ कार्य साधलें म्हणोनि ॥ ७४ ॥ शुक्राचार्यातें नमुनी ॥ कच विनवी कर जोडुनी ॥ मातें दैत्य मारिती म्हणोनि ॥ निरोप द्यावा मजलागीं ॥ ७५ ॥ स्वामीचेनी विद्या शिकलों ॥ तुझे कृपेनें पूर्ण जहालों ॥ देवकार्यार्थ संतोषलों ॥ म्हणूनि चरणीं

लागला ॥ ७६ ॥ शुक्राचार्यें हर्षोनि ॥ निरोप दिधला त्यालागोनी ॥ पदर धरी देवयानी ॥ पति व्हावें म्हणोनियां ॥ ७७ ॥ तूतें मारिलें तीन वेळीं ॥ मीं वांचविलें त्या काळीं ॥ विद्या शिकलासी पित्याजवळी ॥ अवश्य वरावें मजलागीं ॥ ७८ ॥ कच म्हणे ऐक बोळे ॥ गुरुकन्या भगिनी बोले ॥ तुवां आम्हुतें वांचविलें ॥ माता होसी निर्धारीं ॥ ७९ ॥ वरितां दोष आपणासी ॥ दूषण ठेवितील सर्व ऋषि ॥ भगिनी तूं आमुची होसी ॥ कैसी वरूं म्हणे तो ॥ ८० ॥ देवयानी कोपोनि ॥ शाप दिधला ते क्षणीं ॥ वृथा विद्या होईल मानीं ॥ समस्त विसरे तात्काळीं ॥ ८१ ॥ माझे अंतःकरणींची आशा ॥ वृथा केली निराशा ॥ विद्या नये तुज लवलेशा ॥ म्हणूनि शाप दिधला ॥ ८२ ॥ कच म्हणे तियेसी ॥ वाया शापिलें आम्हांसी ॥ पुरुष वरील तुजसी ॥ ब्रह्मकुळाव्यतिरिक्त ॥ ८३ ॥ तुझा पिता

१ तरुण स्त्रिये. २ खरोखरी. ३ ब्राह्मणावांचून इतर.

ब्रह्मज्ञानी ॥ जाणे अमृतसजीवनी ॥ तुज शिकविलें म्हणोनि ॥ पुढें मंत्र न चाले ॥ ८४ ॥ ऐसा शाप देउनी ॥ कच गेला निघुनी ॥ संतोष झाला इंद्र-भुवनीं ॥ दैत्यजीवन नव्हेची ॥ ८५ ॥ शुक्राचा संजीवनी मंत्र ॥ कामा नये झाला अपात्र ॥ स्त्रियांसी न सांगावा मंत्र ॥ म्हणोनि श्रीगुरु निरूपिती ॥ ८६ ॥ स्त्रियांलागीं पतिसेवा ॥ याची कारणें मंत्र न द्यावा ॥ व्रतोपवास करावा ॥ गुरु-पुरुष-निरोपानें ॥ ८७ ॥ सावित्री विनवी श्रीगुरूसी ॥ व्रत आचरलें बहुवशीं ॥ तुझें वाक्य आम्हांसी ॥ व्रत एखादें निरोपावें ॥८८॥ तुजवरी माझा विश्वास ॥ तुजवांचोनि नेणूं आणिकास ॥ व्रत तूंचि आम्हांस ॥ व्रत तुझी चरणसेवा ॥ ८९ ॥ भक्ति राहे तुझे चरणीं ॥ ऐसा निरोप द्यावा मुनि ॥ म्हणुनी लागली चरणीं ॥ कृपा करीं म्हणोनियां ॥ ९० ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ सांगेन तुज व्रत ऐसी ॥ स्थिर होय

१ पति. २ आज्ञेनें.

अहेवपणासी ॥ राज्य पावे तुझा पति ॥९१॥ दंपत्य विनवी श्रीगुरूसी ॥ तुझें वाक्य कारण आम्हांसी ॥ जैसा तूं निरोप देशी ॥ तेणें रीतीं रहाटूं ॥९२॥ जो गुरुवाक्य न करी ॥ तो पडे रौरवघोरीं ॥ तुझें वाक्य आम्हां शिरीं ॥ म्हणूनि चरणीं लागली ॥ ९३ ॥ भक्तवत्सल श्रीगुरुनाथ ॥ सांगता जहाला अतिप्रीत ॥ विस्तारोनि समर्थ ॥ व्रत तिसीं सांगतसे ॥ ९४ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ श्रीगुरु म्हणती कौतुका ॥ ऐकताती दंपती निका ॥ अति-प्रीतींकरोनियां ॥ ९५ ॥ श्रीगुरु म्हणती तयांसी ॥ सांगेन व्रत इतिहासीं ॥ ऋषि पुसती सूतासी ॥ व्रत बरवें निरोपावें ॥ ९६ ॥ सूत म्हणे ऋषीश्वरां ॥ व्रत सांगेन मनोहरा ॥ स्त्रियां अथवा पुरुषां बरा ॥ व्रत असे अवधारा ॥ ९७ ॥ नित्यानंद असे शांत ॥ निर्विकल्प विख्यात ॥ ऐसा ईश्वर अर्चितां त्वरित ॥ सकळाभीष्टें पाविजे ॥ ९८ ॥ संसारसागरांत ॥ विषयातुर आच-रत ॥ तेही पूजितां पूर्ण भक्त ॥ त्यासी ईश्वर प्रसन्न होय ॥९९॥ विरक्त अथवा संसाररत ॥ विषयातुर आसक्त ॥ जे पूजिती पूर्ण भक्त ॥ त्यांसी ईश्वर प्रसन्न

होय ॥ १०० ॥ तेणें पाविजे पैलपार ॥ ऐसें बोलती वेदशास्त्र ॥ स्वर्गापवर्गी अधिकार ॥ त्यासी होय परियेसा ॥ १ ॥ विशेष व्रत असे एक ॥ सोमवार व्रतनायक ॥ ईश्वरार्चन करा विवेक ॥ सकळाभीष्टें पाविजे ॥२॥ नक्तभोजन उपवासी ॥ जितेंद्रिय करा विशेषीं ॥ वैदिक तांत्रिक पूजेसी ॥ विधिपूर्वक सकळिक ॥ ३ ॥ गृहस्थ अथवा ब्रह्मचारीं ॥ सुवासिनीं कन्याकुमारीं ॥ भर्तृविण विधवा नारीं ॥ व्रत करावें अवधारा ॥ ४ ॥ याचें पूर्वील आख्यान ॥ सांगेन ऐका अतिगहन ॥ ऐकतां करी पावन ॥ सकळांसही परियेसा ॥ ५ ॥ स्कंदपुराणींची कथा ॥ सर्व साद्यंत ऐका ॥ पूर्वयुगीं आर्यावर्तका ॥ राजा एक अवधारा ॥ ६ ॥ चित्रवर्मा नाम त्यासी ॥ धर्मात्मा राजा परियेसीं ॥ धर्ममार्ग आचरे हर्षीं ॥ अधर्मातें शिक्षा करी ॥ ७ ॥ अखिल पुण्यें त्याणें केलीं ॥ सकल संपत्ति वाढविली ॥ समस्त

१ संसाराची कड. २ तंत्रांत सांगितल्यांप्रमाणें.

पृथ्वी जिंकिली ॥ पराक्रमेंकरूनियां ॥ ८ ॥ सहपत्नी धर्म करिती ॥ पुत्र-काम्यें शिवाप्रती ॥ ऐसा किती काळ क्रमिती ॥ कन्या झाली तयांतें ॥ ९ ॥ अतिसुंदर सुलक्षण ॥ पार्वतीरूपासमान ॥ तेज फांके सूर्यकिरण ॥ अतिलावण्य न वर्णावें ॥ ११० ॥ वर्तावया जातकासी ॥ बोलाविले ज्योतिषी ॥ द्विज मिळाले अपारेसी ॥ वर्तविती जातक ॥ ११ ॥ म्हणती कन्या सुलक्षण ॥ नामें सीमंतिनी जाण ॥ उमेसारखें मांगल्यंपण ॥ किंवा दमयंतीस्वरूप होय ॥ १२ ॥ भागीरथीऐसी रूपासी ॥ लक्ष्मीसारिखी गुणराशी ॥ ज्ञानें देवमतासरसी ॥ जानकीसमान पतिव्रता ॥ १३ ॥ सूर्या-सारिखी होईल कांति ॥ चंद्रासमान मनशांति ॥ दहा सहस्र वरुषें ख्याती ॥ पतिसह राज्य करील ॥ १४ ॥ जातक वर्तवलें तिसी ॥ राव पावला अति-हर्षी ॥ अखिल दानें विप्रांसी ॥ देता जाहला अवधारा ॥ १५ ॥ असतां राव

१ पतिव्रता.

सभेसी ॥ द्विज एक परियेसीं ॥ भय न धरितां वाक्यासी ॥ बोलतसे अवधारा ॥ १६ ॥ ऐक राया माझें वचन ॥ कन्यालक्षण मी सांगेन ॥ चवदावे वर्षीं विधवापण ॥ होईल इयेसी जाण पां ॥ १७ ॥ ऐसें वाक्य परिसोनि ॥ राव पडिला मूर्छा येवोनि ॥ चिंता वर्तली बहु मनीं ॥ विप्रवाक्य परिसतां ॥ १८ ॥ ऐसें सांगोनि ब्राह्मण ॥ गेला निघोनि तत्क्षण ॥ सर्व दुःखातें पावून ॥ तळमळीत तेधवां ॥ १९ ॥ ऐसें बाळपण क्रमितां ॥ सप्त वर्षे जातीं तत्त्वतां ॥ चिंतीत होतीं मातापिता ॥ वऱ्हाड केवीं करावें ॥ १२० ॥ चवदावे वर्षीं विधवापण ॥ म्हणोनि बोलिला ब्राह्मण ॥ तेणें व्याकुळ अंतःकरण ॥ राजा-राजपत्नींचें ॥ २१ ॥ कन्या खेळे राजांगणीं ॥ सवें सखयांतें घेवोनि ॥ बोलतां ऐकिलें विप्रवचनीं ॥ चौदावे वर्षीं विधवात्व ॥ २२ ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ कन्या करीतसे चिंतन ॥ वर्ततां आली एक दिन ॥

तया घरीं ब्रह्मस्त्री[1] देखा ॥ २३ ॥ याज्ञवल्क्याचिया पत्नी ॥ मैत्रेयी म्हणोनि ॥ घरीं आली देखोनि ॥ चरण धरीत तेधवां ॥ २४ ॥ भावें साष्टांगें नमूनि ॥ करसंपुट जोडोनि ॥ विनवी करुणावचनीं ॥ माते प्रतिपाळीं म्हणतसे ॥ २५ ॥ सौभाग्य स्थिर होय जेणें ॥ उपाय सांगें मजकारणें ॥ चंचळ असे अंतःकरणें ॥ म्हणूनि चरणीं लागली ॥ २६ ॥ कन्या विनवी तियेसी ॥ ऐसें व्रत सांग आम्हांसी ॥ आम्हां जननी तूंचि होसी ॥ व्रत सांग म्हणतसे ॥ २७ ॥ ऐकोनि कन्येच्या वचना ॥ बोले मैत्रेयी जाणा ॥ शरण रिघावें उमारमणा ॥ अहेवपण स्थिर होय ॥२८॥ सोमवार परियेसीं ॥ व्रत आचरीं नेमेंसीं ॥ पूजा करावी शिवासी ॥ उपवास करुनी अवधारा ॥ २९ ॥ बरवें सुस्नात होवोनि ॥ पीतांबर नेसोनि ॥ मन स्थिर करोनि ॥ पूजा करावी गौरीहरा ॥१३०॥ अभिषेकें पापक्षय ॥

[1] ब्राह्मणाची बायको.

पीठ पूजितां साम्राज्य ॥ गंधाक्षता पुष्पमाल्य ॥ सौभाग्यसौख्य पाविजे ॥ ३१ ॥ सौगंध होय धूपानें ॥ कांति पाविजे दीपदानें ॥ भोग नैवेद्यार्पणें ॥ तांबूलदानें लक्ष्मी स्थिर ॥ ३२ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ नमस्कारितां त्वरित ॥ अष्टैश्वर्यें नांदत ॥ ईश्वरजप केलिया ॥ ३३ ॥ होमें सर्व कोश¹ पूर्ण ॥ समृद्धि होतसे जाण ॥ करितां ब्राह्मणभोजन ॥ सर्वदेवता तृप्त होती ॥ ३४ ॥ ऐसें सोमवार व्रत ॥ कन्ये करीं वो निश्चित ॥ भय आलिया दुरित² ॥ परिहरती महा क्लेश ॥ ३५ ॥ गौरीहरपूजा करितां ॥ समस्त दुरितें जातीं तत्त्वतां ॥ ऐकोनि सीमंतिनी तत्त्वतां ॥ अंगिकारिलें व्रत देखा ॥ ३६ ॥ सोमवाराचें व्रत ॥ आचरे सीमंतिनी त्वरित ॥ पिता देखोनि निश्चित ॥ विवाहायोग्य म्हणोनि ॥ ३७ ॥ राजा विचारी मानसीं ॥ वऱ्हाड करावें कन्येसी ॥ जैसें प्राक्तन³ असेल तिसी ॥ तैसें घडो म्हणतसे

१ भांडार. २ पापें. ३ नशीब.

॥ ३८ ॥ विचारोनि मंत्रियांसी ॥ पाठविता झाला राष्ट्रांसी ॥ दमयंती-नळवंशी ॥ इंद्रसेनाचा कुमारक ॥ ३९ ॥ चित्रांगद वर बरवा ॥ जैसा तेज चंद्रप्रभा ॥ बोलाविले विवाहशोभा ॥ कन्या दीधली संतोषें ॥१४०॥ राजे भूमांडलिक देखा ॥ समस्त आले वऱ्हाडिका ॥ वऱ्हाड झालें अति-कौतुका ॥ महोत्साह नानापरीं ॥ ४१ ॥ नाना द्रव्यालंकार ॥ वऱ्हाडिकां देई नृपवर ॥ अखिल दानें देकार ॥ विप्रालागीं देता झाला ॥ ४२ ॥ पाठवणी केली सकळिकां ॥ जामाता ठेविला कौतुका ॥ कन्यास्नेह अनेका ॥ म्हणोनि राहविलें राजपुत्रा ॥ ४३ ॥ राजपुत्र श्वशुरगृहीं ॥ स्त्रिया प्रीति अतिस्नेहीं ॥ काळ क्रमितां एके समयीं ॥ जलक्रीडेसी निघाला ॥ ४४ ॥ कालिंदी म्हणिजे नदीसी ॥ राजपुत्र परियेसीं ॥ सर्व दळ समागमेंसीं ॥ गेला नदीसी विनोदें ॥ ४५ ॥ राजपुत्र निघे नदींत ॥ सवें निघाले लोक

१ आवई. २ यमुना.

बहुत ॥ विनोदें असे पोहत ॥ अतिहर्षें जलक्रीडा ॥ ४६ ॥ पोहतां राजकुमार देखा ॥ बुडाला मध्यें गंगोदका ॥ आक्रांत झाला सकळिकां ॥ काढा काढा म्हणताती ॥ ४७ ॥ सर्वें सैन्य लोक सकळ ॥ होते नावेकरी प्रबळ ॥ उदकीं पाहताती तये वेळ ॥ न दिसे कोठें बुडाला ॥ ४८ ॥ उभय तटीं सैन्यांतून ॥ धांवत गेले राजसदन ॥ व्यवस्था सांगती संपूर्ण ॥ जामात तुमचा बुडाला ॥ ४९ ॥ कालिंदी नदीच्या डोहांत ॥ संगतीनें होते पोहत ॥ अदृश्य झाला त्वरित ॥ न दिसे कुमार बुडाला ॥ १५० ॥ ऐकोनि राजा पडे धरणीं ॥ मूर्च्छना येऊनि तत्क्षणीं ॥ कन्या ऐकतांच श्रवणीं ॥ त्यजूं पाहे प्राणातें ॥ ५१ ॥ राजा कन्येसी संबोखितें ॥ आपण गेला धांवत ॥ राजस्त्रिया शोक करीत ॥ कन्यादुःखें अतिबहु ॥ ५२ ॥ सीमंतिनी करी शोका ॥ म्हणे देवा त्रिपुरांतका ॥ शरण रिघालिया

१ नावाडी. २ आश्वासित.

देखा ॥ मरण कैसें न आलें मज ॥ ५३ ॥ मृत्यु चवदा वर्षीं जाण ॥ म्हणोनि धरिले तुमचे चरण ॥ वृथा गेलें व्रताचरण ॥ सोमवार शिवाचें ॥५४॥ तव देणें अढळ सकळां ॥ मज उपेक्षिलें जाश्वनीळा ॥ अपकीर्ति तुज केवळा ॥ शरणागतां रक्षिसी ॥ ५५ ॥ स्मरण करी श्रीगुरूसी ॥ याज्ञवल्क्यपत्नीसी ॥ सांगितलें व्रत आम्हांसी ॥ सौभाग्य स्थिर म्हणोनियां ॥ ५६ ॥ तिचिया वाक्यें करूनी ॥ पूजिलीं शिवभवानी ॥ वृथा झालीं माझे मनीं ॥ शीघ्र विनवी शिवासी ॥ ५७ ॥ ऐसें दुःखें प्रलापत ॥ सीमंतिनी जाय रडत ॥ गंगाप्रवेश करीन म्हणत ॥ निघाली वेगें गंगेसी ॥ ५८॥ पिता देखोनि नयनीं ॥ धरावया गेला धावोनी ॥ कन्येतें आलिं-गोनी ॥ दुःख करी अत्यंत ॥५९॥ सकळ मंत्री पुरोहित ॥ सर्व सैन्य दुःख करी-त ॥ बोलाविले नावेकरी त्वरित ॥ पहा म्हणती गंगेंत ॥१६०॥ गंगा सकळ

१ शंकरा.

शोधिती ॥ न दिसे कुमार कवणे गती ॥ शोक करितसे सीमंती ॥ राजा संबोखी तियेसी ॥ ६२ ॥ राजकुमाराचे सेवक ॥ करूं लागले बहु दुःख ॥ सांगों गेले पुत्रशोक ॥ इंद्रसेनाकारणें ॥ ६२ ॥ ऐकोनियां इंद्रसेन ॥ दुःख करी अतिगहन ॥ भार्येसहित धांवून ॥ आला तया मृत्युस्थळा ॥ ६३ ॥ दोघे राव मिळोन ॥ शोक करिती दारुण ॥ हा हा कुमारा म्हणोन ॥ ऊर शिर पिटताती ॥ ६४ ॥ हा हा पुत्रा ताता म्हणत ॥ राजा गडबडां असे लोळत ॥ मंत्री राजकुळ समस्त ॥ नरलोक दुःख करिती ॥ ६५ ॥ कोठें गेला राजसुत ॥ म्हणोनि सीमंतिनी रडत ॥ खिन्न झाले समस्त ॥ मातापितर श्वशुरादि ॥ ६६ ॥ कोणे स्थानीं पति गेले ॥ म्हणोनि सीमंतिनी लोळे ॥ ललाट हस्तें पिटिलें ॥ पार नाहीं शोकासी ॥ ६७ ॥ सीमंतिनी म्हणे पितयासी ॥ प्राण त्यजीन पतिसरसी ॥ वांचूनियां संसा-

१ आपदातात.

रासी ॥ वैधव्य कोण भोगील ॥ ६८ ॥ पुसे सकळ द्विजांसी ॥ करावें कीं सहेगमनासी ॥ विप्र सांगती रायासी ॥ प्रेतावेगळें करूं नये ॥ ६९ ॥ प्रेत शोधावें नदींत ॥ दहन करावें कन्येसहित ॥ न दिसे बुडाला गंगेंत॥ केवीं सहगमन होईल ॥ १७० ॥ आतां इसी ऐसें करणें ॥ प्रेत सांपडे तंव-वरी राखणें ॥ ऐकोनियां द्विजवचनें ॥ राजा कन्ये विनवितसे ॥ ७१ ॥ ऐसें व्याकुळ दुःखें करिती ॥ मंत्री पुरोहित म्हणती ॥ जे असेल होणार गती ॥ ब्रह्मादिकां चुकेना ॥ ७२ ॥ होणार जहाली देवकरणी ॥ काय कराल दुःख करोनी ॥ ऐसें मंत्री संबोखुनी ॥ रायातें चला म्हणती ॥ ७३ ॥ निघाले राजे उभयतां ॥ मंदिरा पावले दुःख करितां ॥ इंद्रसेन अति दुःखिता ॥ न विसरे कधीं पुत्रशोक ॥ ७४ ॥ राज्यव्यापार सोडूनि ॥ दुःख करी पुत्रचिंतनीं ॥ गोत्रजीं राज्य हिरूनी ॥ कपटें घेतलें तयाचें

१ सती जाणें. २ समजुतीनें सांगून. ३ भाऊबंदांनीं

॥ ७५ ॥ सहभार्या रायासीं ॥ ठेविते झाले कारागृहासीं[1] ॥ पुत्रशोकें बहु त्यासी ॥ राज्यभोग चाडे[2] नाहीं ॥ ७६ ॥ चित्रवर्मा राव देखा ॥ कन्या ठेविली ममत्विका[3] ॥ प्राण त्यजूं पाहे निका ॥ लोक निंदतील म्हणोनी ॥ ७७ ॥ राव म्हणे कन्येसी ॥ पुत्र नाहीं आमुचे वंशीं ॥ कन्या एक तूं आम्हांसी ॥ पुत्रापरी रहाटावें ॥ ७८ ॥ लोक निंदितील आम्हांसी ॥ वैधव्य आलें परियेसीं ॥ वर्ष एक क्रमिलियासी ॥ पुढें आचार करीं वो बाळे ॥ ७९ ॥ पित्याचें वचन ऐकोनी ॥ करीतसे बहु चिंतनीं ॥ म्हणे देवा शूळपाणि ॥ केवीं मातें गांजिलें ॥ १८० ॥ ऐसें विचारुनी मानसीं ॥ व्रत आचरे तत्परेसीं ॥ सोमवार उपवासासी ॥ ईश्वर पूजा करितसे ॥ ८१ ॥ इकडे तो राजकुमार ॥ बुडाला होता गंगापूर ॥ गेला जेथें पाताळनगर ॥ वासुकी जेथें राज्य करी ॥ ८२ ॥ नागलोकींचिया नारी ॥

१ बंदीखान्यांत. २ पर्वा. ३ ममतेनें.

आल्या होत्या नदीतीरीं ॥ राजकुमार आला पुरीं ॥ नदीतटाकीं वहातसे ॥ ८३ ॥ देखोनियां नागकन्या ॥ काढिती संतोषें करूनियां ॥ अमृत शिंपिती आणूनियां ॥ सावध केला तयातें ॥ ८४ ॥ कन्या मिळून त्यासी ॥ घेवोनि जाती तक्षकापासीं ॥ विचित्र नगर परियेसीं ॥ राजपुत्र पहात असे ॥ ८५ ॥ पाहे पाताळनगर-रचना ॥ जैसी शोभा इंद्रभुवना ॥ गोपुरें दिसती महारत्ना ॥ विद्युल्लतेचिये परी ॥ ८६ ॥ इंद्रनीळ वैडूर्येंसीं ॥ माणिकें मुक्ताफळांसीं ॥ महारम्य पुरी जैसी ॥ सूर्यकांति मिरवत ॥८७॥ चंद्रकांतिसरसी भूमि ॥ महाद्वारें कपाट हेमी ॥ अनेक रत्नें नाहीं उपमी ॥ ऐशा मंदिरा प्रवेशला ॥ ८८ ॥ पुढें देखिली सभा थोर ॥ समस्त बैसले सर्पाकार ॥ आश्चर्य करी राजकुमार ॥ असंख्य सर्प दिसताती ॥ ८९ ॥ सभेमध्यें अतिशोभित ॥ मध्यें बैसला पन्नगनाथ ॥ जैशी

सूर्यकांति फांकत ॥ अति उन्नत बैसला ॥ १९० ॥ अनेक शत फणा दिसती ॥ जैशी वीज लखलखती ॥ पीतांबरें सज्योती ॥ रत्नकुंडलमंडित ॥ ९१ ॥ अनेकरत्नखचित देखा ॥ मुकुट मिरवती सहस्र एका ॥ सहस्रफणी मिरवे तक्षका ॥ ऐसा सभे बैसला असे ॥ ९२ ॥ रूपयौवन नागकन्या ॥ नानाभरणें लेवोनियां ॥ अनेक सहस्र येवोनियां ॥ सेवा करिती तक्षकाची ॥ ९३ ॥ ऐशा सभास्थानीं[1] देख ॥ राव बैसला तक्षक ॥ देखोनियां राजकुमारक ॥ नमन करी साष्टांगीं ॥ ९४ ॥ तक्षक पुसे नागकन्यांसी ॥ कैंचा कुमार आणिलासी ॥ सुलक्षण दिसतो कैसी ॥ कोठें होता म्हणे तयां ॥ ९५ ॥ नागकन्या म्हणती त्यासी ॥ नेणों नाम याचे वंशीं ॥ वहात आला यमुनेसी ॥ घेऊन आलों तुम्हांजवळी ॥ ९६ ॥ तक्षक पुसे राजकुमारासी ॥ नाम कवण कवणे वंशीं ॥ काय कारणें

१ श्रेष्ठ स्थानीं.

आलासी ॥ कवण देशीं वास तुझा ॥ ९७ ॥ सांगे राजकुमार देखा ॥ आम्ही भूमंडळनायका ॥ नैषध राजपति ऐका ॥ नळनामें पुण्यश्लोक ॥ ९८ ॥ त्याचा पुत्र इंद्रसेन ॥ जन्म आमुचा त्यापासून ॥ चित्रांगद नामें आपण ॥ गेलों होतों श्वसुरगृहा ॥ ९९ ॥ जलक्रीडा करावयासी ॥ गेलों होतों यमुनेसी ॥ विधिवंशें आम्हांसी ॥ बुडालों नदीं अवधारा ॥ २०० ॥ वहात आलों नदींत ॥ नागकन्या मज देखत ॥ घेवोनि आल्या तुम्हांप्रत ॥ पूर्व भाग्यें करूनी ॥ १ ॥ पूर्वार्जित पुण्यवंशीं ॥ भेटी झाली चरणा स्पर्शी ॥ धन्य माझे जीवित्वासी ॥ कृतार्थ झालों म्हणतसे ॥ २ ॥ करुणोवचन ऐकोनी ॥ तक्षक बोले संतोषोनी ॥ नको भिऊं म्हणोनी ॥ धैर्य तया दिधलें ॥ ३ ॥ शेष म्हणे रे बाळा ॥ तूं आहेसी मन निर्मळा ॥ तुमचे घरीं सार्वकाळा ॥ दैवत कोण पूजितसां ॥ ४ ॥ ऐसें ऐकोनी राज-

१ दैवयोगानें. २ नम्रत्वाचें.

कुमार ॥ हर्षें जहाला निर्भर ॥ सांगतसे विस्तार ॥ आपुला देव शंकर ॥ ५ ॥ सकळ देवांचा देव ॥ नाम ज्याचें सदाशिव ॥ वामांगीं उमा अपूर्व ॥ त्यालागीं पूजूं निरंतर ॥ ६ ॥ ज्यापासोनी जोनित ब्रह्मा ॥ सृष्टि सृजितो अनुपमा ॥ तो सदाशिव आम्हां ॥ निज दैवत निर्धारें ॥ ७ ॥ तयाच्या सत्त्वगुणेंसी ॥ विष्णु उपजला परियेसी ॥ प्रतिपाळक लोकांसी ॥ तो सदाशिव आराधितों ॥ ८ ॥ ज्याच्या तामसगुणें जाण ॥ एकादश रुद्रगण ॥ उपजले असती याच गुण ॥ प्रलयकर्ता या नांव ॥ ९ ॥ धाता विधाता आपण ॥ उत्पत्तिस्थितिलयाकारण ॥ तेजासी तेज असे जाण ॥ तैसा ईश्वर पूजितसों ॥ १० ॥ पृथ्वी आप तेजासी ॥ जो पूर्ण वायु आकाशीं ॥ तैसा पूजितसों शिवासी ॥ म्हणे राजकुमार देखा ॥ ११ ॥ सर्वां भूतीं असें संपूर्ण ॥ चिन्मय आपण निरंजन ॥ जो रूपें असे अचिं-

१ उत्पन्न झालेला. २ निर्माण करितो. ३ निर्विकार.

तन ॥ तो ईश्वर पूजितसों ॥ १२ ॥ ज्याची कथा वेद जहाले ॥ तक्षक शेष ज्याचीं कुंडलें ॥ त्रिनेत्री असे चंद्र मोळे ॥ तैसा शंकर पूजितसों ॥ १३ ॥ ऐसें ऐकोनी वचन ॥ तक्षक संतोषला अतिगहन ॥ राजकुमारा आलिंगोन ॥ तुष्टलों तुष्टलों म्हणतसे ॥ १४ ॥ तक्षक बोले तये वेळीं ॥ तुज देईन राज्य सकळी ॥ तुवां रहावें पाताळीं ॥ आनंदें भाग्य भोगीत ॥ १५ ॥ माझ्या लोकीं जें जें रत्न ॥ तें तें देईन तुजकारण ॥ पावोनियां समाधान ॥ सुखें येथें रहावें ॥ १६ ॥ पाताळ लोकींची रचना ॥ पहावी तुवां अनुपमा ॥ कल्पवृक्ष मनोरमा ॥ आहेत माझ्या नगरांत ॥ १७ ॥ अमृत न देखती स्वप्नीं कोणी ॥ तें भरलें असें जैसें पाणी ॥ तळीं बावी पोखरणी ॥ अमृताच्या माझ्या घरांत ॥ १८ ॥ नाहीं मरण तव येथें ॥ रोगपीडादि समस्तें ॥ नेणती कोणी स्वप्नावस्थें ॥ ऐसें नगर माझें असे ॥ १९ ॥ सुखें रहावें येथें स्वस्थ ॥ तक्षक कुमारक सांगत ॥ राजपुत्र असे

विनवीत ॥ करुणावचनें अवधरा ॥ २२० ॥ राजपुत्र विनवी तक्षकासी ॥ मी एकलाची पितयाचे कुशीं ॥ भार्या चतुर्दश वर्षी ॥ शिवपूजनीं रत सदां ॥ २१ ॥ नूतन झालें माझें पाणिग्रहण ॥ गुंतलें तेथें अंतःकरण ॥ पाहीन मातापिताचरण ॥ तेणें सर्वस्व पावलों ॥ २२ ॥ आपण बुडालों नदींत ॥ पिता माता दुःख करीत ॥ पत्नी जीव त्यागील सत्य ॥ हत्या पडे मस्तकीं ॥ २३ ॥ देखिले तव चरण आपण ॥ तेणें झालों धन्य धन्य ॥ रक्षिला आपण माझा प्राण ॥ दर्शन करा मातापिता ॥ २४ ॥ तक्षक झाला संतोषित ॥ नाना रत्नें त्यासी देत ॥ अमृत पाजिलें बहुत ॥ आणिक दिधलें स्त्रियेसी ॥ २५ ॥ कल्पवृक्षफळें देती ॥ अपूर्व वस्तु आभरणें त्यासी ॥ जें अपूर्व असे क्षितीं ॥ अमोल्य वस्तु देता जाहाला ॥ २६ ॥ इतुकें देवोनी कुमारकासी ॥ तक्षक बोले परियेसी ॥ जे जे

१ लभ. २ अलंकार.



[अ० ३५] सोमवार त्या दिवशीं । सीमंतिनी आली स्नानासी । सवें होत्या सखी सेवेसीं । नदीतीरीं उभी असे ॥ २३२ ॥

काळीं आम्हां स्मरसी ॥ तव कार्य सिद्धि पावेल ॥ २७ ॥ आणिक संतो-
षोनि चित्तीं ॥ वस्त्रें वाहनें मागुती ॥ तुरंग दिधले मनोगती ॥ सवें दे
कुमार आपुला ॥ २८ ॥ चित्रांगदकुमारासी ॥ इतकें दिधलें आनंदेंसी ॥
निरोप दिधला परियेसी ॥ वाहन तुरंग मनोहर ॥ २९ ॥ तक्षका नमूनि
त्वरित ॥ वारूवरी आरूढ राजसुत ॥ मनोवेगें मार्ग क्रमित ॥ नागकुमार
सवें जाणा ॥ २३० ॥ जिये स्थानीं बुडाला होता ॥ तेथें पावला क्षण न
लागतां ॥ निघाला बाहेर वारुसहिता ॥ नदीतटाकीं उभा असे ॥ ३१ ॥
सोमवार त्या दिवशीं ॥ सीमंतिनी आली स्नानासी ॥ सवें होत्या सखी
सेवेसी ॥ नदीतीरीं उभी असे ॥ ३२ ॥ सीमंतिनी म्हणे सखियांसी ॥
आश्चर्य वाटे मानसीं ॥ उदकांतुनी निघाला परियेसीं ॥ सवें असे नागपुत्र
॥ ३३ ॥ राक्षक होई कीं वेषधरू ॥ रूप धरिलें असे नरू ॥ दिसतसे
मनोहरू ॥ तुरंगारूढ जाहला असे ॥ ३४ ॥ कैसें पहा हो रूप यासीं ॥

जेवीं सूर्य प्रकाशी ॥ दिव्यमालांबरें कैसी ॥ सुगंध असे परिमळा ॥ ३५ ॥ दश योजनेंपर्यंत ॥ सुवास येतसे अमित्त ॥ पूर्वीं देखिला असे रूपवंत ॥ भासे त्यासी पाहिला ॥ ३६ ॥ स्थिर स्थिर भयाभीता ॥ त्याचिया पहाती स्वरूपता ॥ आपुला पतीसादृश्य म्हणतां ॥ रूप आठवी तये वेळीं ॥३७॥ राजपुत्र पाहे तियेसी ॥ म्हणे स्वरूपें माझी स्त्री ऐसी ॥ गळसरी न दिसे कंठासी ॥ हार नसे मुक्ताफळ ॥ ३८ ॥ अवलोकितसे अंगखुण ॥ न दिसे हळदी करीं कंकण ॥ चित्तीं व्याकुळ रूपहीन ॥ सदृश दिसे प्राणेश्वरी ॥ ३९ ॥ मनीं विचारी मागुतां ॥ रूप तिचें आठवितां ॥ तुरंगावरूनि उतरतां ॥ नदीतीरीं बैसला असे ॥ २४० ॥ बोलावोनि तियेसी ॥ पुसतसे अति प्रेमेंसी ॥ तुझा जन्म कवणे वंशीं ॥ पुरुष तुझा कोण सांगें ॥ ४१ ॥ कां कोमाइलीस बाळपणीं ॥ दिससी शोकें म्लान लक्षणी ॥ सांगावें मज

१ सारखा. २ नवरा.

विस्तारोनी ॥ अति स्नेहें पुतससे ॥ ४२ ॥ ऐकोनि सीमंतिनी देखा ॥ आपण न बोले लज्जे ऐका ॥ सखियांसी म्हणे बालिका ॥ वृत्तांत सांगा समस्त ॥ ४३ ॥ सखिया सांगती तयासी ॥ हे सीमंतिनी नाम परियेसी॥ चित्रांगदाची महिषी[1] ॥ चित्रवर्म्याची हे कन्या ॥ ४४ ॥ इचा पति अतिसुंदर ॥ चित्रांगद नामें थोर ॥ जळक्रीडा करितां फार ॥ येथें बुडाला नदींत ॥ ४५ ॥ तेणें शोक करितां इसी ॥ वैधव्य आलें परियेसीं ॥ दुःख करीत तीन वर्षीं ॥ लावण्य इचें हरपलें[2] ॥ ४६ ॥ सोमवारव्रत करीत ॥ उपवास पूजादि आचरत ॥ आज स्नानानिमित्त ॥ आली असे नदीसी ॥ ४७ ॥ इच्या श्वशुराची स्थिति देखा ॥ पुत्रशोकें विकळ ऐका ॥ राज्य घेतलें दायादिका ॥ कारागृहीं[3] घातलें ॥ ४८ ॥ या कारणें सीमंतिनी ॥ नित्य पूजी शूलपाणि ॥ सोमवार उपोषणीं ॥ म्हणोनि करिती परि-

१ राणी. २ कमी झालें. ३ बंदीखान्यांत.

येसा ॥ ४९ ॥ इतकें सख्या सांगती ॥ मग बोले आपण सीमंती ॥ किमर्थ पुसतां आम्हांप्रती ॥ आपण कोण कंदर्परूपी ॥ २५० ॥ गंधर्व किंवा तुम्ही देव ॥ किन्नर अथवा सिद्ध गंधर्व ॥ नररूप दिसतां मानव ॥ आमुतें पुसतां कवण कार्या ॥ ५१ ॥ स्नेहभावेंकरोनी ॥ पुसतां तुम्ही अति गहनी ॥ पूर्वीं देखिलें होतें नयनीं ॥ न कळे खूण म्हणतसे ॥ ५२ ॥ आप्तभाव माझ्या मनीं ॥ स्वजन तसे दिसतां नयनीं ॥ नाम सांगा म्हणोनि ॥ आठवी रूप पतीचें ॥ ५३ ॥ आठवोनि पतीचें रूप ॥ करूं लागली अति प्रलाप ॥ धरणीं पडली रुदितबाष्प ॥ महादुःख करीतसे ॥५४॥ तियेचें दुःख देखोनि नयनीं ॥ कुमार विलोकी तटस्थपणीं ॥ मुहूर्त एक सांवरोनी ॥ आपण दुःख करीतसे ॥ ५५ ॥ दुःख करोनियां देखा ॥ प्रक्षाळिलें आपुल्या मुखा ॥ उगी राहें म्हणे ऐका ॥ आमुचें नाम सिद्ध म्हणे ॥५६॥

1 मदनाप्रमाणें सुंदर.

सीमंतिनीकरितां शोक अपार ॥ जवळी आला राजकुमर ॥ हातीं धरली सत्वर ॥ संबोखीतसे प्रेमभावें ॥ ५७ ॥ एकांतीं सांगे तियेसी ॥ म्हणे तुझ्या भ्रताराासीं ॥ देखिलें आम्हीं दृष्टीसीं ॥ सुखी आतां असावें ॥ ५८ ॥ तव व्रतपुण्यें करोनी ॥ पति शीघ्र पहासी नयनीं ॥ चिंता करूं नको म्हणोनी ॥ तृतीय दिनीं भेटेल ॥ ५९ ॥ तव पति माझा सखा ॥ प्राण तोचि ऐका ॥ संदेह न करीं वो बालिका ॥ आण शिवचरणाची ॥ २६० ॥ ऐसें एकांतीं सांगून ॥ प्रगट न करीं म्हणून ॥ दुःख आठवलें ऐकून ॥ सीमंतिनी बाळिकेसी ॥ ६१ ॥ सुटल्या धारा लोचनीं ॥ प्रेमें रडे स्फुंदोनी ॥ विचार करी सीमंतिनी ॥ हाचि होय मम पति ॥ ६२ ॥ पतीसारिखें मुखकमळ ॥ नयन सुंदर अति कोमळ ॥ ध्वनि बोलतां ज्याची मंजुळ ॥ अति गंभीर बोलतसे ॥ ६३ ॥ मृदु वाणी पतीसरसी ॥ तैसाची बोले तो हर्षी ॥ धरितां माझिया करासीं ॥ अति मृदु लागले ॥ ६४ ॥ माझे

पतीचें लक्षण ॥ मी जाणें सर्व खूण ॥ हाचि होय माझा प्राण ॥ समस्त चिन्हें असती ॥ ६५ ॥ यास देखोनि नयनीं ॥ धारा सुटल्या प्रेमें जीवनीं ॥ नवलपरी विचारूनी ॥ मागुती अनुमान करीत ॥ ६६ ॥ दैवहीन असें आपण ॥ कैसा पति येईल म्हणोन ॥ बुडाला नदींत जाऊन ॥ मागुती केसी भ्रांति म्हणे ॥ ६७ ॥ मेला पति मागुती येतां ॥ ऐशी न ऐकिली कानीं कथा ॥ स्वप्न देखिलें कीं भ्रांता ॥ काय कळतें माझे मना ॥ ६८ ॥ धूर्त होय कीं वेषधारी ॥ राक्षक यक्ष किंवा किन्नरी ॥ कपटें प्रगटला नदीतीरीं ॥ म्हणोनी कल्पना करीतसे ॥ ६९ ॥ किंवा पावला शिवव्रतें ॥ कीं धाडिला गिरजानाथें ॥ संकट जाणोनी आम्हुच्या येथें ॥ मैत्रेयीकारणें धाडिला ॥ २७० ॥ ज्यास प्रसन्न शंकर ॥ त्यास कैंचा दुःखविकार ॥ चिंतिलें पाहिजे निर्धार ॥ ऐसें चिंती सीमंतिनी ॥ ७१ ॥ ऐसें होतां

१ शंका. २ लबाड मनुष्य.

राजकुमार ॥ आरूढला वारूवर ॥ निरोप मागे प्रीतिकर ॥ सीमंतिनी नारीसी ॥ ७२ ॥ निघाला अश्व मनोवेगें ॥ पातला नगरा अतिशीघ्रें ॥ वासुकीपुत्र होता संगें ॥ तया पाठवी नगरांत ॥ ७३ ॥ त्वां जावोनि वैरियांसी ॥ इंष्टतीं सांगा वादीयासी ॥ न ऐकतां तव बोलासी ॥ संहारीन बोलावें ॥ ७४ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ त्वरित पावला राजभुवनीं ॥ उभा राहोनि कठोर वचनीं ॥ बोलतसे नगराधिपतीसी ॥ ७५ ॥ चला शीघ्र कुटुंबेंसी ॥ चित्रांगदाचे भेटीसी ॥ तक्षकाचे दर्शनासी ॥ गेला होता पाताळीं ॥ ७६ ॥ कालिंदीये नदींत ॥ बुडाला हे ऐकोनियां मात ॥ तुम्हीं केला स्वामीघात ॥ राज्य घेतलें इंद्रसेनाचें ॥ ७७ ॥ आतां सांगेन तुम्हांसी ॥ चाड असे जरी प्राणासीं ॥ शरण जावें तयासी ॥ इंद्रसेना स्थापोनी ॥ ७८ ॥ तक्षकासारखा मैत्र जोडला ॥ दिधलें नवनागसहस्र-

१ समजुतीनें. २ शत्रूला. ३ ठार करीन. ४ आज्ञा.

बळा ॥ शीघ्र लागा चरणकमळा ॥ चित्रांगदाचे जाऊनी ॥ ७९ ॥ न ऐकाल माझ्या वचना ॥ तरी आतांचि घेतों प्राणा ॥ तक्षकें पाठविलें आपणा ॥ पारिपत्या कारणें हो ॥ २८० ॥ ऐसें वचन ऐकोनी ॥ शत्रु भयाभीत मनीं ॥ हीन बुद्धि केली जाणोनी ॥ आतां शरण रिघावें ॥ ८१ ॥ जरी करूं बलात्कार ॥ तक्षक करील संहार ॥ लोकांत होई निंदा फार ॥ प्राण जाईल आपुला ॥ ८२ ॥ ऐसें विचारूनी मानसीं ॥ बाहेर आणिती इंद्रसेनासी ॥ नाना वस्त्रें आभरणेंसी ॥ सिंहासनीं बैस-विला ॥ ८३ ॥ सकळ विनविती त्यासी ॥ अपराध घडला आम्हांसी ॥ प्राण राखा वेगेंसी ॥ म्हणोनी चरणीं लागले ॥ ८४ ॥ राया इंद्रसेनासी ॥ तक्षकपुत्र सांगे त्यासी ॥ तुमचा पुत्र आला परियेसी ॥ वासुकी भेटी गेला होता ॥ ८५॥ ऐकोनि राव संतोषी ॥ आठवोनि अधिक दुःखासी ॥ मूर्छा येवोनी धरणीसी ॥ पत्नीसहित पडियेला ॥ ८६ ॥ नागकुमरें उठ-

विलें त्यासी ॥ दुःख कासया करावें हर्षी ॥ येईल पुत्र भेटीसी ॥ त्वरें करोनि आतांची ॥ ८७ ॥ मग राव अतिहर्षी ॥ बोलावित मंत्रियांसी ॥ नगर श्रृंगारावयासी ॥ निरोप दिधला तये वेळीं ॥ ८८ ॥ ऐसा निरोप देऊन ॥ भेटी निघाला आपण ॥ सकळ दायाद स्वजन ॥ राणीवसा आदिकरूनी ॥ ८९ ॥ मंत्रीपुरोहितांसहित ॥ निघाले लोक समस्त ॥ कौतुक पाहों म्हणत ॥ मेला पुत्र कैसा आला ॥ २९० ॥ आनंद झाला सकळिकां ॥ राव मानी महाहरिखा ॥ पाहीन म्हणे पुत्रमुखा ॥ अति आवडीनें अवधारा ॥ ९१ ॥ सर्वे वाजंत्र्याचे गजर ॥ नगर लोकां संतोष थोर ॥ करिताती जयजयकार ॥ अति उल्हास करिताती ॥ ९२ ॥ ऐसें जाऊनी पुत्रासी ॥ भेटी झाली रायासी ॥ चित्रांगद पितयासी ॥ नमस्कारी साष्टांगें ॥ ९३ ॥ अति प्रेमें पुत्रासी ॥ आलिंगी राव त्वरेंसी ॥

१ भाऊबंद. २ महदानंद.

सद्गदित कंठेसी ॥ नेत्रीं सुटल्या अश्रुधारा ॥ ९४ ॥ पुत्रासी म्हणे इंद्रसेन॥ आलासी बाळा माझा प्राण ॥ श्रमलों होतों तुजविण ॥ म्हणोनि सांगे दुःख आपुलें ॥ ९५ ॥ मातेतें आलिंगोन ॥ दुःख करी ती अतिगहन ॥ विनवीत तिये संबोखोन ॥ मजनिमित्त कष्टलीसी ॥ ९६ ॥ पुत्र नव्हे मी तुमचा शत्रु ॥ जाऊनी आपुले सुखार्थु ॥ तुम्हां दुखाविलें कीं बहुतु ॥ नेदीच सुख तुम्हांतें ॥ ९७ ॥ आपण जावोनी पाताळीं ॥ राहिलों सुखें शेषाजवळी ॥ तुम्ही कष्टलींत बहुतकाळीं ॥ मजनिमित्त अहोरात्र ॥ ९८ ॥ काष्ठासरी[1] अंतःकरण ॥ माझें असे कीं सत्य जाण ॥ माताजीव जैसें मेण ॥ पुत्रानिमित्त कष्ट बहुत ॥ ९९ ॥ मातापितयांचें दुःख ॥ जो नेणे तोचि शतमूर्ख ॥ उत्तीर्ण[2] व्हावया अशक्य ॥ स्तनपान एक घडीचें ॥ ३०० ॥ मातेवीण देव देखा ॥ पुत्रासी नाहीं विशेखा ॥ कवण उत्तीर्ण नव्हे ऐका ॥

१ कांकडासारखें. २ उतराई.

माता केवळ मृडानी ॥ १ ॥ दुःख देत जननीसी ॥ तो जाय यमपुरासी ॥ पुत्र नव्हे त्याचे वंशीं ॥ सप्तजन्मीं दरिद्री ॥ २ ॥ ऐसें मातेसी विनवूनी ॥ भेटतसे तो भाऊबहिणी ॥ इष्ट सोयरे अखिल जनीं ॥ प्रधानासमवेत नागरिकां ॥ ३ ॥ इतुकिया अवसरीं ॥ प्रवेश केला नगराभीतरीं ॥ समारंभ केला अति थोरी ॥ पावले निजमंदिरा ॥ ४ ॥ तक्षकाचे पुत्रासी ॥ गौरविलें सन्मानेसी ॥ वस्त्रें भूषणें रत्नेंसी ॥ इंद्रसेनें अतिप्रीतीं ॥ ५ ॥ चित्रांगद सांगे पितयासी ॥ तक्षक उपकार विस्तारेंसी ॥ प्राण वांचविला आम्हांसी ॥ द्रव्य दिधलें अपार ॥ ६ ॥ सुंदर वस्त्रें आभरणें ॥ दिधलीं होतीं तक्षकानें ॥ पिता देखोनी संतोषानें ॥ म्हणे धन्य तक्षक ॥ ७ ॥ निरोप दिधला नागपुत्रासी ॥ बोळाविलें तयासी ॥ भृत्य पाठविले वेगेंसी ॥ चित्रवर्म्याचे नगरांत ॥ ८ ॥ राव म्हणे तये वेळीं ॥ सून माझी दैवें

१ पार्वती.

आगळी ॥ तिचे धर्में वांचला बळी ॥ पुत्र माझा अवधारा ॥ ९ ॥ तिणें आराधिला शंकर ॥ तेणें कंकणें चुडे स्थिर ॥ तेणें वांचला माझा कुमर ॥ सौभाग्यवती सून माझी ॥ ३१० ॥ म्हणोनि पाठविलें वेगेंसी ॥ लिहोनियां वर्तमानासी ॥ चित्रवर्मरायासी ॥ इंद्रसेन रायानें ॥११॥ हेर निघाले सत्वरीं ॥ चित्रवर्म्यांचिये नगरीं ॥ व्यवस्था सांगितली कुसरी ॥ चित्रांगदशुभवार्ता ॥ १२ ॥ संतोषे राजा ऐकोनी देखा ॥ करिता झाला महासुखा ॥ दानें दिधलीं अपार ऐका ॥ रत्नें भूषणें हेरांसी ॥ १३ ॥ इंद्रसेन राजा सत्वर ॥ पुनरपि करावया वऱ्हाड थोर ॥ चित्रांगद बडिवार ॥ सेना घेवोनि निघाला ॥ १४ ॥ महोत्साह झाला थोर ॥ वऱ्हाड केलें धुरंधर ॥ चित्रांगद प्रीतिकर ॥ सीमंतिनीसी भेटला ॥ १५ ॥ पाताळींची अमोल्य वस्त ॥ प्राणेश्वरीसी आर्पित ॥ पाजिता झाला अमृत ॥ महानंद प्रवर्तला ॥ १६ ॥ कल्पवृक्षफळ देखा ॥ देवोनि तोषविली नायका ॥

अमोल्य वस्त्राभरणीं देखा ॥ दश योजनें तेज फांके ॥ १७ ॥ ऐसा उत्साहें विवाह केला ॥ आपुले पुरीसी निघाला ॥ सीमंतिनीचे वैभवाला ॥ जोडा नसे त्रिभुवनीं ॥ १८ ॥ मग जावोनि नगरासी ॥ राज्यीं स्थापिला पुत्रासी ॥ दहा सहस्र पूर्ण वर्षीं ॥ राज्य केलें चित्रांगदें ॥ १९ ॥ सीमंतिनी करी व्रतासी ॥ उपवास सोमवारांसी ॥ पूजिलें गौरीहरासी ॥ म्हणोनि पावली इष्टार्थ ॥ ३२० ॥ ऐसें विचित्र असे व्रत ॥ म्हणोनि सांगे श्रीगुरुनाथ ॥ एक सुवासिनी म्हणत ॥ आति प्रीतीं निरूपिलें ॥ २१ ॥ ऐसें करीं वो आतां व्रत ॥ चुडे कंकणें अखंडित ॥ कन्या पुत्र होती बहुत ॥ आमुचें वाक्य अवधारीं ॥ २२ ॥ दंपत्य विनवी श्रीगुरूसी ॥ तुमची चरणसेवा आम्हांसी ॥ पुरविती मनोरथासी ॥ आम्हां व्रत कायसें ॥ २३ ॥ आमचा तूं प्राणनायक ॥ तुजवांचोनि नेणों आणिक ॥ तव स्मरणमात्रें असे निक ॥ म्हणोनि चरणीं लागलीं ॥ २४ ॥ श्रीगुरु म्हणती तयांसी ॥

आमुचे निरोपें करा ऐसी ॥ व्रत आचरा सोमवारासी ॥ तेचि सेवा आम्हां पावे ॥ २५ ॥ निरोप घेऊनि श्रीगुरूचा ॥ नेम धरिला सोमवाराचा ॥ भेटीलागीं तयाच्या ॥ मातापिता पावलीं ॥ २६ ॥ ऐकोनियां कन्या-पुत्रवार्ता ॥ संतोषली त्याची माता ॥ द्रव्य वेचिलें अपरिमिता ॥ समारा-धना ब्राह्मणांसी ॥२७॥ पूजा करिती श्रीगुरूसी ॥ आनंद अति मानसीं ॥ समारंभ दिवानिशीं ॥ बहुत करिती भक्तीनें ॥ २८ ॥ ऐशापरी वंदोनी ॥ श्रीगुरू ॥ निरोप घेउनी ॥ गेलीं ग्रामा परतोनी ॥ ख्याती झाली चहूं राष्ट्रीं ॥ २९ ॥ पुढें त्या दंपतीसी ॥ पांच पुत्र शतायुषी ॥ झाले आशी-र्वादेंसी ॥ श्रीगुरुरायाच्या ॥ ३३० ॥ प्रतिवर्षीं दर्शनासी ॥ दंपती येती भक्तीसी ॥ ऐसें शिष्या परियेसीं ॥ श्रीगुरूचें माहात्म्य ॥ ३१ ॥ ऐसें श्री-गुरुचरित्र ॥ सिद्ध सांगे पवित्र ॥ नामधारक अतिप्रीतीं ॥ ऐकतसे अव-धारा ॥ ३२ ॥ गंगाधराचा कुमर ॥ सरस्वती विनवी गुरुकिंकर ॥ स्वामी

माझा पारंपार ॥ श्रीनृसिंहसरस्वती ॥ ३३ ॥ ऐसा वरदमूर्ति देखा ॥ सकळ जन तुम्ही ऐका ॥ प्रसन्न होईल तात्काळिका ॥ न धरावा संदेह मानसीं ॥ ३४ ॥ साखर स्वादु म्हणावयासी ॥ उपमा द्यावी कायसी ॥ मनगटींचे कंकणासी ॥ आरसा कासया पाहिजे ॥ ३५ ॥ प्रत्यक्ष पाहतां दृष्टांतेसीं ॥ प्रमाण कासया परियेसीं ॥ ख्याती असे भूमंडळासी ॥ कीर्ति श्रीगुरुयतीची ॥ ३६ ॥ ऐका हो जन समस्त ॥ सांगतों मी उत्तम हित॥ सेवा करितां श्रीगुरुनाथ ॥ त्वरित होय मनकामना ॥ ३७ ॥ अमृताची आरवंटी ॥ घातली असे गोमटी ॥ पान करा हो तुम्ही घोटीं ॥ धणीवरी सकळिक ॥ ३८ ॥ श्रीगुरुचरित्र कामधेनु ॥ ऐकतां होय पतित पावनु ॥ नाम ज्याचें कामधेनु ॥ तो चिंतिलें पुरवित ॥ ३९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सीमंतिनी आख्यान विख्यात ॥ पंचत्रिंशत अध्यायांत ॥ कथासार सांगितली ॥ ३४० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते

नृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे सीमंतिन्याख्यानं नाम पंच-त्रिंशोऽध्यायः ॥ ३५ ॥ ओंवीसंख्या ॥ ३४० ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ शिष्योत्तम नामकरणी ॥ लागे सिद्धाचे चरणीं ॥ विनवीतसे कर जोडोनि ॥ भक्तिभावेंकरूनियां ॥ १ ॥ जय जया जी सिद्ध मुनि ॥ तूंचि तारक भवार्णीं ॥ तूंचि होसी ब्रह्मज्ञानी ॥ अविद्यातिमिरभास्कर[1] ॥ २ ॥ मायामोहरजनींत ॥ होतों आपण निद्रिस्त ॥ कृपासागर श्रीगुरुनाथ ॥ जागृत केलें आम्हांसी ॥ ३ ॥ तिमिरहरण भास्करु ॥ मज भेटलासी गुरु ॥ कडें केलें भवसागरु ॥ चिन्मयात्मा सिद्ध मुनि ॥ ४ ॥ ऐसें म्हणोनि सिद्धासी ॥ विनवी भावभक्तींसीं ॥ गुरुमूर्ति संतोषी ॥ अभयकर देतसे ॥ ५ ॥ पुढें चरित्र केवीं झालें ॥ विस्तारावें स्वामी वैहिलें[2] ॥ आमुतें स्वामी कृतार्थ केलें ॥ ज्ञानामृत पाशवून ॥ ६ ॥ कथामृत ऐकतां श्रवणी ॥ तृप्ति न होय अंतःकरणीं ॥ निरोपावें विस्तारोनि ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ७ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढील कथा झाली

१ अज्ञानांधकाराचा सूर्य. २ सत्वर.

निका ॥ एकाचित्तें तुम्ही ऐका ॥ ज्ञान होय समस्तांसी ॥ ८ ॥ गाणगापुरीं असता श्रीगुरु ॥ महिमा वाढली अपरंपारु ॥ बोलतां असें विस्तारु ॥ तावन्मात्र सांगतसों ॥ ९ ॥ महिमा एकेक सांगतां ॥ विस्तार होईल बहु कथा ॥ अवतार श्रीहरी साक्षाता ॥ कवण शके वर्णावया ॥ १० ॥ तया गाणगापुरांत ॥ होता विप्र वेदरत ॥ विरक्त असे बहुश्रुत ॥ कर्ममार्गे वर्ततसे ॥ ११ ॥ न घेतला प्रतिग्रह त्याणें ॥ परान्नासी न वचे नेणे ॥ मिथ्या वाचे नेणे ॥ अनुवाद आपण न करीच ॥ १२ ॥ नित्य शुष्क भिक्षा करी ॥ तेणें आपुलें उदर भरी ॥ तयाची नारी असे घरीं ॥ क्रोधवंत परियेसा ॥ १३ ॥ याचकवृत्ति[2] तो ब्राह्मण ॥ कंठी संसार सामान्यपणें ॥ अतीत-अभ्यागताविणें ॥ न घेई अन्न प्रत्यहीं ॥ १४ ॥ तया ग्रामीं प्रतिदिवसीं ॥ विप्र येती समाधानेंसी ॥ सहस्र संख्या[1] ब्राह्मणांसी ॥ मिष्टान्न

१ थोडक्यांत. २ भिक्षेनें पोट भरणारा.

घालिती परियेसा ॥ १५ ॥ समस्त जावोनि भोजन करिती ॥ तया विप्र-
वनितेप्रती ॥ येऊनि गृहीं स्तुति करिती ॥ अनेक परींचीं पक्कान्नें ॥ १६ ॥
ऐकोनि तया विप्रनारी ॥ नानापरी दुःख करी ॥ परमेश्वरा श्रीहरी ॥
म्हणोनि चिंती मनांत ॥ १७ ॥ कैसें दैव आपुलें हीन ॥ नेणें स्वप्नीं ऐसें
अन्न ॥ दरिद्री पतीसी वरून ॥ सदां कष्ट भोगितसें ॥ १८ ॥ पूर्वजन्मींचें
आराधन ॥ तैसा आपणासी पति हीन ॥ सदा पाहें दरिद्रपण ॥ वर्ततसों
देवराया ॥ १९ ॥ समस्त विप्र स्त्रियांसहित ॥ नित्य परान्नभोजन करीत ॥
पूर्वजन्मींचें सुकृत ॥ केलें होतें समस्तीं ॥ २० ॥ आपुला पति दैवहीन ॥
कदा नेणे परान्नभोजन ॥ काय करावें नारायण ॥ म्हणोनि चिंती मनांत
॥ २१ ॥ वर्ततां ऐसें तया स्थानीं ॥ आला विप्र महाधनी ॥ अपरपक्ष करणें[1]
मनीं ॥ म्हणोनि आला परियेसीं ॥ २२ ॥ तया स्थानीं विप्रांसी ॥ क्षण

[1] श्राद्ध.

दिले परियेसीं ॥ सवें त्यांच्या स्त्रियांसीं ॥ ओंवंतिलें तिहीं परियेसा ॥ २३ ॥ देखोनि ते विप्रवनिता ॥ पतीजवळी आली त्वरिता ॥ सांगती झाली विस्तारता ॥ आमंत्रण ब्राह्मणाचें ॥ २४ ॥ अनेक परीचीं पक्वान्नें ॥ देताती वस्त्रें परिधानें ॥ अपार दक्षिणा द्रव्यदानें ॥ देताती ऐकें प्राणेश्वरा ॥२५॥ यातें स्वामी अंगीकारणें ॥ अथवा आपण निरोप देणें ॥ कांक्षा करितें माझें मन ॥ अपूर्व अन्न जेवावें ॥ २६ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ निरोप देत ब्राह्मण ॥ सुखें जावें करीं भोजन ॥ आपणा न घडे म्हणतसे ॥ २७ ॥ निरोप घेउनी तये वेळीं ॥ गेली तया गृहस्थाजवळी ॥ आपण येऊं भोजनकाळीं ॥ म्हणोनि पुसे तयासी ॥ २८ ॥ विप्र म्हणे तियेसी ॥ आम्ही सांगूं दंपतींसी ॥ बोलावीं आपुल्या पतीसी ॥ तरीच आमुच्या गृहा यावें ॥ २९ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ झाली नारी खेदें खिन्न ॥ विचार करी

१ बोलाविलें. २ जोडप्यांना.



[ अ० ३६ ] देखोनि ते विप्रवनिता । पतीजवळी आली त्वरिता । सांगती झाली विस्तरता । आमंत्रण ब्राह्मणाचें ॥ २४ ॥

आपुलें मन ॥ काय करावें म्हणोनियां ॥ ३० ॥ म्हणे आतां काय करणें ॥ कैसें दैव आपुलें उणें ॥ बरवें अन्न स्वप्नीं नेणें ॥ पतीकारितां आपणासी ॥ ३१ ॥ विचारोनि मानसीं ॥ आली नृसिंहगुरूपासीं ॥ नमन करी सांष्टां-गेंसीं ॥ अनेका परी विनवितसे ॥ ३२ ॥ म्हणे स्वामी काय करणें ॥ बरवें अन्न कधीं नेणें ॥ आपुले पतीसी सांगणें ॥ आवंतणें बरवें येतसे ॥ ३३ ॥ सांगूं म्हणती दंपतीसी ॥ माझा पति नायके वचनासी ॥ न वंचे कधीं परान्नासी ॥ काय करूं म्हणतसे ॥ ३४ ॥ स्वामी आतां कृपा करणें ॥ माझ्या पतीतें सांगणें ॥ बरवीं येताती आमंत्रणें ॥ अन्नवस्त्र देताती ॥ ३५ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ श्रीगुरुमूर्ति हास्यवदन ॥ बोला-वूनियां तत्क्षण ॥ सांगती तया द्विजासी ॥ ३६ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ जावें तुम्ही आंवतेणेसीं ॥ तुझे स्त्रियेचे मानसीं ॥ असे मिष्टान्न जेवावें ॥ ३७ ॥

तिचे मनींची वासना जाण ॥ तुवां पुरवावी कारण ॥ सदा दुश्चित अंतः-करण ॥ कुलस्त्रियेचें असों नये ॥ ३८ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ नमन करी तो ब्राह्मण ॥ विनवीतसे कर जोडून ॥ परान्न आपणा नेम असे ॥ ३९ ॥ गुरुवचन जो न करी ॥ तोचि पडे रौरवघोरीं ॥ निरोप तुमचा माझ्या शिरीं ॥ जाईन त्वरित म्हणतसे ॥ ४० ॥ पुसोनियां श्रीगुरूसी ॥ आलें दंपत्य आवंतणेसी ॥ आनंद झाला बहुवसी ॥ तया विप्रस्त्रियेतें ॥ ४१ ॥ पितृनाम उच्चारोन ॥ संकल्प करी तो ब्राह्मण ॥ अनेक परींचें मिष्टान्न ॥ वाढिती तयां दंपतीसी ॥ ४२ ॥ भोजन करितां समयासी ॥ दिसे विपरीत तियेसी ॥ श्वान सूकर येउनी हर्षीं ॥ समागमें जेविताती ॥ ४३ ॥ कंटाळलें[1] तिचें मन ॥ उठली आपण त्यजुनी अन्न ॥ जे जेवीत होते ब्राह्मण ॥ तया समस्तांसी सांगतसे ॥ ४४ ॥ ऐसेपरी पतीसहित ॥

[1] खिन्न.

आली नारी चिंताक्रांत ॥ पतीस सांगे वृत्तांत ॥ श्वानउच्छिष्ट जेविलेंती ॥ ४५ ॥ स्त्रियेसी म्हणे तो ब्राह्मण ॥ तुझेनि आपुलें दैवहीन ॥ घडलें आपणासी परान्न ॥ उच्छिष्ट श्वानसूकरांचें ॥ ४६ ॥ ऐसें म्हणोनि स्त्रियेसी ॥ आलीं दोघें श्रीगुरूपासीं ॥ नमन केलें परियेसीं ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ४७ ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ कैसें सुख परान्नासी ॥ सदा दुखविसी पतीसी ॥ पुरले तुझे मनोरथ ॥ ४८ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ लागे नारी श्रीगुरुचरणीं ॥ विनवितसे कर जोडूनि ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ४९ ॥ मंदमति आपणासी ॥ दोष घडविले पतीसी ॥ नेलें आपण परान्नासी ॥ क्षमा करणें स्वामिया ॥ ५० ॥ चिंता करी द्विजवरू ॥ म्हणे स्वामी काय करूं ॥ दोष घडला अपारु ॥ व्रतभंग झाला म्हणोनि ॥ ५१ ॥ परान्न न घ्यावें म्हणोनि ॥ संकल्प होता माझे मनीं ॥ मिळाली सती वैरिणी ॥

दोष आपणा घडविले ॥ ५२ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ पुरविली स्त्रियेची वासना ॥ आतां तिचें मन धालें ॥ ५३ ॥ कधीं न वचे परान्नासी ॥ वर्तेल तुझ्या वाक्यासरसीं ॥ न करीं चिंता मानसीं ॥ दोष तुज नाहीं जाण ॥ ५४ ॥ आणिक एक सांगें तुज ॥ जेणें धर्म घडती सहज ॥ अडला असेल एखादा द्विज ॥ देवपितृकर्माविणें ॥ ५५ ॥ कोणी न मिळती विप्र त्यासी ॥ जावें तेथें भोजनासी ॥ जरी तेथें तूं न जासी ॥ अनंत दोष असे जाण ॥ ५६ ॥ श्रीगुरूचें वचन ऐकोन ॥ साष्टांगीं करी नमन ॥ विनवितसे कर जोडून ॥ विनंती माझी परियेसा ॥ ५७ ॥ अन्न घ्यावें कवणा घरीं ॥ घडतील दोष कवणेंपरी ॥ जाऊं नये कवणा घरीं ॥ निरोपावें स्वामिया ॥ ५८ ॥ विप्रवचन ऐकोन ॥ श्रीगुरु सांगती विस्तारोन ॥ सावधान करून मन ॥ ऐका श्रोते सक-

१ समाधान पावलें.

ळिक ॥ ५९ ॥ श्रीगुरु म्हणती विप्रासी ॥ अन्न घ्यावया घरें पुससी ॥ गुरुभुवनादिकीं हर्षी ॥ जेवावें शिष्यवर्गा-घरीं ॥ ६० ॥ वैदिकादि विद्वज्जन ॥ मातुळ आपुला श्वशुर जाण ॥ सहोदरादि साधुजन ॥ तया घरीं जेवावें ॥ ६१ ॥ अडला विप्र ब्राह्मणाविण ॥ त्याचे घरीं घ्यावें अन्न ॥ करावें गायत्रीजपन ॥ दोष जाती अवधारा ॥ ६२ ॥ विप्र म्हणे श्रीगुरूसी ॥ विनंति माझी परियेसीं ॥ निषिद्ध अन्न आम्हांसी ॥ कवण्या घरीं जेवूं नये ॥ ६३ ॥ श्रीगुरु सांगती ब्राह्मणासी ॥ अन्नवर्जित घरें ऐसीं ॥ अपार असे स्मृतिचंद्रिकेसी ॥ ऋषिसंमतें सांगेन ॥६४॥ नित्य मातापितयांसी ॥ सेवा घेती अतिदोषी ॥ जाऊं नये तया घरांसी ॥ धनलोभिष्ठ द्विजांघरीं ॥ ६५ ॥ कलत्रें पुत्र कष्टवोनि ॥ धर्म करी विप्रांलागोनि ॥ अन्ननिषेध तया भुवनीं ॥ दोष घडती जेविल्या ॥ ६६ ॥ गर्विष्ठ चित्रैंक शस्त्रधारी ॥

१ नायको. २ चितारी.

विप्र जाण मल्लयुद्ध करी ॥ वीणा वाद्य ज्याचें घरीं ॥ न घ्यावें अन्न ब्राह्मणानें ॥ ६७ ॥ बहिष्कारी विप्राघरीं ॥ याचकवृत्तीनें उदर भरी ॥ अन्न वर्जावें तया घरीं ॥ आत्मस्तुति परनिंदक ॥ ६८ ॥ बहु जन एक अन्न करिती ॥ पृथक् वैश्वदेव न करिती ॥ वर्जावीं अन्नें विप्रजातीं ॥ महादोष बोलिजे ॥ ६९ ॥ गुरु म्हणोनि समस्तांसी ॥ आपण मंत्र उपदेशी ॥ शिष्य राहटे दुर्वृत्तिंसीं ॥ त्या गुरुघरीं जेवूं नये ॥ ७० ॥ क्रोधवंत ब्राह्मण असे ॥ अन्न न घ्यावें त्या गृहीं ऐसें ॥ स्त्रियेसी वर्जिता पुरुष असे ॥ जेवूं नये तया घरा ॥ ७१ ॥ धनगर्वी तामसाघरीं ॥ कृपण निर्द्रव्य व्यभिचारी ॥ दांभिक दुराचारी विप्राघरीं ॥ अन्न तुम्हीं वर्जावें ॥ ७२ ॥ पुत्रा पतीतें सोडोनि ॥ वेगळी असे जे ब्राह्मणी ॥ वर्जावें अन्न साधुजनीं ॥ महादोष बोलिजे ॥ ७३ ॥ स्त्रीजित असे एखादा जरी ॥ विप्र सुवर्णाकार करी ॥ सदा बहु याचक जरी ॥ तया घरीं न जेवावें ॥ ७४ ॥ खळ राजसेवकाघरीं ॥ लोह

काष्ठ छेदन करी ॥ वस्त्रधुत्या रजकाघरीं ॥ दान विप्रें घेऊं नये ॥ ७५ ॥
मद्यपान नराघरीं ॥ याचनें उदरपूर्ति करी ॥ वेश्या असे जे नारी ॥ दान
विप्रें न घ्यावें ॥ ७६ ॥ तस्करविद्या असे ज्यासी ॥ द्वारपाळकाघरीं परि-
येसीं ॥ न घ्यावें अन्न कुटिलासी ॥ महादोष बोलिजे ॥ ७७ ॥ द्रव्य
घेउनि शूद्राकरीं ॥ अध्ययन सांगे द्विजवरी ॥ अन्न वर्जावें तया घरीं ॥
घोडीं विकी जो ब्राह्मण ॥ ७८ ॥ भागवतकीर्तन नाहीं घरीं ॥ द्यूतकर्मी
अतिनिष्ठुरी ॥ स्नानावीण भोजन करी ॥ तया घरीं जेवूं नये ॥ ७९ ॥
न करी संध्या सायंकाळीं ॥ दान न करी कदा काळीं ॥ पितृकर्म वर्जितां
कुळीं ॥ तया घरीं न जेवावें ॥ ८० ॥ दंभार्थीनें[1] जो जप करी ॥ अथवा
कापट्यरूपें जरी ॥ द्रव्य घेवोनि जप करी ॥ तया घरीं जेवूं नये ॥८१॥
ऋण देऊन एखाद्यासी ॥ उपकार दावी परियेसीं ॥ द्रव्य सांची कलत्रैसी[2]॥

१ ढोंगीपणानें. २ बायकोकडून.

तया घरीं जेवूं नये ॥ ८२ ॥ विश्वासघातकी नराघरीं ॥ अनीति पक्षपात करी ॥ स्वधर्म सांडी दुराचारी ॥ पूर्वजमार्ग सोडिल्या घरीं ॥ ८३ ॥ विद्वज्जन ब्राह्मण साधूसी ॥ एखादा करी अति द्वेषी ॥ अन्न वर्जावें तुम्हीं हर्षीं ॥ तया घरीं जेवूं नये ॥ ८४ ॥ कुळदैवत माता पिता ॥ सोडोनि जाय जो परंता[1] ॥ आपुलाले गुरूसी निंदिता ॥ जेवूं नये तया घरीं ॥ ८५ ॥ गोब्राह्मणवध करी ॥ स्त्रीवधू नर असे जरी ॥ अन्न घेतां दोष भारी ॥ श्रीगुरु म्हणती विप्रासी ॥ ८६ ॥ आशाबद्ध[2] सदा नरु ॥ धरूनि राहे एका द्वारु ॥ दान देतां वर्जी नरु ॥ जेवूं नये तया घरीं ॥ ८७ ॥ समस्त जातीस करी शरण ॥ तोचि चांडाळ होय जाण ॥ घेवूं नये त्याचें अन्न ॥ नमन न करी विप्रासी ॥ ८८ ॥ आपुल्या कन्याजामातेसी ॥ क्रोधेंकरून सदा दूषी ॥ न घ्यावें अन्न त्या घरासी ॥ निपुत्राचे घरीं देखा

---

१ दूर. २ आशाळभूत.

॥ ८९ ॥ पंचमहायज्ञ करी आपण ॥ जेवी आणिकाचे घरीं अन्न ॥ पर-
पाक करी तया नाम जाण ॥ तया घरीं जेवूं नये ॥ ९० ॥ विवाह झाला
असतां आपण ॥ पंचमहायज्ञ न करी ब्राह्मण ॥ स्थालीपाकनिवृत्ति नव
जाणे ॥ न जेवावें तया घरीं ॥ ९१ ॥ घरचें अन्न दूषण करी ॥ परान्नाची
स्तुति करी ॥ अन्न वर्जावें तया घरीं ॥ श्वपचे[1] नाम तयाचें ॥९२॥ भाण-
सपणें उदर भरी ॥ अन्न घेतां तया घरीं ॥ डोळे जाती अवधारीं ॥ आंधळा
होय अल्पायुषी ॥ ९३ ॥ बधिर होय शरीरहीन ॥ स्मृतिमेधा[2] जाय जाण ॥
धृतिशक्ति[3] जाय जाण ॥ भाणसाचे घरीं जेवूं नये ॥ ९४ ॥ गृहस्थधर्में
असे आपण ॥ दानधर्म न करी जाण ॥ अद्वैतशास्त्र बोलूं जाणे ॥ तया
घरीं जेवूं नये ॥ ९५ ॥ परगृहीं वास आपण ॥ परान्न जेवी जो
ब्राह्मण ॥ त्याचें जितुकें असे पुण्य ॥ यजमानासी जाय देखा ॥ ९६ ॥

१ चांडाळ. २ स्मरणशक्ति. ३ धैर्यबळ.

तया यजमानाचे दोष ॥ लागती त्वरित भोजनस्पर्शे ॥ त्याचिकारणें निषिद्ध असे ॥ परान्न तुम्हीं वर्जावें ॥ ९७ ॥ भूदान गोदान सुवर्णदान ॥ गजवाजीरत्नदान ॥ घेतां नाहीं महादूषण ॥ अन्नदाना अतिदोष असे ॥९८॥ समस्त दुष्कृत परान्नासी ॥ घडती देखा ब्राह्मणासी ॥ तैसेंचि जाणा परस्त्रियेसी ॥ संग केलिया नरक होय ॥ ९९ ॥ परगृहीं वास करितां ॥ जाय आपुली लक्ष्मी त्वरितां ॥ अमावास्येसी परान्न जेवितां ॥ मासपुण्य जाय देखा ॥ १०० ॥ अगत्य जाणें परान्नासी ॥ न बोलवितां जाय संतोषी ॥ जातां होती महादोषी ॥ शूद्रें बोलावितां जाऊं नये ॥ १ ॥ आपुल्या कन्येच्या घरासी ॥ जाऊं नये भोजनासी ॥ पुत्र झालिया कन्येसी ॥ सुखें जावें अवधारा ॥ २ ॥ सूर्यचंद्रग्रहणेसी ॥ दान घेऊं नये परियेसीं ॥ जात अथवा मृतसूतकेसी ॥ जाऊं नये परियेसा ॥३॥ ब्राह्मणपणाचा आचार ॥ कवण रहाटे द्विजवर ॥ तैसें जरी करिती नर ॥ त्यांसी

कैचें दैन्य असे ॥ ४ ॥ समस्त देव त्याचे होती ॥ अष्ट महासिद्धि साधती ॥ ब्राह्मणकर्में आचरती ॥ कामधेनु तया घरीं ॥ ५ ॥ विप्र मंदांधें व्यापिले ॥ आचारकर्म सांडिलें ॥ यांचिकारणें दरिद्री झाले ॥ स्वधर्म नष्ट होऊनियां ॥ ६ ॥ विप्र विनवी स्वामीसी ॥ आमुची विनंति परियेसीं ॥ सकळ आचारधर्मासी ॥ निरोपावे दातारा ॥ ७ ॥ श्रीगुरुमूर्ति कृपासागरु ॥ त्रिमूर्तींच्या अवतारु ॥ भक्तजनांच्या आधारु ॥ निरोपावे आचार ब्राह्मणाचे ॥ ८ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ ब्राह्मणाचा आचार पुससी ॥ सांगेन ऐक विस्तारेंसीं ॥ पूर्वीं ऋषि आचरले जे ॥ ९ ॥ नैमिषारण्यीं समस्त ऋषि ॥ तप करिती बहु दिवसीं ॥ आला पराशर ऋषि ॥ म्हणोनि समस्त वंदिती ॥११०॥ समस्त ऋषि मिळोन ॥ विनविताती कर जोडून ॥ ब्राह्मणाचें आचरण ॥ कैंची करावें म्हणती ते ॥ ११ ॥ आतां आम्ही

१ गर्वरूपी अज्ञानानें.

आचार करितों ॥ तेणें संशय मनीं येतो ॥ ब्रह्मऋषि तुम्ही म्हणूनि पुसतों ॥ तुमचा उपदेश आम्हां व्हावा ॥ १२ ॥ गुरुमुखेंवीण मंत्र ॥ ग्राह्य नव्हे हो पवित्र ॥ तैसा श्रीगुरु तूं सत्पात्र ॥ आचार आम्हां सांगावे ॥ १३ ॥ पराशर म्हणे ऋषींसी ॥ सांगेन आचार तुम्हांसी ॥ जेणें होय अभ्यासीं ॥ सर्व सिद्धि पावती ॥ १४ ॥ ब्राह्ममुहूर्तीं[1] उठोनि ॥ श्रीगुरुस्मरण करोनि ॥ मग ध्याव्या मूर्ति तिन्ही ॥ ब्रम्हाविष्णुमहेश्वर ॥ १५ ॥ मग स्मरावे नव-ग्रह ॥ सूर्यादि केतूसह ॥ सनत्कुमार-सनक-सनंदन-सह ॥ स्मरावे तये वेळीं ॥ १६ ॥ सह नारद तुंबरु देखा ॥ स्मरावे सिद्ध योगी देखा ॥ सप्त समुद्र असती जे कां ॥ स्मरावें सप्त पितृदेवता ॥ १७ ॥ सप्त ऋषींतें स्मरोनि ॥ सप्त द्वीपें सप्त भुवनीं ॥ समस्त नामें घेऊनि ॥ ऐसें म्हणावें प्रातःस्मरण ॥ १८ ॥ मग उठावें शयनस्थानीं ॥ आचमन करोनि दोनी ॥

१ पहांटेच्या पांच घटका रात्रीं.

लघुशंकेसी जाउनी ॥ शौचाचमन करावें ॥ १९ ॥ पराशर म्हणे ऋषींसी ॥ ऐका आचमनविधीसी ॥ सांगतसें विस्तारेंसीं ॥ जे जे समयीं करणें ऐका ॥ १२० ॥ स्नानापूर्वी अपर दोनी ॥ उदक प्राशितां येणेंचि गुणीं ॥ निजतां उठतां समयीं दोनी ॥ आचमनें करावीं ॥ २१ ॥ अधोवायुशब्द झालिया ॥ वोखटें दृष्टीं देखिलिया ॥ दोन्ही वेळां आचमूनियां ॥ शुचि व्हावें परियेसा ॥ २२ ॥ भोजनापूर्वी अपर दोनी ॥ जांभई आलिया शिंकलिया दोनी ॥ लघुशंकाशौचीं दोनी ॥ आचमन करावें ॥ २३ ॥ जवळी उदक नसेल जरी ॥ श्रोत्राचमन करा निर्धारीं ॥ स्पर्श करावा दक्ष श्रोत्रीं ॥ येणें पवित्र परियेसा ॥ २४ ॥ ब्राह्मणाचे उजवे कानीं ॥ सप्त देवता असती निर्गुणी ॥ त्यांसी स्पर्शितां तत्क्षणीं ॥ आचमनफळ असे देखा ॥२५॥ श्लोक ॥ अग्निरापश्च चंद्रश्च वरुणार्केंद्रवायवः ॥ विप्रस्य

१ किळस येणारा पदार्थ.

दक्षिणे कर्णे नित्यं तिष्ठंति देवताः ॥ १ ॥ ॥ २६ ॥ टीका ॥ त्या देवतांचीं नांवें ऐका ॥ सांगेन ऋषि सकळिका ॥ अग्नि आप वरुणार्का ॥ वायु इंद्र चंद्र असती ॥ २७ ॥ लघुशंकाचमन करोनि ॥ तूष्णीं[1] स्नान करा सुमनीं ॥ बैसावें शुचि आसनीं ॥ अरुणोदय होय तंव ॥ २८ ॥ गायत्रीमंत्रजपाव्यतिरिक्त ॥ वरकड जपावे पवित्र ॥ प्रगट होतां अरुणोदित ॥ बाहिर्भूमीसी जाईजे ॥ २९ ॥ यज्ञोपवीत कानीं ठेवोनि ॥ डोईस पालेव[2] घालोनि ॥ नैर्ऋत्य दिशे जाऊनि ॥ अधोमुखीं बैसावें ॥ १३० ॥ दिवसा बसावें उत्तरमुखी ॥ रात्रीं बसावें दक्षिणमुखी ॥ मौन असावें विवेकीं ॥ चहूंकडे पाहूं नये ॥ ३१ ॥ सूर्यचंद्रनक्षत्रांसी ॥ पाहूं नये नदी-आकाशीं ॥ स्त्रीजन लोक परियेसीं ॥ पाहूं नये कवणातें ॥ ३२ ॥ शौचाविणें कांस घाली ॥ कांस न काढी लघुशंकाकाळीं ॥ त्यासी होय यमपुरी अढळी ॥

१ न बोलतां. २ आच्छादन.

नरक भोगी अवधारा ॥ ३३ ॥ अगत्य घडे उदकावीण ॥ करूनियां गंगा-
स्मरण ॥ मृत्तिकेनें शौच करणें ॥ भक्षणादि वर्जावें ॥ ३४ ॥ बहिर्भूमे
जावयासी ॥ ठाऊं कैसा परियेसीं ॥ ऐका समस्त तत्परेंसीं ॥ म्हणे पराशर
सर्वांतें ॥ ३५ ॥ न बैसावें भूमीवरी ॥ बैसिजे पानगवतावरी ॥ हिरवीं पर्णें
करावीं दुरी ॥ वाळल्या पानीं बैसावें ॥ ३६ ॥ जे ब्राह्मण उभ्यां मुतती ॥
त्यांसी ऐका कवण गति ॥ त्यांचे रोमें अंगीं किती ॥ तावत्काळ वर्षें
नरकीं पडती ॥ ३७ ॥ मळविसर्जन करूनि ॥ उठावें हातीं शिश्न
धरूनि ॥ जळपात्रापासीं जाऊनि ॥ शौच करावें परियेसा ॥ ३८ ॥ मृत्ति-
काशौच करावयासी ॥ मृत्तिका आणावी तुम्हीं ऐसी ॥ वारुळ मूषकगृह
परियेसीं ॥ नदीमधील आणूं नये ॥ ३९ ॥ ज्या मार्गीं लोक चालती ॥
अथवा वृक्षाखालील माती ॥ देवालय क्षेत्रतीर्थीं ॥ मृत्तिका आपण वर्जावी

१ ठिकाण.

॥ १४० ॥ वापी कूप तडागांत ॥ मृत्तिका आणितां पुण्य बहुत ॥ उदक करीं घेऊनि प्रोक्षित ॥ मृत्तिका घ्यावी शौचासी ॥ ४१ ॥ आंवळ्याएवढे गोळे करावे ॥ लिंगस्थानीं एक लावावें ॥ अपानद्वारीं पांच स्वभावें ॥ एकैका हस्तासी तीन ससें ॥ ४२ ॥ एकैक पायासी सात वेळ ॥ मृत्तिका लावावी सकळ ॥ आणिक सांगेन समय केवळ ॥ ऋषि समस्त परियेसा ॥ ४३ ॥ या मृत्तिका शौचविधान ॥ मूत्रशंकेसी एक गुण ॥ बहिर्भूमीसी द्विगुण ॥ मैथुनाअंतीं त्रिगुण देखा ॥ ४४ ॥ आणिक प्रकार असे देखा ॥ करावें येणेंप्रमाणें ऐका ॥ जितुकें करणें गृहस्थ लोकां ॥ द्विगुण करावें ब्रह्मचारीं ॥४५॥ त्रिगुण करावें वानप्रस्थें ॥ चतुर्गुण करावें यतीं समस्तें ॥ न्यून पूर्ण करावें थापरतें ॥ धर्मसिद्धि होय देखा ॥ ४६ ॥ येणें प्रकारें करा दिवसीं ॥ रात्रीं याच्या अर्धेसीं ॥ संकटसमयीं या अर्धेसीं ॥ मार्गस्थें

१ दुप्पट.

अर्ध त्याहुनी ॥ ४७ ॥ व्रतबंध झालिया ब्राह्मणासी ॥ हाच आचार परियेसीं ॥ हाचि उपदेश चहूं वर्णांसी ॥ शौचविधि बोलिला ॥ ४८ ॥ शौच केलियानंतरीं ॥ चूळ भरावे परिकरी ॥ ब्राह्मणें आठ भरी ॥ क्षत्रियें सहा परियेसा ॥ ४९ ॥ वैश्यें चार शूद्रें दोनी वेळ ॥ येणें विधि भरा चूळ ॥ अधिक न करावें केवळ ॥ म्हणे पराशर ऋषि ॥१५०॥ चूळ भरावे आठ वेळा ॥ आचमम्वें तीन वेळां ॥ शुचिस्थानीं बैसून निर्मळा ॥ कुळदेवता स्मरावी ॥ ५१ ॥ तूष्णीं आचमन करावें ॥ नाम घेतां चोवीस ठावें ॥ आतळावें पुनः आचमांव ॥ त्याचा विधि सांगेन ॥ ५२ ॥ विप्रदक्षिणतळहातीं ॥ पाच तीर्थें विख्यात असती ॥ जें बोलिलें असे श्रुतीं ॥ सांगेन तीर्थ अवधारा ॥ ५३ ॥ अंगुष्ठमूळ तळहातेसीं ॥ अग्निब्रह्मतीर्थ परियेसीं ॥ तर्जनी अंगुष्ठ मध्यदेशीं ॥ पितृतीर्थ असे जाण ॥ ५४ ॥ चतुर्थ

१ मुंज.

अंगुलीचे वरी ॥ देवतीर्थ अवधारीं ॥ कनिष्ठिकाभागोत्तरीं ॥ ऋषितीर्थ परियेसा ॥ ५५ ॥ तर्पण देवपितृऋषि ॥ जे स्थानीं तीर्थें करावीं हर्षी ॥ आचमन ब्रह्मतीर्थेंसीं ॥ करा ब्राह्मण विद्वज्जन ॥ ५६ ॥ ब्रम्हतीर्थें आचमनें तिन्ही ॥ केशव नारायण माधव म्हणोनि ॥ देवतीर्थ उदक सांडोनि ॥ गोविंद नाम उच्चारावें ॥ ५७ ॥ विष्णु मधुसूदन हस्त धुवोनि दोन्ही ॥ त्रिविक्रम वामन गाला स्पर्शोनि ॥ बिंबोष्ठ[1] तळहस्तें स्पर्शोनि ॥ श्रीधर नाम उच्चारावें ॥ ५८ ॥ पुनरपि हस्त हर्षीकेशी ॥ पद्मनाभ पादद्वय स्पर्शी ॥ सव्य हस्त पंचांगुलींसीं ॥ दामोदर शिखास्थानीं ॥ ५९ ॥ चतुरंगुलि पृष्ठ-देशीं ॥ संकर्षण घ्राणेंसी[2] ॥ तर्जनीं आणि अंगुष्ठेंसीं ॥ म्हणावा वासुदेव प्रद्युम्न ॥ १६० ॥ अंगुष्ठ अनामिकेंसीं ॥ नेत्रस्पर्श श्रोत्रेंसी ॥ कनिष्ठिका अंगुष्ठेंसीं ॥ अच्युत नाभीं म्हणावे ॥ ६१ ॥ पंचांगुलीं उपेंद्र देवा ॥ हरी

१ खालचा ओंठ. २ नाकाला.

श्रीकृष्ण भुजा एका ॥ पांच अंगुलीं विधिपूर्वका ॥ येणें विधीं स्पर्शावें ॥ ६२ ॥ येणें विधीं संध्याकाळीं ॥ आणिक करावें वेळोवेळीं ॥ अशौच अथवा संकटकाळीं ॥ असतीं विधानें तीं ऐका ॥ ६३ ॥ देवतीर्थें तिन्ही घ्यावें ॥ हस्त प्रक्षाळा गोविंद-नांवें ॥ मुख प्रक्षाळोनि मंत्र म्हणावे ॥ संध्याव्यतिरिक्त येणेंपरी ॥ ६४ ॥ विधान आणिक सांगेन ॥ देवतीर्थें तिनी घेऊन ॥ गोविंदनामें हस्त धुऊन ॥ चक्षु श्रोत्र स्पर्शावे ॥ ६५ ॥ शूद्रादि ओवळियासी ॥ स्पर्श होतां परियेसीं ॥ आचमनविधि ऐसी ॥ गुरु म्हणती ब्राह्मणातें ॥ ६६ ॥ भिजोनि आलिया पाउसांत ॥ द्विराचमनें होय पुनीत ॥ स्नान भोजनीं निश्चित ॥ द्विराचमन करावें ॥ ६७ ॥ फला-हार भक्षण करितां ॥ अथवा आपण उदक घेतां ॥ आला असेल स्मशानीं हिंडतां ॥ द्विराचमनें शुद्ध होय ॥ ६८ ॥ उदक नसे जवळी जरी ॥ श्रोत्रा-

चमन करा निर्धारीं ॥ आणिक असे एक परी ॥ तूष्णीं आचमन करावें ॥ ६९ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ आचमनविधि आहे ऐसी ॥ जे करिती भक्तींसीं ॥ दैन्य कैंचें तया घरीं ॥१७०॥ आतां सांगेन विधान ॥ करावया दंतधावन ॥ समस्त पर्वणी त्यजून ॥ प्रतिपदा षष्ठी वर्जावी ॥७१॥ न करावें नवमीद्वादशीसी ॥ शन्यर्कमंगळवारेसी ॥ श्राद्धकाळीं विवाहदिवसीं ॥ करूं नये दंतधावन ॥ ७२ ॥ कंटकवृक्षशाखेंसीं ॥ ताड माड केतकींसीं ॥ खर्जूरनारिकेलशाखेंसीं ॥ केलिया जन्म चांडाळयोनीं ॥ ७३ ॥ खदिर करंज आघाडेंसीं ॥ औदुंबरार्कवटशाखेंसीं ॥ अथवा वृक्ष करवंदेंसीं ॥ पुण्य वृक्ष ऐका तुम्ही ॥ ७४ ॥ विप्रें द्वादशांगुलेंसीं ॥ नवांगुलें क्षत्रियासी ॥ षडांगुलें वैश्यशूद्रांसी ॥ दंतधावन-काष्ठ आणावें ॥ ७५ ॥ दंतधावन काष्ठेसी ॥ तोडितां म्हणावें मंत्रासी ॥ आयुः प्रज्ञा नाम परि-

१ मानसिक कल्पनेनें. २ दांत घांसणें. ३ या मंत्रानें.

येसीं ॥ म्हणोनि काष्ठ तोडावें ॥ ७६ ॥ दंतधावन करोनि ऐसें ॥ काष्ठ टाकावें नैर्ऋत्य दिशे ॥ चूळ भरोनि द्वादश ॥ द्विराचमन करावें ॥ ७७ ॥ मग करावें प्रातःस्नान ॥ तेणें होय सर्व साधन ॥ तेजोबलआयुष्यवर्धन ॥ प्रातःस्नान केलिया ॥ ७८ ॥ प्रज्ञा वाढे दुःस्वप्ननाश ॥ सकळ देवतें होतीं वश ॥ सौभाग्य सुख होती हर्ष ॥ प्रातःस्नान केलिया ॥ ७९ ॥ यतीं तापसीं संन्यासीं ॥ त्रिकाळ करावें स्नानासी ॥ ब्रह्मचारीं विधींसीं ॥ एक वेळ करावें ॥१८०॥ नित्य केलिया पापनाश असे ॥ करावें याचि कारणें हर्षें ॥ गृहस्थें वानप्रस्थें विशेषें ॥ प्रातर्मध्यान्हीं करावें ॥ ८१ ॥ अशक्य संकट आलें जरी ॥ अथवा न मिळे निर्मल वारी ॥ स्नान करावयाची परी ॥ सांगेन ऐका ब्राह्मणहो ॥ ८२ ॥ अग्निस्नान भस्मस्नान ॥ अथवा करावें वायु-स्नान ॥ करा विधीनें मंत्रस्नान ॥ आपोहिष्ठा मंत्रानें ॥ ८३ ॥ आणिक स्नान-फळें असतीं ॥ ज्यास असेल भावभक्ति ॥ गुरुदेवता दर्शनमात्रीं ॥ तीर्थस्नान-

फळ असे ॥ ८४ ॥ अथवा दर्शन मातापिता ॥ चरणतीर्थ भक्तीनें घेतां ॥ अंगावरी प्रोक्षितां ॥ तीर्थस्नानफळ असे ॥ ८५ ॥ अथवा भिजेल पर्जन्यांत ॥ उभा राहोंनि वारा घेत ॥ किंवा बैसावें गोधुळींत ॥ स्नानफळ असे देखा ॥ ८६ ॥ स्पर्श चांडाळा होतां ॥ जलस्नानें होय शुचिता ॥ शूद्राचा स्पर्श होतां ॥ उपस्नान करावें ॥ ८७ ॥ दृढ असे तनु आपुलें ॥ स्नान मुख्य करावें जळें ॥ संधि-विग्रह-सांकडें पडलें ॥ उपस्नान करावें ॥ ८८ ॥ प्रातःस्नान करावयासी ॥ शीतोदक उत्तम परियेसीं ॥ अशक्तता असेल देहासी ॥ उष्णोदकें करावें ॥ ८९ ॥ स्वभावें पवित्र असे उदक ॥ वरी झालिया अग्निसंपर्क[1] ॥ पवित्र झालें उदक अधिक ॥ गृहस्थासी मुख्य असे ॥१९०॥ उष्णोदकें स्नान करितां ॥ शीतोदक करा मिश्रिता ॥ मध्यें करावें आचमन तत्त्वतां ॥ संकल्प तेथें म्हणावा ॥९१॥ घरीं स्नान करितां

[1] अग्नीचा संस्कार.

देखा ॥ अघमर्षण तर्पण नव्हे निका ॥ वस्त्रें पिळूं नये ऐका ॥ आपुले हस्तें-करूनियां ॥ ९२ ॥ पुत्रोत्साह संक्रांतीसी ॥ श्राद्धकाळ मृतदिवसीं ॥ न करावें स्नान उष्णोदकेंसीं ॥ अमावास्या पौर्णिमा ॥ ९३ ॥ स्नान करितां बांधा शिखा ॥ दर्भहस्ती सूर्याभिमुखा ॥ मौन असावें विवेका ॥ कवणासवें न बोलावें ॥ ९४ ॥ आपोहिष्ठा मंत्रेंसीं ॥ गायत्री तीन म्हणा सुरसी ॥ येणें परी स्नानोदकासी ॥ अभिमंत्रावें ब्राह्मणें ॥ ९५ ॥ प्रथम शीतोदक घेऊनि ॥ पश्चात् उष्णोदक मिळवोनि ॥ स्नान करावें प्रतिदिनीं ॥ गृहस्थांनीं घरीं देखा ॥ ९६ ॥ अवधूत मंत्र म्हणत ॥ वस्त्र उकलावें त्वरित ॥ उद्यंत मंत्र जपत ॥ वस्त्र सूर्यासी दाखवावें ॥ ९७ ॥ आचमन करूनि आपण ॥ देवस्यत्वा मंत्र जपोन ॥ धूत वस्त्र नेसून ॥ आणिक मंत्र जपावे ॥ ९८ ॥ आवहंती वित-न्वती मंत्रें ॥ वस्त्रें नेसावीं पवित्र ॥ द्विराचमन करावें तंत्रें ॥ वस्त्र पिळोनि

१ शेंडी. २ सूर्यासमोर. ३ काल्पनिक.

आचमन कीजे ॥ ९९ ॥ आतां मंत्रस्नान करणें ॥ सांगेन त्याचीं विधानें ॥
आपोहिष्ठादि मंत्रानें ॥ प्रोक्षावें शरिरावरी ॥ २०० ॥ पाद मूर्ध्नी हृदय-
स्थानीं ॥ मूर्ध्नी हृदय पाद प्रोक्षोनि ॥ करावें तुम्हीं मार्जनी ॥ आपोहिष्ठा
मंत्रेंसीं ॥ १ ॥ ऐसें स्नान करोनि ॥ पुनः आचमन करोनि ॥ मानस-
स्नान विधींनीं ॥ करावें ऐका भक्तीनें ॥ २ ॥ नारायण विष्णुमूर्तीसी ॥
स्नान करावें भक्तींसीं ॥ चतुर्भुज अलंकारेंसीं ॥ ध्यान केलिया मानसस्नान
॥ ३ ॥ अपवित्रः पवित्रो वा ॥ येणें मंत्रें हरि ध्यावा ॥ उदकें देहे प्रोक्षावा ॥
स्नानफळ अवधारा ॥४॥ मंगलस्नानविधान ॥ सांगेन ऐका ब्राह्मण ॥ रवि-
वारीं निषेध जाण ॥ ज्वर होय अंगासी ॥ ५ ॥ नदीतीरीं असे नरु ॥
अशक्त असे शरीरु ॥ गंगास्मरणें निर्धारु ॥ आर्द्रवस्त्रें अंग पुसावें ॥ ६ ॥
कांतिहानि सोमवारासी ॥ मंगलवारीं मृत्यु परियेसीं ॥ लक्ष्मी पावे बुध-
वारेसी ॥ धनहानि गुरुवारीं ॥ ७ ॥ शुक्रवारीं पुत्रघात ॥ शनिवारीं

अखिल संपत ॥ जाणा ऐसें निश्चित ॥ मंगलस्नान करावें ॥८॥ नदीस्नान प्रवाहमुखी ॥ घरीं प्रातःसूर्याभिमुखी ॥ संध्याकाळीं पश्चिममुखी ॥ स्नान करावें अवधारा ॥९॥ स्नान करितां नदीसी ॥ अघमर्षण करावें परियेसीं ॥ नमोऽग्नयेऽप्सुमते मंत्रेंसीं ॥ नदीस्नान करावें ॥२१०॥ यदपांक्रूरं मंत्रेंसीं ॥ उदक लोटावें द्विहस्तेंसीं ॥ तीन वेळां लोटोनि हर्षीं ॥ इमं मे गंगे जपावें ॥११॥ ऋतं च सत्यं च मंत्र जपत ॥ स्नान करावें गंगेंत ॥ नदीस्नानविधि ख्यात ॥ करा तुम्ही विप्रवर्ग ॥ १२ ॥ रोदनांतीं वमनांतीं ॥ मैथुनदुःस्वप्नदर्शनांतीं ॥ स्नानावेगळे शुद्ध न होती ॥ स्नान करावें अवधारा ॥१३॥ आतां वस्त्राचें विधान ॥ सांगेन ऐका ऋषिजन ॥ ओलें वस्त्र कांसेवीण ॥ नेसूं नये गृहस्थानें ॥ १४ ॥ रक्तादि वस्त्र जीर्ण धोत्र ॥ नेसूनि जे जन जप करीत ॥ तें पुण्य जाय राक्षसांप्रत ॥ एक धोत्र असलिया ॥१५॥ श्वेतवस्त्र ब्राह्म-

१ मकार.

णासी ॥ मुख्य असे परियेसीं ॥ उपवस्त्र बहिर्वासी ॥ उत्तरवस्त्र म्हणिजे तया ॥१६॥ धोत्र नेसलिया नंतरी ॥ विभूति लावावी परिकरी ॥ मंत्रविधान-पुरःसरी ॥ भस्म धारण करावें ॥ १७ ॥ भस्म शुद्ध न मिळे जरी ॥ गोपीचंदन लावावें परी ॥ द्वारावती मुख्य धरी ॥ वरकड मृत्तिका अग्राह्य ॥१८॥ न मिळे द्वारावती देखा ॥ करा धारण गंगामृत्तिका ॥ ऊर्ध्वपुंड्र असे निका ॥ विष्णुसायुज्य होय तयां ॥ १९ ॥ पुष्टिकाम असे ज्यासी ॥ लावावें तेणें अंगुष्ठेंसीं ॥ ज्यासी काम असे आयुषीं ॥ मध्यांगुलीं लावावें ॥ २२०॥ अन्नकाम अनामिकेंसीं ॥ तर्जनीं काम्य मुक्तीसी ॥ जे लाविती नखेंसीं ॥ महापातक घडे तयां ॥ २१ ॥ उत्तम रुंदी दशांगुलीं ॥ मध्यम नव अष्ट अंगुलीं ॥ सप्त सहा पंचांगुलीं ॥ शूर्पाकार लावावें ॥ २२ ॥ चतुर्थ त्रीणि द्वयांगुलीं ॥ अधम पक्ष असे बोली ॥ द्वादश नामें करा भलीं ॥

१ भस्म.

विष्णुनाम उच्चारित ॥ २३ ॥ केशव म्हणावें ललाटस्थानीं ॥ नाभीं नारायण म्हणोनि ॥ माधवनामें हृदयस्थानीं ॥ कमळपुष्पाकार देखा ॥ २४ ॥ गोविंदनामें कंठेसी ॥ विष्णुनामें कटिप्रदेशीं ॥ दक्षिणभुजा मधुसूदनेंसीं ॥ नाभीं उत्तर त्रिविक्रम ॥२५॥ वामन नामें बाहु देखा ॥ श्रीधर दक्षिणकर्णिका ॥ हृषीकेश वामकर्णिका ॥ पद्मनाभ दक्षिणकटी ॥ २६ ॥ दामोदर शिरस्थान ॥ ऐका ऊर्ध्वपुंड्रविधान ॥ पापें जातीं जळोन ॥ गोपीचंदन लावितां ॥ २७ ॥ द्वारावती लावोनि ॥ लावा भस्म त्रिपुंड्रांनीं ॥ हरिहर संतोषोनि ॥ साधे भक्ति मुक्ति देखा ॥ २८ ॥ विवाहादि शोभन दिवसीं ॥ देवतांकृत्य श्राद्धदिवसीं ॥ अभ्यंगनंतर सूतकेसी ॥ गोपीचंदन वर्जावें ॥ २९ ॥ ब्रह्मयज्ञतर्पणासी ॥ कुश सांगेन विस्तारेंसीं ॥ आहेती दश प्रकारेंसी ॥ नामें सांगेन विख्यात ॥२३०॥ दूर्वा उशीरें[1] कुश काश ॥ सकुद गोधूम

[1] वाळ्याच्या पात्या.

व्रीहि मौंजीष ॥ नागरमोथा दर्भ परियेसा ॥ दश दर्भ मुख्य असती ॥३१॥
नित्य आणावें दूर्वेसी ॥ जरी न साधे आपणासी ॥ श्रावण भाद्रपदमासीं ॥
संग्रह संवत्सरीं करावा ॥ ३२ ॥ चारी दूर्वा विप्रासी ॥ तीनि क्षत्रिय
वैश्यासी ॥ एक नेमिली शूद्रासी ॥ चतुर्वर्णी धरावें ॥ ३३ ॥ या दूर्वेची
महिमा ॥ सांगतां असे अनुपमा ॥ अग्रस्थानीं असे ब्रह्मा ॥ मूळीं रुद्र मध्यें
हरि ॥ ३४ ॥ अग्रभागीं चतुरंगुल ॥ ग्रंथीं मूळीं द्व्यांगुल ॥ धारण करावें
ब्रह्मकुळें ॥ याची महिमा थोर असे ॥ ३५ ॥ चक्र धरोनि विष्णु देखा ॥
दैत्य पराभवी ऐका ॥ ईश्वर त्रिशूल धरितां देखा ॥ राक्षसांतक केविं होय
॥ ३६ ॥ इंद्र वज्रायुध धरितां ॥ दैत्यांगिरी विभांडी तत्त्वतां ॥ तैसे ब्राह्मण
दूर्वा धरितां ॥ पापदुरितें पराभवति ॥ ३७ ॥ जैसे तृणाचे बणंवीसी ॥ अग्नि-
स्पर्शें होतां नाशी ॥ तेविं आलिया पापराशि ॥ दर्भस्पर्शें जळती देखा

१ पराभूत करी. २ राशीस.

॥ ३८ ॥ ब्रह्मयज्ञ जपसमयीं ॥ ग्रंथि बांधावी कुशाग्रीं ॥ वर्तुळाकार भोजनसमयीं ॥ धरावी ब्राह्मणें भक्तीनें ॥३९॥ कर्म आचरतां दूर्वेसीं ॥ ग्रंथि बांधावी परियेसीं ॥ अग्निस्पर्श कर्पूराशीं ॥ पाप नाशी येणेंपरी ॥ २४० ॥ एकादशांगुल प्रादेशमात्र ॥ द्विदल असावें पवित्र ॥ नित्य-कर्मासी हेंच पवित्र ॥ द्विदल जाणा मुख्य असे ॥४१॥ जपहोमादि दानासी ॥ स्वाध्याय पितृकर्मासी ॥ सुवर्णरजतमुद्रिकेंसीं ॥ कुंशावेगळें न करावें ॥४२॥ देवपितृकर्मासी देख ॥ रजत करावें सुवर्णयुक्त ॥ तर्जनीस्थानीं रौप्यमुद्रिका ॥ सुवर्ण धरावें अनामिकेसी ॥ ४३ ॥ मुद्रिका असावी खड्गेंपात्री ॥ कनिष्ठिकांगुलीं पवित्रीं ॥ ग्राह्य नव्हे जीवंतपित्री ॥ तर्जनांगुलीं मुद्रिका ॥४४॥ योगपट उत्तरी देखा ॥ तर्जनीस्थानीं रौप्यमुद्रिका ॥ पायीं न घालाव्या पादुका ॥ गयाश्राद्ध न करावें ॥४५॥ नवरत्न मुद्रिका ज्याचे

१ टीचभर. २ वेदाध्ययन. ३ दर्भ. ४ गव्याचे शिंगाची.

हातीं ॥ पापें त्यासी न लागतीं ॥ एखादें रत्न असतां हातीं ॥ मुद्रिका पवित्र ब्राह्मणासी ॥ ४६ ॥ प्रातःसंध्येचें विधान ॥ सांगेन ऐका ऋषिजन ॥ नक्षत्र असतांचि प्रारंभून ॥ अर्घ्य सूर्योदयीं द्यावें ॥४७॥ सूर्योदय होय तंव ॥ जप करीत उभें असावें ॥ उदयसमयीं अर्घ्य द्यावें ॥ तत्पूर्वीं देणें सर्व व्यर्थ ॥४८॥ ऋषि पुसती पराशरासी ॥ संध्या करावया विधि कैसी ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ सांगावें जी स्वामिया ॥४९॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ सांगेन संध्याविधीसी ॥ ऐका तुम्ही तत्परतेंसीं ॥ पराशर-स्मृतीसी असे ॥२५०॥ गायत्रीमंत्रजप करितां ॥ शिखा बांधावी तत्त्वतां ॥ आसन घालावें निरुता ॥ दर्भपाणि होउनी ॥५१॥ देवतीर्थें द्विराचमन ॥ विष्णुनाम स्मरोन ॥ प्राणायाम विस्तारोन ॥ न्यासपूर्वक करावे ॥ ५२ ॥ प्रणवाचा परब्रह्म ऋषि ॥ गायत्री नाम छंदासी ॥ परमात्मा देवता परि-

१ हातांत दर्भ घेऊन.

येसीं ॥ म्हणा प्राणायामे विनियोगः ॥५३॥ ॐ व्याहृति सत्यज्ञानिया ॥
नाभि हृदय मूर्ध्नीं स्पर्शावया ॥ व्याहृति सप्त अतिशया ॥ प्रत्येक देवता
ऋषि सांगेन ॥५४॥ व्याहृति सप्त स्थानासी ॥ ऐका असे प्रजापति ऋषि ॥
प्रत्येक देवता परियेसीं ॥ सप्त नामें देवांचीं ॥५५॥ अग्निर्वायु गुरुःसूर्य ॥
वरुणेंद्र विश्वदेव ॥ सप्त व्याहृती सप्त देव ॥ छंद सप्त सांगेन ॥५६॥ गायत्री
आणि उष्णिका ॥ अनुष्टुप् बृहती पंक्ति पंचम ऐका ॥ त्रिष्टुप् जगती छंद
विशेखा ॥ प्राणायामे विनियोगः ॥ ५७ ॥ ॐ भूः पादन्यास ॥ भुवःजानु
स्वः गुह्य ॥ ॐ महः नाभि स्थान स्पर्शा ॥ जनो हृदय तपो कंठ ॥ ५८ ॥
सत्यभूर्ललाट जाणा ॥ गायत्री छंदेसी म्हणा ॥ विश्वामित्र ऋषि खुणा ॥
प्राणायामे विनियोगः ॥५९॥ ॐ भूर्हृदयाय नम इति ॥ ॐ भुवः शिरसे स्वा-
हेति ॥ ॐ स्वः शिखायै वषडिति ॥ ॐ तत्सवितुर्वरेण्यं कवचायहूं ॥ २६० ॥

१ विशेष.

ॐ भर्गोदेवस्य धीमहि नेत्रत्रयाय वौषट् ॥ धियोयोनः प्रचोदयात् अस्त्राय फट् ॥ ॐ भूर्भु० इति दिग्बंधः ॥ ऐसे षडंग करावे ॥६१॥ प्राणायामे विनि-योगः म्हणूनि ॥ आपोस्तन स्पर्शोनि ॥ ज्योतिर्नेत्रस्पर्शस्थानीं ॥ रसो जिव्हामृतललाटे ॥ ६२ ॥ प्राणायाम करावयासी ॥ प्रजापति म्हणती ऋषि ॥ देवतानामें परियेसीं ॥ ब्रह्माग्निवायु सूर्य असे ॥ ६३ ॥ ब्रह्मभूर्भुवः-स्वः म्हणूनि ॥ प्राणायाम करा तिन्ही ॥ त्रिपदा गायत्री जप कोणी ॥ जप-णारासी सर्व सिद्धि ॥ ६४ ॥ गायत्रीची अधिदेवता ॥ ब्रह्माग्निवायु सविता ॥ ऋषि ब्रह्मा असे ख्याता ॥ सप्त लोकन्यास सांगेन ॥६५॥ पादन्यास भूर्लोक ॥ भुवः जानु अतिविशेख ॥ स्वः गुह्य असे लोक ॥ नाभिन्यास महर्लोक ॥६६॥ जनो हृदय तपो ग्रीवे ॥ भ्रुवोर्ललाटे सत्यलोक म्हणावें ॥ ऐसें शिर-स्थान बरवें ॥ सत्यलोक म्हणती तयासी ॥६७॥ गायत्रीची प्रार्थना करूनि ॥ प्राणायाम करा विधींनीं ॥ ब्रह्मचारी गृहस्थांनीं ॥ पंचांगुलीं धरा

परमेष्ठी ॥६८॥ वानप्रस्थ संन्यासी यती ॥ अनामिकाकनिष्ठिकांगुष्ठेंसी ॥ ओंकारादि वायुपूरकेसीं ॥ दक्षिणनासापुटें चढवावें ॥६९॥ वामनासापुटीं विसर्जोनि ॥ करा प्राणायाम तिन्ही ॥ येणेंचि विधीं करा मुनि ॥ त्रिकाल-संध्या कर्मे ॥२७०॥ आतां करावें मार्जनेसी ॥ सांगेन ऐका समस्त ऋषि ॥ जैसें असे स्मृतिचंद्रिकेसी ॥ तेणें विधीं सांगतों ॥ ७१ ॥ आपोहिष्ठेति सूक्तेंसीं ॥ सिंधुद्वीप ऋषि गायत्री छंदेंसीं ॥ आपोदेवता मार्जनासी ॥ हा म्हणावा विनियोग ॥७२॥ येणें मंत्रें म्हणोन ॥ कुशपवित्रें करा मार्जन ॥ यस्य क्षयाय मंत्रें जाण ॥ आपुले पाद प्रोक्षावे ॥ ७३ ॥ आपोजनयथा मंत्रेंसीं ॥ प्रोक्षावें आपुल्या शिरसी ॥ सूर्यश्चेति मंत्रेंसीं ॥ उदक प्राशन करावें ॥७४॥ हिरण्यवर्णसूक्तेंसीं ॥ मार्जन करावें परियेसीं ॥ द्रुपदादिवेति मंत्रेंसीं ॥ घ्राणोनि[1] उदक सोडावें ॥७५॥ आचमनें करोनि दोन ॥ मार्जन-

१ हुंगून.

विधान सांगेन ॥ वामहस्तीं पात्र धरून ॥ मार्जन करा विशेषी ॥७६॥ औदुंबर सुवर्ण रजत ॥ काष्ठाचेंही असे पवित्र ॥ ऐसें असे निर्मळ पात्र ॥ वामहस्तीं उदक बरवें ॥७७॥ मृण्मय अथवा द्विमुख पात्र ॥ भिन्न पात्र तें जाण अपवित्र ॥ तें अग्राह्य देवपितरां ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी॥७८॥ मार्जनसंख्या सांगेन ऐका ॥ शिरसी अष्ट पादे नवका ॥ यस्य क्षयाय स्थान भूमिका ॥ येणेंपरी मार्जन ॥७९॥ आपः पुनंतु मंत्रेंसीं ॥ प्राशनोदक माध्यान्हेसी ॥ अग्निश्चेति मंत्रेंसीं ॥ सायंसंध्या करावी ॥२८०॥ प्राशनांतीं तुम्ही ऐका ॥ द्विराचमन करा निका ॥ आघ्राण करूनी सांडिजे ऐका ॥ एक आचमन करावें ॥८१॥ अर्घ्य द्यावयाचें विधान ॥ सांगेन ऐका ऋषि-जन ॥ गोशृंगाइतुकें आकारोन ॥ अर्घ्य द्यावें मनोभावें ॥ ८२ ॥ गायत्री-मंत्र जपोनि ॥ सायंप्रातर्द्यावीं तिन्ही ॥ हंसःशुचिषेति माध्याह्नीं ॥ अर्घ्य

१ तांबें. २ मातीचें. ३ दोन तोंडांचें. ४ फुटकें.

द्यावें अधारा ॥ ८३ ॥ प्रातर्माध्यान्हीं उभें बरवें ॥ सायं अर्घ्य बैसोनि द्यावें ॥ आचमन त्रिवारी करावें ॥ करीं प्रदक्षिणा असावादित्य ॥ ८४ ॥ अर्घ्य द्यावयाचें कारण ॥ सांगेन कथा विस्तारोन ॥ राक्षस महादारुण ॥ तीस कोटि आहेती देखा ॥ ८५ ॥ सूर्यासवें युद्धासी ॥ नित्य येती परियेसीं ॥ संदेह पडे देवासी ॥ सूर्या होईल अपजय ॥ ८६ ॥ अपजय येतां सूर्यासी ॥ उदयास्तमान न होय परियेसीं ॥ कर्मे न चालती ब्राह्मणांसी ॥ स्वधास्वाहाकार न चाले ॥ ८७ ॥ स्वाहास्वधाकार रहाती ॥ समस्त देवांस उपवास होतीं ॥ सृष्टि राहिली न होय उत्पत्ति ॥ म्हणोनि उपाय रचियेला ॥ ८८ ॥ याचि कारणें अर्घ्य देती ॥ तींचि वज्रायुधें होतीं ॥ जावोनि दैत्यांसी लागती ॥ पराभविति प्रतिदिवसीं ॥८९॥ दैत्य असती ब्रह्मवंश[1] ॥ त्यांसी वधिलिया घडती दोष ॥ प्रदक्षिणा करितां होय नाश ॥ असावा-

१ ब्राह्मण कुळांतील.

दित्य म्हणोनियां ॥ २९० ॥ ब्रह्महत्योचिया पातकासी ॥ भूप्रदक्षिणा दोष नाशी ॥ चार पावलें फिरतां कैसी ॥ भूमिप्रदक्षिणा पुण्य असे ॥ ९१ ॥ संध्या करावयाचें स्थान ॥ सांगेन ऐका फलविधान ॥ घरीं करितां प्रतिदिन ॥ एकचि फळ अवधारा ॥ ९२ ॥ दश फळ ग्रामाबाहेर देखा ॥ नदीस केलिया शताधिका ॥ पुष्करतीरीं सहस्र ऐका ॥ गंगासुरनदीं कोटिफल ॥ ९३ ॥ सुरापान दिवामैथुन ॥ अनृतादि वाक्यें पापें जाण ॥ संध्या बाहेर करितां क्षण ॥ जळती दोष तात्काळीं ॥ ९४ ॥ स्थानें असती जप करावयासी ॥ विस्तारें सांगेन तुम्हांसी ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ९५ ॥ जप केलिया घरीं ऐका ॥ एकचि फल असे देखा ॥ बाहेर द्विगुणी फल अधिका ॥ नदीतीरीं त्रिगुण फळ ॥ ९६ ॥ गोस्थळ वृंदावन देखा ॥ दशगुण फळ अधिका ॥ अग्निहोत्रस्थानीं निका ॥ शतगुण फल अधिक असे ॥ ९७ ॥ तीर्थ-देवतासन्निधानीं ॥ सहस्रफल

असे निर्गुणी ॥ शतकोटि फल हरिसन्निधानीं ॥ ईश्वरसन्निधानीं अनंत फल ॥ ९८ ॥ जप करितां आसनासी ॥ विधिनिषेध आहे परियेसीं ॥ सांगेन ऐका तत्परेंसीं ॥ पुण्य पाप बोलिलें असे ॥ ९९ ॥ काष्ठासनीं बैसोनि जरी ॥ जप करितां मनोहरी ॥ दुःख भोगी निरंतरी ॥ अभागी पुरुष तो होय ॥ ३०० ॥ पल्लवशाखांसी बसतां ॥ सदा होय दुश्चिता ॥ वस्त्रासनीं दरिद्रता ॥ पाषाणासनीं व्याधि होय ॥ १ ॥ भस्मासनीं व्याधि-नाश ॥ कंबलासनीं सुखसंतोष ॥ कृष्णाजिनीं ज्ञानप्रकाश ॥ व्याघ्रचर्मीं मोक्षश्री ॥ २ ॥ कुशासनीं वशीकरण ॥ सर्व रोगांचें उपहरण ॥ पापें जाती पळोन ॥ आयुःप्रज्ञा अधिक होय ॥ ३ ॥ ओं इत्येकाक्षरमंत्रीं ॥ जपावा तुम्हीं पवित्री ॥ ध्यान करावें गायत्री ॥ समस्त पापें हरती देखा ॥ ४ ॥ गायत्रीचें स्वरूप आता ॥ अभिनव असे वर्णितां ॥ रक्तांगी वासे

१ देवाचे मूर्तीजवळ. २ वस्त्र.

रक्ता ॥ हंस वाहन असे देखा ॥ ५ ॥ अकार ब्रह्मा अधिदेवता ॥ चतुर्भुजा चतुर्वक्त्रा ॥ कमंडलुं अक्षसूत्रा ॥ चाटु धरिला असे करीं ॥ ६ ॥ ऋग्वेद असे समागमीं ॥ अग्निहोत्रफल आवाहयामि ॥ मग आयातु वरदा देवी ॥ म्हणावें ऐका ब्राह्मणानें ॥ ७ ॥ त्या मंत्रासी ऋषि देवता ॥ गायत्रीसादृश्य असे ख्याता ॥ प्रातःसंध्या तुम्ही करितां ॥ विधि तुम्हां सांगेन ॥ ८ ॥ गायत्री देवता गायत्री अनुष्टुप् छंद ॥ ओं आदित्य देवता देवा ॥ हे प्रातःसंध्या म्हणतां भेद ॥ गायत्री देवता गायत्री छंदः ॥ ९ ॥ गायत्री आवाहने विनियोगः ॥ ही माध्यान्हसंध्या म्हणावी ॥ सविता देवता गायत्री छंद ॥ सरस्वती अवाहने विनियोगः ॥ ३१० ॥ प्रातःसंध्येचें ध्यान ॥ सांगेन ऐका तुम्ही गहन ॥ रक्तांगी रक्तवसन ॥ हंसासनीं आरूढ असे ॥ ११ ॥ चतुर्बाहु चतुर्मुखी ॥ कमंडलु धरिला विशेखी ॥ अक्षसूत्र

१ सुंदर. २ रुद्राक्षमाळा.

चातु हस्तकीं ॥ ऋग्वेदसाहित अग्निहोत्र ॥ १२ ॥ ऐसें ध्यान करोनि ॥ मग म्हणावें अक्षरज्ञानी ॥ एकचित्तें असा ध्यानीं ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ १३ ॥ ओंकारशिखामावाहयामि ॥ छंदऋषीनावाहयामि ॥ श्रियमावाहयामि ॥ बलमावाहयामि ॥ १४ ॥ ऐसें म्हणोनि प्रातःकाळीं ॥ संध्या करावी सुवेळीं ॥ आतां सांगेन मध्यान्हकाळीं ॥ ध्यान आवाहनपूर्वक ॥ १५ ॥ अभिमुरों सावित्रीध्यान ॥ यौवनस्था माध्यान्ह ॥ सांगेन ऐका ऋषिजन ॥ एकचित्तें परियेसा ॥ १६ ॥ श्वेतांगी श्वेतवस्त्र ॥ वाहन असे वृषभ पवित्र ॥ उकार रुद्रगण दैवत ॥ पंचमुखा असे देखा ॥ १७ ॥ वरद अभयहस्त देखा ॥ रुद्राक्षमाळा त्रिशूलधारका ॥ यजुर्वेद असे देखा ॥ अग्निष्टोम फल जाणा ॥ १८ ॥ ओंकारशिखामावाहयामि ॥ छंदऋषीनावाहयामि ॥ श्रियमावाहयामि ॥ न्हियमावाहयामि ॥ १९ ॥ आतां साय-

१ योग्य वेळेवर.

संध्याध्यान ॥ सांगेन ऐका विधान ॥ एकचित्तें ऐका वचन ॥ ध्यानपूर्वक सांगेन ॥ ३२० ॥ अभिमुखें सरस्वती वृद्धा ॥ जाणावी तुम्हीं सायंसंध्या ॥ कृष्णांगी कृष्णवस्त्रपरिधाना ॥ गरुडवाहन असे देखा ॥ २१ ॥ मकार विष्णुदेवता ॥ चतुर्भुज शंखचक्रधृता ॥ गदापद्मधारणहस्ता ॥ सामवेद-सहित जाणा ॥ २२ ॥ वाजपेयफल जाण ॥ सायंसंध्या असे ध्यान ॥ करावें ऐका तुम्हीं ब्राह्मण ॥ म्हणोनि सांगती श्रीगुरु ॥ २३ ॥ ओंकार-शिखामावाहयामि ॥ छंदऋषीनावाहयामि ॥ श्रिमवाहयामि ॥ बलमावाह-यामि ॥ २४ ॥ पंचशीर्षोपनयने विनियोगः ॥ प्रणवस्य परब्रह्म ऋषिः ॥ परमात्मा देवता ॥ गायत्री छंदः ॥ २५ ॥ उदात्तस्वरित स्वरःअग्निर्वायुःसूर्य-देवता ॥ गायत्री त्रिष्टुप् जगती छंद ॥ ब्रह्मविष्णुमहेश्वरादेवताः ॥ ऋग्य-जुःसामानि स्वरूपाणि ॥२६॥ आहवनीयाग्निगार्हपत्य ॥ दक्षिणाग्निउपस्था-

१ प्रयोग.

नानि ॥ पृथिव्यंतरिक्षं द्यौस्तत्त्वानि ॥ उदात्तअनुदात्तस्वरितस्वराः ॥ २७ ॥ पीतविद्युतश्वेतवर्णी ॥ प्रातर्मध्यान्हतृतीयसवनानि ॥ विश्वतैजसप्राज्ञस्वरूपिणी ॥ जागृतीस्वप्नसुषुप्त्यवस्था ॥ २८ ॥ ऐसें त्रिपदा गायत्रीसी ॥ सांगितलें त्रिविधं ध्यानासी ॥ आतां विधान जपासी ॥ सांगेन ऐका एकचित्तें ॥ २९ ॥ ममोपात्तदुरितक्षयद्वारा ॥ श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जपे विनियोगः ॥ ओं अं नाभौ ॥ वं हृदयं मं कंठ ॥ ३३० ॥ भूः अक्षरमंत्रासी ॥ गायत्री असे छंदेसी ॥ अग्निर्देवता परियेसीं ॥ विश्वामित्र ऋषि देखा ॥ ३१ ॥ षड्ज स्वर श्वेत वर्ण ॥ पादस्पर्श उच्चारोन ॥ प्राणायामे विनियोगून ॥ दुसरी व्याहृति म्हणावी ॥ ३२ ॥ भुवः अक्षरमंत्रासी ॥ उष्णिक् नाम छंदासी ॥ वायुर्देवता परियेसीं ॥ भृगु ऋषि असे जाण ॥ ३३ ॥ असे रूप श्यामवर्ण ॥ पादस्पर्श रूप उच्चारोन ॥ करा तुम्ही ऐसें ध्यान ॥

१ तीन प्रकारचें.

जानुमध्यें न्यासावें ॥ ३४ ॥ प्राणायाम विनियोग म्हणोनि ॥ न्यास करावे भक्तिभावनीं ॥ स्वः व्याहृति म्हणोनी ॥ ध्यान करा भक्तीनें ॥ ३५ ॥ स्वः व्याहृतिमंत्रासी ॥ म्हणा अनुष्टुप् छंदासी ॥ सविता देवता परियेसीं ॥ भारद्वाज ऋषि जाण ॥ ३६ ॥ स्वर गांधार पीतवर्णा ॥ कंठीं स्पर्शोनि मंत्र म्हणा ॥ प्राणायामे विनियोग जाणा ॥ तृतीय व्याहृतिमंत्रासी ॥ ३७ ॥ ॐ महः मंत्रासी ॥ बृहती छंदासी ॥ बृहस्पति देवता परियेसीं ॥ वसिष्ठ ऋषि निर्धारें ॥ ३८ ॥ मध्यम स्वर पिशंग वर्ण ॥ ऐसें करा तुम्ही ध्यान ॥ वेगें म्हणा नाभीं स्पर्शोन ॥ प्राणायामे विनियोगः ॥ ३९ ॥ जन मंत्र उच्चारासी ॥ म्हणा पंक्ति छंदासी ॥ वरुण देवता गौतम ऋषि ॥ पंचम स्वर असे जाण ॥ ३४० ॥ रूप असे नीलवर्ण ॥ करा न्यास हृदयस्थान ॥ प्राणायामे विनियोगून ॥ जनः पंच न्यास ऐसे ॥ ४१ ॥ तपः मंत्र न्या-

१ कवरा.

सासी ॥ त्रिष्टुप् छंद परियेसीं ॥ ईश्वर देवता कश्यप ऋषि ॥ धैवत स्वर परियेसा ॥ ४२ ॥ असे आपण लोहवर्ण[1] ॥ स्पर्श करावें कंठस्थान ॥ प्राणायामे विनियोगून ॥ न्यास करावा ब्राह्मणहो ॥ ४३ ॥ सत्यं म्हणतसे मंत्रासी ॥ करावें जगती छंदासी ॥ विश्वेदेव अंगिरस ऋषि ॥ निषाद स्वर जाणावा ॥ ४४ ॥ रूप असे कनकवर्ण[2] ॥ भ्रुवोर्ल्ललाटा स्पर्शून ॥ प्राणायामे विनियोगून ॥ न्यास करावा भक्तीनें ॥ ४५ ॥ इतुके न्यास करोनि ॥ हस्त ठेवा शिरस्थानीं ॥ ध्यान करा विधानीं ॥ सांगेन ऐका ब्राह्मणहो ॥ ४६ ॥ शिरस्थान स्पर्शासी ॥ म्हणा अनुष्टुप् छंदासी ॥ उच्चार प्रजापति ऋषि ॥ परमात्मा देवता जाण ॥ ४७ ॥ प्राणायामे विनियोगून ॥ मग करावें गायत्रीध्यान ॥ ॐ आपोज्योति म्हणोन ॥ मंत्र म्हणा भक्तीनें ॥ ४८ ॥ ओम् आपोज्योतिरसोमृतं ॥ ब्रह्मभूर्भुवःस्वुवरों ॥ शिरसी येणें

१ लोखंडाप्रमाणें काळा. २ सोन्यासारखा पिंवळा.

विधीं ॥ अंगन्यास करावे ॥ ४९ ॥ चौवीस अक्षरें मंत्रासी ॥ न्यास सांगेन एकाएकासी ॥ एकचित्तें परियेसीं ॥ म्हणे पराशर ऋषि तो ॥ ३५० ॥ या त्रिपदा गायत्रीसी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ देवी गायत्री छंदेसी ॥ वर्ण देवता सांगेन ॥ ५१ ॥ ऐसें त्रिपदा गायत्रीमंत्रासी ॥ चोवीस अक्षरें परियेसीं ॥ पृथक् न्यास परियेसीं ॥ सांगेन ऐक द्विजोत्तमा ॥ ५२ ॥ तवर्णाक्षर मंत्रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ अग्नि देवता परियेसीं ॥ गायत्री छंद म्हणावा ॥ ५३ ॥ अंतसीपुष्पें वर्णें जैसीं ॥ तद्रूप वर्ण असे परियेसीं ॥ वायव्य कोण स्थान त्यासी ॥ गुल्फन्यास करावा ॥ ५४ ॥ त्सवर्णाक्षर मंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ वायुदेवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥ ५५ ॥ जंघस्थानीं असे न्यास ॥ सौम्यरूप पिंवळें सुरस ॥ सर्व पापें दहतीं परियेस ॥ त्सवर्णाचें लक्षण ॥ ५६ ॥ विवर्णनाम अक्षरासी ॥

१ प्रत्येकाचे. २ अळशीच्या फुलाप्रमाणें निळें.

जाणा विश्वामित्र ऋषि ॥ सोमदेवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥ ५७ ॥ न्यास करावया जानुस्थान ॥ इंद्रनील विद्युद्वर्ण ॥ ऐसें अक्षर-विधान ॥ महारोग हरती देखा ॥ ५८ ॥ तुवर्ण नाम अक्षरासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ विद्युद्देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥५९॥ न्यास करा जानुस्थानीं ॥ दीप्ति असे जैसा वन्हि ॥ रूप असे सौम्यपणीं ॥ भ्रूणहत्यापाप नाशी ॥३६०॥ वंवर्ण अक्षरासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ सोम देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥ ६१ ॥ सुवर्णस्फटिक-कांति ॥ गुह्यस्थानीं न्यास बोलती ॥ समस्त अघौघ नाशती ॥ रूप वंवर्ण-स्थाना उत्तम ॥६२॥ रेवर्ण नाम अक्षरमंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ वरुण देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥ ६३ ॥ णिकार वृषण-स्थान जाणा ॥ विद्युत्प्रकाशरूपधारणा ॥ बार्हस्पत्यनाम खुणा ॥ अभक्ष्य-

१ रक्तपितीसारखे.

पापक्षालन ॥६४॥ णिवर्णाक्षर मंत्रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ बृहस्पति देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥ ६५ ॥ यं कटिस्थान शांताकारवर्ण ॥ देहहत्यापापज्वलन ॥ न्यास करावे सगुण ॥ विद्वज्जन ब्राह्मणा ॥ ६६ ॥ यं अक्षर म्हणावयासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ तारका दैवत परियेसीं ॥ देवी गायत्री छंद असे ॥६७॥ भकारा नाभीं करा न्यास ॥ कृष्णमेघवर्ण सुरस ॥ पर्जन्य देवता संकाश ॥ गुरुहत्यापाप नाशी ॥६८॥ भवर्ण नाम अक्षरासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ पर्जन्य देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥६९॥ गों अक्षरा उदर न्यास ॥ ध्यान रक्तवर्ण सुरस ॥ इंद्र देवता परियेस ॥ गोहत्येचें पाप जाय ॥३७०॥ गोंवर्ण नाम अक्षरासी ॥ जाणावा विश्वामित्र ऋषि ॥ इंद्र देवता परियेसीं ॥ देवी गायत्री, छंद जाणा ॥७१॥ देकारन्यास स्तनासी ॥ गंधर्व नाम देव परियेसीं ॥ स्त्रीहत्यापाप नाशी ॥ एकचित्तें परियेसा ॥७२॥ देवर्ण नाम अक्ष-

रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ गंधर्व देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद देखा ॥७३॥ वकार हृदयस्थानन्यास ॥ शुक्ल रूप वर्ण परियेस ॥ पूषा देवता असे त्यास ॥ वाणीजातपाप नाशी ॥७४॥ ववर्णाक्षर मंत्रासी ॥ जाणावा विश्वामित्र ऋषि ॥ रुद्र देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥७५॥ स्य अक्षरा कंठन्यास ॥ कांचनवर्ण रूप सुरस ॥ मित्र देवता परियेस ॥ मार्जारकुक्कुटपाप जाय ॥७६॥ स्यवर्ण अक्षर मंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ मित्र देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥७७॥ धीकाराक्षरमंत्र दंतीं न्यास ॥ शुक्लकुमुदसंकाश ॥ त्वष्टा देवता परियेस ॥ पितृहत्यापाप जाय ॥७८॥ धीवर्ण नाम अक्षरासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ विष्णु देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥७९॥ मकार-न्यास तालुस्थान ॥ पद्म तेजोमय जाण ॥ वासुदेव असे खूण ॥ सर्वजन्म-पाप जाय ॥३८०॥ मकार वर्णाक्षरमंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ वासु-

देव देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥८१॥ हिकार नासिकीं करा न्यास ॥ शंखवर्ण असे त्यास ॥ वासुदेव देवता परियेस ॥ सर्व पाप हरण होय ॥८२॥ हिवर्ण नाम मंत्रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ मेरु देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥८३॥ धिकारा नेत्रस्थानीं न्यास ॥ पांडुरभास संकाश ॥ सोम देवता परियेस ॥ पाणिग्रहणपाप नाशी ॥८४॥ धिवर्ण नाम अक्षरासी ॥ तोचि विश्वामित्र ऋषि ॥ सोम-देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ ८५ ॥ योकाराक्षर मंत्रासी ॥ भ्रुवोर्मध्ये न्यासिजे त्यासी ॥ रक्तगौरवर्ण रूपेंसीं ॥ प्राणिवधपाप जाय ॥ ८६ ॥ योकाराक्षर नामाक्षरासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ यमदेवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ ८७ ॥ योकार ललाटस्थानीं न्यास ॥ रूप रुक्मांभसंकाश ॥ सर्व पाप होय नाश ॥ भक्तिपूर्वक न्यासावें[1]

---

[1] ह्मोन्यासारखें.

॥८८॥ योवर्णाक्षर मंत्रासी ॥ तोचि विश्वामित्र ऋषि ॥ विश्वे देवता परि-
येसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥८९॥ नकारा उदित प्राङ्मुखा ॥ सूर्या-
समान तेज देखा ॥ अश्विनौ देवता असे निका ॥ विराजमान परियेसा
॥३९०॥ नकाराक्षर वर्णासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ अश्विनौ देवता
परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ ९१ ॥ प्रकाराक्षरन्यास करोनि
दक्षिणे ॥ रूप असे नीलवर्ण ॥ प्रजापति देवता जाण ॥ विष्णुसायुज्य
पाविजे ॥९२॥ प्रवर्णाक्षर मंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ प्रजापति
देवता परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥९३॥ चोकार वर्ण मंत्रासी ॥
न्यासिजे तया पश्चिम भागासी ॥ कुंकुमरूपवर्ण त्यासी ॥ सर्वदेवपदवी
पाविजे ॥९४॥ चोकार वर्ण मंत्राक्षरासी ॥ जाणावा विश्वामित्र ऋषि ॥
सर्व देवता परियेसीं ॥ गायत्री देवी छंद जाणा ॥९५॥ दकाराक्षराचा
उत्तरे न्यास ॥ शुक्लवर्ण रूप सुरस ॥ करावे तुम्हीं ऐसे न्यास ॥ कैलासपद

पाविजे ॥९६॥ दकाराक्षर मंत्रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ रुद्र देवता
परियेसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ ९७ ॥ याकार मूर्धास्थानीं न्यास ॥
सुवर्णरूप सुरस ॥ ब्रह्मस्थानीं होय वास ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी
॥९८॥ यावर्णाक्षर मंत्रासी ॥ असे विश्वामित्र ऋषि ॥ ब्रह्म देवता परि-
येसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ ९९ ॥ तकार न्यास शिखास्थानीं ॥
निरुपम वैष्णवभुवनीं ॥ विष्णुरूप धरोनि ॥ वैकुंठवास होय जाणा ॥४००॥
तकार वर्णाक्षरमंत्रासी ॥ जाणा विश्वामित्र ऋषि ॥ विष्णु देवता परि-
येसीं ॥ देवी गायत्री छंद जाणा ॥ १ ॥ ऐसे चोवीस अक्षरमंत्रासी ॥
न्यास करावे विधींसीं ॥ हस्त ठेवोनियां शिरासी ॥ आणिक न्यास करावे
॥ २ ॥ शिरस्थानीं न्यासासी ॥ म्हणावें अनुष्टुप् छंदासी ॥ ख्याति प्रजा-
पति ऋषि ॥ परमात्मा देवता जाणा ॥३॥ प्राणायामे विनियोग म्हणोनि ॥
ओं आपोस्तान स्पर्शोनि ॥ ज्योतिर्नेत्र स्पर्शोनि ॥ रसोजिव्हा न्यासावें ॥४॥

अमृतेति ललाटेसीं ॥ मूर्ध्नि स्पर्शोनि ऐसी ॥ ब्रह्मभूर्भुवःस्वरो· मासी ॥ न्यास करा येणें विधीं ॥ ५ ॥ इतुके न्यास करोनि ॥ गायत्री त्रिवार म्हणोनि ॥ व्यापक न्यास करोनि ॥ करशुद्धि करा तीन वेळां ॥ ६ ॥ भुः० स्वः० विन्यसोनि ॥ गायत्रीच्या दश पदांनीं ॥ दशांगुलीं न्यासोनि ॥ पादप्रमाण करावें ॥ ७ ॥ अंगुष्ठमूल धरोनि ॥ कनिष्ठिका स्पर्शोनि ॥ उभय हस्त न्यासोनि ॥ दशपादांगुलीं न्यासावें ॥ ८ ॥ चोवीस अक्षरमंत्रासी ॥ अंगुलिन्यास करा हर्षीं ॥ तर्जनीमूलादारभ्येसी ॥ कनिष्ठिकापर्यंत ॥ ९ ॥ द्वादशाक्षरीं एकैक हस्त ॥ करावे न्यास सुनिश्चित ॥ षडंगन्यास समस्त ॥ प्रणवासहित करावे ॥४१०॥ ओं भूः० हिरण्यात्मने ॥ अंगुष्ठाभ्यां नमः ॥ ओं भुवः प्रजापत्यात्मने ॥ तर्जनीभ्यां नमः ॥११॥ ओं स्वः सूर्यात्मने मध्यमाभ्यां नमः ॥ ओं महः ब्रह्मात्मने अनामिकाभ्या नमः॥

१ संध्येचे वेळीं देहशुद्धीसाठीं करण्याचा एक विधि.

ओं जनः ओं तपः ओं सत्यं कनिष्ठिकाभ्यां नमः ॥ प्रचोदयात् करतल-करपृष्ठाभ्यां नमः ॥ १२ ॥ ओं०तुः अंगुष्ठाभ्यां हृदयाय नमः ॥ वरेण्यं तर्जनीभ्यां शिरसेस्वाहा ॥ भ०स्य मध्यमाभ्यां शिखायै वषट् ॥ धी०हि अनामिकाभ्यां कवचायहुम् ॥ १३ ॥ धी० नः कनिष्ठिकाभ्यां नेत्रत्रयाय वौषट् ॥ प्र० त् करतलकरपृष्ठाभ्यां अस्त्राय फट् ॥ उभयहस्तांगुलिन्यासं कुर्यात् ॥ अथ षडंगन्यास ॥ १४ ॥ ओं भूः हिरण्यात्मने हृदयाय नमः ॥ ओं भुवः प्रजापत्यात्मने शिरसे स्वाहा ॥ ओं स्वः सूर्यात्मने शिखायै वषट् ॥ ओं महः ब्रह्मात्मने कवचाय हुं ॥ १५ ॥ ओं जनः ओं तपः ओं सत्यं सोमात्मने ॥ नेत्रत्रयाय वौषट् ॥ प्रचोदयात् सर्वात्मने अस्त्राय फट् ॥ ओं तत्स० हृदयाय नमः ॥ १६ ॥ ओं वरे० शिरसे स्वाहा ॥ भर्गो० शिखायै वषट् ॥ धी० कवचाय हुम् ॥ धियो० नेत्रत्रयाय वौषट् ॥ प्रचोदयात् अस्त्रा० ॥ १७ ॥ षडंगन्यास करोनि ॥ अंगन्यास दशस्थानीं ॥ त्यांचीं

नांवें सांगेन कानीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ १८ ॥ पादजानुकटिस्थानीं ॥ नाभिहृदयकंठभुवनीं ॥ तालुनेत्र स्पर्शोनि ॥ ललाटशिरीं दशस्थान ॥१९॥ गायत्रीमंत्राच्या दहा पदांसी ॥ दशस्थान अंगन्यासासी ॥ तत्स० वरेण्येसी ॥ भर्गो देवस्य पंचमस्थान ॥ ४२० ॥ धीमहि म्हणजे षष्ठस्थान ॥ धियो सप्तमस्थान जाण ॥ योकारो अष्टम अंगन्यास पूर्ण ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ २१ ॥ नकार नवम मंत्रस्नान ॥ प्र० त् दहावें जाण ॥ अंगन्यास येणें गुण ॥ करा तुम्ही द्विजोत्तमा ॥२२॥ चतुर्विंशति अक्षरांसी ॥ करावें अंगन्यासासी ॥ पादांगुष्ठस्पर्श हर्षी ॥ शिखादारभ्य न्यासावें ॥२३॥ तं अंगुष्ठाभ्यां नमः ॥ त्सं गुल्फयोर्नमः ॥ विं जंघयोर्नमः ॥ तुं जानुभ्यां नमः ॥ २४ ॥ वं ऊरुभ्यां नमः ॥ रें गुह्याय नमः ॥ णीं वृषणाय नमः ॥ यं कटिभ्यां नमः ॥ २५ ॥ भं नाभ्यै नमः ॥ गों उदराय नमः ॥ दें स्तनाभ्यां नमः ॥ वं हृदयाय नमः ॥ २६ ॥ स्यं कंठाय नमः ॥ धीं दंतेभ्यो नमः ॥ मं

तालवे नमः ॥ हिं नासिकायै नमः ॥ २७ ॥ धिं नेत्राभ्यां नमः ॥ यों भ्रुवोर्मध्याय नमः ॥ यों ललाटाय नमः ॥ नः प्राङ्मुखाय नमः ॥२८॥ प्रं दक्षिणमुखाय नमः ॥ चों पश्चिममुखाय नमः ॥ दं उत्तरमुखाय नमः ॥ यां मूर्ध्ने नमः ॥ तं शिखायै वषट् ॥ २९ ॥ ऐसे न्यास करोनि ॥ पुनः पादांगुष्ठ धरोनि ॥ कटिपर्यंत न्यासोनि ॥ ऊर्ध्वन्यास करावे ॥४३०॥ तकारा अंगुष्ठस्थान ॥ त्सकार गुल्फ असे स्थान ॥ विकार जंघास्थान ॥ ऐका ब्राह्मणा म्हणती गुरु ॥ ३१ ॥ तुकार जानू रकार उरू ॥ वकार गुह्यपूर्वक स्पर्श ॥ णिकारा वृषणस्थान बरवें ॥ तुकार कटिस्थान न्यास ॥ ३२ ॥ शिखा धरोनि पादपर्यंत ॥ करावे न्यास उतरत ॥ त्यातें सांगेन आदिअंत ॥ एकचित्तें परियेसा ॥ ३३ ॥ तं नमः शिखायै विन्यस्य ॥ यां नमः मूर्ध्नि विनस्य ॥ दं नमः उत्तराशिखायां न्यस्य ॥ चों नमः पश्चिमशिखायां ॥३४॥ प्रं नमः दक्षिणशिखायां ॥ नं नमः प्राङ्मुखे ॥ यों नमः ललाटे ॥ यों नमः

भ्रुवोर्मध्ये ॥ ३५ ॥ धिं नमः नेत्रत्रये ॥ हिं नमः नासिकयोः ॥ मं नमः तालौ ॥ धीं नमः दंतेषु ॥ ३६ ॥ स्यं नमः कंठे ॥ वं नमः हृदये ॥ दें नमः स्तनयोः ॥ गौं नमः उदरे ॥ भं मनः नाभौ ॥ ३७ ॥ प्रणवादि नमोंत न्यास करावे ॥ आकार नाभीं उकार हृदये ॥ मकार मुखे नकार ललाटे ॥ मकार शिरसि हस्तेन नमस्कृत्वा ॥ ३८ ॥ अथ मुद्रासंपुटप्रकारीं ॥ चतुर्विंशति अवधारीं ॥ सांगेन त्यांचा विस्तार परी ॥ ऐका ब्राह्मण एकचित्तें ॥ ३९ ॥ श्लोक ॥ सुमुखं संपुटं चैव विततं विस्तृतं तथा ॥ द्विमुखं त्रिमुखं चैव चतुःपंचमुखं तथा ॥४४०॥ षण्मुखाधोमुखं चैव व्यापकांजलिकं तथा ॥ शकटं यमपाशं च ग्रंथितं चोल्मुकोल्मुकम् ॥ ४१ ॥ प्रलंबं मुष्टिकं चैव मत्स्यकूर्मौ वराहकम् ॥ सिंहाक्रांतं महाक्रांतं मुद्गरं पल्लवं तथा ॥ ४२ ॥ एता मुद्रा न जानाति गायत्री निष्फला भवेत् ॥ एता मुद्रास्तु कर्तव्या गायत्री सुप्रतिष्ठिता ॥४३॥ अस्यार्थः ॥ सुमुखं ॥१॥ संपुटं ॥ २ ॥

विततं ॥ ३ ॥ विस्तृतं ॥ ४ ॥ द्विमुखं ॥ ५ ॥ त्रिमुखं ॥ ६ ॥ चतुर्मुखं
पंचमुखं ॥ ८ ॥ षण्मुखं ॥ ९ ॥ अधोमुखं ॥ १० ॥ व्यापकांजलिकं ॥ ११ ॥
शकटं ॥ १२ ॥ यमपाशं च ॥ १३ ॥ ग्रंथितं ॥ १४ ॥ चोल्मुकोल्मुकं ॥ १५ ॥
प्रलंबं ॥ १६ ॥ मुष्टिकं ॥ १७ ॥ मत्स्यः ॥ १८ ॥ कूर्मः ॥ १९ ॥ वराहः ॥ २० ॥
सिंहाक्रांतं ॥ २१ ॥ महाक्रांतं ॥ २२ ॥ मुद्गरं ॥ २३ ॥ पल्लवं ॥ २४ ॥ मुद्राविण
गायत्रीमंत्र ॥ जप करिता सर्व व्यर्थ ॥ या कारणें करावें पात्र ॥ मुद्रापूर्वक
जप करावा ॥ ४४ ॥ गौप्य करावा मुद्रायुक्त ॥ प्राणायाम करा निश्चित ॥
समस्त पापक्षयार्थ ॥ म्हणोनि अष्टोत्तरीय संकल्पावें ॥ ४५ ॥ या गायत्री-
प्रथमपादासी ॥ म्हणा ऋग्वेद असे ऋषि ॥ भूमितत्त्व परियेसीं ॥ ब्रह्मा
देवता त्रिष्टुप् छंद ॥ ४६ ॥ द्वितीयपाद गायत्रीसी ॥ यजुर्वेद असे ऋषि ॥
रुद्रदेवता प्राणापानव्यानतत्त्वेंसीं ॥ जगती म्हणा अहर्निशीं ॥ ४७ ॥ गायत्री-
तृतीयपादासी ॥ ऋग्यजुः सामतत्त्व परियेसीं ॥ विष्णु देवता त्रिष्टुप्

छंदेसी ॥ समस्तपापक्षयार्थ विनियोग ॥ ४८ ॥ भूमिस्तंभ परियेसीं ॥ गायत्री छंदासी ॥ म्हणावें ब्रह्मपदासी ॥ ब्रह्मा दैवत जाणावें ॥ ४९ ॥ गायत्रीचें ध्यान ॥ सांगेन तुम्हां विधान ॥ एकचित्तें करा पठण ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ४५० ॥ श्लोक ॥ मुक्ताविद्रुमहेमनीलधवलच्छायैर्मुखै-स्त्रीक्षणैर्युक्तामिंदुकलानिबद्धमुकुटां तत्त्वार्थवर्णात्मिकाम् ॥ गायत्रीं वरदाभ-यांकुशकशां शुभ्रं कपालं गदां शखं चक्रमथारविंदयुगलं हस्तैर्वहंतीं भजे ॥ ५१ ॥ ऐसें ध्यान करोनि ॥ जप करावा नासिकाग्रनयनीं ॥ अंतीं षडंग न्यासोनि ॥ जप करा येणेंपरी ॥ ५२ ॥ गायत्रीमंत्राची प्रशंसा ॥ एकचित्तें परियेसा ॥ मंत्रनाम असे विशेषा ॥ अक्षरें दोनी पाप हरे ॥५३॥ मकार म्हणजे आपुलें मन ॥ त्रकार नाम आपुला प्राण ॥ मन प्राण एक-वटोन ॥ जप करावा एकचित्तें ॥ ५४ ॥ जप म्हणजे अक्षरें दोनी ॥ प्रख्यात असती त्रिभुवनीं ॥ जकार जन्म विच्छेदोनि ॥ पकारें जन्मपाप

दुरी ॥ ५५ ॥ चारी वेदांस मूळ एका ॥ गायत्रीनाम नाशी पातका ॥ याचि कारणें करावा निका ॥ वेदपठणफळ असे ॥ ५६ ॥ ऐसा मंत्र न जरी जपे नर ॥ वृथा जन्म जैसा सूकर ॥ जप करा हो निर्धार ॥ चिंतिलें फल पाहिजे ॥ ५७ ॥ न करावा उदकीं बैसोन ॥ त्वरित होय प्रज्ञाहीन ॥ याचि कारणें सांगेन विस्तारोन ॥ अग्नि तीनि विप्रमुखीं ॥ ५८ ॥ आहवनीय गार्हपत्य ॥ दक्षिणाग्नि तिसरा विख्यात ॥ अग्निउदकसंपर्कें त्वरित ॥ तेजत्व जाय अग्नीचें ॥ ५९ ॥ या कारणें उदक वर्जोनि ॥ बैसिजे उत्तम आसनीं ॥ हस्तस्पर्शी नाभिस्थानीं ॥ जपावा माळ धरोनियां ॥ ४६० ॥ उभेनी जपावा प्रातः कार्ळी ॥ बैसोन किजे माध्यान्हकाळीं ॥ अथवा उभा ठाकोनि ॥ उभय पक्षीं करावा ॥ ६१ ॥ माध्यान्हीं हृदयस्थानीं ॥ जपावा माळ धरोनि ॥ हस्त मुखें स्पर्शोनि ॥ सायंकाळीं जपावा ॥ ६२ ॥ बैसोन जपावा सायंकाळीं ॥ पहावा वृक्ष निर्मळी ॥ जरी वृक्ष नसे जवळी ॥ नासाग्र-

नयनीं जपावा ॥ ६३ ॥ ब्रह्मचारी गृहस्थासी ॥ जप नेमिला अष्टोत्तरेसी ॥ वानप्रस्थ संन्यासी यांसी ॥ सहस्र मुख्य करावा ॥ ६४ ॥ संधिग्रह होय जरी ॥ अष्टविंशति तरी करीं ॥ अशक्त होय जरी ॥ दहा वेळ जपावा ॥६५॥ उत्तम पक्ष मानसीं ॥ मध्यम गौप्य सुमुखेंसीं ॥ अक्षरें प्रगट वाक्येंसीं ॥ कनिष्ठ प्रकार परियेसा ॥ ६६ ॥ त्रिपाद असती गायत्रीसी ॥ मिळोनि म्हणावी परियेसीं ॥ न म्हणतां होय महादोषी ॥ महानरक अवधारा ॥६७॥ पृथक् करोनि त्रिपदासी ॥ जपा मंत्र अतिहर्षीं ॥ ब्रह्महत्यादि पापें नाशी ॥ अनंत पुण्य लाधिजे ॥ ६८ ॥ अंगुष्ठजपें एक पुण्य ॥ पर्वांगुलीनें दशगुण ॥ शंखमणीनें होय शतगुण ॥ प्रवालमाला सहस्रफळ ॥ ६९ ॥ स्फटिकमणि दहासहस्र ॥ मौक्तिकें पुण्य लक्षाधिक ॥ पद्माक्षी निर्गुण जप ॥ दशलक्ष पुण्य असे ॥ ४७० ॥ कोटिगुणें सुवर्णमाला ॥ कुश रुद्राक्ष अनंत-फला ॥ जप करा नित्य काळा ॥ गौप्यमाला धरोनियां ॥ ७१ ॥ गौप्य

माला करकमळीं ॥ जप करा निश्चळीं ॥ सौख्य पावे अनंत फळीं ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणातें ॥ ७२ ॥ जप करितां नुल्लंघिजे मेरू ॥ उल्लंघितां पाप बोलिलें अपारू ॥ प्राणायाम केलिया त्रिवारू ॥ मेरुलंघनपाप जाय ॥७३॥ गायत्रीजप तीन दिवस ॥ प्रत्यहीं करावा एकादश ॥ सर्व पातकें होती नाश ॥ त्रिरात्रीचें पाप जाय ॥ ७४ ॥ अष्टोत्तरशत जप करितां ॥ अघोर पातक जाय त्वरिता ॥ करोनि सहस्र जप एकाग्रता ॥ उपपातकें नासती ॥ ७५ ॥ महापातकादि दोषासी ॥ कोटि जप करावा परियेसीं ॥ जें जें कर्म इच्छिसी ॥ त्वरित होय अवधारा ॥ ७६ ॥ जप करावा मन दृढें ॥ न पहावें मागें पुढें ॥ शूद्रादिक यातीकडे ॥ संभाषण न करावें ॥ ७७ ॥ द्रव्य घेवोनि एखाद्यासी जपतां होय अनंतदोषी ॥ चांडाळयोनींत भरं-वसीं ॥ जन्म पावे परियेसा ॥ ७८ ॥ कंडूयनूं नये शरीर आपुलें ॥ नेणतां जरी इतुकें घडलें ॥ श्रोत्राचमन करा वहिलें ॥ दोष नाहीं अवधारा ॥७९॥

ब्राह्मणाचे दक्षिणकर्णीं ॥ सप्त देवता ऐका निर्गुणी ॥ स्पर्श करितां तत्क्षणीं ॥ पापें जातीं परियेसा ॥४८०॥ दृष्टीं पडतां चांडाळासी ॥ द्विराचमनें शुद्ध होसी ॥ संभाषण झालिया पतितासी ॥ आचमनस्नान करावें ॥८१॥ जपतां निद्रा येई जरी ॥ अधोवायु जाभई आलियावरी ॥ क्रोधरूपें जपतां जरी ॥ पापरूपें अवधारा ॥ ८२ ॥ मौन्य करावें हें उत्तमीं ॥ अगत्यें बोलिजे संधिविषयीं ॥ तद्विष्णो मंत्र जपतां कर्मीं ॥ पापें जाती सकळिक ॥८३॥ नेणतां घडे इतुकें जरी ॥ आचमन करावें श्रोत्रीं ॥ अग्नि सूर्यधेनुदर्शन करीं ॥ विष्णुमंत्र जपावा ॥ ८४ ॥ ऐसा जप करावा विधीनें ॥ मनकामना होय पूर्ण ॥ ऐकती समस्त ऋषिजन ॥ म्हणोनि सांगे पराशर ॥ ८५ ॥ गायत्री जपावी ऐशी ॥ प्रातः कालीं म्हणा मित्रस्य ऋषि ॥ उदुत्यं मंत्र माध्यान्हेसी ॥ इमं मे वरुण सायंकाळीं ॥८६॥ शाखापरत्वें मंत्र असती ॥ म्हणावे विधि जैसे असती ॥ गोत्र प्रवर म्हणा भक्तीं ॥

वृद्धाचाराप्रमाणें ॥ ८७ ॥ चारी दिशा नमोनि ॥ प्रदक्षिणा करावी सगुणी ॥ गोत्र प्रवर उच्चारोनि ॥ नमस्कार करा परियेसा ॥ ८८ ॥ ऐसी संध्या करून ॥ मग करावें औपासन ॥ सांगेन त्याचें विधान ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ८९ ॥ सायंप्रातर्वेळा दोन्ही ॥ औपासन करावें सगुणीं ॥ मिळोनि न करावें द्विजजनीं ॥ सर्वांनीं पृथक् पृथक् हेंचि जाणा ॥४९०॥ न करावें वेळणीं आळंद्यांत ॥ भूमीवरी न करा नित्य ॥ स्थंडिलीं करावें विहित ॥ अथवा उदकें सारवावें ॥ ९१ ॥ कुंडी स्थापोनि अग्नीसी ॥ करावें नित्य उपासनेसी ॥ वाराघालों नये त्यासी ॥ हातें पर्णीं आणि सुपें ॥ ९२ ॥ व्याधिष्ठ पर्णवातें होय ॥ सुपें दरिद्र धनक्षय ॥ मुखें फुंकिलिया आयुष्य जाय ॥ हस्तमूळीं होय मृत्यु ॥ ९३ ॥ फुंकणी अथवा विंझण्यासी ॥ वायु घालावा अग्नीसी ॥ काष्ठें समृद्धि परियेसीं ॥ ज्वलित असावा अग्नि देखा ॥ ९४ ॥ ज्वाला निघती जये स्थानीं ॥ आहुति

घालावी तया वदनीं ॥ समिधा आणाव्या ब्राह्मणीं ॥ शूद्रहस्तें घेऊं नये ॥ ९५ ॥ समिधा पुष्पें दूर्वा देखा ॥ आणों नये शूद्रें ऐका ॥ होमद्रव्यें होती विशेखा ॥ सांगेन नांवें परियेसा ॥ ९६ ॥ साळी सांवे नीवार ॥ तंदुल असती मनोहर ॥ गोधूम जव निर्धार ॥ यावनाळ मुख्य असे ॥९७॥ साठी दाणे मिति प्रमाण ॥ आहुति मुख्य कारण ॥ अधिक न कीजे अथवा न्यून ॥ घृतसंपर्क करावें ॥ ९८ ॥ घृत नसेल समयासी ॥ तिल पवित्र होमासी ॥ तिळांचें तैल परियेसीं ॥ तेंही पवित्र असे देखा ॥ ९९ ॥ औपासन केलियावरी ॥ ब्रह्मयज्ञ तर्पण करीं ॥ सांगेन विधि अवधारीं ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ५०० ॥ मुख्य सकळ प्रातःकर्म सारोनि ॥ ब्रह्मयज्ञ करावा माध्यान्हीं ॥ उपासनादि कर्में करोनि ॥ मग करावा ब्रह्मयज्ञ ॥ १ ॥ उदकसन्निध मुख्य स्थानीं ॥ करावें तर्पण ब्राह्मणीं ॥ प्राणायाम तीन करोनि ॥ विद्युदसि मंत्र जपावा ॥ २ ॥ दूर्वा घेऊन दक्षिण

करीं ॥ पूर्वमुख अथवा उत्तरीं ॥ बसावें वाम पादावरी ॥ दक्षिण पाद ठेवोनि ॥ ३ ॥ उभयहस्तसंपुटेंसी ॥ ठेवावे दक्षिण जानुवासी ॥ म्हणावें तीन प्रणवांसी ॥ मग म्हणावें ऋचाक्षर ॥ ४ ॥ ओं भूः० ऐसें म्हणोनि ॥ त्रिपदा गायत्री उच्चारोनि ॥ तत्स० म्हणोनि ॥ मग जपावी दश वेळां ॥ ५ ॥ स्वाध्याय दिवसासीं ॥ म्हणा वेद शक्तीसीं ॥ अनाध्याय होय तया दिवसीं ॥ एक ऋचा म्हणा पन्नासा ॥ ६ ॥ तोही नये एखाद्यासी ॥ मंत्र म्हणावा विशेषीं ॥ नमो ब्रह्मणे मंत्रासी ॥ तीन वेळां जपावा ॥ ७ ॥ वृष्टि-रसि मंत्रासी ॥ जपोनि स्पर्शावें उदकासी ॥ तर्पण करावें परियेसीं ॥ एक ब्राह्मणा एकचित्तें ॥ ८ ॥ ब्रह्मयज्ञ करावयासी ॥ द्रव्य दर्भ परियेसीं ॥ वसुरुद्रआदित्यांसी ॥ तृप्त समस्त देव पितर ॥ ९ ॥ एखादे दिवसीं न घडे जरी ॥ अथवा होय समय रात्री ॥ जप करावा गायत्री ॥ वेदपठण फल असे ॥ ५१० ॥ देवतर्पण कुशाग्रेंसीं ॥ मध्यस्थानें तृप्त ऋषि ॥ मुळें पितृ-

वर्गासी ॥ तर्पण करावें परियेसा ॥११॥ न करावें तर्पण पात्रांत ॥ करावें आपण उदकांत ॥ भूमीवरी घरीं नित्य ॥ निषिद्ध असे करूं नये ॥ १२ ॥ दर्भ ठेवोनि भूमीवरी ॥ तर्पण करावें अवधारीं ॥ विधियुक्त भक्तिपुरःसरीं ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ १३ ॥ तीळ धरोन आपुल्या करीं ॥ तर्पण करावें अवधारीं ॥ ठेवों नये शिळेवरी ॥ भूमीं काष्ठपात्रीं देखा ॥ १४ ॥ रोमकूपादि स्थानीं देखा ॥ तीळ ठेवितां पावती दुःखा ॥ तीळ होती कृमि ऐका ॥ निषिद्ध बोललीं स्थानें पांच ॥ १५ ॥ घरीं तर्पण करावयासी ॥ तीळ अग्राह्य परियेसीं ॥ करावें आपण उदकासी ॥ ऐका समस्त ऋषिजन ॥ १६ ॥ श्वेत तीळ देवांसी ॥ धूम्रवर्ण ऋषिजनांसी ॥ कृष्णवर्ण पितरांसी ॥ तीळतर्पण करावें ॥ १७ ॥ यज्ञोपवीती सव्यें देवांसी ॥ निवीती करावी ऋषींसी ॥ अपसव्य पितरांसी ॥ तर्पण करावें येणें रीतीं ॥ १८ ॥ देवासी अंजुलि एक ॥ ऋषींसी अंजुलिद्वय सम्यक् ॥ पितरांसी अंजुलित्रिक ॥ तर्पण ऐसें करावें ॥ १९ ॥ स्त्रियांसी अंजुलि एक देखा ॥ व्यति-

रिक्त बंधूसी एका ॥ सापत्नी आचार्य नामिका ॥ द्वयांजुलि करावें ॥५२०॥
देवब्रह्मऋषीश्वरांसी ॥ अक्षता मुख्य तर्पणासी ॥ कृष्णतिलतर्पण पितरांसी ॥
अनंतपुण्यें परियेसा ॥ २१ ॥ आदित्य शुक्रवारेंसी ॥ प्रतिपदा मघा नक्ष-
त्रासी ॥ षष्ठी नवमी एकादशीसी ॥ तिलतर्पण करूं नये ॥ २२ ॥ अथवा
विवाह उपनयनासी ॥ जन्मनक्षत्र जन्मदिवशीं ॥ आपुल्या घरीं शुभदिवसीं ॥
तिलतर्पण करूं नये ॥ २३ ॥ जधीं न करी तिलतर्पण ॥ उदकें मुख्य करा
जाण ॥ मुद्रिका हस्तीं सुवर्ण ॥ दर्भपवित्रें करावें ॥२४॥ पाय न धुतां मंगळ-
स्नान ॥ तिलावीण करितां तर्पण ॥ श्राद्ध करी दक्षिणेवीण ॥ निष्फल असे
अवधारीं ॥ २५ ॥ निषिद्ध बोलिलें ज्या दिवसीं ॥ तर्पण करावें उदकेंसीं ॥
दिपवाळी चतुर्दशीसी ॥ करावें तर्पण परियेसा ॥२६॥ अंगारक कृष्ण चतुर्द-
शीसी ॥ करावें तर्पण परियेसीं ॥ यमाचे नांवें विधींसीं ॥ यज्ञोपवीत सव्यानें
॥२७॥ एकेक तीळ घेऊनि ॥ त्रिवार अंजुलि देऊनि ॥ यमाचें नाम उच्चारोनि ॥
तर्पण करावें भक्तीनें ॥२८॥ यमाचीं नांवें त्रयोदशी ॥ सांगेन ऐका विस्ता-

रेंसी ॥ यम धर्मराजा परियेसीं ॥ मृत्यु अंतक चौथा जाणा ॥ २९ ॥ वैव-
स्वत काल देखा ॥ सर्वभूतक्षय ऐका ॥ आठवा औदुंबरनामिका ॥ नीलाय
परमेष्ठी दहा जाणा ॥५३०॥ वृकोदर चित्ररेखा ॥ चित्रगुप्त त्रयोदशिका ॥
प्रत्येक नामें म्हणोनि एकेका ॥ नदींत द्यावें परियेसा ॥ ३१ ॥ समस्त
पातकें नासतीं ॥ रोगराई न पीडिती ॥ अपमृत्यु कधीं न येती ॥ ग्रह-
पीडा न बाधे ॥ ३२ ॥ शुक्लपक्षीं माघमासीं ॥ तर्पण करावें अष्टमीसीं ॥
भीष्मनामें परियेसीं ॥ वर्षपातकें परिहरतीं ॥ ३३ ॥ ऐसें तर्पण करोनि ॥
सूर्यनामें अर्घ्यें तिन्ही ॥ द्यावीं समस्त द्विजजनीं ॥ म्हणे श्रीनृसिंहसर-
स्वती ॥ ३४ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ कृपामूर्ति स्वामी कर्मवि-
विधीसी ॥ सांगता झाला ब्राह्मणासी ॥ येणेंपरीं विहिताचार ॥ ३५ ॥ म्हणे
सरस्वती गंगाधर ॥ ऐसा ब्राह्मणांचा आचार ॥ वर्ततां होय मनोहर ॥ सर्वा-

१ दयाळ.

भीष्टें साधतील ॥ ३६ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ नामधारक शिष्य संवादत ॥ वेदोपनिषदमथितार्थ ॥ आचारनिरूपणाध्याय हा ॥५३७॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे आन्हिकनिरूपणं नाम षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ओंवीसंख्या ॥ ५३७ ॥ ॥ ७ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक विनवी सिद्धासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ श्रीगुरु सांगती विस्तारेंसीं ॥ काय निरूपिलें यानंतर ॥ १ ॥ ऐक नामधारका सगुणा ॥ श्रीगुरु अवतार नारायणा ॥ जाणे सर्व आचारखुणा ॥ सांगतसे कृपेसीं ॥ २ ॥ त्रैमूर्तींच्या अवतारास ॥ आचार सांगता काय प्रयास ॥ ज्ञान देउनी पतितास ॥ वेद म्हणविले कवणेंपरीं ॥ ३ ॥ ऐसे गुरुमूर्ति दातारु ॥ भक्तजनकल्पतरु ॥ सांगते झाले आचारु ॥ कृपा करोनि विप्रासी ॥४॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ गृहरक्षणार्थ कारणासी अग्निमंथनकाष्ठासी ॥ संपादावें कृष्णमार्जार ॥ ५ ॥ श्रीखंडादि मणिघृतें ॥ तिळ कृष्णाजिन छोगवस्त्रें ॥ इतुकीं असावीं पवित्रें ॥ दुरितें बाधा करूं न शकती ॥ ६ ॥ शुक्लपक्ष सारसासी ॥ पोसावें घरीं परियेसीं ॥ समस्तपापविनाशी ॥ धेनु असावी आपुले घरीं ॥ ७ ॥ देवपूजेचें विधान ॥

१ लोंकरीचें वस्त्र. २ एक प्रकारचा पक्षी.

सांगेन ऐका एक मन ॥ गृह बरवें संमार्जन ॥ देवगृह असावें ॥ ८ ॥
हिरण्य रौप्य ताम्रेंसीं ॥ अथवा मृत्तिका पात्रेंसीं ॥ संमार्जन करावें विधींसीं॥
निषिद्ध पात्रें सांगेन ॥ ९ ॥ कांस्यपात्रीं कन्यकाहस्तीं ॥ नोवरीं अथवा
शत्रू जातीं ॥ न करावें वस्त्र धरोनि वामहस्तीं ॥ दक्षिण हस्तीं सारवावें
॥ १० ॥ प्रारंभ करावा नैर्ऋत्यकोनीं ॥ रात्रीं न करावें उदक घेउनी ॥
अगत्य करणें घडे मनीं ॥ भस्मेंकरोनि सारवावें ॥ ११ ॥ रंगमाळिका
घालोनि निर्मळ ॥ असावें देवताभुवनीं ॥ मग बैसोनि शुभासनीं ॥ देवपूजा
करावी ॥ १२ ॥ जैसी संध्या ब्राह्मणासी ॥ देवपूजा करावी तैसी ॥
त्रिकाल करावें अर्चनासी ॥ एकचित्तें मनोभावें ॥ १३ ॥ त्रिकाळीं न घडे
ज्यासी ॥ प्रातःकाळीं करावी हर्षीं ॥ तेंही न साधे परियेसीं ॥ माध्यान्ह-
काळीं करावें ॥ १४ ॥ सायंकाळीं मंत्रेंसीं ॥ पुष्पें वाहोनि भक्तींसीं ॥
ऐसें न साधे जयासी ॥ भोजनकाळीं करावें ॥१५॥ देवपूजा न करी नर॥

पावे त्वरित यमपुर ॥ नरक भोगी निरंतर ॥ ऐक ब्राह्मणा एकचित्तें ॥ १६ ॥
विप्रकुळीं जन्म जयासी ॥ पूजा न करितां जेवी हर्षी ॥ तोचि होय यम-
ग्रासी ॥ वैश्वदेव न करी नर ॥ १७ ॥ देवपूजा करावयासी ॥ सहा प्रकार
परियेसीं ॥ उदकनारायण विशेषीं ॥ पूजितां तृप्ति जगन्नाथा ॥ १८ ॥
दुसरा प्रकार सांगेन ऐका ॥ अग्निदेवपूजा अधिका ॥ मानसपूजा अति-
विशेखा ॥ एकाचित्तें परियेसा ॥ १९ ॥ सूर्यपूजा करितां जाण ॥ संतुष्ट
होय नारायण ॥ सामान्यपक्षें स्थंडिलीं जाण ॥ प्रतिमापूजा स्वल्पबुद्धि
॥ २० ॥ ज्ञाता असेल बुद्धिमंत ॥ यज्ञपुरुषपूजा त्वरित ॥ स्वर्गापवर्गा
पूजा देत ॥ यज्ञपुरुषपूजा मुख्य जाण ॥ २१ ॥ अथवा पूजावें धेनूसी ॥
ब्राह्मणपूजा विशेषां ॥ गुरुपूजा मनोभावेंसी ॥ प्रत्यक्ष तुष्टे गुरुमूर्ति ॥ २२ ॥
गुरु त्रैमूर्ति म्हणोनि ॥ बोलती समस्त श्रुतिवचनीं ॥ सकळाभीष्टें तयापासूनी ॥

१ मूर्तिपूजा. २ अग्निसेवा.

पाविजे चारी पुरुषार्थ ॥ २३ ॥ कलिप्रवेश होतां नरू ॥ न करितां अंतः-
करण स्थिरू ॥ उत्पत्ति केली शार्ङ्गधरू ॥ समस्त कलि उद्धरावया ॥२४॥
शालिग्रामचक्रांकितेंसी ॥ प्रकाश केला हृषीकेशीं ॥ तीर्थ घेतां परियेसीं ॥
समस्त पापें नासती ॥ २५ ॥ आज्ञा घेऊनि श्रीगुरूची ॥ पूजा करावी
प्रतिमेची ॥ वेदोक्त मंत्र करोनि वाचीं ॥ विधिपूर्वक पूजावें ॥ २६ ॥
स्त्रीजनादि शूद्रांसी ॥ न म्हणावे वेदमंत्रेसी ॥ आगमोक्तमार्गेसीं ॥ गुरु-
निरोपें करावें ॥ २७ ॥ श्रीगुरूचे निरोपानें ॥ पूजिजे काष्ठं पाषाणें ॥
तेचि होती देव जाणें ॥ होती प्रसन्न परियेसा ॥ २८ ॥ शुचि आसनीं
बैसोनी ॥ करावे प्राणायाम तिन्ही ॥ येभ्योमाता म्हणोनि ॥ चेतन करावा
परमात्मा ॥ २९ ॥ प्रणव मंत्रोनी द्वादशी ॥ उदक प्रोक्षावें आपुल्या शि-
रसीं ॥ संकल्प करोनि अंगन्यासी ॥ कलशपूजा करावी ॥३०॥ देवाच्या

१ वेद. २ जागृत.

दक्षिण भागेसीं ॥ कलश ठेवावा परियेसीं ॥ पूजा करोनि भक्तीसीं ॥ शंखपूजा करावी ॥ ३१ ॥ निर्माल्य काढोनि विनयेंसीं ॥ टाकावें तें नैर्ऋत्यदेशीं ॥ धौत वस्त्र हांतरोनि हर्षीं ॥ दीप प्रज्वलित करावा ॥ ३२ ॥ स्मरावें मनीं श्रीगुरूसी ॥ मनोवाक्कायकर्मेंसी ॥ अर्चन करावें पीठासी ॥ विधिपूर्वक अवधारा ॥ ३३ ॥ चारी द्वारें पूजोनि ॥ दिशा पुजाव्या अर्चुनी ॥ शांताकार करा ध्यानीं ॥ मग आवाहनावें मंत्रोक्त ॥ ३४ ॥ सहस्रशीर्षेति आवाहनोनि ॥ पुरुषएवेदं आसनीं ॥ एतावानस्य म्हणोनि ॥ पाद्य द्यावें अवधारा ॥ ३५ ॥ मंत्र म्हणोनि त्रिपादूर्ध्व ऐसा ॥ अर्घ्य द्यावें परियेसा ॥ तस्माद्विराड म्हणा ऐसा ॥ देवासी आचमन समर्पावें ॥ ३६ ॥ यत्पुरुषेण मंत्रेसीं ॥ स्नपन करा देवासी ॥ दुग्धादि पंचामृतांसी ॥ स्नपनपूजा करावी ॥३७॥ पुरुषसूक्तादि रुद्रेसीं ॥ श्रुतिमार्गें करोनि न्यासासी ॥ स्नपन करावें परियेसीं ॥ एकचित्तें अवधारा ॥ ३८ ॥ स्नपन करूनि

देवासी ॥ बैसवावें शुभासनेसीं ॥ तंयेज्ञेति मंत्रेंसीं ॥ वस्त्रें द्यावीं परियेसा ॥ ३९ ॥ तस्माद्यज्ञेति मंत्रेंसी ॥ यज्ञोपवीत द्यावें देवासी ॥ येणेंचि मंत्रें गंधाक्षतेंसी ॥ वहावें अनन्यभक्तीनें ॥ ४० ॥ तस्मादश्वा अजायंत ॥ ऐसा तुम्ही मंत्र म्हणत ॥ पुष्पें वहावीं एकचित्त ॥ मनःपूर्वक देवासी ॥ ४१ ॥ पुष्पें वहावयाचें विधान ॥ सांगेन ऐका ऋषिजन ॥ आपण पेरिलीं कुसुमें सगुण ॥ उत्तम पक्ष परियेसा ॥ ४२ ॥ पुष्पें असती अरण्यांत ॥ तीं मध्यम प्रकार बोलिजेत ॥ क्रय करूनि घेतां विकत ॥ अधम पुष्पें जाणिजे ॥ ४३ ॥ उत्तम न मिळतां घ्यावीं विकत ॥ उत्तम पक्ष पुष्पें श्वेत ॥ रक्त मध्यम अधम पीत ॥ कृष्णचित्र अधमाधम ॥ ४४ ॥ वर्जावीं शिळीं पुष्पें देख ॥ सच्छिद्र अथवा कृमिभक्षक ॥ भूमीवरी पडे ऐक ॥ पुष्प त्यजावें देवासी ॥ ४५ ॥ शिळीं नव्हेती द्रव्यें जाणा ॥ बिल्वपत्रें तुळसी आणा ॥ सहस्रपत्रें कमळें माना ॥ सदां ग्राह्य देवांसी ॥ ४६ ॥ शतपत्रें बकुल

चंपकासी ॥ पाटलें कमलें पुन्नागेंसीं ॥ मल्लिका जाती करवीरेंसीं ॥ कल्हार-पुष्पें अर्पावीं ॥ ४७ ॥ विष्णुपूजा करावयासी ॥ वर्जावीं पुष्पें तुम्हीं ऐसीं॥ धत्तूर अर्क करवीरेंसीं ॥ रक्त पुष्पें वर्जावीं ॥ ४८ ॥ गिरिकर्णिका निर्गुं-डेंसीं ॥ सेवगा कपित्थ करंजेंसीं ॥ अमलपंत्र[1] कूष्मांडेंसीं ॥ पुष्पें विष्णूसी वर्जावीं ॥ ४९ ॥ हीं वाहिल्या होय दोषी ॥ सांगेन ऐका समस्त ऋषि ॥ पूजा करितां विष्णूसी ॥ त्यजावीं याचि कारणें ॥ ५० ॥ अर्कपुष्प वा-हिल्यासी ॥ विनाश होय आपणासी ॥ धत्तूरपुष्पें प्रज्ञानासी ॥ कोविदारें दरिद्रता ॥ ५१ ॥ श्रीकर्णिकापुष्पें[2] वाहतां ॥ कुळक्षय होय त्वरिता ॥ कंटकारीपुष्पें[3] वाहतां ॥ शोक होय परियेसा ॥ ५२ ॥ कुंदपुष्पें होय दुःख ॥ शाल्मलीपुष्पें रोग ऐक ॥ त्याचीं कारणें करूनि विवेक ॥ पुष्पें वहावीं विष्णूसी ॥ ५३ ॥ वर्ज्य पुष्पें ईश्वरासी ॥ सांगेन नांवें परियेसीं ॥ कपित्थ

१ आंवळीचें पान. २ कुंभीचीं फुलें. ३ रिंगणीचीं फुलें.

केतकी शशांकेंसीं ॥ श्यामपुष्पें वर्जावीं ॥५४॥ काष्ठ पिंपळ करंज देखा ॥ वकुल दाडिंब केतका ॥ घातकी निंबादि पंचका ॥ माधवीपुष्पें वर्जावीं ॥ ५५ ॥ चूत कुंद यूथिका जाती ॥ रक्त पुष्पें वर्जावीं निरुती ॥ ईश्वराचेनें दोष घडती ॥ श्वेतपुष्पें मुख्य देखा ॥ ५६ ॥ पूजा करितां गणेशासी ॥ वर्ज करा तुम्ही तुलसी ॥ नित्यपूजा करा दूर्वेसीं ॥ दूर्वा वर्ज शक्तिदेवीतें ॥५७॥ येणें विधीं पुष्पें वाहतां ॥ काम्य होय तुम्हां त्वरिता ॥ चतुर्विध पुरुषार्था ॥ लाधाल तुम्ही अवधारा ॥ ५८ ॥ यत्पुरुषेति मंत्रेंसीं ॥ सुगंध धूपादि परिमळेसीं ॥ ब्राह्मणोस्येति मंत्रेंसीं ॥ एकार्तिक्य करावें ॥ ५९ ॥ चंद्रमामनसो इति मंत्रेंसीं ॥ नैवेद्य अर्पावा देवासी ॥ तांबूल अर्पितां म्हणा मंत्रासी ॥ नाभ्याआसीदिति ऐसा ॥ ६० ॥ सुवर्णपुष्पें नीरांजन ॥ सप्तास्येति मंत्रेंकरून ॥ पुष्पांजलिं घेऊन ॥ देवा यज्ञेति

१ मखमल. २ हेतु.

मंत्रें अर्पावी ॥ ६१ ॥ धातापुरस्तात् मंत्रेंसीं ॥ नमस्कारावें देवासी ॥ अति सन्मुख पृष्ठदेशीं ॥ गर्भगृहीं करूं नये ॥६२॥ नमस्काराचें विधान ॥ सांगेन ऐका विद्वज्जन ॥ सव्य देवप्रदक्षिण ॥ करूनि नमन करावें ॥६३॥ आपुला गुरु माता पिता ॥ सन्मुख जावें बाहेरूनि येतां ॥ अथवा उत्तम द्विज देखतां ॥ सन्मुख जावोनि वंदावें ॥ ६४ ॥ सभा असेल द्विजांची ॥ नमस्कार करा तुम्ही एकचि ॥ देवार्चनीं तैसेंची ॥ नमस्कार पावे समस्तां ॥ ६५ ॥ माता पिता श्रीगुरूसी ॥ नमस्काराची रीति ऐसी ॥ उभय हस्तें कर्णस्पर्शी ॥ एकभावें वंदावें ॥ ६६ ॥ सव्य पादावरी देखा ॥ सव्य हस्त स्पर्शोनि निका ॥ वामहस्तीं वामपादुका ॥ धरूनि नमन करावें ॥ ६७ ॥ गुरुस्थानांचीं नांवें ॥ सांगेन ऐका भावें ॥ विचारोनियां बरवें ॥ नमस्कारावें येणें विधीं ॥ ६८ ॥ माता पिता गुरु धाता ॥ भयहर्ता अन्न-दाता ॥ व्रतबंध केल्या पुरोहिता ॥ सापत्नी ते गुरुस्थानीं ॥ ६९ ॥ ज्येष्ठ

भ्राता अथवा चुलता ॥ सापत्न असेल ज्याची माता ॥ वय अधिक इष्ट-मित्रा ॥ नमस्कारावें तयांसी ॥ ७० ॥ निषिद्ध स्थानें नमावयासी ॥ सांगेन ऐका तुम्हांसी ॥ उणें असेल वय ज्यासी ॥ नमूं नये विद्वज्जनीं ॥७१॥ अग्नि समिधा पुष्पें कुशा ॥ धरिला असेल अक्षतांकुशा ॥ स्वहस्तीं पर-हस्तीं असता दोषा ॥ अशास्त्रवध होईजे नमस्कारितां ॥७२॥ जप अथवा होम करितां ॥ दूर देखिला द्विज येतां ॥ स्नान करितां जळीं असतां ॥ नमन करितां दोष घडे ॥ ७३ ॥ एखादा विप्र असे धांवत ॥ नेणता अथवा धनगर्वित ॥ क्रोध-वंत किंवा मंगलस्नान करित ॥ नमस्कार करूं नये ॥७४॥ एकहस्तें ब्राह्म-णासी ॥ नमूं नये परियेसीं ॥ सूतकिया मूर्ख जनांसी ॥ करूं नये नम-स्कार ॥ ७५ ॥ गीतावाद्यादि नृत्यसीं ॥ संतुष्टावें देवांसी ॥ प्रार्थना करावी भक्तींसीं ॥ मग अर्चावें सनकादिकां ॥ ७६ ॥ पूजा अपूर्व देवासी ॥ हस्त

ठेवूनि पीठेसीं ॥ उत्तरपूजा करावी हर्षी ॥ मग करावें उद्वार्चन ॥ ७७ ॥
ऐसेपरी देवपूजा ॥ करावी भक्तीनें ऐका द्विजा ॥ संस्कृत अन्न व्हावया
काजा ॥ वैश्वदेव करावा ॥ ७८ ॥ अग्नि अलंकार करूनि ॥ अन्न अग्नि-
कुंडीं दाखवूनि ॥ घृतसंमिश्रित करूनि ॥ पंच भाग करावे ॥ ७९ ॥ एक
भागाच्या दहा आहुति ॥ दुसरा बळिहरणीं योजिती ॥ अवदान तिसरा
करिती ॥ चौथ्या भागें पितृयज्ञ ॥ ८० ॥ मनुष्ययज्ञ पांचव्यासी ॥ वैश्व-
देव करावा मंत्रेंसीं ॥ अन्न नाहीं ज्या दिवसीं ॥ तंदुलांनीं करावा ॥ ८१ ॥
वैश्वदेव समयासी ॥ अतिथि[1] आलिया घरासी ॥ चोर चांडाल होय हर्षी ॥
पूजा करावी मनोभावें ॥ ८२ ॥ यम सांगे दूतासी ॥ वैश्वदेव करितां
नरासी ॥ जाऊं नको तयापासीं ॥ विष्णुआज्ञा आम्हां असे ॥ ८३ ॥ माता-
पिताघातकियांसी ॥ शुनि श्वपचचांडालांसी ॥ अतिथि आलिया घरासी ॥

१ अन्नार्थी पाहुणा.

अन्न द्यावें परियेसा ॥८४॥ न विचारावें गोत्रकुळ ॥ अन्न घालावें तात्काळ ॥ विन्मुख झालिया पितृकुळ ॥ वर्षें सोळा न येती घरासी ॥ ८५ ॥ प्रवासी असेल आपण जरी ॥ औषधि घृत दधि क्षीरीं ॥ कंद मूळें फळें तरी ॥ देवयज्ञ करावा ॥ ८६ ॥ अन्नाविणें अवदान ॥ करूं नये साधुजन ॥ पंच-महायज्ञ करी ब्राह्मण ॥ चांद्रायण आचरावें ॥ ८७ ॥ न होतां वैश्वदेव आपुल्या घरीं ॥ भिक्षेसि आला नर जरी ॥ भिक्षा घालितां पाप दूरी ॥ वैश्वदेवफल असे ॥ ८८ ॥ बळिहरण घालोनि काढी आपण ॥ त्याणें आच-रावें चांद्रायण ॥ आपण काढितां दोष जाण ॥ आणिकाकरवीं काढवावें ॥८९॥ बळिहरण न काढितां जेवी जरी ॥ सहा प्राणायाम त्वरित करीं ॥ तेणें होय पाप दुरी ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ९० ॥ गृहपूजा करूनि देखा ॥ गोग्रास द्यावा विशेखा ॥ नित्य श्राद्ध करणें ऐका ॥ करूनि अन्न समर्पावें ॥ ९१ ॥ स्वधाकार पिंडदान ॥ करूं नये अग्नौकरण ॥ ब्रह्मचा-

रियासी तांबूलदान ॥ दक्षिणा वर्ज परियेसा ॥ ९२ ॥ वैश्वदेव झालिया-
वरी ॥ उभा राहोनि आपुल्या द्वारीं ॥ अतिथिमार्ग पहावा निर्धारीं ॥
आलिया पूजन करावें ॥ ९३ ॥ श्रमोनि आलिया अतिथीसी ॥ पूजा
करावी भक्तींसीं ॥ अथवा अस्तमानसमयासीं ॥ आलिया पूजन करावें
॥९४॥ वर्णानां ब्राह्मणो गुरुः ॥ ऐसें बोलती वेदशास्त्रु ॥ अतिथि जाण
सर्व गुरु ॥ वैश्वदेवसमयासी ॥ ९५ ॥ वैश्वदेवसमयीं अतिथीसी ॥ पूजा
करितां परियेसीं ॥ ती पावे देवांसी ॥ तुष्ट ब्रह्मा इंद्र वन्हि ॥ ९६ ॥ वायु-
गण अर्यमादि देव ॥ तृप्ति पावे सदाशिव ॥ पूजा करावी एकभाव ॥ सर्व
देवता संतुष्टती ॥ ९७ ॥ अतिथिपाद प्रक्षाळिती ॥ पितर सकळ तृप्त
होती ॥ अन्नदानें ब्रह्मा तृप्ति ॥ विष्णुमहेश्वरां अवधारा ॥ ९८ ॥ यती-
श्वरादि ब्रह्मचारी ॥ जे समयीं येती आपुल्या घरीं ॥ अन्न द्यावें निर्धारीं ॥
महापुण्य असे देखा ॥ ९९ ॥ ग्रासमात्र दिधला एक ॥ मेरुसमान पुण्य

अधिक ॥ बरवें द्यावें त्यासी उदक ॥ समुद्रासमान दान असे ॥ १०० ॥
अतिथि आलिया घरासी ॥ जेवी आपण त्यजूनि त्यासी ॥ श्वानयोनीं
पावे हर्षी ॥ गर्दभयोनीं पुढें उपजे ॥ १ ॥ ऐसें अतिथि पूजोन ॥ मग
करावें भोजन आपण ॥ सर्वथा न करावें अन्न भिन्न ॥ प्रपंच करितां दोष
असे ॥ २ ॥ सायंप्रातर्गृहस्थांसी ॥ भोजन करणें संतोषीं ॥ प्रक्षालन
करोनि पादांसी ॥ ओले पायीं असावें ॥३॥ ओलीं असावीं पांच स्थानें ॥
हस्त पाद उभय जाणें ॥ मुख ओलें पंचमस्थानें ॥ शतायुषी पुरुष होय
॥ ४ ॥ पूर्वाभिमुख बैसोन ॥ भोजनसमयीं धरा मौन ॥ पाद उभय
जोडोन ॥ बैसावें ऐका एकचित्तें ॥ ५ ॥ मंडल करावें चतुष्कोनि ॥ वरी
भस्म प्रोक्षोनि ॥ क्षत्रियास मंडल त्रिकोनि ॥ वर्तुळ वैश्यासी परियेसा ॥६॥
शूद्रें अर्धचंद्राकार ॥ मंडल करावें परिकर ॥ आवाहनावे सुरवर ॥ आदित्य
वसु रुद्र ब्रह्मा ॥ ७ ॥ पितामहादि देवता ॥ तया मंडलीं उपजविता ॥

याचि कारणें तत्त्वतां ॥ मंडलाविणें जेवूं नये ॥ ८ ॥ न करिता मंडल जेवी जरी ॥ अन्न नेती निशाचरी ॥ पिशाच असुर राक्षस परी ॥ अन्नरस नेती अवधारा ॥ ९ ॥ उत्तम पूर्वाभिमुखी देख ॥ पश्चिम मध्यम ऐक ॥ पितृकार्यां उत्तरमुख ॥ सदा दक्षिण वर्जावी ॥११०॥ घरावें पात्र ॥ सुवर्ण रजत ताम्रपात्र ॥ पद्मपात्र पालाशपात्र ॥ पुण्यपात्र परियेसा ॥११॥ जेवितां वर्जावें गृहस्थांनीं ताम्रपात्र ॥ यतींनीं सुवर्ण अथवा रजत ॥ ताम्रशुक्तीशंखज पात्र ॥ स्फटिक पाषाण यतीसी ॥ १२ ॥ कर्दलीगर्भपत्रेंसी ॥ पद्मपत्रजळें स्पर्शी ॥ वल्लीपालाशपत्रेंसी ॥ जेवितां चांद्रायण आचरावें ॥ १३ ॥ वट अश्वत्थ अर्क पटोल ॥ कदंब कोविदारपर्णें कोमळ ॥ भोजन करितां तात्काळ ॥ चांद्रायण आचरावें ॥ १४ ॥ लोहपात्र आपुले करीं ॥ ताम्र मृण्मय पृष्ठपर्णावरी ॥ कार्पासपत्रीं वस्त्रावरी ॥ जेवितां नरकाप्रती

१ कमळाचें पान. २ कोरळाचे पानावर.

जाय ॥ १५ ॥ कांस्यपात्रीं जेविल्यासी ॥ यश बळ प्रज्ञा आयुष्यासी ॥ वाढे नित्य अधिकेसी ॥ गृहस्थांनीं नित्य कांस्यपात्र ॥ १६ ॥ असावें पात्र पांच शेर ॥ नसावें उणें अधिक थोर ॥ उत्तमोत्तम षट्शेर ॥ सुवर्णपात्रासमान देखा ॥ १७ ॥ कास्यपात्रींचें भोजन ॥ तांबूलासहित अभ्यंगन ॥ यतीं ब्रह्मचारीं जाण ॥ विधवा स्त्रियांनीं वर्जावें ॥ १८ ॥ श्वानाच्या चर्माहुनी ॥ निषेध असे एरंडपानीं ॥ निषेध अधिक त्याहुनी ॥ आणिक जेविल्या भिन्नताटीं ॥ १९ ॥ फुटकें कांस्यपात्रेंसीं ॥ जेवितां होय महादोषी ॥ संध्याकाळीं जेवितां हर्षी ॥ माहापातकी होय जाणा ॥ १२० ॥ जवळी असतां पतित जरी ॥ जेवूं नये अवधारीं ॥ शूद्र जेविल्या शेषावरी ॥ जेवूं नये ब्राह्मणानें ॥ २१ ॥ सवें घेउनी बाळासी ॥ जेवूं नये श्राद्धदिवसीं ॥ आसन आपुलें आपणासी ॥ घालूं नये ब्राह्मणानें ॥ २२ ॥ आपोशन आपुले

१ फुटक्या ताटामध्यें.

हातीं ॥ घेऊं नये मंदमतीं ॥ तैल घालुनी स्वहस्तीं ॥ आपण अभ्यंग करूं नये ॥ २३ ॥ भोजनकाळीं मंडळ देखा ॥ करूं नये स्वहस्तका ॥ आयुष्य-क्षय पुत्रघातका ॥ म्हणिजे नाम तयासी ॥ २४ ॥ नमस्कारावें वाढितां अन्न ॥ अभिघारावें पहिलेंचि जाण ॥ प्राणाहुति घेतां क्षण ॥ घृत घालावें स्वहस्तानें ॥ २५ ॥ उदक घेउनि व्याहृति मंत्रीं ॥ प्रोक्षोनि अन्न करा पवित्री ॥ परिषिंचावें तेचि रीतीं ॥ मग नमावें चित्रगुप्ता ॥ २६ ॥ बळी घालोनि चित्रगुप्तासी ॥ काढवावें सर्वेचि परियेसीं ॥ वाम हस्तक धुवोनि सरसी ॥ पात्र दृढ धरावें ॥ २७ ॥ अंगुष्ठतर्जनीमध्यमांगुलींसीं ॥ धरावें पात्र वामहस्तेसीं ॥ आपोशन करावें सव्यकरेंसीं ॥ आणिकोंकरवीं घालावें ॥ २८ ॥ आपोशन उदक सोडोनि जरी ॥ आणिक घेती उदक तरी ॥ श्वानमूत्र घेतल्यापरी ॥ एकचित्तें परियेसा ॥ २९ ॥ धरिलें आपोशन

१ वर तूप घालावें. २ दुसऱ्याकडून

ब्राह्मणासी ॥ नमस्कारितां महादोषी ॥ आशीर्वाद घेऊं नये तयापासीं ॥
उभयतांसी दोष घडे ॥ १३० ॥ मौनें असावें ब्राह्मणें देख ॥ बोलूं नये
शब्दादिक ॥ आपोशन घ्यावें मंत्रपूर्वक ॥ मग घ्याव्या प्राणाहुति ॥३१॥
आपोशनाविण भोजन करी ॥ पापविमोचन करा तरी ॥ अष्टोत्तरशत
मंत्र गायत्री ॥ जपतां दोष परिहरे ॥ ३२ ॥ प्राणाहुतीचें विधान ॥ सांगेन
ऐकिजे ब्राह्मण ॥ प्राणाग्निहोत्र करितां जाण ॥ समस्त पापें जाती देखा
॥ ३३ ॥ जैसा कर्पासराशीसी ॥ अग्नि लागतां परियेसीं ॥ जळोनि जाय
त्वरितेसीं ॥ तैसीं पापें नासतीं ॥ ३४ ॥ प्राणाहुतीचें लक्षण ॥ चतुर्विध
पुरुषार्थ जाण ॥ अन्न स्पर्शोनि मंत्र ह्मणे ॥ गीताश्लोक प्रख्यात ॥ ३५ ॥
श्लोक ॥ अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ॥ प्राणापानसमायुक्तः
पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ ३६ ॥ टीका ॥ अन्नं ब्रह्म रसो विष्णु ॥ भोक्ता देव
गिरिजारमणु ॥ ऐसा तुम्ही मंत्र म्हणोनु ॥ अग्निरस्मि मंत्र जपावा ॥३७॥

मग घ्याव्या प्राणाहुति ॥ आहेति पंच मंत्र प्रख्याति ॥ तर्जनी मध्यम अंगुष्ठधृतीं ॥ प्राणाय स्वाहा म्हणावें ॥ ३८ ॥ मध्यम अनामिका अंगुष्ठेंसीं ॥ अपानाय स्वाहा म्हणा हर्षी ॥ व्यानाय स्वाहा म्हणा यांसी ॥ कनिष्ठिकाअनामिकाअंगुष्ठेंसीं ॥ ३९ ॥ अंगुष्ठतर्जनीकनिष्ठिकेंसीं ॥ उदानाय स्वाहा म्हणा हर्षी ॥ पंचांगुलीनें परियेसी ॥ समानाय स्वाहा म्हणावें ॥१४०॥ प्राणाहुति घेतल्या अन्न ॥ दंतां स्पर्शों नये जाण ॥ जिव्हें गिळावें तत्क्षण ॥ मग धरावें मौन देखा ॥४१॥ मौन धरावयाचीं स्थानें ॥ सांगेन ऐका अतिउत्तमें ॥ स्नानसमयीं धरा निर्गुणें ॥ न धरितां फल असेना ॥ ४२ ॥ होम करितां न धरी मौन ॥ लक्ष्मी जाय तत्क्षण ॥ जेविता मौन न धरितां आपण ॥ अपमृत्यु घडे त्यासी ॥ ४३ ॥ अशक्य असेल मौन जरी ॥ प्राणाहुति घेई तंववरी ॥ मौन धरावें अवधारीं ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ४४ ॥ पिता जिवंत असे ज्यासी ॥ अथवा ज्येष्ठ

बंधु परियेसीं ॥ धरूं नये मौनासी ॥ श्राद्धान्न जेवितां धरावें ॥ ४५ ॥ पंच प्राणाहुति देतां ॥ सर्वांसी मौन-आज्ञता ॥ असेल पिता वडील भ्राता ॥ मौन धरिल्या अधःपात ॥ ४६ ॥ जेवितां प्रथम मधुरान्न ॥ भोजन करावें नरें जाण ॥ भक्षूं नये द्रवान्न ॥ कठिणांश परियेसा ॥ ४७ ॥ भोजनांतीं समयासी ॥ जेवूं नये द्रवान्नासी ॥ बळ जाय परियेसीं ॥ शीघ्र भोजन करावें ॥ ४८ ॥ धेनूसी उदक प्यावयासी ॥ जितुका वेळ होय त्यासी ॥ भोजन करावें परियेसीं ॥ शीघ्र भोजन मुख्य जाणा ॥ ४९ ॥ भोजन करा-वयाची स्थिति ॥ सांगेन ऐका ग्रासमिति ॥ संन्यासी-मुनि-यतीं ॥ अष्ट ग्रास घ्यावे जाण ॥ १५० ॥ षोडस ग्रास अरण्यवासीं ॥ द्वात्रिंशत् गृह-स्थासी ॥ मिति नाहीं ब्रह्मचाऱ्यासी ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५१ ॥ जितुका मावेल आपुल्या मुखीं ॥ तितुका ग्रास घ्यावा विशेखीं ॥ अधिक घेतां ग्रास मुखीं ॥ उच्छिष्ट भक्षिलें फळ देखा ॥ ५२ ॥ अर्धा ग्रास भक्षूनि ॥

उरलें ठेविती आपुल्या भाणीं ॥ चांद्रायण आचरावें त्यांनीं ॥ उच्छिष्ट भोजन तया नांव ॥ ५३ ॥ न बैसावें सहभोजनासी ॥ इष्टसोयरे इत्यादिकांसी ॥ व्रतबंधाविणें पुत्रासी ॥ कन्याकुमारांसी दोष नाहीं ॥ ५४ ॥ सांडूं नये अन्न देखा ॥ घृत पायस विशेष ऐका ॥ सांडावें थोडें ग्रास एका ॥ जेवूं नये सर्व अन्न ॥ ५५ ॥ भोजन संपेपर्यंत ॥ पात्रीं धरावा वामहस्त ॥ जरी सोडील अजाणत ॥ अन्न वर्जोनि उठावें ॥ ५६ ॥ या कारणें द्विजजना ॥ सोडूं नये पात्र जाणा ॥ अथवा न धरावें पूर्वींच जाणा ॥ दोष नाहीं परियेसा ॥ ५७ ॥ वस्त्र गुंडाळोनि डोयीसी ॥ अथवा सन्मुख दक्षिणेसी ॥ वामपादावरी हस्तेंसीं ॥ जेवितां अन्न राक्षस नेती ॥ ५८ ॥ वामहस्त भूमीवरी ॥ ठेवुनि नर भोजन करी ॥ रोग होय शरीरीं ॥ अंगुली सोडोनि जेवूं नये ॥ ५९ ॥ अंगुली सोडूनि जेवी जरी ॥ दोष गोमांस भक्षिल्यापरी ॥ दोष असती नानापरी ॥ स्थानें असती भोजनासी ॥ १६० ॥

अश्वगजारूढ होउन ॥ अथवा बैसोनि स्मशानीं ॥ देवालयीं शयनस्थानीं ॥ जेवूं नये परियेसा ॥ ६१ ॥ निषिद्ध जेवण करपात्रेंसीं ॥ ओलें नेसोनि आर्द्रकेशी ॥ बहिर्हस्त बहिःकेशी ॥ जेवितां दोष परियेसीं ॥ ६२ ॥ यज्ञोपवीताच्या उपवीतीसीं ॥ भोजन करावें परियेसीं ॥ जेवितां आपुल्या सन्मुखेसी ॥ पादरक्षा असूं नये ॥ ६३ ॥ ग्रास उदक कंद मूळ ॥ इक्षुदंडादि केवळ ॥ भक्षोनि पात्रीं ठेवितां सकळ ॥ उच्छिष्ट होय अवधारा ॥ ६४ ॥ भोजन करी स्नानाविणें ॥ न करितां होम जेवी कवणें ॥ अन्न न्व्हे कृमि जाणे ॥ म्हणे पराशर ऋषि ॥ ६५ ॥ पर्णपृष्ठावरी रात्रीसीं ॥ दीपेंवीण जेविल्यासी ॥ महादोष असे तयासीं ॥ कृमि भक्षिल्यासमान होय ॥ ६६ ॥ दीप जाय भोजन करितां ॥ पात्र धरावें स्मरोनि सविता ॥ पुनरपि आणोनि लावितां ॥ मग भोजन करावें ॥ ६७ ॥ पात्रीं असेल जितुकें अन्न ॥ तितुकेंचि जेवावें परिपूर्ण ॥ आणिक घेतां दोष जाण ॥

श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ ६८ ॥ स्पर्शों नये जेवितां केश ॥ कथा सांगतां महादोष ॥ दिसूं नये व्योम आकाश ॥ अंधकारीं जेवूं नये ॥६९॥ न ठेवितां शेष स्त्रियेसी ॥ जेवितां होय अत्यंत दोषी ॥ ठेविलें न जेवितां स्त्रिया दोषी ॥ महापातकें घडती जाणा ॥१७०॥ शून्यदेवदेवालयीं ॥ देवस्थान आपुले गृहीं ॥ जलसमीप संध्यासमयीं ॥ जेवूं नये परियेसा ॥७१॥ पात्रें ठेवुनि दगडावरी ॥ जेवूं नये अवधारीं ॥ अवलोकूं नये मुखावरी ॥ स्त्रीजनाचे परियेसीं ॥ ७२ ॥ न करावें सहभोजन ॥ जेवितां होय उच्छिष्टभक्षण ॥ कुलस्त्रियेंसीं करितां भोजन ॥ निर्दोष असे परियेसा ॥ ७३ ॥ प्राशन शेष उदकासी ॥ घेऊं नये उच्छिष्टासी ॥ अगत्य घडे संधीसीं ॥ किंचित् सांडूनि घेईजे ॥ ७४ ॥ वस्त्रोदक घेतल्यासी ॥ अपार दोष घडती तयासी ॥ जन्म पावे श्वानयोनीसी ॥ पडे मागुती नरकांत ॥ ७५ ॥ शब्द होय उदक घेतां ॥ अथवा क्षीर घृत सेवितां ॥ आपोशनोदक प्राशितां ॥

सुरापानसमान असे ॥७६॥ महाजळीं रिघोनि ॥ उदक घेती मुखांतुनी ॥
अथवा जे घेती उभ्यानी ॥ सुरापानसमान जाणा ॥ ७७ ॥ द्वयहस्तांजुळि
करुनि ॥ घेऊं नये उदक ज्ञानीं ॥ घ्यावें एक हस्तेंकरूनि ॥ वाम हस्त लावूं
नये ॥ ७८ ॥ सभे बैसोनि एकासनीं ॥ अथवा आपुले हांतुरणीं ॥ प्राशन
करूं नये पाणी ॥ महादोष परियेसा ॥ ७९ ॥ वाढावें भिन्न पात्रेंसीं ॥ पाहूं
नये आणिक यातीसी ॥ रजस्वला स्त्रियांसी ॥ चांडाळ श्वान पाहूं नये ॥१८०॥
दृष्टि पडे इतुकियांसी ॥ ध्वनि ऐकतां कर्णांसी ॥ त्यजावें अन्न त्वरितेसी ॥
जेवितां दोष परियेसीं ॥ ८१ ॥ कलहशब्द कांडण दळण ॥ ऐकतां जेवूं नये
अन्न ॥ अपशब्द स्पृष्टास्पृष्ट जाण ॥ त्यजावें अन्न परियेसा ॥ ८२ ॥ नेणते
लोक पंक्तीसी ॥ घेऊं नये परियेसीं ॥ अगत्य घडे संधीसी ॥ उदकें भस्में करा
पृथक् ॥ ८३ ॥ अथवा स्तंभ असेल मध्य ॥ द्वारमार्ग असेल शुद्ध ॥ उदकें
वेष्टितां आपुले परिघ ॥ दोष नाहीं परियेसा ॥ ८४ ॥ कृष्ण वस्त्र नेसोनि

आपंण ॥ जेवितां दोष अपार जाण ॥ स्त्रीजन वाढिती कांसेविण ॥ उच्छि-ष्टसमान परियेसा ॥ ८५ ॥ ऐसा विचार करूनि मनीं ॥ करावें भोजन द्विजजनीं ॥ विकिरिद विलोहित म्हणोनि ॥ अभिमंत्रावें शेष अन्न ॥८६॥ विकिरीदे इति मंत्रासी ॥ म्हणावा अघोर ऋषि ॥ रुद्रदेवता परियेसीं ॥ अन्नाभिमंत्रणे विनियोग ॥८७॥ ऐसा मंत्र जपोन ॥ हातीं घ्यावें शेषान्न ॥ यमाच्या नांवें बळी घालोन ॥ उत्तरापोशन मग घ्यावें ॥ ८८ ॥ उच्छिष्ट सर्व पात्रींचें ॥ घेऊनि हातीं म्हणा वाचे ॥ रौरवमंत्र असे त्याचे ॥ पात्रा-जवळीं ठेवावें ॥ ८९ ॥ उठोनि जावें प्रक्षालनासी ॥ गंडूष करोनि मग हस्त स्पर्शीं ॥ न करितां गंडूष प्रक्षाली हस्तासी ॥ आत्मघातकी तोची जाणा ॥ १९० ॥ मुख प्रक्षाळितां परियेसीं ॥ मध्यमांगुलीं दांत घासी ॥ तर्जनी अंगुष्ठें महादोषी ॥ रौरव नरकीं परियेसा ॥ ९१ ॥ बरवें हस्तप्र-लन ॥ करावें दंतशोधन ॥ हातींचें पवित्र सोडून ॥ टाकावें नैर्ऋत्य दिशे

॥ ९२ ॥ अंगुष्ठमात्र पुरुषा ॥ म्हणावा मंत्र परियेसा ॥ हस्त घासोनी चक्षुषा ॥ उदक लावावें अवधारा ॥ ९३ ॥ ऐसा जरी न म्हणे मंत्र ॥ चक्षुरोगी होय निश्चित ॥ या कारणें निश्चित ॥ हस्तोदकें आरोग्यता ॥९४॥ द्विराचमन करोनी ॥ आयंगौ मंत्र म्हणोनी ॥ द्रुपदादिवेन्मुमुचा म्हणोनि ॥ पादप्रक्षालन करावें ॥९५॥ ऐसा तुम्हीं मंत्र जपतां ॥ भोजनठायीं जाऊनि बैसतां ॥ द्विराचमन करूनि निगुता ॥ नासिकास्पर्श मग करावा ॥९६॥ स्मरावें मग अगस्त्यासी ॥ कुंभकर्ण वडवाग्नीसी ॥ वृकोदर शनैश्वरासी ॥ इल्वल वातापि जीर्य म्हणावें ॥ ९७ ॥ हस्त दाखवावे अग्नीसी ॥ आणिक सांगेन परियेसीं ॥ बंधुवर्ग असती जयासी ॥ पुसूं नये वस्त्रें कर ॥ ९८ ॥ मग स्मरावें श्रीगुरूसी ॥ आणिक स्मरावें कुळदेवतेसी ॥ येणेंपरी विधीसी ॥ भोजन करावें द्विजोत्तमें ॥ ९९ ॥ विप्र विनवी श्रीगुरूसी ॥ भोजनप्रकार सांगितला आम्हांसी ॥ विधिनिषिद्ध अन्नें कैसीं ॥ निरोपावीं दातारा

॥२००॥ विप्रवचन ऐकोनि ॥ निरोपिती श्रीगुरु संतोषोनी ॥ ऐक ब्राह्मणा म्हणोनि ॥ अतिप्रेमें निरोपिती ॥ १ ॥ म्हणे सरस्वती गंगाधरु ॥ ब्राह्मण-पणाचा आचारु ॥ निरोपिला गुरुनाथें समग्रु ॥ म्हणोनि विनवी संतोषें ॥ २ ॥ वैश्वदेवाविणें अन्न ॥ अथवा गणान्न परिपूर्ण ॥ घातलें असेल बहु लवण ॥ बहुमिश्रितान्न जेऊं नये ॥३॥ लशुन गाजर कंद मुळा ॥ वृंताक श्वेत जो असे भोंपळा ॥ छत्राकार शाखा सकळा ॥ वर्जाव्या तुम्हीं परियेसा ॥ ४ ॥ धेनुअजामहिषीक्षिर ॥ प्रसूतीचें वर्जावें दशरात्र ॥ नूतनोदक पर्जन्य पूर ॥ त्रिरात्रीचें वर्जावें ॥ ५ ॥ कूष्माड डोरलीं पडवळेसीं ॥ मुळा बेल आंवळेसीं ॥ न भक्षावें प्रतिपदेसी ॥ भक्षितां पाप परियेसा ॥ ६ ॥ स्वर्गापवर्ग चाड ज्यासी ॥ अष्टमी वर्जावी औदुंबरासी ॥ अमलकफळ रात्रीसी ॥ वर्जावें भानुवासर सप्तमी ॥ ७ ॥ बेलफळ वर्ज शुक्रवारीं ॥ शमीफळ मंदवारीं ॥ भक्षितां लक्ष्मी जाय दुरी ॥ वर्जावें ते दिवसीं परियेसा ॥ ८ ॥ धात्रीफळ

रात्रीसीं ॥ भक्षितां हानि प्रज्ञेसी ॥ नाश करी वीर्यासी ॥ धात्रीफळ वर्जावें ॥९॥ नख केश पडिलिया अन्ना ॥ स्पर्श केलिया मार्जार जाणा ॥ वायस घारी कुक्कुटजाणा ॥ स्पर्श केलिया अन्न त्यजावें ॥ २१० ॥ धेनु-मूषक मुखस्पर्शें ॥ अथवा स्पर्शे अधःकेशें ॥ त्यजावें अन्न भरंवसें ॥ असेल उच्छिष्ट अन्नाजवळी ॥ ११ ॥ एक हातीं वाढलें अन्न ॥ शिळें असेल शीत जाण ॥ वर्जावें तुम्हीं ब्राह्मण ॥ निषिद्ध बोलिले आचार्य ॥ १२ ॥ घृत-तैलमिश्रित ॥ शिळें अन्न अपवित्र ॥ तळिलें असेल सर्वत्र ॥ शिळें नव्हे सर्वथा ॥ १३ ॥ विप्र विकिती गोरस ॥ घृत क्षीर परियेस ॥ घेतां घडती महादोष ॥ साक्षात् वन्हिपक्क जेवूं नये ॥ १४ ॥ माषान्नाचे वटक देखा ॥ शिळे न होती कधीं ऐका ॥ जैसें लाह्यापीठ देखा ॥ शिळें नव्हे परियेसा ॥ १५ ॥ कंदमूळादि सुरान्न ॥ जवांचें असेल परमान्न ॥ गुडयुक्त असेल अन्न ॥ शिळें नव्हे परियेसा ॥ १६ ॥ ऐशा शिळ्या अन्नासी ॥ दोष नाहीं

परियेसी ॥ विटाळ होतां महादोषी ॥ शुचि स्थानीं असावें ॥ १७ ॥
भोजन केलियानंतर ॥ तांबूल घ्यावे परिकर ॥ क्रमुकचूर्ण पर्ण सत्वर ॥
घ्यावें द्यावें ब्राह्मणीं ॥१८॥ तिळमिश्रित भक्ष्यासीं ॥ जेवूं नये रात्रीसीं ॥
जेवितां होय महादोषी ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणातें ॥ १९ ॥ क्रमुक एक
सुखा योग्य ॥ द्वय देतां निश्चळ आरोग्य ॥ त्रीणि द्यावीं महा भाग्य ॥
चतुर्थें दुःख होय जाणा ॥ २२० ॥ पांच क्रमुक देतां जरी ॥ आयुष्य प्रज्ञा
वाढे भारी ॥ देऊं नये सहा सुपारी ॥ मरण सांगे परियेसा ॥ २१ ॥ पर्ण
अग्र मूळ न काढी जरी ॥ व्याधि संभवे अवधारीं ॥ अग्र भक्षितां पाप
भारी ॥ चूर्णपर्णें आयुष्य क्षीण ॥ २२ ॥ पर्णपृष्ठीं बुद्धिनाश ॥ द्विपर्ण-
खातां महादोष ॥ ऐश्वर्याचा होय विनाश ॥ ऋषिसंमत असे जाणा ॥२३॥
पर्णेंविण क्रमुक मुखीं ॥ घालितां आपण होय असुखी ॥ सप्त जन्म दरिद्री
दुःखी ॥ अज्ञानी होय अंतकाळीं ॥ २४ ॥ यतीश्वरादिब्रह्मचारीं ॥ रज-

स्वला स्त्री विधवा जरी ॥ तांबूलभक्षितां मांसपरी ॥ रस त्याचा सुरापान-
सम ॥ २५ ॥ तांबूल भक्षिल्यानंतर ॥ सायंसंध्या करावी विप्रें ॥ सूर्य-
अर्धमंडळ उत्तरे ॥ अर्घ्यें द्यावीं परियेसा ॥ २६ ॥ बैसोनि द्यावीं अर्घ्यें
तिन्ही ॥ चारी द्यावीं काळ क्रमुनी ॥ गायत्री मंत्र जपूनी ॥ इमंमेवरुण
म्हणावा ॥ २७ ॥ गोत्रप्रवर उच्चारोन ॥ मग करावें औपासन ॥ करावें
निशिं भोजन ॥ क्षीरमिश्रित मुख्य असे ॥ २८ ॥ रात्रीं करितां परिसिं-
चना ॥ ऋतंत्वा सत्यं मंत्र म्हणा ॥ येणें विधीं करा भोजना ॥ पूर्वीं जैसें
बोलिलें असे ॥ २९ ॥ भोजन झालियानंतर ॥ वेदाभ्यास एक प्रहर ॥
मग जावें शयनावर ॥ येणें विधीं आचरावें ॥ ३० ॥ शयन करावयाचें
विधान ॥ सांगेन ऐका विद्वज्जन ॥ पराशर सांगे वचन ॥ तेंचि विधान
सांगतसें ॥ ३१ ॥ खट्वा असावी निर्मळ जाण ॥ वर्जावी त्रिपाद भिन्न
दूषण ॥ औदुंबर अश्वत्थ पिंपरी निर्गुण ॥ न करावी खट्वा परियेसा ॥ ३२ ॥

निषिद्ध जांबूळ काष्ठाची ॥ वर्जावी प्रेतगजदंताची ॥ भिन्नकाष्ठ त्यजावी साची ॥ बरवी असावी खट्वा देखा ॥३३॥ सुमुहूर्तें विणावी खट्वा देखा ॥ घनिष्ठा भरणी मृगशीर्षीं दूषका ॥ वार सांगेन विशेखा ॥ शुभाशुभफळ असे ॥ ३४ ॥ आदित्यवारीं लाभ देखा ॥ चंद्रवारीं महासुखा ॥ भौमवारीं पाविजे दुःखा ॥ बुधवारीं सांगे महापीडा ॥ ३५ ॥ गुरुवारीं विणल्यासी ॥ सहा पुत्र होती त्यासी ॥ शुक्रवारीं अतिविशेषीं ॥ मृत्यु पावे मंदवारीं ॥३६॥ स्वगृहीं शयन पूर्वशिरेंसीं ॥ श्वशुरालयीं दक्षिणेसीं ॥ प्रवासकाळीं पश्चिमेसीं ॥ शयन करावें परियेसा ॥ ३७ ॥ सदां निषिद्ध उत्तर दिशा ॥ वर्जिलें फळ सांगितली दिशा ॥ विप्रें आचरावा ऐसा ॥ ऋषिमार्ग शुभाचार ॥ ३८ ॥ पूर्ण कुंभ ठेउनि उशीं ॥ मंगळ द्रव्य घालावें बहुवशीं ॥ रात्रिसूक्त म्हणावें हर्षीं ॥ विष्णुस्मरण करावें ॥ ३९ ॥ मग स्मरावा

अगस्त्यऋषि ॥ माधव मुचुकुंद परियेसीं ॥ आस्तिक कपिल महाऋषि ॥ सर्पस्तुति करावी ॥२४०॥ निषिद्ध स्थानें निजावयासी ॥ सांगेन सर्व परियेसीं ॥ जीर्ण देवालयीं स्मशानासीं ॥ एक वृक्षातळीं वर्जावें ॥४१॥ चारी बिदीं चोहाटेसी ॥ ईश्वरस्थान परियेसी ॥ मातापिता निजले स्थळासीं ॥ निजूं नये परियेसा ॥ ४२ ॥ वर्जावें वारुळाजवळीं ॥ आणिक तळ्याचे पाळीं ॥ नदीतीरीं नसतां जवळी ॥ घोर स्थळीं निजूं नये ॥४३॥ वर्जावें शयन धान्यावरी ॥ निजूं नये मोडके घरीं ॥ वडील खालीं निजतील तरी ॥ खट्वा वर्जावी त्यांपुढें ॥ ४४ ॥ नेसून ओलें अथवा नग्न ॥ निजूं नये शिर वेष्टून ॥ आकाशाखालीं वर्जावें शयन ॥ दीप असतां निजूं नये ॥ ४५ ॥ पूर्वरात्रीं अपरात्रीसी ॥ निजूं नये परियेसीं ॥ असूं नये स्त्रियेपासीं ॥ रजस्वला चतुर्थदिनीं ॥ ४६ ॥ असावें जानवें उपवीतीसी ॥ दृष्टी न पडावी योनीसी ॥ आयुष्य क्षीण परियेसीं ॥ दीप वर्जावा या

कारणें ॥ ४७ ॥ नीळ वस्त्र नेसले स्त्रियेसीं ॥ करितां संग परियेसीं ॥ पुत्र उपजे चांडाळेसी ॥ शुभ्र वस्त्र विशेष ॥ ४८ ॥ रजस्वला न होतां स्त्रियेसीं ॥ न करावा संग परियेसीं ॥ संग करितां महादोषी ॥ आणिक प्रकार एक असे ॥ ४९ ॥ दश वर्षें होतां कन्येसी ॥ रजस्वला सर्वत्रांसी ॥ ऐका तुम्ही सर्व ऋषि ॥ पराशर सांगतसे ॥ २५० ॥ ऋतुकाळ असतां स्त्रियेसी ॥ गांवासी जातां परियेसीं ॥ भ्रूणहत्या होय दोषी ॥ प्रख्यात असे परियेसा ॥ ५१ ॥ वृद्ध अथवा वांझेसी ॥ परत असती पुत्र जिसी ॥ बहु कन्या होती जियेसी ॥ चुकतां ऋतुकाळ दोष नाहीं ॥ ५२ ॥ ऋतु देतां चतुर्थ दिवसीं ॥ पुत्र उपजे अल्पायुषी ॥ कन्या होय पांचवे दिवसीं ॥ साहवे दिनीं पुत्र परियेसा ॥ ५३ ॥ विषम दिवसीं कन्या जाण ॥ सम दिवसीं पुत्र सगुण ॥ दहा दिवस ऋतुकाळ खूण ॥ चंद्रबळ असावें ॥ ५४ ॥ मूळ मघा रेवती दिवसीं ॥ संग न करावा परियेसीं ॥ कोप

नसावा उभयतांसी ॥ संतोषरूपें असावें ॥ ५५ ॥ ऋतुकाळीं स्त्रीपुरुषांसी ॥ जें जें असेल मानसीं ॥ सत्त्वरजतमोगुणेंसी ॥ तैसा पिंड उपजे देखा ॥ ५६ ॥ ऐसा ब्राह्मणाचा आचार ॥ सांगता झाला पराशर ॥ ऐकोनि समस्त ऋषीश्वर ॥ येणेंपरी आचरती ॥ ५७ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणांसी ॥ ऐसा आचार परियेसीं ॥ जे आचरती विधींसीं ॥ दैन्य कैचें तयां घरीं ॥ ५८ ॥ ते वंद्य होत देवांसी ॥ कामधेनु येईल घरासी ॥ लक्ष्मी राहे अखंडेंसीं ॥ पुत्रपौत्रीं नांदती ॥ ५९ ॥ होय आपण शतायुषी ॥ न घडती दोष कांहीं त्यासी ॥ तो न भिई कळिकाळासी ॥ ब्रह्मज्ञानी होयं जाणा ॥ २६० ॥ काळमृत्यु चुके देखा ॥ अपमृत्यु घडे कैंचा ऐका ॥ ऐसा आचार आहे निका ॥ नित्य रहाटावें येणेंपरी ॥ ६१ ॥ ऐसें ऐकोनियां वचना ॥ विप्र लागे श्रीगुरुचरणां ॥ झाला उपदेश उद्धारणा ॥ कृपासागर गुरुमूर्ति ॥ ६२ ॥ भक्तजन तारावयासी ॥ अवतरलासी हर्षी-



[ अ० ३७ ] ऐसा ब्राह्मणाचा आचार । सांगता झाला पराशर । ऐकोनि समस्त ऋषीश्वर । येणेंपरी आचरती ॥ २८७ ॥

केशी ॥ परिहरिलें अंधकारासी ॥ ज्ञानज्योती प्रकाशली ॥ ६३ ॥ ऐसें विनवोनि ब्राह्मण ॥ पुनरपि धरिले श्रीगुरुचरण ॥ श्रीगुरुमूर्ति संतोषोन ॥ प्रसन्न झाले तये वेळीं ॥ ६४ ॥ म्हणती श्रीगुरु तयासी ॥ आचार सांगितला तुज हर्षीं ॥ नव जावें आतां भिक्षेसी ॥ आचार करुनि सुखी असें ॥ ६५ ॥ जे जे इच्छिसी कामना ॥ होईल निरुती सत्य जाणा ॥ कन्या पुत्र नांदती सगुणा ॥ संदेह न धरावा मानसीं ॥ ६६ ॥ ऐसा वर लाधोनि ॥ विप्र गेला संतोषोनि ॥ होतां तैसा आचरोनि ॥ सकळाभीष्टें लाधला ॥ ६७ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ श्रीगुरुचरित्र ऐसें परियेसीं ॥ ऐकतां ज्ञान समस्तांसी ॥ मूढ होय ब्रह्मज्ञानी ॥ ६८ ॥ अज्ञानतिमिरअंधकारासी ॥ ज्योतिप्रकाश कथा सुरसी ॥ जें जें इच्छिलें मानसीं ॥ पाविजे त्वरित अवधारा ॥ ६९ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधरु ॥ श्रीगुरुचरित्र असे सुरतरु ॥ ऐकतां होय संतोष फारु ॥ सकळाभीष्टें साधती ॥२७०॥

इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ नामधारका शिष्य सांगत ॥ आचार जो कां समस्त ॥ निरोपिला श्रीगुरुनाथें ॥ २७१ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते सिद्ध-नामधारकसंवादे आन्हिककर्मनिरूपणं नाम सप्तत्रिंशोऽध्यायः ॥ ३७ ॥ ओंवीसंख्या ॥ २७१ ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक विनवी सिद्धासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ विस्तारावी जी कृपेंसीं ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ १ ॥ आर्त झालों मी तृषेचा ॥ घोट भरवीं गा अमृताचा ॥ प्रताप वर्णुनी श्रीगुरूचा ॥ माझें मन निववीं वेगीं ॥ २ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ जों जों मज तूं पुससी ॥ संतोष होतो मानसीं ॥ श्रीगुरुचरित्र आठवितां ॥३॥ तुज करितां आम्हांसी ॥ लाभ जाहला परियेसीं ॥ आठविली कथा सुरसी ॥ विचित्र एक झालें असे ॥ ४ ॥ चरित्र मागें सांगितलें ॥ जें भक्तानें द्रव्य आणिलें ॥ स्वामीं तें नाहीं अंगिकारिलें ॥ समाराधना करा म्हणती ॥ ५ ॥ नित्य समाराधना देख ॥ करीत होते भक्त अनेक ॥ कधीं न होय आराणूक ॥ ऐसा दिवस एक नाहीं ॥ ६ ॥ ऐसें असतां एके दिवशीं ॥ दुर्बळै द्विज आला परियेसीं ॥ असे काश्यप गोत्र त्यासी ॥

१ भ्रमशांति. २ दरिद्री.

नाम तयाचें भास्कर ॥ ७ ॥ अतिक्षीण तो ब्राह्मण ॥ आला दर्शना म्हणोन ॥ साष्टांग नमस्कार करून ॥ भक्तिपूर्वक विनविलें ॥ ८ ॥ ते दिवसीं भक्तजन ॥ करीत होते समाराधन ॥ उठविती तया ब्राह्मणा ॥ भोजन करा म्हणोनि ॥ ९ ॥ संकल्प करोनि तो ब्राह्मण ॥ गुरुभिक्षा करीन आपण ॥ सर्वं सोपस्कार घेऊन ॥ आला होता परियेसा ॥ १० ॥ त्रिवर्गांपुरते देख ॥ स्वल्प होते तंडुल कणिक ॥ वरकड त्या प्रामाणिक ॥ असे सोपस्कार त्यापासीं ॥ ११ ॥ सर्व असे वस्त्रीं बांधिलें ॥ नेऊनि मठांत ठेविलें ॥ भक्तें आपणासी बोलाविलें ॥ म्हणोनि गेला भोजनासी ॥ १२ ॥ भोजन करितां झाली निशी ॥ आपण आला मठासी ॥ गांठोडी ठेविली आपुल्या उशीं ॥ मग निद्रा करी देखा ॥ १३ ॥ नित्य घडे ऐसें तयासी ॥ भक्त येती समाराधनेसी ॥ आराणूक होय त्यासी ॥ नित्य जेवी

१ साहित्य. २ प्रमाणें.

समाराधनीं ॥ १४ ॥ समस्त लोक त्यासी हांसती ॥ पहा हो समाराधनेची आयंती ॥ घेऊनि आला अतिभक्तीं ॥ आपण जेवी समाराधनीं ॥ १५ ॥ एकासी न होय पुरतें अन्न ॥ श्रीगुरुशिष्य बहूत जाण ॥ काय करील हा ब्राह्मण ॥ समाराधना करीन म्हणतो ॥ १६ ॥ लाज न वाटे तया कैसी ॥ समाराधना म्हणावयासी ॥ विनोदें करिताती ब्राह्मणासी ॥ तूं आजि करीं माधुकरी ॥ १७ ॥ नाना प्रकारें त्या ब्राह्मणासी ॥ विनोद करिती परियेसीं ॥ मासत्रय ऐशिया विधींसीं ॥ क्रमिलें तेथें ब्राह्मणें ॥ १८ ॥ नित्य होतसे समाराधना ॥ त्यांचे घरीं जेवी आपण ॥ गांठोडी उशोसी घेऊन ॥ निद्रा करी प्रतिदिवसीं ॥१९॥ मासत्रय क्रमिलियावरी ॥ समस्त मिळोनि द्विजवरीं ॥ परिहासें करितां परोपरी ॥ श्रीगुरुमूर्तीनें ऐकिलें ॥ २० ॥ बोलाविती त्या ब्राह्मणासी ॥ आजि भिक्षा करावयासी ॥

१ तयारी. २ श्रद्धा. ३ चेष्टा

स्वयंपाक करीं वेगेंसीं ॥ श्रीगुरु म्हणती कृपासिंधु ॥ २१ ॥ ऐकोनियां श्रीगुरूच्या बोला ॥ संतोष अपार द्विजासी झाला ॥ चरणावरी माथा ठेविला ॥ हर्षें गेला आयतीसी ॥ २२ ॥ आणिलें द्वय शेर घृता ॥ शाका दोनी त्यापुरत्या ॥ स्नान करूनि शुचिर्भूता ॥ स्वयंपाक केला तये वेळीं ॥ २३ ॥ समस्त ब्राह्मण तये वेळीं ॥ मिळोन आले श्रीगुरूजवळी ॥ म्हणती आमुची आली पाळी ॥ यावनाल अन्न घरीं ॥ २४ ॥ नित्य होतसे समाराधन ॥ आम्ही जेवितों मिष्टान्न ॥ कैंचा आला ब्राह्मण ॥ आजि समाराधना राहिली ॥२५॥ श्रीगुरु म्हणती तयांसी ॥ नका जाऊं आपुल्या घरांसी ॥ शीघ्र जावें स्नानासी ॥ येथेंचि जेवा तुम्हीं आज ॥ २६ ॥ ब्राह्मण मनीं विचारिती ॥ मठीं असे सामग्री आयती ॥ स्वयं-पाक आतां करविती ॥ आम्हां निरोपिती याचि गुणें ॥ २७ ॥ समस्त

१ करितां.

गेले स्नानासी ॥ श्रीगुरु बोलती ब्राह्मणासी ॥ शीघ्र करीं गा होईल निशी ॥ ब्राह्मण अपार सांगितले ॥ २८ ॥ स्वयंपाक झाला तत्क्षण ॥ सांगतसे श्रीगुरूसी ब्राह्मण ॥ श्रीगुरु निरोपिताती जाय धांवोन ॥ ब्राह्मण समस्त पाचारीं ॥ २९ ॥ ब्राह्मण गेले गंगेसी ॥ पाचारितसे ब्राह्मण त्यांसी ॥ स्वामी बोलाविती तुम्हांसी ॥ शीघ्र यावें म्हणोनियां ॥ ३० ॥ ब्राह्मण म्हणती विप्रांसी ॥ स्वयंपाक करावया होय निशी ॥ तुवां शीघ्र श्रीगुरूसी ॥ भिक्षा करीं गा जाय वेगीं ॥ ३१ ॥ ऐसें ऐकोनि ब्राह्मण ॥ गेला श्रीगुरूजवळी आपण ॥ म्हणोन न येती ब्राह्मण ॥ रात्रीं आपण जेवूं म्हणती ॥ ३२ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ नेम असे आजि आम्हांसी ॥ सहपंक्तीनें ब्राह्मणांसी ॥ जेवूं आम्ही निर्धारीं ॥ ३३ ॥ ब्राह्मणांसहित आम्हांसी ॥ जेवूं वाढीं गा परियेसीं ॥ जरी तूं अंगिकार न करिसी ॥ न जेवूं तुझे घरीं आम्ही ॥ ३४ ॥ ब्राह्मण म्हणे श्रीगुरूसी ॥ जो

निरोप द्याल मजसी ॥ तोचि निरोप माझे शिरसी ॥ ब्राह्मणांसहित जेवूं घालीन ॥ ३५ ॥ ब्राह्मण मनीं विचारी ॥ श्रीगुरु असती पुरुषावतारी ॥ न कळे बोले कवणेंपरी ॥ आपुलें वाक्य सत्य करितील ॥ ३६ ॥ मग काय करी तो ब्राह्मण ॥ विनवीत असे कर जोडून ॥ मज न येती ब्राह्मण ॥ विनोद करिती माझ्या बोला ॥३७॥ श्रीगुरु आणिक शिष्यांसी ॥ निरोपिती जावें वेगेंसीं ॥ बोलावूनि आणावें ब्राह्मणांसी ॥ भोजन करा म्हणोनियां ॥ ३८ ॥ शिष्य गेले धांवत ॥ समस्त ब्राह्मणांतें बोलावित ॥ स्नानें करोनि आले त्वरित ॥ श्रीगुरु-मठाजवळिक ॥३९॥ श्रीगुरु निरोपिती तयांसी ॥ पत्रावळी करा वेगेंसीं ॥ जेवा आज सहकुटुंबेसीं ॥ ब्राह्मण करितो समाराधना ॥ ४० ॥ चारी सहस्र पत्रावळी ॥ कराव्याँ तुम्ही तात्काळीं ॥ उभा होता ब्राह्मण जवळी ॥ तयासी स्वामी निरोपिती ॥४१॥

१ आज्ञा. २ दुसऱ्या. ३ मांडाव्या.

या समस्त ब्राह्मणांसी ॥ विनंति करा तुम्ही ऐसी ॥ तुम्हीं यावें सहकुटुं-
बेसीं ॥ आपण करितों समाराधना ॥ ४२ ॥ श्रीगुरूचा निरोप घेऊन ॥
विनवीतसे तो ब्राह्मण ॥ द्विज म्हणती हांसोन ॥ काय जेवा म्हणतोसि
आम्हां ॥४३॥ आम्हां इतुकिया ब्राह्मणांसी ॥ एकेक शित न ये वांट्यासी ॥
आमंत्रण सांगावया न लाजसी ॥ विनंति करितोसि ब्राह्मणा ॥ ४४ ॥
वृद्ध ब्राह्मण ऐसें म्हणती ॥ निंदा न करावी गुरु ऐकती ॥ जैसें श्रीगुरु
निरूपिती ॥ तैसें बोलती ब्राह्मण ॥ ४५ ॥ हो कां बरवें बरवें म्हणती ॥
सर्व पत्रावळी करिती ॥ ब्राह्मण श्रीगुरुपूजा त्वरिती ॥ करिता झाला उप-
चारें ॥ ४६ ॥ मनःपूर्वक करी भक्ति ॥ बरवी केली मंगळ आरती ॥ तेणें
श्रीगुरु संतोषती ॥ ठाय घाला म्हणती वेगें ॥ ४७ ॥ स्वयंपाक आणूनि
आपुल्या जवळी ॥ ठेवीं म्हणती तये वेळीं ॥ आणोनियां तात्काळीं ॥
श्रीगुरूजवळीं ठेविला ॥ ४८ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ आमुचें वस्त्र

घेऊनि अन्नासी ॥ झांकोनि ठेवीं आम्हापासीं ॥ देती वस्त्र त्याजवळी ॥ ४९ ॥ झांकिलें वस्त्र अन्नावरी ॥ कमंडलुउदक घेऊनि करीं ॥ श्रीगुरु प्रोक्षिती अन्नावरी ॥ अभिमंत्रोनि तये वेळीं ॥ ५० ॥ मग म्हणती ब्राह्मणासी ॥ उघडूं नको अन्नासी ॥ काढूनि नेऊनी समस्तांसी ॥ वाढीं वेगीं अन्नातें ॥ ५१ ॥ तूप घालिती घटांत ॥ ओतूनि घेऊनि आणिकांत ॥ वाढीं वेगीं ऐसें म्हणत ।' निरोप देती श्रीगुरु ॥ ५२ ॥ ठाव घातले समस्तांसी ॥ वाढितसे परियेसीं ॥ लोक पहाती कौतुकासी ॥ महदाश्चर्य म्हणताती ॥ ५३ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणांसी ॥ वाढा उठा त्वरेंसीं ॥ आणिक उठिले बहुतेसी ॥ वाढूं लागले तये वेळीं ॥ ५४ ॥ भरोनि नेती जितुकें अन्न ॥ पुनः मागुती परिपूर्ण ॥ घृत भरलें असे पूर्ण ॥ घट ओतूनि नेताती ॥ ५५ ॥ वाढिलें समस्त पंक्तीसी ॥ सहपंक्तीं श्रीगुरूसी ॥ जेविताती अतिहर्षी ॥ द्विजवर पुसतसे ॥ ५६ ॥ जें जें मागती तें वाढा



[ अ० ३८ ] घृत असें आपुले करीं । वाढितसे महापुरीं । विप्र म्हणती पुरे करीं । आकंठमर्यादा जेविलों ॥ ५८ ॥

म्हणत ॥ परिपूर्ण जेवा असें प्रार्थित ॥ भागलेत क्षुधाक्रांत ॥ क्षमा करणें म्हणतसे ॥ ५७ ॥ घृत असे आपुले करीं ॥ वाढितसे महापुरीं ॥ विप्र म्हणती पुरे करीं ॥ आकंठमर्यादा जेविलों ॥ ५८ ॥ भक्ष्य परमान्न[1] पत्र शाका ॥ ब्राह्मण वाढितातीं अनेका ॥ शर्करा लवण दधि शाका ॥ अनेकपरी जेविले ॥ ५९ ॥ तृप्त जाहले ब्राह्मण देखा ॥ हस्तप्रक्षालन करिती ऐका ॥ उच्छिष्टें काढिताती तात्काळिका ॥ आश्चर्य म्हणती तये वेळीं ॥ ६० ॥ तांबूल देती समस्तांसी ॥ गुरु बोलावूनि म्हणती त्यांसी ॥ पाचारा[2] आपुल्या कलत्रपुत्रांसी[3] ॥ समस्त येऊनि जेविती ॥ ६१ ॥ आलें विप्रकुळ समस्त ॥ जेवून गेलें पंचामृत ॥ श्रीगुरु मागुती निरोपित ॥ शूद्रादि ग्रामलोकां पाचारा ॥ ६२ ॥ त्यांच्या स्त्रियापुत्रांसहित ॥ बोलावीं शीघ्र ऐसें म्हणत ॥ पाचारिल्या समस्त येत ॥ जेवुनी गेलीं तये वेळीं

१ उत्तम पक्वान्न. २ बोलावा. ३ बायकामुलांना.

॥ ६३ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणांसी ॥ आतां कोण उरले ग्रामवासी ॥ ते सांगती स्वामियासी ॥ अंत्यज जाती उरली असे ॥ ६४ ॥ पाचारावें समस्तांसी ॥ अन्न वाढून द्यावें तयांसी ॥ जितुकें मागती तृप्तीसी ॥ जितुकें द्यावें अन्न वेगीं ॥ ६५ ॥ तेही तृप्त झाले देखा ॥ प्राणिमात्र नाहीं भुका ॥ सांगती श्रीगुरु द्विजलोकां ॥ डांगोरा¹ पिटा गांवांत ॥ ६६ ॥ कोणी असती क्षुधाक्रांत ॥ तयांसी पाचारावें त्वरित ॥ ऐसें श्रीगुरु निरोपित ॥ हिंडती ग्रामीं तये वेळीं ॥ ६७ ॥ प्राणिमात्र नाहीं उपवासी ॥ सर्व जेवले परियेसीं ॥ मग निरोपित त्या द्विजासी ॥ भोजन तुवां करावें ॥ ६८ ॥ श्रीगुरु निरोपें भोजन केलें ॥ मागुती जाऊनि अन्न पाहिलें ॥ आपण जितुकें होतें केलें ॥ तितुकें अन्न उरलें असे ॥ ६९ ॥ ऐकोनि श्रीगुरु म्हणती ॥ घेउनि जावें अन्न त्वरिती ॥ घालावें जळीं जळचरें खाती ॥

¹ दंवडी

तृप्त होती तींही जीवनीं ॥ ७० ॥ ऐसें तया दिवसीं विचारिती ॥ चारी सहस्र झाली मिती[1] ॥ भूमीवरी झाली ख्याति ॥ लोक म्हणती आश्चर्य ॥ ७१ ॥ इतुकें झालियावरी ॥ श्रीगुरु द्विजातें पाचारी ॥ वर देती दरिद्र दुरी ॥ पुत्रपौत्र होती तुज ॥ ७२ ॥ समस्त तटस्थ झाले लोक ॥ म्हणती देखिलें आजि कौतुक ॥ अन्न केलें होतें स्वल्पएक ॥ चारी सहस्र केवीं जेविले ॥ ७३ ॥ एक म्हणती श्रीगुरु-करणी ॥ स्मरली असेल अन्नपूर्णी ॥ अवतारपुरुष परिपूर्णी ॥ झाला नृसिंहसरस्वती ॥ ७४ ॥ एक म्हणती अपूर्व देखिलें ॥ पूर्व कथानक होतें ऐकिलें ॥ पांडवगृहीं दुर्वास गेले ॥ ऋषीश्वरांसमवेत ॥७५॥ सत्त्वभंग होईल म्हणोन ॥ कृष्ण आला ठाकून[2] ॥ तेणें केलें अन्न पूर्ण ॥ दुसरें आजी देखिलें ॥ ७६ ॥ नर दिसे तो दंड-धारी ॥ सत्य त्रिमूर्ति अवतारी ॥ न कळे महिमा असे अपारी ॥ म्हणती

१ गणती. २ धांवून.

लोक अनेक ॥७७॥ यातें नर जे म्हणती ॥ ते जाती अधोगति ॥ वर्णा-
वया आम्हां नाहीं मति ॥ परब्रह्ममूर्ति श्रीगुरु ॥ ७८ ॥ नव्हे हा जरी
ईश्वर ॥ केवीं केलें अन्नपूर ॥ होतें तीन अडीच शेर ॥ चारी सहस्र जेविले
केवीं ॥ ७९ ॥ आणिक एक नवल झालें ॥ आम्हीं समस्तीं देखिलें ॥
प्रेताचें संजीवन केलें ॥ शुष्क काष्ठासी आले पल्लव ॥ ८० ॥ आणिक
ऐका त्याची महिमा ॥ कोणाची देऊं आतां उपमा ॥ कुमसीस होता त्रिवि-
क्रमा ॥ तयासी दाखविलें विश्वरूप ॥८१॥ ग्रामांत होती वांझ महिषी ॥
क्षीर काढिलें भिक्षेसी ॥ वेद म्हणविले पतितमुखासी ॥ अभिमंत्रिता
श्रीगुरूंनीं ॥८२॥ आणिक झालें एक नवल ॥ कुष्ठी आला विप्र केवळ ॥
दर्शनमात्रें झाला निर्मळ ॥ आम्हीं देखिला दृष्टीनें ॥ ८३ ॥ विणकरी
होता एक भक्त ॥ तयासी दाखविला श्रीशैल्यपर्वत ॥ काशीक्षेत्र क्षण न
लागत ॥ एका भक्तासी दाखविलें ॥ ८४ ॥ आणिक अपार चरित्रें ॥

सांगतां आहेत अपारें ॥ क्षितीवरी समस्त दैवतें ॥ तयाचें नव्हे सामर्थ्य ॥ ८५ ॥ समस्त देवातें आराधितां ॥ आयासें होय मनकाम्यता ॥ दर्शनमात्रें गुरुनाथा ॥ सकळाभीष्टें होताती ॥ ८६ ॥ ऐसें म्हणती विप्रलोक ॥ अपूर्व झालें कौतुक ॥ ख्याति ऐकती समस्त लोक ॥ येती अनेक दर्शना ॥ ८७ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ श्रीगुरुचरित्र ऐसें परियेसीं ॥ याचि निमित्तें बहुवसीं ॥ शिष्य झाले श्रीगुरूचे ॥ ८८ ॥ नाना राष्ट्रींचे भक्त येती ॥ श्रीगुरूची सेवा करिती ॥ अंतःकरणीं एकचित्तीं ॥ भजणारांसी प्रसन्न ॥ ८९ ॥ गंगाधराचा सुत ॥ सरस्वती असे विनवित ॥ जनहो ऐका तुम्ही समस्त ॥ भजा भजा हो श्रीगुरूसी ॥ ९० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ अन्नपूर्ति गुरु करीत ॥ चार सहस्र जेवित ॥ अष्टत्रिंशत्तमोऽध्याय हा ॥ ९१ ॥ इति श्रीगुरुचरित्रे श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे अन्नपूर्तिकद्विजचतुःसहस्रभोजनं नाम अष्टत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३८ ॥ ओंवी संख्या ॥ ९१ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व वर्तलें ऐका ॥ साठ वर्षीं वांझेसि एका ॥ कन्या-पुत्र झालीं परियेसा ॥ १ ॥ आपस्तंब-शाखेसी ॥ ब्राह्मण एक परियेसीं ॥ शौनकगोत्री प्रवरेसी ॥ नाम तयाचें सोमनाथ ॥ २ ॥ गंगा नामें तयाची पत्नी ॥ पतिव्रताशिरोमणि ॥ वेद-शास्त्र जाणे सगुणी ॥ असतीं झालीं उभयतां ॥ ३ ॥ वर्षें झालीं साठ तियेसी ॥ पुत्र नाहीं तिचे कुशीं ॥ वांझ म्हणोनि ख्याति ऐसी ॥ होती तया गाणगापुरीं ॥ ४ ॥ पतिसेवा निरंतरीं ॥ करीतसे भक्तिपुरस्सरीं ॥ नित्य नेम असे नारी ॥ गुरुदर्शना येत असे ॥ ५ ॥ नीरांजन प्रतिदि-वसीं ॥ आणोनि करी श्रीगुरूसी ॥ येणेंपरी बहुत दिवसीं ॥ वर्तत होती परियेसा ॥ ६ ॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥ संतुष्ट झाले श्रीगुरुमुनि ॥ पृच्छा करिती [1]हांसोनि ॥ तया द्विजस्त्रियेसीं ॥ ७ ॥ श्रीगुरु पुसती तियेसी ॥

[1] आश्चर्यकारक.

काय अभीष्ट असे मानसीं ॥ आणित्येसी प्रतिदिवसीं ॥ नीरांजन परोपरी ॥ ८ ॥ तुझ्या मनीं अभीष्ट कोण ॥ त्वरित सांग विस्तारोन ॥ सिद्धि पाववील नारायण ॥ गौरीरमण गुरुप्रसादें ॥ ९ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ करी साष्टांग नमन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ निपुत्रिका मी लोकनिंद्य ॥ १० ॥ पुत्राविणें स्त्रियेसी ॥ न पाहावें तिच्या मुखासी ॥ पापरूपी महादोषी ॥ म्हणती मातें स्वामिया ॥ ११ ॥ जिये पोटीं नाहीं बाळ ॥ तिचा जन्म निष्फळ ॥ वाट पाहतीं उभयकुळ ॥ बेचाळिस पितृ-लोकीं ॥ १२ ॥ पितर चिंतती मनांत ॥ म्हणती एखादे समयीं वंशांत ॥ पुत्र झाल्या आम्हां हित ॥ तो उद्धरील सकळांतें ॥ १३ ॥ पुत्रावेगळें जें घर ॥ तें सदा काळीं अघोर ॥ अरण्य नाहीं तयास दूर ॥ यथारण्यं तथा गृहं ॥ १४ ॥ नित्य गंगास्नानासी ॥ आपण जातसें परियेसीं ॥ घेऊनि येती बाळकांसी ॥ समस्त स्त्रिया कौतुकें ॥१५॥ कडिये घेऊनियां बाळा ॥

खेळविती स्त्रिया सकळा ॥ तैसें नाहीं माझे कपाळा ॥ मंदभाग्य असें देखा ॥ १६ ॥ जळो माझें वक्षस्थळ ॥ कडे घ्यावया नाहीं बाळ ॥ जन्मोनियां संसारीं निष्फल ॥ नव्हें पुरुष अथवा सती ॥ १७ ॥ पुत्रपौत्र असती जयांसी ॥ परलोक लाभे तयांसी ॥ अधोगति निपुत्रिकासी ॥ लुप्तपिंड होय देखा ॥ १८ ॥ आतां पुरे जन्म मज ॥ साठी वर्षें झालीं सहज ॥ आम्हां आतां वर दीज ॥ उत्तम जन्म पुढें होय ॥ १९ ॥ पुत्रवंती व्हावें आपण ॥ अंतःकरणीं वासना पूर्ण ॥ ऐसा वर द्यावा म्हणोन ॥ विनवीतसे तये वेळीं ॥ २० ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ पुढील जन्म जाणे कवण ॥ तूतें कैचें स्मरण सांग ॥ २१ ॥ नित्य आरती आम्हांसी ॥ भक्तिपूर्वक अहर्निशीं ॥ करिता झालों संतोषी ॥ कन्या-पुत्र तूतें होती ॥ २२ ॥ इहजन्मीं तूतें जाण ॥ कन्या पुत्र सुल-

१ दुर्दैवी. २ नरकमावि

क्षण ॥ होती निश्चयें मानीं वचन ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ २३ ॥ श्रीगुरूचें वचन ऐकोनि ॥ पोलवीं गांठ बांधोनि ॥ विनवीतसे कर जोडूनि ॥ ऐकें स्वामी कृपासिंधू ॥ २४ ॥ साठी वर्षें जन्मासी ॥ झालीं स्वामी परियेसीं ॥ होत नाहीं विटाळसी ॥ मातें कैंचे पुत्र होती ॥ २५ ॥ नाना व्रतें नाना तीर्थें ॥ मी हिंडलें पुत्रार्थें ॥ अनेक ठायीं पूजिलीं दैवतें ॥ मनोभावें स्वामिया ॥ २६ ॥ लोक सांगती मजलागीं जाण ॥ कराव्या अश्वत्थाप्रदक्षिणा ॥ तेणें पुरतील मनकामना ॥ होतील पुत्र म्हणती मज ॥ २७ ॥ चिरकाळ अश्वत्थाला ॥ सेवा करितां जन्म गेला ॥ विश्वास आपण बहु केला ॥ पुत्र होतील म्हणोनि ॥ २८ ॥ साठी वर्षें येणेंपरी ॥ कष्ट केले अपरंपारी ॥ सेवा करीतसें अद्यापिवरी ॥ अश्वत्थासी प्रदक्षिणा ॥ २९ ॥ पुत्र न होती या जन्मीं ॥ पुढें होतील ऐसिया कामीं ॥ सेवा

१ पदराला

करीतसें मी स्वामी ॥ अश्वत्थाची परियेसा ॥ ३० ॥ आतां स्वामी प्रसन्न होसी ॥ इहजन्मीं पुत्र देसी ॥ अन्यथा न होय बोलासी ॥ तुमच्या स्वामी नरहरी ॥ ३१ ॥ स्वामींनीं दिधला मातें वर ॥ माझे मनीं हाचि निर्धार ॥ हांसें न करी स्वामी गुरुवर ॥ शकुनगांठी बांधिली म्यां ॥ ३२ ॥ पुढील जन्म काम्यासी ॥ करीतसें सेवा अश्वत्थासी ॥ स्वामी आतांच वर देशी ॥ इहजन्मीं कन्या पुत्र ॥ ३३ ॥ अश्वत्थसेवा बहुत दिवसीं ॥ करितां झालें मी प्रवासी ॥ काय होईल आम्हांसी ॥ अश्वत्थ सेवित्यें मूर्खपणें ॥ ३४ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ अश्वत्थसेवा महापुण्य ॥ वृथा न होय परियेसीं ॥ ३५ ॥ निंदा न करीं अश्वत्थासी ॥ अनंत पुण्य परियेसीं ॥ सेवा करीं वो आम्हांसरसी ॥ तूतें पुत्र होतील ॥ ३६ ॥ आतां तुमचें वचन धरीं ॥ नित्य जाई संगमातीरीं ॥ अमरजा वाहे निरं-

१ कष्टी.

तरीं ॥ भीमरथीसमागमें ॥ ३७ ॥ तेथें अश्वत्थ असे गहन ॥ करितों आम्ही अनुष्ठान ॥ सेवा करीं एकमन ॥ आम्हांसहित अश्वत्थाची ॥३८॥ अश्वत्थाचें महिमान ॥ सांगेन ऐका परिपूर्ण ॥ अश्वत्थनाम नारायण ॥ आमुचा वास तेथें असे ॥ ३९ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ विनवीतसे कर जोडून ॥ अश्वत्थवृक्षाचें सेवन ॥ विस्तारोनि सांगा म्हणे ॥ ४० ॥ कैसें महात्म्य असे तयाचें ॥ स्वामी निरोपावें मज साचें ॥ स्थिरत्व[1] होय मनाचें ॥ सेवा करीन भक्तीनें ॥ ४१ ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ अश्वत्थवृक्ष तूं निंदिसी ॥ सांगतां महिमा अपारेसी ॥ समस्त देव तेथें असती ॥ ४२ ॥ अश्वत्थाचें महिमान ॥ ब्रह्मांडपुराणीं निरूपण ॥ नारदमुनीतें विस्तारोन ॥ ब्रह्मदेवें सांगितलें ॥ ४३ ॥ ब्रह्मकुमार नारदमुनि ॥ ज्याचें गमन त्रिभुवनीं ॥ ब्रह्मयासी पुसोनि ॥ आला ऋषि आश्रमासी ॥ ४४ ॥

१ समाधान.

नारदातें देखोनि ॥ अर्घ्यपाद्य देवोनि ॥ पूजा केली उपचारोनि ॥ पुसते झाले तयेवेळीं ॥ ४५ ॥ ऋषि म्हणती नारदासी ॥ विनंति ऐक परियेसीं ॥ अश्वत्थमाहिमा आहे कैसी ॥ विस्तारावी स्वामिया ॥ ४६ ॥ ऋषिवचन ऐकोनि ॥ सांगतसे नारदमुनि ॥ गेलों होतों आजिच्या दिनीं ॥ ब्रह्म-लोका हिंडत ॥ ४७ ॥ आपणं पुसिलें ब्रह्मयासी ॥ अश्वत्थमहिमा आहे कैसी ॥ समस्त मानिती तयासी ॥ विष्णुरूप म्हणोनि ॥ ४८ ॥ ऐसा वृक्ष असे जरी ॥ सेवा करिजे कवणेंपरी ॥ कैसी महिमा विस्तारीं ॥ निरो-पावी दातारा ॥ ४९ ॥ ब्रह्मा सांगे आम्हांसी ॥ अश्वत्थमुळीं आपणासी ॥ मध्ये वांस हृषीकेशी ॥ अग्नि रुद्र वसतसे ॥ ५० ॥ शाखापल्लव-अधि-ष्ठानी ॥ दक्षिण शाखे शूलपाणि ॥ पश्चिम शाखे विष्णु निर्गुणी ॥ आपण उत्तरे वसतसे ॥ ५१ ॥ इंद्रादि देव परियेसीं ॥ वसती पूर्वशाखेसी ॥

१ रहाणें.

आदित्य देव अहोर्निशीं ॥ समस्त शाखे वसती जाणा ॥ ५२ ॥ गोब्राह्मण समस्त ऋषि ॥ वेदादि यज्ञ परियेसीं ॥ समस्त मूळांकुरेंसी ॥ असती देखा निरंतर ॥ ५३ ॥ समस्त नदीतीर्थें देखा ॥ समस्त सागर लवणादिका ॥ वसती जाणा पूर्व शाखा ॥ ऐसा अश्वत्थ वृक्ष असे ॥ ५४ ॥ अकारशब्द मूळस्थान ॥ स्कंध शाखा उकार जाण ॥ फळ पुष्प मकार वर्ण ॥ अश्वत्थ ऐसा ओंकाररूपी ॥ ५५ ॥ एकादश रुद्रादिक ॥ अष्ट वसु आहेत ऐक ॥ जे स्थानीं त्रैमूर्ति देख ॥ समस्त देव तेथें वसती ॥ ५६ ॥ ऐसा अश्वत्थनारायण ॥ महिमा वर्णूं शके कवण ॥ कल्पवृक्ष याचि कारण ॥ ब्रह्मा म्हणे नारदासी ॥ ५७ ॥ नारद म्हणे ऋषींसी ॥ त्रिमूर्ति असे वृक्षापासीं ॥ किती वर्णूं त्याचे महिमेसी ॥ भजतां कार्यसिद्धि त्वरित होय ॥ ५८ ॥ ऐकोनियां समस्त ऋषि ॥ विनविताती नारदासी ॥ आचारावया विधि

१ रात्रंदिवस.

कैसी ॥ कवणेंपरी भजावें ॥ ५९ ॥ पूर्वीं आम्हीं एके दिवसीं ॥ पुसिलें होतें आथर्वणासी ॥ त्याणें सांगितलें आम्हांसी ॥ अश्वत्थसेवा करावया ॥६०॥ तूं नारद ब्रह्मऋषि ॥ समस्त धर्मातें जाणसी ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ विधि-पूर्वक निवेदावें ॥६१॥ नारद म्हणे मुनिवरा ॥ सांगेन ऐका तत्परा ॥ चित्त करोनियां स्थिरा ॥ विधान असे ब्रह्मवचनीं ॥६२॥ आषाढ पौष चैत्रेसी ॥ अस्तंगत गुरु-शुक्रांसी ॥ चंद्रबळ नसल्या दिवसीं ॥ करूं नये प्रारंभ ॥६३॥ यान्य-तिरिक्त आणिक मासीं ॥ बरवा पाहोनियां दिवसीं ॥ प्रारंभ करावा उप-वासी ॥ शुचिर्भूत होऊनियां ॥ ६४ ॥ भानुसोमवारदिवसीं ॥ आतळूं नये अश्वत्थासी ॥ भृगुवार संक्रांतिदिवसीं ॥ स्पर्शों नये सर्वथा ॥ ६५ ॥ संधि रात्रीं रिक्तातिथीं ॥ पर्वणीस व्यतीपातीं ॥ दुर्दिनादि वैधृतीं ॥ अपराण्हसमयीं[1] स्पर्शूं नये ॥ ६६ ॥ अनृत द्यूत कर्मभेषी ॥ निंदा पाखांड वर्जे-

[1] तिसरे प्रहरीं

नेसी ॥ प्रातःकाळीं मौन्यें हर्षी ॥ आरंभावें परियेसा ॥ ६७ ॥ सचैल स्नान करोनि ॥ निर्मळ वस्त्र नेसोनि ॥ गंगा यमुना कलश दोनी ॥ आणोनि ठेवणें पारावरी ॥ ६८ ॥ पूजा करावी कलशांसी ॥ पुण्याहवाचनकर्मेंसीं ॥ संकल्पावें विधींसीं ॥ कांम्यार्थ आपुलें उच्चारिजे ॥ ६९ ॥ मग कलश घेवोनि ॥ सात वेळां भरोनि ॥ स्नपन करावें आणोनि ॥ अश्वत्थ वृक्षासी अवधारा ॥ ७० ॥ पुनरपि करोनियां स्नान ॥ मग करावें वृक्षस्नपन ॥ पुरुषसूक्त म्हणोन ॥ पूजा करावी षोडशोपचारें ॥ ७१ ॥ मग ध्यावी विष्णुमूर्ति ॥ अष्टभुजा आहेत विख्याती ॥ शंखचक्र उभय हस्तीं ॥ वरदहस्त असे जाणा ॥ ७२ ॥ खड्ग खेटक एके करीं ॥ धनुष्यबाणा सविस्तरी ॥ अष्टभुजीं येणेंपरी ॥ आयुधें असतीं परियेसा ॥ ७३ ॥ पीतांबर प्रावरणं[3] ॥ सदा लक्ष्मी-सन्निधान ॥ ऐसी मूर्ति ध्याऊन ॥ पूजा करणें

१ वस्त्रासहित. २ इच्छित हेतु. ३ वस्त्र.

वृक्षासी ॥ ७४ ॥ त्रैमूर्तीचें असे स्थान ॥ शिवभक्तीविणें नाहीं जाण ॥ समस्त देवता-आवाहन ॥ षोडशोपचारें पूजावें ॥ ७५ ॥ वस्त्रें अथवा सुतासी ॥ वेष्टावें तया वृक्षासी ॥ पुनरपि संकल्पेंसीं ॥ प्रदक्षिणा कराव्या ॥ ७६ ॥ अथवा सहस्रनामेंसीं ॥ कराव्या प्रदक्षिणा हर्षीं ॥ अथवा करा मौन्येंसीं ॥ तयाचें फळ अनंत देखा ॥ ७७ ॥ मनसा वाचा कर्मेंसीं ॥ भक्तिपूर्वक भावेंसीं ॥ प्रदक्षिणा कराव्या हर्षीं ॥ पुरुषसूक्त म्हणत देखा ॥ ७८ ॥ चाले जैसी स्त्री गर्भिणी ॥ कीं उदककुंभ घेउनी ॥ तैशा महा-मंद गतींनीं ॥ प्रदक्षिणा कराव्या ॥ ७९ ॥ पदोपदीं अश्वमेध ॥ पुण्य जोडे फळप्रद ॥ प्रदक्षिणासमाप्तमध्य ॥ नमस्कार करावा ॥ ८० ॥ ब्रह्म-हत्यादि पापांसी ॥ प्रायश्चित्त नाहीं परियेसीं ॥ प्रदक्षिणा द्विलक्षांसीं ॥ ब्रह्महत्यादि पापें जातीं ॥ ८१ ॥ त्रिमूर्ति वसती जया स्थानीं ॥ फल

१ फार हळू.

काय सांगू प्रदक्षिणीं ॥ समस्त पाप होय धुणी ॥ गुरुतल्पादि दोष जाती ॥ ८२ ॥ नाना हरती व्याधि दोष ॥ प्रदक्षिणा करितां होय निःशेष ॥ कोटि ऋण असेल ज्यास ॥ परिहारेल परियेसा ॥ ८३ ॥ जरामृत्यु व्याधि-उत्पत्ति ॥ संसारताप भयें नासतीं ॥ ग्रहपीडा बाधों न शकती ॥ सहस्र प्रदक्षिणा केलिया ॥ ८४ ॥ पुत्रकाम्य असे ज्यासी ॥ पुत्र होती भरंवसीं ॥ मनो वाक्कायकर्मेंसीं ॥ एक भावें करावें ॥ ८५ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ देता होय तो अश्वत्थ ॥ पुत्रकाम्य पावती त्वरित ॥ न धरावी शंका ऋषीहो ॥ ८६ ॥ शनिवारीं वृक्ष धरोनि ॥ जप करावा मृत्युंजयनी ॥ काळमृत्यूतें जिंकोनि ॥ राहे नर अवधारा ॥ ८७ ॥ ते अपमृत्यु न पावती ॥ पूर्णायुषी होतीं निश्चितीं ॥ शनिग्रह न पीडिती ॥ प्रार्थावें अश्वत्थासी ॥८८॥ ॥ श्लोक ॥ कोणस्थको रौद्र यमश्च बभ्रुः कृष्णः शनिः पिंगल एव मंदः ॥ नित्यं स्मरेत् व्याहरते च पीडां तस्मै नमस्ते रविनंदनाय ॥ ८९ ॥ टीका ॥

शनिनामें घेवोनि ॥ उच्चारावें आपुले वदनीं ॥ बभ्रु पिंगल म्हणोनि ॥ कोणस्थ कृष्ण म्हणावें ॥ ९० ॥ अंतक यम महारौद्री ॥ मंद शनैश्वर शौरि ॥ जप करावा येणेंपरी ॥ शनिपीडा न होय ॥ ९१ ॥ ऐसें दृढ करोनि मन ॥ अश्वत्थ सेवितां कामना पूर्ण ॥ पुत्रकाम्य तत्क्षण ॥ होय निरुतें अवधारा ॥९२॥ अमावास्या गुरुवारेंसी ॥ अश्वत्थछायेंत जळासीं ॥ स्नान करितां नरासी ॥ ब्रह्महत्या पापें जाती ॥ ९३ ॥ अश्वत्थतळीं ब्राह्मणासी ॥ अन्न घालितां एकासी ॥ कोटि ब्राह्मणां परियेसीं ॥ भोजन दिल्हें फळ असे ॥ ९४ ॥ अश्वत्थतळीं बैसोन ॥ एकदां मंत्र जपतां क्षण ॥ फळ होय अनंतगुण ॥ वेदपठण केलिया ॥ ९५ ॥ नर एखादा अश्वत्थासी ॥ स्थापन करी भक्तींसीं ॥ सह बेचाळिस पितरांसी ॥ स्वर्गीं स्थापी [1]निरंतर ॥९६॥ छेदितां अश्वत्थवृक्षासी ॥ महापाप परियेसीं ॥ पितरांसहित नर-

१ स्वरित.

कासी ॥ जाय देखा तों नर ॥ ९७ ॥ अश्वत्थातळीं बैसोन ॥ होम करितां महायज्ञ ॥ अक्षय सुकृत असे जाण ॥ पुत्रकाम्य त्वरित होय ॥ ९८ ॥ ऐसें अश्वत्थमाहिमान ॥ नारदासी सांगे चतुरांनन ॥ म्हणोनि ऐकती ऋषि-जन ॥ तया नारदापासोनि ॥ ९९ ॥ नारद म्हणे ऋषीश्वरासी ॥ प्रदक्षि-णांच्या दहावे अंशीं ॥ हवन करावें परियेसीं ॥ आंगमोक्त विधीनें ॥ १०० ॥ हवनाच्या दहावे अंशीं ॥ ब्राह्मणभोजन करावें हर्षीं ॥ ब्रह्मचर्य हविष्या-न्नेंसीं ॥ व्रत आपण करावें ॥ १ ॥ येणेंपरी आचरोन ॥ मग करावें उद्या-पन ॥ शक्त्यनुसार सौवर्ण ॥ अश्वत्थवृक्ष करावा ॥ २ ॥ तो द्यावा ब्राह्म-णासी ॥ विधिपूर्वक परियेसीं ॥ श्वेतधेनु सवत्सेंसी ॥ द्यावी ब्राह्मणा-कारणें ॥ ३ ॥ वृक्षातळीं तिलराशी ॥ करावी यथाशक्तींसीं ॥ वरी झांकोनि श्वेतवस्त्रासी ॥ द्विजालागीं द्यावें ॥ ४ ॥ ऐशा अश्वत्थविधाना ॥ सांगे

१ ब्रह्मदेव. २ वेदोक्त.

नारद ऋषिजना ॥ यावरी मुनि आचरणा ॥ करूनि अभीष्ट लाधले ॥५॥ श्रीगुरु म्हणती वंध्येसी ॥ अश्वत्थमहिमा आहे ऐशी ॥ भावभक्ति असे ज्यासी ॥ त्यासी होय फलश्रुति ॥ ६ ॥ आचार करीं हो येणेंपरी ॥ संशय आतां चित्तीं न धरीं ॥ वृक्ष असे भीमातीरीं ॥ जेथें अमरजासंगम ॥ ७ ॥ तेंचि आमुचें स्थान जाण ॥ सेवा करावी एकमन ॥ होईल कामना शीघ्र पूर्ण ॥ कन्या पुत्र तुझे उदरीं ॥ ८ ॥ ऐकोनियां श्रीगुरूच्या वचना ॥ नमस्कार करी ते अंगना ॥ विनवी कर जोडोनि जाणा ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥९॥ आपण वांझ वर्षें साठी ॥ कैंचे पुत्र माझे पोटीं ॥ वाक्य असें तुमचें शेवटीं ॥ म्हणोनि आपण अंगिकारीन ॥ ११० ॥ गुरुवाक्य सुरभिसमान ॥ ऐसें सांगती वेदपुराण ॥ आतां नाहीं अनुपान ॥ करीन सेवा स्वामिया ॥ ११ ॥ चाड नाहीं अश्वत्थासी ॥ निर्धार तुमच्या

१ इच्छा. २ कामधेनु.

बोलासी ॥ सेवा करीन तुमची ऐशी ॥ म्हणोनि चरणीं लागली ॥ १२ ॥
ऐसा निरोप घेवोनि ॥ जावोनियां संगमस्थानीं ॥ षट्कुलात स्नान
करूनि ॥ सेवा करी अश्वत्थासी ॥ १३ ॥ श्रीगुरूचा निरोप जेणेंपरी ॥
तैसीच सेवा करी नारी ॥ येणेंपरी तीन रात्रीं ॥ आराधिला परियेसा
॥ १४ ॥ श्रीगुरुनिरोपें अश्वत्थासी ॥ सेवा करी रात्रंदिवसीं ॥ तिसरे
रात्रीं स्वप्न तियेसी ॥ झालें ऐका एकचित्तें ॥ १५ ॥ स्वप्नामध्यें विप्र एक ॥
येवोनि देतो तिसी भाक ॥ कार्य तुझें झालें ऐक ॥ सांगेन एक तें करीं
म्हणे ॥ १६ ॥ जावोनि गाणगापुरांत ॥ तेथें असे श्रीगुरुनाथ ॥ प्रदक्षिणा
करीं वो सात ॥ नमन करीं भक्तींसीं ॥ १७ ॥ जें काय देतील तुजसी ॥
भक्षण करीं वेगेंसीं ॥ निर्धार करीं वो मानसीं ॥ त्वरित जावें म्हणे विप्र
॥ १८ ॥ ऐसें देखोनि सुषुप्तींत ॥ सर्वांचि झाली जागृत ॥ कल्पवृक्ष असे

१ या नांवाच्या तीर्थांत. २ स्वप्नांत

अश्वत्थ ॥ कल्पिलें फळ त्वरित होय ॥१९॥ सेवा करोनि चवथे दिवशीं ॥ आली आपण मठासी ॥ प्रदक्षिणा करोनियां हर्षी ॥ नमन केलें तये वेळीं ॥१२०॥ हांसोनियां श्रीगुरुमुनि ॥ फळें देती तिसी दोनी ॥ भक्षण करीं वो संतोषोनि ॥ कार्य झालें तुझें आतां ॥ २१ ॥ भोजन करीं आतां त्वरित ॥ काम्य होईल तुझें सत्य ॥ कन्या-पुत्र दोनी सुत ॥ दिल्हें आज परियेसा ॥ २२ ॥ पारणें करोनि विधींसीं मग भक्षावें यांसी ॥ दान द्यावें ब्राह्मणासी ॥ जें कां पूर्वीं निरोपिलें ॥ २३ ॥ व्रत संपूर्ण करोनि ॥ करी दान ती भामिनी ॥ त्याच दिवशीं अस्तमानीं ॥ झाली आपण विटाळशी ॥ २४ ॥ मौनी दिवस तीनवरी ॥ हविष्यान्न भोजन करी ॥ श्वेत वस्त्र नेसोनि नारी ॥ कोणाकडे न पाहेची ॥ २५ ॥ येणेंपरी तिन्ही निशी ॥ क्रमिल्या नारीनें परियेसीं ॥ सुस्नात होवोनि चवथे दिवशीं ॥ आली श्रीगुरुदर्शना ॥ २६ ॥ पतीसमवेत येऊनि ॥ पूजा करी एकाग्रमनीं ॥

श्रीगुरु म्हणती संतोषोनि ॥ पुत्रवंती व्हावें तुवां ॥ २७ ॥ ऐसें नमुनि श्रीगुरूसी ॥ आली आपुल्या घरासी ॥ ऋतु दिधला पांचवे दिवसीं ॥ म्हणोनि कन्या परियेसीं ॥ २८ ॥ येणेंपरी ते नारी ॥ झाली ऐका गरोदरी ॥ ग्रामस्त लोक विस्मय करी ॥ काय नवल म्हणतसे ॥ २९ ॥ म्हणती पहा नवल वर्तलें ॥ वांझेसी गर्भधारण झालें ॥ सोमनाथ विप्रें भलें ॥ मनीं मानिलें सुखातें ॥ १३० ॥ सातवे मासीं ओंटी भरिती ॥ अक्षय वाणें ओंवाळिती ॥ गुरूसी विनोदावरी प्रीतीं ॥ वाणें द्यावीं म्हणतसे ॥ ३१ ॥ आठवे मासीं ते ब्राह्मण ॥ करी सीमंतविधान ॥ गुरुनिरोपें संतोषोन ॥ देववी वाणें ग्रामांत ॥ ३२ ॥ अभिनव करिती सकळ जन ॥ म्हणती वांझेसी गर्भधारण ॥ पांढरे केश म्हातारपण ॥ वाणें देतसे कौतुकें ॥ ३३ ॥ एक म्हणती गुरुप्रसाद ॥ श्रीनृसिंहमूर्ति भक्तवरद ॥ त्याची सेवा

१ आश्चर्य.

करितां आनंद ॥ लाभे चारी पुरुषार्थ ॥ ३४ ॥ त्रैमूर्तींचा अवतार ॥ झाला नृसिंहसरस्वती नर ॥ भक्तजनमनोहर ॥ प्रगटला भूमंडळीं ॥ ३५ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ स्तोत्रें करिती गुरुनायका ॥ वाणें देतसे बायकां ॥ अति उल्हास तिच्या मनीं ॥ ३६ ॥ वाणें देऊनि समस्तांसी ॥ येऊनि नमिती श्रीगुरूसी ॥ भक्तवत्सल परियेसीं ॥ आशीर्वाद देतसे ॥ ३७ ॥ संतोषोनि विप्रवनिता ॥ साष्टांग करी दंडवता ॥ नानापरी स्तोत्र करितां ॥ विनवीतसे गुरुनाथा ॥ ३८ ॥ जय जया जी परमपुरुषा ॥ तूंचि ब्रह्मा-विष्णुमहेशा ॥ तुझ्या वाक्यपरिसा ॥ सुवर्ण केला माझा देह ॥ ३९ ॥ तारावया विश्वासी ॥ म्हणोनि तूं अवतरलासी ॥ त्रैमूर्ति तूंचि होसी ॥ अन्यथा नव्हे स्वामिया ॥१४०॥ तुझी स्तुति करावयासी ॥ अशक्यता या वाचेसी ॥ अपार तुझे महिमेसी ॥ नाहीं साम्यता कृपासिंधु ॥ ४१ ॥ येणें-परी स्तोत्र करोनि ॥ श्रीगुरुचरण वंदोनि ॥ गेली निरोप घेवोनि ॥

आपुल्या गृहासी परियेसा ॥ ४२ ॥ ऐसे नवमास क्रमोनि ॥ झाली प्रसूत शुभदिनीं ॥ कन्या प्रसवली तत्क्षणीं ॥ आनंदलीं मातापिता ॥ ४३ ॥ ज्योतिषी म्हणती तये वेळीं ॥ होईल कन्या मन निर्मळी ॥ अष्टपुत्रीं वाढेल कुळी ॥ पुत्रपौत्रीं नांदेल ॥ ४४ ॥ येणेंपरी ज्योतिषीं ॥ जातक वर्तविलें परियेसीं ॥ सोमनाथ आनंदेंसीं ॥ दानधर्म करिता झाला ॥ ४५ ॥ दहा दिवस क्रमोनि ॥ सुस्नात झाली भामिनी ॥ कडिये बाळ घेवोनि ॥ आली श्रीगुरुदर्शना ॥४६॥ बाळ आणोनि भक्तींसीं ॥ ठेवी श्रीगुरुचरणापासीं ॥ नमन करी साष्टांगेंसीं ॥ एकभावेंकरोनियां ॥ ४७ ॥ आश्वासोनि श्रीगुरुमूर्ति ॥ उठीं बाळे पुत्रवंती ॥ बहुतापरी संतोषविती ॥ प्रेमभावेंकरोनिया ॥ ४८ ॥ उठोनि विनवी श्रीगुरुमूर्तीसी ॥ पुत्र न होय आमचे कुशीं ॥ सरस्वती आली घरासी ॥ बोल आपुला सांभाळिजे ॥ ४९ ॥ ऐकोनि तियेचें वचन ॥ श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ न करीं मनीं अनमान ॥ तूतें पुत्र




[अ०३९] उठोनि विनवी श्रीगुरुमूर्तीसी । पुत्र न होय आमचे कुशी । सरस्वती आली घरासी । बोल आपुला सांभाळिजे ॥१४९॥

होईल ॥१५०॥ म्हणोनि तिये कुमारीसी ॥ कडिये घेती प्रीतींसीं ॥ सांगतात समस्तांसी ॥ तये कन्येचें लक्षण ॥ ५१ ॥ पुत्र होतील बहु ईसी ॥ होईल आपण शतायुषी ॥ पुत्रपौत्र नयनेंसीं ॥ पाहील आपण अहेवपणें ॥ ५२ ॥ होईल इचा ज्ञानी पति ॥ तयातें चारी वेद येती ॥ अष्टैश्वर्यें नांदती ॥ प्रख्यात होईल भूमंडळीं ॥ ५३ ॥ होईल आपण पतिव्रता ॥ पुण्यशील धर्मरता ॥ इची ख्याति होईल बहुता ॥ समस्त ईतें वंदिती ॥ ५४ ॥ दक्षिणदेशीं महाराजा ॥ येईल इच्छा दर्शनकाजा ॥ आणिक पुत्र होईल तुझा ॥ ज्ञानवंत म्हणती गुरु ॥ ५५ ॥ येणेंपरी श्रीगुरुमूर्ति ॥ कन्यालक्षण सांगती ॥ विप्रवनिता विनयवृत्तीं ॥ पुत्र व्हावा म्हणे ती ॥ ५६ ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ पुत्र व्हावा कैसा तुजसी ॥ योग्य पाहिजे तरी तीसवर्षी ॥ अथवा मूर्ख शतायुषी पैं ॥ ५७ ॥ ऐकोनि श्रीगुरूच्या वचना ॥ विनवीतसे विप्रांगना ॥ योग्य पाहिजे पुत्र जाणा ॥

तयासी पुत्र पांच व्हावे ॥ ५८ ॥ भक्तवत्सल श्रीगुरुमूर्ति ॥ वर देती तेणें रीतीं ॥ संतोषोनि घरा जाती ॥ परमानंदें दंपत्यें ॥ ५९ ॥ पुढें तियेसी पुत्र झाला ॥ वेदशास्त्रीं विख्यात भला ॥ पांच पुत्र तो लाधला ॥ नामकरणीं श्रीगुरूच्या ॥ १६० ॥ कन्यालक्षण श्रीगुरुमूर्तीं ॥ निरोपिलें होतें जेणें रीतीं ॥ प्रख्यात नामें सरस्वती ॥ महा आनंद वर्तला ॥ ६१ ॥ यज्ञ करोनि तिचा पति ॥ दीक्षित नाम मिरवी क्षितीं ॥ चोहों राष्ट्रीं त्याची ख्याति ॥ म्हणोनि सांगे सिद्धमुनि ॥ ६२ ॥ साठ वर्षे वांझेसी ॥ पुत्र झाला परियेसीं ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ ऐसी कृपा श्रीगुरूची ॥ ६३ ॥ निर्धार असे ज्याचे मनीं ॥ तयातें वर देती तत्क्षणीं ॥ एकभावें या कारणीं ॥ भक्ति करावी श्रीगुरूची ॥ ६४ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ भजतां भावें श्रीगुरु उदार ॥ सकळाभीष्टें लाधती ॥ ६५ ॥ जो भजे श्रीगुरूसी ॥ एकभावें भक्तींसीं ॥ दैन्य काय

बाधेल त्यासी ॥ जें जें मागेल तें देईल ॥६६॥ श्रीगुरु म्हणजे कामधेनु ॥ अंतःकरणीं नको अनुमानु ॥ जें जें इच्छित भक्तजनु ॥ समस्त देईल परियेसा ॥ ६७ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ विप्रस्त्रियेसी झाला सुत ॥ तोचि कथा अद्भुत ॥ एकुणचाळिसाव्यांत निवेदिली ॥ ६८ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत श्रीनृसिंसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे वृद्धवंध्याप्रसवो नाम एकोनचत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ३९ ॥ ओंवी संख्या ॥ ६८ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ अपूर्व वर्तलें आणिक ऐका ॥ वृक्ष होता काष्ठ शुष्का ॥ विचित्र कथा ऐक पां ॥ १ ॥ गाणगापुरीं असतां श्रीगुरु ॥ आला एक कुष्ठी द्विजवरु ॥ आपस्तंब भार्गवगोत्रु ॥ नाम तयाचें नरहरि ॥ २ ॥ येवोनियां श्रीगुरुमूर्तीसीं ॥ नमन करी भक्तींसीं ॥ करी स्तोत्र बहु[1]वसीं ॥ करसंपुट जोडोनियां ॥ ३ ॥ जय जया जी गुरुमूर्ति ॥ ऐकोनि आलों तुझी कीर्ति ॥ भक्तवत्सला परं[2]ज्योती ॥ परमपुरुषा जगद्गुरु ॥ ४ ॥ आपण जन्मोनि संसारीं ॥ वृथा झालों दगडा-परी ॥ निंदा करिताती द्विजवरी ॥ कुष्ठी म्हणोनि स्वामिया ॥ ५ ॥ वाचिला वेद यजुःशाखा ॥ निंदा करिताती माझी लोका ॥ ब्राह्मणार्थीं न सांगती देखा ॥ अंगहीन म्हणोनियां ॥ ६ ॥ प्रातःकाळीं उठोनी लोक ॥ न पाहती माझें मुख ॥ तेणें होतें मनांत दुःख ॥ जन्म पुरे आतां मज ॥ ७ ॥ पाप

१ पुष्कळ. २ तेजःस्वरूप.

केलें आपण बहुत ॥ जन्मांतरीं असंख्यात ॥ तेणें हा भोग भोगित ॥ आतां न साहें स्वामिया ॥ ८ ॥ नाना तीर्थ नाना व्रत ॥ हिंडोनि आलों आचरत ॥ म्यां पूजिलें देव समस्त ॥ माझी व्याधि न वेचेची ॥ ९ ॥ आतां धरोनि निर्धारु ॥ आलों स्वामीजवळी जगद्गुरु ॥ तुझा न होतां कृपावरु ॥ प्राण आपुला त्यजीन ॥ १० ॥ म्हणोनियां निर्वाणेंसीं ॥ विनवीतसे श्रीगुरूसी ॥ एकभावें भक्तींसीं ॥ करुणा भाकी द्विजवर ॥ ११ ॥ म्हणोनि मागुती नमस्कारी ॥ नानापरी स्तुति करी ॥ लोहपरिसा भेटीपरी ॥ तुझ्या दर्शनमात्रेंसीं ॥ १२ ॥ करुणावचन ऐकोनि ॥ भक्तवत्सल श्रीगुरु मुनि ॥ निरोप देती कृपा करोनि ॥ ऐक शिष्या नामधारका ॥ १३ ॥ श्रीगुरु म्हणती द्विजासी ॥ पूर्वजन्मीं महादोषासी ॥ तुवां केलें बहुवसीं ॥ म्हणोनि कुष्ठी झालास ॥ १४ ॥ आतां सांगेन तें करीं ॥ तुझीं पापें जाती ॥

१ जात.

दुरी ॥ होशील दिव्यशरीरी ॥ एकभावें आचरावें ॥ १५ ॥ इतुकिया
अवसरीं ॥ काष्ठ एक औदुंबरीं ॥ शुष्क होतें वर्षें चारी ॥ घेवोनि आले
सर्पणासी ॥ १६ ॥ तें देखिलें श्रीगुरुमूर्ती ॥ तया विप्रा निरोप देती ॥
एकभावेंकरोनि चित्तीं ॥ घेई काष्ठ झडकरीं ॥ १७ ॥ काष्ठ घेवोनि संग-
मासी ॥ त्वरित जाय भावेंसीं ॥ संगमनाथपूर्वभागेसी ॥ भीमातीरीं रोंवीं
पां ॥ १८ ॥ तुवां जावोनियां संगमांत ॥ स्नान करोनियां त्वरित ॥ पूजा
करोनि अश्वत्थ ॥ पुनरपि जाय स्नानासी ॥ १९ ॥ हातीं घरोनियां कलश
दोनी ॥ आणीं उदक तत्क्षणीं ॥ शुष्क काष्ठा वेळ तिन्ही ॥ स्नपन करीं
मनोभावें ॥ २० ॥ ज्या दिवसीं काष्ठासी ॥ पर्णें येतील संजीवेसीं ॥ दोष
गेले तुझे परियेसीं ॥ अंग तुझें होय बरवें ॥ २१ ॥ येणेंपरी श्रीगुरुमूर्ति ॥
तया विप्रासी निरोप देती ॥ विश्वास झाला त्याचे चित्तीं ॥ धांवत¹ गेला

१ चांगलें.

काष्ठाजवळी ॥२२॥ काष्ठ उचलोनि डोईवरी ॥ घेवोनि आला भीमातीरीं ॥ संगमेश्वरासमोरी ॥ रोंविता झाला द्विजवर ॥ २३ ॥ जेणें रीतीं श्रीगुरुमूर्ति ॥ तया विप्रा निरोप देती ॥ आचरतसे एकचित्तीं ॥ भावभक्ति करोनिया ॥ २४ ॥ येणेंपरी सात दिवस ॥ द्विजें केले उपवास ॥ तया काष्ठा दोनी कलश ॥ भरोनि घाली वेळोवेळीं ॥ २५ ॥ देखोनि म्हणती सकळ जन ॥ तया विप्रा बोलावोन ॥ सांगताती विवंचून ॥ गुरुनिरोपलक्षण ॥ २६ ॥ म्हणती तूतें काय झालें ॥ शुष्क काष्ठ कां रोविलें ॥ याचें तुवां संजीवन योजिलें ॥ मग तूतें काय होय ॥ २७ ॥ यातें तूं सजीव करिसी ॥ मागुतीं काय येती पल्लव यासी ॥ ऐसें पाहिलें नाहीं भूमीसी ॥ श्रीगुरूची इच्छा कळेना ॥ २८ ॥ श्रीगुरुमूर्ति कृपासिंधु ॥ भक्तजना असे वरदु ॥ त्याची कृपा असे अगाधु ॥ समस्तांतें कृपा करी ॥२९॥ नसेल निष्कृति तुझिया

१ खुलासेवार.

पापा ॥ म्हणोनि दिधलें काष्ठ बापा ॥ वायां कष्ट करिसी कां पां ॥ तूतें श्रीगुरूंनीं निरोपिलें ॥३०॥ ऐकोन तयांचें वचन ॥ विप्रवर करी नमन ॥ गुरुवाक्य मज कामधेन ॥ अन्यथा केवीं होईल ॥३१॥ सत्यसंकल्प श्रीगुरुनाथ ॥ त्याचें वाक्य न होय मिथ्य ॥ माझे मनीं निर्धार सत्य ॥ होईल काष्ठ वृक्ष जाणा ॥ ३२ ॥ माझ्या मनीं निर्धारु ॥ असत्य न होय वाक्यगुरु ॥ प्राण वेंचीन साचारु ॥ गुरुवाक्य कारण आपणा ॥ ३३ ॥ येणेंपरी समस्तांसी ॥ विप्र सांगे परियेसीं ॥ सेवा करितो भक्तींसीं ॥ तया शुष्क काष्ठाची ॥ ३४ ॥ एके दिवशीं गुरुमूर्तीसी ॥ शिष्य सांगती परियेसां ॥ स्वामींनीं निरोपिलें द्विजासी ॥ शुष्क काष्ठा भजे म्हणोनि ॥३५॥ सात दिवस उपवासी ॥ सेवा करितो काष्ठासी ॥ एकभावें भक्तींसीं ॥ निर्धार केला गुरुवचनीं ॥ ३६ ॥ किती रीतीं आम्हीं त्यासी ॥ सांगितलें

१ खरें बोलणारा. २ खोटें.

सर्व हितासी ॥ वायां कां गा कष्ट करिसी ॥ मूर्खपणें म्हणोनि ॥ ३७ ॥ विप्र आम्हांतें ऐसें म्हणे ॥ चोड नाहीं काष्ठाविणें ॥ गुरुवाक्य मजकारणें ॥ करील आपुले बोल सांच ॥३८॥ निर्धार धरोनि मानसीं ॥ सेवा करितो काष्ठासी ॥ सात दिवस उपवासी ॥ उदक मुखीं घेत नाहीं ॥ ३९ ॥ ऐकोनि शिष्यांचें वचन ॥ निरोप देती श्रीगुरु आपण ॥ जैसा असे भाव अंतःकरण ॥ तैसी सिद्धि पावेल ॥ ४० ॥ गुरुवाक्य शिष्यासी कारण ॥ सर्वथा न होय निर्वाण ॥ जैसें भक्ताचें अंतःकरण ॥ तैशी सिद्धि पावेल ॥४१॥ याकारणें तुम्हांसी ॥ सांगेन कथा इतिहासीं ॥ सांगे सूत ऋषी-श्वरांसी ॥ स्कंदपुराणीं परियेसा ॥ ४२ ॥ गुरुभक्तीचा प्रकार ॥ पुसती सूतासी ऋषीश्वर ॥ सांगे सूत सविस्तर ॥ तेचि कथा सांगतसे ॥ ४३ ॥ सूत म्हणे ऋषीश्वरांसी ॥ गुरुभक्ति असे विशेषीं ॥ तारावया संसारासी ॥

आणिक नाहीं उपाय ॥ ४४ ॥ अयोग्य अथवा ज्ञानवंत ॥ म्हणोनि न पाहिजे अंत ॥ गुरुमूर्ति मनीं ध्यात ॥ सेवा करणें भक्तिभावें ॥ ४५ ॥ दृढ भक्ति असे जयापासीं ॥ सर्व धर्म साधती त्यासी ॥ संदेह न धरावा मानसीं ॥ एकचित्तें भजावें ॥ ४६ ॥ श्रीगुरु नर ऐसा न म्हणावा ॥ त्रैमूर्ति तोचि जाणावा ॥ गुण दोष न विचारावा ॥ म्हणावा तोचि ईश्वर ॥ ४७ ॥ येणेंपरी धरोनि मनीं ॥ जे जे भजती श्रीगुरुचरणीं ॥ प्रसन्न होय शूलपाणि ॥ तात्काळिक परियेसा ॥ ४८ ॥ श्लोक ॥ मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भेषजे गुरौ ॥ यादृशीं भावनां कुर्यात् सिद्धिर्भवति तादृशी ॥ ४९ ॥ टीका ॥ मंत्रतीर्थद्विजस्थानीं ॥ देवभक्तीं औषधगुणीं ॥ गुरूसी पाहे शिवसमानी ॥ भाविल्यासारखें फल होय ॥५०॥ म्हणे सूत ऋषीश्वरांसी ॥ गुरुभक्ति म्हणिजे आहे कैसी ॥ सांगेन साक्ष तुम्हांसी ॥ अपूर्व एक वर्तलेंसे ॥ ५१ ॥ पूर्वीं पांचाल नगरांत ॥ होता राजा सिंव्हकेत ॥ तयासी होता

एक सूत ॥ नाम तयाचें धनंजय ॥ ५२ ॥ एके दिवसीं राजसुत ॥ गेला पारधीसीं अरण्यांत ॥ तेथें नसती मनुष्यमात्र ॥ उदकवर्जित स्थळांसीं ॥५३॥ राजकुमार तृषाक्रांत ॥ हिंडतसे अरण्यांत ॥ संगें होते शबरसुत ॥ श्रमले बहुत अवधारा ॥५४॥ तेथें एक शबरसुत ॥ हिंडत होता वनांत ॥ देखता झाला अवचित ॥ जीर्ण एक शिवालय ॥ ५५ ॥ भिन्न[1]लिंग तया स्थानीं ॥ पडिलें[2] होतें मेदिनीं[3] ॥ शबरें घेतलें उचलोनि ॥ म्हणे लिंग बरवें असे ॥५६॥ हातीं घेवोनि लिंगासी ॥ पहात होता शबर हर्षी ॥ राजसुत तया संधीसी ॥ आला तया जवळिक ॥ ५७ ॥ राजकुमार म्हणे तयासी ॥ भिन्न लिंग काय करिसी ॥ पडिलीं असतीं भूमीसी ॥ लिंगाकार अनेक ॥ ५८ ॥ शबर म्हणे राजसुतातें ॥ माझ्या मनीं ऐसें येतें ॥ लिंगपूजा करावयातें ॥ म्हणोनि घेतलें परियेसा ॥ ५९ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ राजपुत्र सुहास्यवदन ॥ म्हणे पूजीं एकमनें ॥ लिंग बरवें असे सत्य ॥ ६० ॥ ऐसें म्हणतां राजकुमार ॥

१ भिन्न. २ फुटलेलें. ३ जमिनीवर.

तयासी करी नमस्कार ॥ कोण विधि पूजाप्रकार ॥ निरोपावें म्हणतसे ॥६१॥ तुवां व्हावें मातें गुरु ॥ मी तंव असें शबरु ॥ नेणें पूजेचा प्रकारु ॥ विस्तारावें म्हणतसे ॥ ६२ ॥ राजपुत्र म्हणे तयासी ॥ न्यावा पाषाण घरासी ॥ पूजा करावी भक्तींसीं ॥ पत्रपुष्पें अर्चोनियां ॥ ६३ ॥ दंपत्यें दोघें जण ॥ पूजा करणें मनें पूर्ण ॥ हेंचि लिंग गिरिजारमण ॥ म्हणोनि मनीं निर्धारीं पां ॥ ६४ ॥ नानापरी पुष्पजाती ॥ आणाव्या तुवां शिवाप्रती ॥ धूप दीप नैवेद्य आरती ॥ नैवेद्यासी भस्म जाण ॥ ६५ ॥ भस्म असेल जें स्मशानीं ॥ आणावें तुवां प्रतिदिनीं ॥ द्यावा नैवेद्य सुमनीं ॥ प्रसाद आपण भक्षावा ॥ ६६ ॥ आणिक जें जें जेवी आपण ॥ तोही द्यावा नैवेद्य जाण ॥ ऐसें आहे पूजाविधान ॥ म्हणोनि सांगे राजकुमारु ॥ ६७ ॥ येणेंपरी राजकुमारु ॥ तया शबरा झाला गुरु ॥ विश्वासें केला निर्धारु ॥ शबरें आपुले मनांत ॥ ६८ ॥ संतोषोनि शबर देखा ॥ नेलें

लिंग गृहांतिका ॥ स्त्रियेसी सांगे कौतुका ॥ म्हणे लिंग प्रसन्न झालें ॥ ६९ ॥ गुरुनिरोप जेणें रीती ॥ पूजा करीन एकचित्तीं ॥ चिताभस्म अतिप्रीतीं ॥ आणोनि नैवेद्या देतसे ॥ ७० ॥ कचित्काळ येणेंपरी ॥ पूजा करी शबरशबरी ॥ एके दिवशीं तया नगरीं ॥ चिताभस्म न मिळेची ॥ ७१ ॥ हिंडोनि पाहे गांवोगांवीं ॥ चिताभस्म न मिळे कांहीं ॥ येणेंपरी सात गांवीं ॥ हिंडोनि आला घरासी ॥ ७२ ॥ चिंता लागली शबरासी ॥ पुसता झाला स्त्रियेसी ॥ काय करूं म्हणे तिसी ॥ प्राण आपुला त्यजीन म्हणे ॥ ७३ ॥ पूजा राहिली लिंगासी ॥ भस्म न मिळे नैवेद्यासी ॥ हिंडोनि आलों दाही दिशीं ॥ चिताभस्म न मिळेची ॥ ७४ ॥ जैसें गुरूनीं आज्ञापिलें ॥ त्या विधीनें पाहिजे अर्चिलें ॥ नाहीं तरी वृथा गेलें ॥ शिवपूजन परियेसा ॥ ७५ ॥ गुरूचें वाक्य जो न करी ॥ तो पडेल रौरवघोरीं ॥ तयातें पाप नाहीं दूरी ॥ सदा दरिद्री होय नर ॥ ७६ ॥ त्यासी होय अधोगति ॥

अखंड नरकीं तया वस्ती ॥ जो करी गुरूची भक्ति ॥ तोचि तरेल भवार्णवीं ॥ ७७ ॥ सकळ शास्त्रें येणेंपरी ॥ बोलताती वेद चारी ॥ याचि कारणें ऐक हो शबरी ॥ प्राण आपुला त्यजीन ॥ ७८ ॥ ऐकोनि पतीचें वचन ॥ बोले शबरी हांसोन ॥ चिंता करितां किंकारण ॥ चिताभस्म देईन मी ॥ ७९ ॥ मज घालोनि गृहांत ॥ अग्नि लावा तुम्ही त्वरित ॥ काष्ठें असती बहुत ॥ दहन करा आपणासी ॥ ८० ॥ तेंचि भस्म ईश्वरासी ॥ उपहारावें[1] तुम्ही हर्षी ॥ व्रतभंग न करावा भरंवसीं ॥ संतोषरूपें बोलतसे ॥ ८१ ॥ कधीं तरी शरीरासी ॥ नाश असे परियेसीं ॥ ऐसे कार्यकारणासी ॥ देह आपुला समर्पीन ॥ ८२ ॥ ऐकोनि स्त्रियेचें वचन ॥ शबर झाला मनीं खिन्न ॥ प्राणेश्वरी तुझा प्राण ॥ केवीं घ्यावा म्हणतसे ॥ ८३ ॥ रूपें दिससी रतीसरेंसी[2] ॥ अद्यापि तूं पूर्ववयासी ॥ पुत्रअपत्य

१ अर्पण करावें. २ रतीसारखी.

न देखिलेंसी ॥ या संसारासी येऊनी ॥ ८४ ॥ मन नाहीं तुझें धालें ॥ संसारसुख नाहीं देखिलें ॥ तुझे मातापित्यानें मज निरविलें[१] ॥ प्राणप्रिया रक्ष म्हणोनि ॥ ८५ ॥ चंद्रसूर्यसाक्षीसीं ॥ तुज वरिलें म्यां संतोषीं ॥ प्राण रक्षिन म्हणोनि हर्षीं ॥ घेवोनि आलों मंदिरांत ॥ ८६ ॥ आतां दहन करितां तूतें ॥ घडती पापें असंख्यातें ॥ स्त्रीहत्या महादोषातें ॥ केवी करूं म्हणतसे ॥ ८७ ॥ तूं माझी प्राणेश्वरी ॥ तूतें मारूं कवणेंपरी ॥ केसा तुष्टेल त्रिपुरारि ॥ पुण्य जावोनि पाप घडे ॥ ८८ ॥ दुःखें तुझीं माता-पिता ॥ मातें म्हणती स्त्रीघाता ॥ अजूनि तुझी लावण्यता[२] ॥ दिसतसे प्राणप्रिये ॥ ८९ ॥ नाना व्रतें नाना भक्ति ॥ या शरीरालागीं करिती ॥ दहन करूं कवणें रीती ॥ पापें मातें घडतील ॥ ९० ॥ ऐकोनि पतीचें वचन ॥ विनवितसे सती आपण ॥ कैसें असे तुम्हां अज्ञान ॥ मिथ्या बोल

१ स्वाधीन केलें. २ सुंदरपणा.

बोलतसां ॥ ९१ ॥ शरीर म्हणे स्वप्नापरी ॥ जैसा फेण गंगेवरी ॥ स्थिर न राहे क्षणभरी ॥ मरणें सत्य परियेसा ॥ ९२ ॥ आमुचे मायबापें जाण ॥ तुम्हां दिधलें मातें दान ॥ तुमची अर्धांगी मी पूर्ण ॥ भिन्नभावना कोठें असे ॥ ९३ ॥ मी म्हणजे तुमचा देहे ॥ विचार करोनि मनीं पाहें ॥ आपुलें अर्ध शरीर आहे ॥ काय दोष दहन करितां ॥ ९४ ॥ जें जें उपजे भूमीवरी ॥ तें तें नाश पावे निर्धारीं ॥ माझें देहसाफल्य[1] करीं ॥ ईश्वराप्रती पावेल ॥ ९५ ॥ संदेह सोडोनि आपणासी ॥ दहन करीं वो वेगेंसीं ॥ आपण होवोनि संतोषीं ॥ निरोप देतें परियेसा ॥ ९६ ॥ नानापरी पतीसी ॥ बोधी शबरी परियेसीं ॥ घरांत जावोनि पतीसी ॥ म्हणे अग्नि लावीं आतां ॥ ९७ ॥ संतोषोनि तो शबर ॥ बांधिता झाला गृहाचें द्वार ॥ अग्नि लावितां थोर ॥ ज्वाळा व्यापिती गगनासी ॥ ९८ ॥ दहन झालें

१ शरीराचें सार्थक.

शबरीसी ॥ भस्म घेतलें परियेसीं ॥ पूजा करोनि शिवासी ॥ नैवेद्य दिधला अवधारा ॥ ९९ ॥ पूजा करितां ईश्वरासी ॥ आनंद झाला बहुवसीं ॥ स्त्री दिधली हुताशीं ॥ स्मरण ऐसें त्यास नाहीं ॥१००॥ ऐसी भक्तिभावेंसी ॥ पूजा केली महेश्वरासी ॥ प्रसाद घेवोनि हस्तेंसीं ॥ पाचारिलें स्त्रियेतें ॥ १ ॥ जैसी पूजा नित्य करोन ॥ प्रसाद हातीं घेऊन ॥ आपुले स्त्रियेतें बोलावून ॥ देत असे तो शबर ॥ २ ॥ तया दिवसीं त्याचपरी ॥ आपल्या स्त्रियेतें पाचारी ॥ कृपासागर त्रिपुरारि ॥ प्रसन्न झाला परियेसा ॥ ३ ॥ तेचि शबरी येवोनि[1] ॥ उभी ठेली सुहास्यवदनी ॥ घेतला प्रसाद मागोनि ॥ घेवोनि गेली घरांत ॥ ४ ॥ जैसें तैसेंचि घर दिसे ॥ शबर विस्मय करीतसे ॥ म्हणे दग्ध केलें स्त्रियेसरिसें ॥ घर कैसें दिसताहे ॥ ५ ॥ बोलावोनि स्त्रियेसी ॥ शबर पुसतसे तियेसी ॥ दहन केलें मीं तुजसी ॥ पुन-

१ स्त्रीसुद्धां.

रपि कैसी आलीस ॥ ६ ॥ शबरी सांगे पतीसी ॥ आपणास आठवण आहे ऐसी ॥ अग्नि लावितां घरासी ॥ निद्रिस्थ झाल्यें परियेसा ॥ ७ ॥ महाशीतें पीडित ॥ आपण होत्यें निद्रिस्थ ॥ तुमचे बोल ऐकोन सत्य ॥ उठोनि आल्यें परियेसा ॥ ८ ॥ हे होईल देवकरणी ॥ प्रसन्न झाला शूल-पाणि ॥ ऐसें म्हणतां तत्क्षणीं ॥ निजस्वरूपीं उभा ठाकला ॥ ९ ॥ नमन करिती लोटांगणीं ॥ धांवोनि लागती दोघें चरणीं ॥ प्रसन्न झाला शूल-पाणि ॥ मागा वर म्हणतसे ॥ ११० ॥ होईल सुख संसारीं ॥ राज्य दिधलें धुरंधरी ॥ गति होईल त्यानंतरी ॥ कल्पकोटि स्वर्गवास ॥ ११ ॥ येणें-परी ऋषीश्वरांसी ॥ सूत सांगे विस्तारेंसीं ॥ गुरुचरणीं विश्वास असे ज्यासी ॥ तैसें फळ होय जाणा ॥ १२ ॥ म्हणोनि श्रीगुरु शिष्यासी ॥ सांगते झाले परियेसीं ॥ विश्वासेकरोनि द्विज हर्षी ॥ शुष्क काष्ठ सेवितसे

१ मोठें.

॥ १३ ॥ जैसा भाव तैसी सिद्धि ॥ होईल सत्य हे त्रिशुद्धि ॥ श्रीगुरु-नाथ कृपानिधि ॥ सहज निघाले संगमासी ॥ १४ ॥ जावोनि करिती अनुष्ठान ॥ पहावया येती ते ब्राह्मण ॥ देखोनि त्याचें अंतःकरण ॥ प्रसन्न झाले तत्क्षणीं ॥ १५ ॥ होता कमंडलु करकमळीं ॥ भरला सदा गंगाजळीं ॥ उचलोनियां हस्तकमळीं ॥ घालिती उदक काष्ठासी ॥ १६ ॥ तेचि क्षणीं काष्ठासी ॥ पल्लव आले परियेसीं ॥ औदुंबर वृक्ष जनासी ॥ दिसतसे समस्तां ॥ १७ ॥ जैसा चिंतामणिस्पर्श ॥ सुवर्ण करी लोहास ॥ तैसा श्रीगुरु सुधा-रस ॥ काष्ठ झाला औदुंबर ॥ १८ ॥ काष्ठ दिसे औदुंबर ॥ सुदेही झाला तो विप्र ॥ दिसे सुवर्णकांति नर ॥ गेलें कुष्ठ तात्काळीं ॥ १९ ॥ संतोषोनि द्विज-वर ॥ करी साष्टांग नमस्कार ॥ करिता झाला महास्तोत्र ॥ श्रीगुरूचें तये वेळीं ॥१२०॥ श्लोक॥ इंदुकोटितेजकीर्णसिंधुभक्तवत्सल ॥ नंदनात्रिसूनुदत्त

१ हा ग्रंथ प्रासादिक असल्यामुळें संस्कृताची दुरुस्ती केली नाहीं.



[ अ० ४० ] होता कमंडलु करकमळीं । भरला सदा गंगाजळीं । उचलोनी हस्तकमळीं । घालितीं उदक काष्ठासी ॥ ११६ ॥

मिंदिराक्षश्रीगुरुम् ॥ गंधमाल्यअक्षतादिवृंददेववंदितम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥ २१ ॥ मोहपाशअंधकारजातदूरभास्करम् ॥ आयताक्ष पाहि श्रीयवल्लभेशनायकम् ॥ सेव्यभक्तवृंदवरद भूयो भूयो नमाम्यहम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥ २२ ॥ चित्तजादिवर्गषट्कमत्तवारणांकुशम् ॥ सत्त्वसारशोभितात्मदत्त श्रीयवल्लभम् ॥ उत्तमावतारभूतकर्तृभक्तवत्सलम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥२६॥ व्योमवायुतेजआपभूमिकर्तृमीश्वरम् ॥ कामक्रोधमोहरहितसोमसूर्यलोचनम् ॥ कामितार्थदातृभक्तकामधेनुश्रीगुरुम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥२४॥ पुंडरीकआयताक्षकुंडलेंदुतेजसम् ॥ चंडदुरितखंडनार्थदंडधारीश्रीगुरुम् ॥ मंडलीकमौलिमार्तंडभासिताननं वरम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥ २५ ॥ वेदशास्त्रस्तुत्यपादमादिमूर्तिश्रीगुरुम् ॥ नादबिंदुकलातीतकल्पपादसेव्ययम् ॥ सेव्यभक्तवृंदवरद भूयो भूयो नमा-

म्यहम् ॥ वंदयामि नारसिंह-सरस्वतीश पाहि माम् ॥ २६ ॥ अष्टयोगतत्त्व-
निष्ठ तुष्टज्ञानवारिधिम् ॥ कृष्णवेणितीरवासपंचनद्यसंगम् ॥ कष्टदैन्यदूर-
भक्ततुष्टकाम्यदायकम् ॥ वंदयामि नारसिंह- सरस्वतीश पाहि माम् ॥ २७॥
नारसिंह-सरस्वतीशनाममष्टमौक्तिकम् ॥ हारकृत्यशारदेन गंगाधराख्यस्वा-
त्मजम् ॥ धारणीकदेवदीक्षगुरुमूर्तितोषितम् ॥ परमात्मानंदश्रीयपुत्रपौत्रदा-
यकम् ॥ २८ ॥ नारसिंह- सरस्वतीश-अष्टकं च यः पठेत् ॥ घोरसंसारसिं-
धुतारणाख्यसाधनम् ॥ सारज्ञानदीर्घआयुरारोग्यादिसंपदाम् ॥ चारुवर्गका-
म्यलाभनित्यमेव यः पठेत् ॥ २९ ॥ स्तोत्र केलें येणेंपरी ॥ आणिक विनवी
परोपरी ॥ म्हणे देवा श्रीहरी ॥ कृपा केली स्वामिया ॥ १३० ॥ म्हणोनि
मागुती नमस्कारी ॥ श्रीगुरुनाथ अभयकरीं ॥ उठविता झाला अवधारीं ॥
ज्ञानराशि म्हणोनियां ॥ ३१ ॥ समस्त लोक विस्मय करिती ॥ श्रीगुरुतें
नमस्कारिती ॥ नानापरी स्तोत्रें करिती ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ३२ ॥

मग निघाले मठासी ॥ समस्त शिष्यादि द्विजांसरसीं ॥ ग्रामलोक आनंदेसीं ॥ घेऊनि येती आरत्या ॥ ३३ ॥ जावोनि बैसती मठांत ॥ शिष्यासहित श्रीगुरुनाथ ॥ समाराधना असंख्यात ॥ झाली ऐका ते दिनीं ॥ ३४ ॥ तया विप्रा बोलावोनि ॥ सद्गुरु म्हणती संतोषोनि ॥ कन्यापुत्रगोधनीं ॥ तुझी संतति वाढेल ॥ ३५ ॥ तुझें नाम योगेश्वरी ॥ आम्हीं ठेविलें निर्धार ॥ समस्त शिष्यांमाजी थोर ॥ तूंचि आमुचा भक्त जाण ॥ ३६ ॥ वेदशास्त्रीं संपन्न ॥ तुझ्या वंशोवंशीं जाण ॥ होतील पुरुष निर्माण ॥ म्हणोनि देती निरोप ॥ ३७ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ जावोनि आणीं कलत्रासी ॥ तुम्हीं रहावें आम्हांपासीं ॥ येचि ग्रामीं नांदत ॥ ३८ ॥ म्हणोनि तया द्विजासी ॥ श्रीगुरु मंत्र उपदेशी ॥ विद्यासरस्वती या मंत्रासी ॥ उपदेशिलें परियेसा ॥ ३९ ॥ तूतें होतील तिघे सुत ॥ एकाचें नांव योगी विख्यात ॥ आमुची सेवा करील बहुत ॥ वंशोवंशीं माझे दास

॥ १४० ॥ जैसें श्रीगुरूंनीं निरोपिलें ॥ तयापरी त्यासी झालें ॥ म्हणोनि सिद्धें सांगितलें ॥ नामधारक शिष्यासी ॥ ४१ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सांगे श्रीगुरुचरित्रविस्तार ॥ उतरावया पैल पार ॥ कथा ऐका एकाचित्तें ॥ ४२ ॥ इति श्रीगुरुचारित्रामृत ॥ कुष्ठी उद्धरिला भक्त ॥ गुरुमहिमा अत्यद्भुत ॥ प्रकट झाला येणेंपरी ॥ १४३ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे शुष्ककाष्ठसंजीवनं नाम चत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ४० ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवी संख्या ॥ १४३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्य देखा ॥ उभा राहोन सन्मुखा ॥ कर जोडुनी कौतुका ॥ नमन करी साष्टांगीं ॥ १ ॥ जय जया जी सिद्ध-मुनि ॥ तूं तारक भवार्णीं ॥ नाना धर्म विस्तारोनि ॥ गुरुचरित्र निरोपिलें ॥ २ ॥ तेणें धन्य झालों आपण ॥ प्रकाश केलें महाज्ञान ॥ सुधारस गुरुस्मरण ॥ प्राशविला दातारा ॥ ३ ॥ एक असे माझी विनंती ॥ निरो-पावें मजप्रती ॥ आमुच्या पूर्वजें कवणें रीतीं ॥ सेवा केली श्रीगुरूची ॥ ४ तुम्हीं सिद्ध महाज्ञानी ॥ होतां श्रीगुरुसन्निधानीं ॥ शिष्य झाले कवणें गुणीं ॥ निरोपावें दातारा ॥ ५ ॥ ऐकोनि शिष्याचें वचन ॥ सिद्ध सांगे विस्तारोन ॥ एकचित्तें करोनि मन ॥ ऐक शिष्या नामधारका ॥ ६ ॥ पूर्वीं कथानक सांगितलें ॥ जे कां श्रीगुरूशीं भेटले ॥ वोसरग्रामीं एक होते भले ॥ पूर्वज तुमचे परियेसा ॥ ७ ॥ तयाचें नाम सायंदेव ॥ केली पूजा

भक्तिभाव ॥ त्यावरी प्रीति अतिस्नेह ॥ आमुचे श्रीगुरुमूर्तीचा ॥ ८ ॥ तेथून आले दक्षिणदिशीं ॥ गाणगापुरीं परियेसीं ॥ ख्याति झाली दश दिशीं ॥ कीर्ति वाढली बहुवस ॥ ९ ॥ ऐकोनि येती सकळ जन ॥ करिती श्रीगुरुदर्शन ॥ जें मनीं करिती चिंतन ॥ पूर्ण होय तयांचें ॥ १० ॥ येणें-परी श्रीगुरुमूर्ति ॥ होते गाणगापुरा वस्ती ॥ नाम नृसिंहसरस्वती ॥ भक्त-वत्सल निर्धारीं ॥ ११ ॥ तुमचा पूर्वज जो कां होता ॥ सायंदेव भक्त विख्याता ॥ त्याणें ऐकिलें वृत्तांता ॥ महिमा श्रीगुरु यतीचा ॥ १२ ॥ भक्ति-पूर्वक वेगेंसीं ॥ आला गाणगापुरासी ॥ आनंद बहु मानसीं ॥ हर्षे निर्भर होउनी ॥ १३ ॥ दुरूनि देखिलें गाणगाभुवन ॥ आपण घाली लोटांगण ॥ करी दंडप्राय नमन ॥ ऐशापरी चालिला ॥ १४ ॥ ऐसा दंडप्रणाम करीत ॥ गेला विप्र मठांत ॥ देखिले तेथें मूर्तिमंत ॥ परात्पर श्रीगुरु ॥ १५ ॥ साष्टांग

१ अष्टांग. २ अतिशय श्रेष्ठ.

नमस्कार करीत ॥ असे चरणावरी लोळत ॥ केशेंकरून पाय झाडीत ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ १६ ॥ करसंपुट जोडोनि ॥ स्तुति करी एकाग्र मनीं ॥ त्रैमूर्ति तूंचि ज्ञानी ॥ गुरुमूर्ति स्वामिया ॥१७॥ धन्य धन्य जन्म आपुलें ॥ कृतार्थ पितर माझे झाले ॥ कोटि जन्मांचें पाप गेलें ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ १८ ॥ जय जया जी श्रीगुरुमूर्ति ॥ त्राहि त्राहि विश्वपती ॥ परमात्मा परंज्योती ॥ नृसिंहसरस्वती स्वामिया । १९ ॥ तुझे चरण वर्णावयासी ॥ शक्ति कैंची आम्हांसी ॥ परमात्मा तूंचि होसी ॥ भक्तवत्सला स्वामिया ॥२०॥ तुमचे चरणाचिये प्रौढी ॥ वसती तेथें तीर्थें कोडी ॥ वर्णिती श्रुति घडोघडी ॥ चरणं पवित्रं विततं पुराणं ॥ २१ ॥ त्रैमूर्तीचा अवतार ॥ मज दिससी साक्षात्कार ॥ भासतसे निरंतर ॥ त्रैमूर्ति तूंचि होसी ॥२२॥ परब्रह्म तुम्ही केवळू ॥ हातीं दंड कमंडलू ॥ अमृत भरलें सोज्ज्वळू ॥

१ पुष्कळ. २ वेद.

प्रोक्षितां प्रेत उठतसे ॥२३॥ दंड धरिला या कारणें ॥ शरणांगतातें रक्षणें ॥ दुरितदैन्य निवारणें ॥ निज भक्त रक्षावया ॥ २४ ॥ रुद्राक्षमाळा भस्म-धारण ॥ व्याघ्रचर्माचें आसन ॥ अमृतदृष्टि इंदुनयन ॥ क्रूरदृष्टीं अग्निसूर्य ॥ २५ ॥ चतुर्विध पुरुषार्थांसी ॥ भक्तजना तूंचि होसी ॥ तूंचि रुद्र सत्य होसी ॥ तूं नृसिंह जगद्गुरु ॥ २६ ॥ विष्णुरूपें करिसी रक्षण ॥ पीतांबर पांघरूण ॥ तीर्थ समस्त तुझे चरण ॥ भक्ताभिमानी विष्णू तूंचि ॥ २७ ॥ वांझे कन्या पुत्र देसी ॥ शुष्क काष्ठ आणिलें पल्लवासी ॥ दुभविली वांझ महिषीसी ॥ अन्न पुरविलें ब्राह्मणा ॥२८॥ विष्णुमूर्ति तूंचि जाण ॥ त्रिवि-क्रमभारती ऐसी खूण ॥ साक्ष दिधली अंतःकरण ॥ विश्वरूप दाखविलें ॥ २९ ॥ म्हणविले वेद पतिताकरवीं ॥ अपार महिमा झाला पूर्वी ॥ नर-हरि-अवतार मूर्ति बरवी ॥ आलेति भक्त तारावया ॥ ३० ॥ ऐसी नाना-

१ पाप व दुःख. २ विराटस्वरूप.

परी स्तुति करीत ॥ पुनः पुनः नमन करीत ॥ सद्गदित कंठ होत ॥ रोमांच अंगीं उठले ॥ ३१ ॥ आनंदाश्रुलोचनीं ॥ निघती संतोषें बहु मनीं ॥ नव विधा भक्ति करोनि ॥ स्तुति केली श्रीगुरूची ॥ ३२ ॥ संतोषोनि श्रीगुरुमूर्ति ॥ तया विप्रा आश्वासिती ॥ माथां हस्त ठेवोनि म्हणती ॥ परम भक्त तूंचि आम्हां ॥ ३३ ॥ तुवां जें कां स्तोत्र केलें ॥ तेणें माझें मन धालें ॥ तुज वरदान दिधलें ॥ वंशोवंशीं माझा दास ॥ ३४ ॥ ऐसा वर देउनी ॥ गुरुमूर्ती संतोषोनि ॥ मस्तकीं हस्त ठेवोनि ॥ म्हणती जाय संगमासी ॥ ३५ ॥ स्नान करून संगमासी ॥ पूजा करीं अश्वत्थासी ॥ त्वरित यावें मठासी ॥ पंक्तीस भोजन करीं गा ॥ ३६ ॥ येणेंपरी श्रीगुरुमूर्ति ॥ तया विप्रा निरोप देती ॥ गुरुनिरोप जेणें रीतीं ॥ आला स्नान करोनियां ॥ ३७ ॥ षोडशोपचारें श्रीगुरूसी ॥ पूजा करी भक्तीसीं ॥ अनेक

१ माझा

परी पक्वान्नेंसीं ॥ भिक्षा करवी परियेसा ॥३८॥ भक्तवत्सल[1] श्रीगुरुमूर्ति ॥ तया विप्रा आपुले पंक्ति ॥ समस्त शिष्यांहुनि प्रीती ॥ ठाव देती आपलेजवळी ॥३९॥ भोजन झालें श्रीगुरूसी ॥ शिष्यांसहित विप्रांसी ॥ संतोषोनि आनंदेंसीं ॥ बैसले होते मठांत ॥ ४० ॥ तया सायंदेवविप्रासी ॥ श्रीगुरु पुसती प्रीतींसीं ॥ तुझें स्थान कोणे देशीं ॥ कलत्र पुत्र कोठें असती ॥ ४१ ॥ पुसती क्षेमसमाधान ॥ कैसें तुमचें वर्तन ॥ कृपा असे परिपूर्ण ॥ म्हणोनि पुसती संतोषें ॥ ४२ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ सांगे सायंदेव विस्तारोन ॥ कन्या पुत्र बंधुजन ॥ समस्त क्षेम असती स्वामिया ॥ ४३ ॥ उत्तरकांची म्हणोनि ग्रामीं ॥ तेथें वसोनि आम्ही ॥ तुझ्या कृपें समस्त क्षेमी ॥ असों देवा कृपासिंधु ॥ ४४ ॥ पुत्रवर्ग बंधु जाणा ॥ करिती संसारयातना ॥ आपुले मनींची वासना ॥ करीन सेवा

१ भक्तांवर दया करणारा.

श्रीगुरूची ॥ ४५ ॥ करूनि सेवा श्रीगुरूची ॥ असेन स्वामी परियेसीं ॥
ऐसा माझे मानसीं ॥ निर्धार असे देवराया ॥ ४६ ॥ ऐकोन तयाचें
वचन ॥ श्रीगुरु म्हणती हांसोन ॥ आमुची सेवा असे कठिण ॥ आम्हां
वास बहुतां ठायीं ॥ ४७ ॥ एके समयीं अरण्यांत ॥ अथवा राहूं गांवांत ॥
आम्हांसवें कष्ट बहुत ॥ तुम्ही केवीं सोंहूं[1] शका ॥ ४८ ॥ येणेंपरी श्रीगुरु-
मूर्ति ॥ तया विप्रा निरोपिती ॥ ऐकोन विनवी मागुती ॥ म्हणे स्वामि
अंगिकारा ॥ ४९ ॥ गुरूची सेवा करी नरु ॥ तोचि उतरे पैल पारु ॥
तयासी कैसें दुःख अघोरु ॥ सदा सुखी तोचि होय ॥ ५० ॥ चतुर्विध[2]
पुरुषार्थ ॥ देऊं शके श्रीगुरुनाथ ॥ त्यासी नाहीं यमपंथ ॥ गुरुभक्ति मुख्य
कारण ॥ ५१ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ सायंदेव भक्तींसीं ॥ विनवीतसे परि-
येसीं ॥ संतोषी झाले श्रीगुरुमूर्ति ॥ ५२ ॥ श्रीगुरु तया विप्रा म्हणती ॥

१ सहन करण्यास समर्थ होशील. २ चार प्रकारचे.

जैसें असे तुझे चित्तीं ॥ दृढ असेल मनीं भक्ति ॥ तरीच करीं अंगीकार ॥ ५३ ॥ स्थिर करोनि अंतःकरण ॥ करितां सेवा-गुरुचरण ॥ झाले मास तीन जाण ॥ ऐक शिष्या नामकरणी ॥ ५४ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ श्रीगुरु निघाले संगमासी ॥ सवें घेतलें सायंदेवासी ॥ समस्तांतें वारूनी ॥ ५५ ॥ भक्ताचें अंतःकरण ॥ पहावया गेले श्रीगुरु आपण ॥ पूर्वज तुमचा भोळा जाण ॥ जात असे संगमासी ॥ ५६ ॥ भक्तासहित संगमासी ॥ गेले श्रीगुरु समर्यां निशी ॥ बैसते झाले अश्वत्थासी ॥ सुखें गोष्टी करितातीं ॥ ५७ ॥ दिवस गेला अस्तमानीं ॥ श्रीगुरु विचार करिती मनीं ॥ दृढ याचे अंतःकरणीं ॥ कैसी करणी पाहूं म्हणती ॥ ५८ ॥ उठविती वारा अवचित्त ॥ तेणें वृक्ष पडों पाहत ॥ पर्जन्य झाला बहुत ॥ मुसळधारा वर्षतसे ॥ ५९ ॥ सायंदेव होता जवळी ॥ सेवा केली तये वेळीं ॥ केला आश्रय वृक्षातळीं ॥ वस्त्रेंकरूनि श्रीगुरूसी ॥ ६० ॥ पर्जन्य

वारा समस्त देखा ॥ साहिले आपण भावें ऐका ॥ उभा राहोनि सन्मुखा सेवा करी एकभावें ॥ ६१ ॥ येणेंपरी याम[1] दोन ॥ पर्जन्य आला महा क्षोभोन ॥ आणिक वारा उठोन ॥ वाजे शीतें[2] अत्यंत ॥ ६२ ॥ श्रीगुरु म्हणती ब्राह्मणासी ॥ शीत झालें बहुवशी ॥ तुवां जाउनी मठासी ॥ अग्नि आणावा शेकावया ॥६३॥ गुरुनिरोपें तत्क्षणीं ॥ ऐक्यभाव धरोनि मनीं ॥ निघाला विप्र महाज्ञानी ॥ आणावया वैश्वानर[3] ॥ ६४ ॥ निघाला शिष्य देखोनि ॥ श्रीगुरु म्हणती हांसोनि ॥ नको पाहूं आपुले नयनीं ॥ उभय-पार्श्वभागांतें[4] ॥ ६५ ॥ गुरुनिरोपें येणेंपरी ॥ निघता झाला झडकरी ॥ न दिसे वाट अंधकारीं ॥ खुणें खुणें जात असे ॥ ६६ ॥ अंधकार महाघोर ॥ पाऊस पडे धुरंधर ॥ न दिसे वाटेचा प्रकार ॥ जात असे भक्तिपूर्वक ॥ ६७ ॥ मनीं ध्याय श्रीगुरूसी ॥ जातसे तैसा मार्गेसीं ॥ लवतां वीज

१ प्रहर. २ थंडी. ३ विस्तव. ४ दोन्ही बाजूंकडे.

संत्रीसी ॥ तेणें तेजें जातसे ॥ ६८ ॥ येणेंपरी द्विजवर ॥ पावला त्वरित गाणगापुर ॥ वेशीपाशीं जाऊनि सत्वर ॥ हाक मारिली द्वारपाळा ॥६९॥ तयासी सांगे वृत्तांत ॥ आणोनि दिधला अग्नि त्वरित ॥ घालूनियां भां[illegible]ांत ॥ घेवोनि गेला परियेसा ॥ ७० ॥ नसे मार्गं अंधकार ॥ विजेचे तेजें जातसे नर ॥ मनीं करितसे विचार ॥ श्रीगुरूंनीं मातें निरोपिलें ॥ ७१ ॥ दोहींकडे न पाहें निगुती ॥ श्रीगुरु मातें निरोपिती ॥ याची कैसी आहे स्थिति ॥ म्हणोनि पाहे तये वेळीं ॥ ७२ ॥ आपुले दक्षिण-दिशेसी ॥ पहातां देखे सर्पासी ॥ भिऊनि पळतां उत्तरेसीं ॥ अद्भुत दिसे महानाग ॥ ७३ ॥ पांच फणी दिसती दोनी ॥ सवेंचि येताती धांवोनि ॥ विप्र भ्याला आपुले मनीं ॥ धांवत जातसे भिऊनियां ॥ ७४ ॥ वाट सोडुनी जाय रानीं ॥ सवेंचि येताति सर्प दोनी ॥ जातां भयभीत होउनी ॥

१ मकार.



[ अ० ४१.] दोहोंकडे न पाहे निगुती । श्रीगुरु माते निरोपिति । याची कैशी आहे स्थिति । म्हणोनि पाहे तये वेळां ॥ ७२ ॥

अतिशीघ्र धांवतसे ॥७५॥ स्मरता झाला श्रीगुरूसी ॥ एकभावें धैर्येसीं ॥ जातां विप्र परियेसीं ॥ पातला संगमाजवळिक ॥७६॥ दुरूनि देखे श्रीगुरूसी ॥ सहस्रदीपज्योतीसरसी ॥ दिसती विप्र बहुवशी ॥ वेदध्वनि ऐकतसे ॥ ७७ ॥ जवळी जातां द्विजवरु ॥ एकला दिसे श्रीगुरु ॥ गेला समस्त अंधकारु ॥ दिसे चंद्र पौर्णिमेचा ॥७८॥ प्रज्वलित केलें अग्नीसी ॥ उजेड झाला बहुवशी ॥ झाला विप्र सावधेसी ॥ पाहतसे श्रीगुरूतें ॥७९॥ दोनी सर्प येवोनि ॥ श्रीगुरूतें वंदोनि ॥ सवेंचि गेले निघोनि ॥ तंव हा पूर्वींच भ्यालासे ॥ ८० ॥ श्रीगुरु पुसुती तयासी ॥ कां गा भयभीत झालासी ॥ आम्हीं तूतें रक्षावयासी ॥ सर्प दोन पाठविले ॥ ८१ ॥ न घरीं आतां भय कांहीं ॥ आमुची सेवा कठीण पाहीं ॥ विचार करुनि आपुल्या देहीं ॥ अंगिकारीं मुनिसेवा ॥ ८२ ॥ गुरुभक्ति असे कठिण ॥ दृढभक्तीनें सेवा करणें ॥ कळिकाळाचें नाहीं भेणें ॥ तया शिष्या परियेसा

१ कलिरूप काळाचें.

॥८३॥ सायंदेव तये वेळीं ॥ लागतसे श्रीगुरुचरणकमळीं ॥ विनवीतसे करुणा बाहळी ॥ कृपा करीं म्हणोनियां ॥ ८४ ॥ गुरुभक्तीचा प्रकारु ॥ निरोपावा मातें श्रीगुरु ॥ जेणें माझें मन स्थिरु ॥ होवोनि राहे तुम्हांजवळी ॥ ८५ ॥ श्रीगुरु म्हणती विप्रासी ॥ सांगे कथा सुरसी ॥ न गमे वेळ रात्रीसी ॥ ब्राह्म मुहूर्त होय तंव ॥८६॥ पूर्वी कैलासशिखरासी ॥ बैसला होता व्योमकेशी ॥ अर्धांगी पार्वतीसी ॥ कथा एकांतीं सांगतसे ॥ ८७ ॥ गिरिजा पुसे ईश्वरासी ॥ गुरुभक्ति म्हणिजे आहे कैशी ॥ विस्तारोनि आम्हांसी ॥ सांगा म्हणे तये वेळीं ॥ ८८ ॥ शिव सांगे गिरिजेसी ॥ सर्व साध्य गुरुभक्तीसी ॥ करावें एकभावेंसीं ॥ शिव जो तोचि गुरु होय ॥ ८९ ॥ याचें एक आख्यान ॥ सांगेन तुज विस्तारोन ॥ एकचित्तें करोनि मन ॥ ऐक गिरिजे म्हणतसे ॥ ९० ॥ गुरुभक्ति म्हणिजे सुलभ-

१ शंकर.

परियेसीं ॥ ९१ ॥ नानातपें अनुष्ठानें ॥ करिती यज्ञ महाज्ञानें ॥ त्यांतें होतीं महाविघ्नें ॥ साध्य होतां दुर्लभ ॥९२॥ जो गुरुभक्ति करी निर्मळ ॥ साध्य होईल तात्काळ ॥ यज्ञदान तषफळ ॥ सर्व सिद्धि त्यासी होती ॥ ९३ ॥ सुलभ असे अप्रयास ॥ जो जाणे गुरुकुलवास ॥ एकभावें धरोनि कांस ॥ आराधावें श्रीगुरूसी ॥ ९४ ॥ याचा एक दृष्टांत ॥ सांगेन ऐका एकचित्त ॥ ब्रह्मयाचा अवतार व्यक्त ॥ त्वष्टाब्रह्मा परियेसा ॥ ९५ ॥ तयासी झाला एक कुमर ॥ अतिलावण्य सुंदर ॥ सर्वधर्मकुशल धीर ॥ योग्य झाला उपनयना ॥ ९६ ॥ त्वष्टाब्रह्मा पुत्रासी ॥ व्रतबंध करी परियेसीं ॥ करावया विद्याभ्यासासी ॥ गुरूचे घरीं निरविला ॥९७॥ गुरूची सेवा नानापरी ॥ करीतसे ब्रह्मचारी ॥ वर्ततां ऐशियापरी ॥ अपूर्व एक वर्तलें ॥ ९८ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ आला पर्जन्य बहुवशी ॥ पर्ण-

१ सहज साध्य होणारी.

शाळा परियेसीं ॥ गळतसे गुरूची ॥ ९९ ॥ तये वेळीं शिष्यासी ॥ निरोपिती गुरु त्यासी ॥ त्वरित करावें आम्हांसी ॥ एक गृह दृढ ऐसें ॥१००॥ पर्णशाळा प्रतिवर्षीं ॥ जीर्ण होतसे परियेसीं ॥ गृह करावें दृढतेंसीं ॥ कधीं जीर्ण नोहे ऐसें ॥ १ ॥ न तुटे कधीं राहे स्थिर ॥ दिसावें रम्य मनोहर ॥ असावें सर्व परिकर[1] ॥ करीं शीघ्र ऐसें गृह ॥ २ ॥ ऐसें गुरु निरोपिती ॥ तेच समया गुरूची सती ॥ सांगतसे अतिप्रीतीं ॥ मातें कंचुकी आणावी ॥३॥ नसावी विणली अथवा शिवली ॥ विचित्र रंगीत पाहिजे केली ॥ माझ्या अंगप्रमाण वहिली ॥ त्वरित आणीं म्हणतसे ॥ ४ ॥ गुरुपुत्र म्हणे शिष्यासी ॥ मागेन तें आणीं वेगेंसीं ॥ पादुका पाहिजेत आम्हांसी ॥ उदकावरूनी चालती ऐशा ॥ ५ ॥ अथवा चिखल न लागे त्यांसी ॥ न व्हाव्या अधिक पायांसी ॥ जेथें चिंतूं मानसीं ॥ तेथें घेऊनि जाती ऐशा

१ साहित्यासह.

॥ ६ ॥ इतुकिया अवसरीं ॥ गुरुकन्या काय करी ॥ जातां तयाचा पल्लवें धरी ॥ आपणा कांहीं आणावें ॥ ७ ॥ उंच तानवडें आपणासी ॥ घेऊनि यावें परियेसीं ॥ आणिक आणा खेळावयासी ॥ घरकूल एक आपणा ॥८॥ कुंजराचे दांतें बरवें ॥ घरकुल तुवां आणावें ॥ एकस्तंभी ¹ सावें ॥ कधीं न तुटे न होय जीर्ण ॥ ९ ॥ जेथें नेईन तेथें यावें ॥ सोपस्कारासहित आणावें ॥ पाट ठाणवीं असावें ॥ तया घराभीतरीं ॥ ११० ॥ सदा दिसावें नूतन ॥ वावरत असावें आपें आपण ॥ करावया पाक निष्पन्न ॥ मडकीं करूनि आणीं पां ॥ ११ ॥ आणिक एक सांगेन तुज ॥ रांधप करावया शिकवीं मज ॥ पाक केलिया उष्ण सहज ॥ असों नये अन्न जाणा ॥ १२ ॥ पाक करितां मडकींयेसी ॥ न लागे काजळ परियेसीं ॥ आणोनि दे गा भांडीं ऐसीं ॥ आणिक सर्व सोपस्कार ॥ १३ ॥ गुरुकन्या

१ पदर.

ऐसें म्हणे ॥ अंगिकारिलें शिष्यराणें ॥ निघता झाला तत्क्षणें ॥ महा अरण्यांत प्रवेशला ॥ १४ ॥ मनीं चिंता बहु करी ॥ आपण बाळ ब्रह्मचारी ॥ काय जाणें त्यांचे परी ॥ केवीं करूं म्हणतसे ॥ १५ ॥ पत्रावळी करूं नेणें ॥ इतुकें मातें कधीं होणें ॥ स्मरतसे एकाग्र मनें ॥ श्रीगुरुचरण देखा ॥ १६ ॥ म्हणे आतां काय करूं ॥ मातें कोण आधारु ॥ बोल ठेवील माझा गुरु ॥ शिघ्र इतुकें न करितां ॥ १७ ॥ कवणापासीं जाऊं शरण ॥ कवण राखील माझा प्राण ॥ कृपानिधि गुरूवीण ॥ ऐसा कवण असे दुजा ॥ १८ ॥ जरी नायकें गुरूचा बोल ॥ शाप देईल तात्काळ ॥ ब्रह्मचारी आपण बाळ ॥ म्हणोनि अंगिकार कां केला ॥१९॥ काय गति आपणासी ॥ आतां जाऊं कवणापासीं ॥ अशक्त बाळ मी अज्ञानेसी ॥ अंगिकार कां केला ॥ १२० ॥ गुरुवाक्य मज कारण ॥ मातें न करी निर्वाण ॥ वेंचीन आतां आपुला प्राण ॥ गुरुनिरोप करीन मी ॥ २१ ॥

ऐसें मध्य अरण्यांत ॥ जातसे बाळ चिंता करीत ॥ श्रमोनियां अत्यंत ॥ निर्वाणमनें जातसे ॥ २२ ॥ पुढें जातां मार्ग क्रमित ॥ भेटला एक अवधूत ॥ तेणें बाळ देखिला तेथ ॥ पुसता झाला तये वेळीं ॥ २३ ॥ कवण बाळा कोठें जासी ॥ चिंताव्याकुळ मानसीं ॥ विस्तारोनि आम्हांसीं ॥ सांग म्हणे तये वेळीं ॥ २४ ॥ ऐसें म्हणतां ब्रह्मचारी ॥ जाऊनियां नमस्कारी ॥ म्हणे स्वामी तारीं तारीं ॥ चिंतासागरीं बुडतसें ॥ २५ ॥ भेटलासि तूं निधानु ॥ जैसी वत्सालागीं धेनु ॥ दुःखी झालों होतों आपणु ॥ देखतां मन निवालें ॥ २६ ॥ जैसें चकोरपक्षियातें ॥ चांदणें देखतां मन हर्षतें ॥ तैसें तुझ्या दर्शनमात्रें ॥ आनंद झाला स्वामिया ॥ २७ ॥ माझें पूर्वार्जित पुण्य ॥ कांहीं होतें म्हणोन ॥ तुम्ही भेटलेंती निधान ॥ कृपासिंधु परमपुरुषा ॥ २८ ॥ सांगा आपुलें नाम कवण ॥ आगमन झालें

१ साधु. २ ठेवा

कोठून ॥ पहा हें निर्मनुष्य अरण्य ॥ येथें तुम्ही भेटलेती ॥ २९ ॥ व्हाल तुम्ही ईश्वरु ॥ मातें कृपा केली गुरु ॥ तुम्हां देखता मनोहरु ॥ अंतःकरण स्थिर झालें ॥ १३० ॥ कीं होसील कृपाळू ॥ सत्त्वप्रिय भक्तवत्सलू ॥ मी दास तुझा करीं सांभाळू ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ३१ ॥ नमितां तया बाळकासी ॥ उठवीतसे तापासी ॥ आलिंगोनि महाहर्षी ॥ आश्वासीतसे तये वेळीं ॥ ३२ ॥ मग पुशिला वृत्तांत ॥ बाळ सांगे समस्त ॥ गुरूनीं जी जी मागितली वस्त ॥ कवणेंपरी साध्य होय ॥ ३३ ॥ आपण बाळ ब्रह्मचारी ॥ न होय कार्य तें अंगिकारीं ॥ आतां पडिलों चिंतासागरीं ॥ तारीं स्वामी म्हणतसे ॥ ३४ ॥ मग अभय देऊनि अवधूत ॥ तया बाळातें म्हणत ॥ सांगेन तुज एक हितं ॥ जेणें तुझें कार्य साधे ॥ ३५ ॥ विश्वेश्वर-आराधन ॥ असे एक निधान ॥ काशीपुर महास्थान ॥

१ हिताची गोष्ट.

सकळाभीष्टें साधती ॥ ३६ ॥ पंचक्रोश असे क्षिति ॥ तया आगळी विख्याति ॥ विष्णुमुख्य ऋषि प्रजापति ॥ तेथें वर लाधले ॥ ३७ ॥ ब्रह्मा सृष्टि रचावयासी ॥ वर लाधला त्या स्थळासी ॥ वर दिधला विष्णूसी ॥ समस्त सृष्टि पाळावया ॥ ३८ ॥ काशीपूर महास्थान ॥ तुवां तेथें जातांची जाण ॥ होईल तुझी कामना पूर्ण ॥ संदेह न धरीं मनांत ॥ ३९ ॥ तुवां जावें त्वरितेंसीं ॥ जें जें वसे तव मानसीं ॥ समस्त विद्या लाधसी ॥ विश्वकर्मा तूंचि जाण ॥ १४० ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ साध्य होतील त्वरित ॥ यापरीस आणिक स्वार्थ ॥ काय असे सांग मज ॥ ४१ ॥ तोचि देव असे दयाळ ॥ विचित्र असे त्याचा खेळ ॥ उपमन्यु म्हणोनि होता बाळ ॥ तयातें दिधला क्षीरसिंधु ॥ ४२ ॥ नामें आनंदकानन ॥ विख्यात असे महास्थान ॥ समस्तांची कामना पूर्ण ॥ तये ठायीं होतसे ॥ ४३ ॥ नाम असे पुरी काशी ॥ समस्त धर्मांची हे राशी ॥ सकळ जीवजंतूंसी ॥ मोक्ष-

स्थान परियेसा ॥ ४४ ॥ जे वास करिती तये स्थानीं ॥ त्यातें देखताचि नयनीं ॥ जाती दोष पळोनि ॥ स्थानमहिमा काय सांगूं ॥ ४५ ॥ ऐसें काशीस्थान असतां ॥ कां बा करिसी तूं चिंता ॥ तेथील महिमा वर्णितां ॥ अशक्य माझे जिव्हेसी ॥४६॥ तया काशीनगरांत ॥ जे जन तीर्थें हिंडत ॥ एकेक पाउलीं पुण्य बहुत ॥ अश्वमेधफळ असे ॥ ४७ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष ॥ जी जी मनीं असे कांक्षे¹ ॥ जातांचि होईल प्रत्यक्ष ॥ संदेह न धरीं मनांत ॥ ४८ ॥ ऐकोनियां ब्रह्मचारी ॥ साष्टांगीं नमस्कारी ॥ कोठें असे काशीपुरी ॥ आपण असे अरण्यांत ॥ ४९ ॥ आनंदकानन म्हणसी ॥ स्वर्गीं असे कीं भूमीसी ॥ अथवा जाऊं पाताळासी ॥ कोठें असे सांगा मज ॥ १५० ॥ या संसारसागरासी ॥ तूंचि तारक जगा होसी ॥ ज्ञान मातें उपदेशीं ॥ तारीं मातें स्वामिया ॥ ५१ ॥ ऐशिया काशीपुरासी ॥ मातें कोण नेईल हर्षीं ॥

1 इच्छा.

विनवूं जरी तुम्हांसी ॥ घेवोनि जावें म्हणोनियां ॥ ५२ ॥ कार्य असलिया तुम्हांसी ॥ आम्हां कैसी बुद्धि देशी ॥ मी बाळक तुम्हांसी ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ५३ ॥ ऐसें म्हणतां तापसी ॥ आपण नेईन म्हणे हर्षी ॥ तुजकारितां आपणासी ॥ यात्रालाभ घडे थोर ॥५४॥ यापरतें आम्हांसी ॥ काय लाभ विशेषीं ॥ वृथा जन्म मानवासी ॥ काशीवास न करितां ॥ ५५ ॥ तुजकारितां आपणासी ॥ दर्शन घडे पुरी काशी ॥ चला जाऊं त्वरितेंसीं ॥ म्हणोनि दोघे निघाले ॥ ५६ ॥ मनोवेगें तात्काळीं ॥ पातले विश्वेश्वराजवळी ॥ तापसी म्हणे तये वेळीं ॥ बाळका यात्रा करीं आतां ॥ ५७ ॥ बाळ म्हणे तयासी ॥ स्वामी मातें निरोप देशी ॥ नेणें यात्रा आहे कैसी ॥ कवणेंपरी रहाटावें ॥ ५८ ॥ आपण बाळ ब्रह्मचारी ॥ नेणें तीर्थ कवणेंपरी ॥ कवणें विधिपुरःसरीं ॥ विस्तारोनि सांगा मज ॥ ५९ ॥

१ प्रार्थू. २ तपस्वी. ३ अत्यंत जलद.

तापसी म्हणे तयासी ॥ सांगेन यात्राविधीसी ॥ तुवां करावें भावेंसीं ॥ नेमें क्तिपूर्वक ॥ १६० ॥ पाहिलें मणिकर्णिकेसी ॥ स्नान करणें नेमेंसीं ॥ जाऊनियां विनायकासी ॥ पांचाळेश्वरा नमावें ॥ ६१ ॥ मग जावें महाद्वारा ॥ विश्वेश्वरदर्शन करा ॥ पुनरपि यावें गंगातीरा ॥ मणिकर्णिकास्नान करावें ॥ ६२ ॥ मणिकर्णिकेचा ईश्वर ॥ पुजूनियां निर्धार ॥ जाऊनियां कंबळेश्वर ॥ पूजा करीं गा भावेंसीं ॥ ६३ ॥ पुढें ईश्वरवासुकीसी ॥ पूजा करीं भक्तींसीं ॥ पर्वतेश्वर पूजोनि हर्षी ॥ गंगाकेशव पूजीं मग ॥ ६४ ॥ ललिता देवी पूजोनि ॥ मग जावें तेथुनि ॥ जरासंधेश्वर ध्यानीं ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ ६५ ॥ सोमनाथ असे थोर ॥ पूजावा शूळटंकेश्वर ॥ तयापुढें वाराहेश्वर ॥ पूजा करीं गा ब्रह्मेश्वरी ॥ ६६ ॥ अगस्त्येश्वर कश्यपासी ॥ पूजा करीं हरिहरेश्वरासी ॥ वैजनाथ महाहर्षी ॥ ध्रुवेश्वर पूजीं मग ॥ ६७ ॥ गोकर्णेश्वर असे थोर ॥ पूजा करीं गा हाटकेश्वर ॥ अस्थि-

क्षेप तटाकेश्वर ॥ किंकरेश्वर पूजावा ॥ ६८ ॥ भारतभूतेश्वरासी ॥ पूजा करीं गा भावेंसीं ॥ चित्रगुप्तेश्वरासी ॥ चित्रघंट पूजावा ॥ ६९ ॥ पाशुपतेश्वर निका ॥ पूजा करोनि तेथें बाळका ॥ पितामह असे जो कां ॥ ईश्वरातें पूजावें ॥ १७० ॥ कल्लेश्वरातें वंदूनी ॥ पुढें जावें एक मनीं ॥ चंद्रेश्वरातें पूजोनि ॥ पूजा करीं गा विश्वेश्वरा ॥ ७१ ॥ पुढें पूजीं विघ्नेश्वर ॥ त्यानंतर अग्नीश्वर ॥ मग पूजा नागेश्वर ॥ हरिश्चंद्रेश्वर पूजीं जाण ॥ ७२ ॥ चिंतामणि विनायका ॥ सोमनाथ विनायक देखा ॥ पूजा करोनि ऐका ॥ वसिष्ठ वामदेव पूजावा ॥ ७३ ॥ पुढें त्रिसंध्येश्वर ॥ पूजीं लिंग असे थोर ॥ विशालाक्ष मनोहर ॥ धर्मेश्वर पूजावा ॥ ७४ ॥ विश्वबाहु पूजा निका ॥ पुढें आशा-विनायका ॥ वृद्धादित्य असे जो कां ॥ पूजा करीं वो मनोभावें ॥ ७५ ॥ चतुर्वक्रेश्वर असे थोर ॥ लिंग असे मनोहर ॥ पूजा करीं गा ब्रह्मेश्वर ॥ नित्यकर्मेंकरूनियां ॥ ७६ ॥ पुनः प्रकामेश्वर असे खूण ॥

पुढें ईश्वरईशान ॥ चंडी चंडेश्वरा जाण ॥ पूजा करीं भक्तींसीं ॥ ७७ ॥
पूजीं भवानीशंकर ॥ धुंडिराज मनोहर ॥ अर्चीं राजराजेश्वर ॥ लांगूले-
श्वर पूजीं मग ॥७८॥ नकुलेश्वर पूजेसी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ परान्न-
परद्रव्येश्वरासी ॥ पाणिग्रहणेश्वर पूजीं मग ॥ ७९ ॥ गंगेश्वर मोरेश्वर
पूजोन ॥ ज्ञानवापीं करीं स्नान ॥ ज्ञानेश्वर अर्चून ॥ नंदिकेश्वर पूजीं मग
॥ ८० ॥ निष्कलंकेश्वर थोर ॥ लिंग असे मनोहर ॥ पूजीं मार्कंडेयेश्वर ॥
असुरेश्वर पूजीं मग ॥ ८१ ॥ तारकेश्वर असे थोर ॥ लिंग बहु मनोहर ॥
पूजा महाकाळेश्वर ॥ दंडपाणि पूजीं मग ॥ ८२ ॥ महेश्वरातें पूजोनि ॥
अर्चीं मोक्षेश्वर ध्यानीं ॥ वीरभद्रेश्वरसुमनीं ॥ पूजा करीं गा बाळका
॥ ८३ ॥ अविमुक्तेश्वरापासीं ॥ तुवां जाऊनियां हर्षीं ॥ पूजा करीं गा
भावेंसी ॥ मोदादि पंच विनायका ॥ ८४ ॥ आनंदभैरवपूजा करीं ॥ पुन-
रपि जाय महाद्वारीं ॥ जेथें असे मन्मथारि ॥ विश्वनाथ पूजावा ॥ ८५ ॥

वाळा तूंचि येणेंपरी ॥ अंतरगृहयात्रा करीं ॥ मुक्तिमंडपाभीतरीं ॥ जाऊनियां मंत्र म्हणावा ॥ ८६ ॥ श्लोक ॥ अंतर्गृहेषु यात्रेयं यथावद्या मया कृता ॥ न्यूनातिरिक्तया शंभुः प्रीयतामनया विभुः ॥ १ ॥ इति मंत्रं समुच्चार्य क्षणं वै मुक्तिमान्भवेत् ॥ विश्रम्य यायाद्भवने निष्पापः पुण्यभाग्भवेत् ॥ २ ॥ ऐसा मंत्र जपोन ॥ विश्वनाथातें नमून ॥ मग निघावें तेथून ॥ दक्षिणमानसयात्रेसी ॥ ८७ ॥ मणिकर्णिकेसी जाउनी ॥ स्नान उत्तरवाहिनी ॥ विश्वनाथातें पूजोनि ॥ संकल्पावें यात्रेसी ॥ ८८ ॥ तेथोनि निघावें हर्षी ॥ मोदादि पंच विनायकांसी ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ धुंडिराज पूजीं मग ॥ ८९ ॥ पूजीं भवानीशंकर ॥ दंडपाणि नमन कर ॥ विशालाक्षा अवधार ॥ पूजा तुम्ही भक्तींसीं ॥ १९० ॥ स्नान धर्मकूपेसी ॥ श्राद्धविधि करा हर्षी ॥ पूजा धर्मेश्वरासी ॥ गंगाकेशव पूजीं मग ॥ ९१ ॥ पूजावी देवी ललिता ॥ जरासंधेश्वर नमिता ॥ पूजीं मग सोमनाथा ॥

वराहेश्वरा भक्तींसीं ॥ ९२ ॥ दशाश्वमेधतीर्थेसी ॥ स्नान करीं श्राद्धेंसीं ॥ प्रयागतीर्थं परियेसीं ॥ स्नान श्राद्ध करावें ॥ ९३ ॥ पूजोनियां प्रयागेश्वरासी ॥ दशाश्वमेध ईश्वरासी ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ शीतलेश्वर अर्चीं मग ॥ ९४ ॥ अर्चीं मग वंदि देवी ॥ सर्वेश्वर मनोभावीं ॥ धुंडिराज भक्तिपूर्वीं ॥ पूजा करीं गा ब्रह्मचारी ॥ ९५ ॥ तिळभांडेश्वर देखा ॥ पूजा करोनि पुढें ऐका रेवाकुंडीं स्नान निका ॥ मानससरोवरीं मग स्नान ॥ ९६ ॥ श्राद्धादि पितृतर्पण ॥ मानसेश्वर मग पूजोन ॥ मनकामना पावे जाण ॥ ऐक बाळा ब्रह्मचारी ॥ ९७ ॥ केदारकुंडीं स्नान ॥ करावें तेथें तर्पण ॥ केदारेश्वर पूजोन ॥ गौरीकुंडीं स्नान करा ॥ ९८ ॥ पूजीं वृद्धकेदारेश्वर ॥ पूजीं मग हनुमंतेश्वर ॥ पूजोनियां रामेश्वर ॥ स्नान श्राद्ध कृमिकुंडीं ॥ ९९ ॥ सिद्धेश्वरा करीं नमन ॥ करूनि स्वप्नकुंडीं स्नान ॥ स्वप्नेश्वर पूजोन ॥ स्नान करीं गा संगमांत ॥ २०० ॥ संगमेश्वर पूजोन ॥

लोलार्ककूपीं करीं स्नान ॥ श्राद्धकर्म आचरोन ॥ गतिप्रदीप ईश्वरासी ॥ १ ॥
पूजीं अर्कविनायका ॥ पाराशरेश्वरा अधिका ॥ पूजा करोनि बाळका ॥
सन्निहत्य कुंडीं स्नान करीं ॥ २ ॥ कुरुक्षेत्र कुंड देखा ॥ स्नान करावें
विशेखा ॥ सुवर्णादि दानादिका ॥ तेथें तुम्हीं करावें ॥ ३ ॥ अमृतकुंडीं
स्नान निका ॥ पूजीं दुर्गा विनायका ॥ दुर्गादेवीसी बाळका ॥ पूजा करीं
मनोभावें ॥ ४ ॥ पुढें चौसष्ट योगिनी ॥ पूजा करीं गा मनकामनीं ॥
कुक्कुट द्विजातें वंदुनी ॥ मंत्र तेथें जपावा ॥ ५ ॥ श्लोक ॥ वाराणस्यां
दक्षिणे भागे कुक्कुटो नाम वै द्विजः ॥ तस्य स्मरणमात्रेण दुःस्वप्नः सुस्वप्नो
भवेत् ॥ ६ ॥ पुढें मासोपवासासी ॥ पूजिजे गोबाईसी ॥ सात कवड्या
घालूनियां तिसी ॥ नमन भावें करावें ॥ ७ ॥ पूजा करीं रेणुकेसी ॥ पुढें
स्नान करीं हर्षीं ॥ शंखोद्धारकुंडेसी ॥ शंखविष्णु पूजिजे ॥ ८ ॥ कामाक्षि-
कुंडीं करीं स्नान ॥ कामाक्षिदेवी पूजोन ॥ अयोध्याकुंडीं करीं स्नान ॥

सिताराम पूजावा ॥९॥ लवांकुशकुंडीं करीं स्नान ॥ लवांकुशातें पूजोन ॥ लक्ष्मीकुंडीं करीं स्नान ॥ लक्ष्मीनारायण पूजावा ॥ २१० ॥ सूर्यकुंडीं करीं स्नान ॥ श्राद्धकर्म आचरोन ॥ सांबादित्य पूजोन ॥ जावें पुढें बाळका ॥११॥ वैजनाथकुंड बरवें ॥ तेथें स्नान तुवां करावें ॥ वैजनाथातें पूजावें ॥ एकभावेंकरूनियां ॥ १२ ॥ गोदावरीकुंडेसी ॥ स्नान करा भक्तींसीं ॥ गौतमेश्वरलिंगासी ॥ पूजीं बाळ ब्रह्मचारी ॥ १३ ॥ अगस्तिकुंडीं जावोनि ॥ अगस्तेश्वरा नमूनि ॥ स्नान करीं मनापासोनि ॥ पूजा करीं भक्तिभावें ॥ १४ ॥ शुक्रकूपीं करीं स्नान ॥ करीं शुक्रेश्वर-अर्चन ॥ मग पुढें अन्नपूर्णा नमून ॥ पूजा करीं भावेंसीं ॥ १५ ॥ धुंडिराजातें पूजोन ॥ ज्ञानवापीं करीं स्नान ॥ ज्ञानेश्वर अर्चोन ॥ दंडपाणि पूजावा ॥ १६ ॥ आनंदभैरव वंदोनि ॥ महाद्वारा जाऊनि ॥ साष्टांगेंसीं नमोनि ॥ विश्वनाथा अर्चिजे ॥ १७ ॥ ऐसें दक्षिणमानस ॥ यात्रा असे विशेष ॥ ब्रह्मचारी करी

हर्ष ॥ योगिराज सांगतसे ॥ १८ ॥ आतां उत्तरमानसासी ॥ सांगेन विधि आहे कैशी ॥ संकल्प करोनियां हर्षीं ॥ निघावें तुवां बाळका ॥ १९ ॥ जावें पंचगंगेसी ॥ स्नान करीं महाहर्षीं ॥ कोटिजन्मपाप नाशी ॥ प्रख्यात असे पुराणीं ॥ २२० ॥ पंचगंगा प्रख्यात नामें ॥ सांगेन असतीं उत्तमें ॥ किरणा धूतपापा नामें ॥ तिसरी पुण्यसरस्वती ॥ २१ ॥ गंगा यमुना मिळोन ॥ पांचही ख्याति जाणोनि ॥ नामें असतीं सगुणी ॥ ऐक बाळा एकचित्तें ॥ २२ ॥ कृतयुगीं त्या नदीसी ॥ धर्मनदी म्हणती हर्षीं ॥ धूत-पापा नाम तिसी ॥ त्रेतायुगीं अवधारा ॥ २३ ॥ बिंदुतीर्थ द्वापारासी ॥ नाम जाण विस्तारेंसीं ॥ कलियुगाभीतरीं तिसी ॥ नाम झालें पंचगंगा ॥ २४ ॥ प्रयागासी माघमासीं ॥ स्नान करितां फळें जैसीं ॥ कोटिगुण पंचगंगेसी ॥ त्याहूनि पुण्य अधिक असे ॥ २५ ॥ ऐशापरी पंचगंगेसी ॥ स्नान करीं गा भावेंसीं ॥ बिंदुमाधवपूजेसी ॥ पूजा करीं गा केशवा

॥२६॥ गोपालकृष्ण पूजोनि ॥ जावें नृसिंहभुवनीं ॥ मंगळागौरी वंदोनि ॥ गभस्तेश्वर पूजावा ॥ २७ ॥ मयुषादित्यपूजेसी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ पुनरपि जावें हर्षीं ॥ विश्वेश्वरदर्शना ॥ २८ ॥ मागुती मुक्तिमंडपासी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ संकल्पावें विधींसी ॥ निघावें उत्तरमानसा ॥ २९ ॥ मग निघा तेथून ॥ आदित्यातें पूजोन ॥ अमर्दकेश्वर अर्चोन ॥ पापभक्षेश्वरा पूजिजे ॥ २३० ॥ नवग्रहातें पूजोनि ॥ काळभैरवातें वंदूनि ॥ क्षेत्रपाळातें अर्चोनि ॥ काळकूपीं स्नान करीं ॥ ३१ ॥ पूजा करोनि काळेश्वरा ॥ हंसतीर्थीं स्नान करा ॥ श्राद्धपितृकर्म सारा ॥ ऐक बाळा एकचित्तें ॥ ३२ ॥ कृत्तिवासेश्वरा देखा ॥ पूजा करोनि बाळका ॥ पुढें जाऊनि ऐका ॥ शंखवापीं स्नान करीं ॥ ३३ ॥ तेथें आचमन करोनि ॥ रत्नेश्वरातें पूजोनि ॥ सीतेश्वरा अर्चोनि ॥ दक्षेश्वर पूजीं मग ॥ ३४ ॥ चतुर्वक्रेश्वरीं पूजा ॥ करीं वो बाळा तूं वोजा ॥ पुढें स्नान करणें काजा ॥ वृद्ध-

कालकूपा जावें ॥ ३५ ॥ काळेश्वराचे पूजेसी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ अपमृत्यवीश्वरा हर्षीं ॥ पूजा करीं गा बाळका ॥ ३६ ॥ मंदाकिनी स्नान करणें ॥ मध्यमेश्वरातें पूजणें ॥ तेथोनि मग पुढें जाणें ॥ जंबुकेश्वर पूजावया ॥ ३७ ॥ वक्रतुंडपूजेसी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ दंडखात कूपेसी ॥ स्नान श्राद्ध तूं करीं ॥ ३८ ॥ पुढें भूतभैरवासी ॥ पूजिजे ईशानेश्वरासी ॥ जैगीषव्यगुहेसी ॥ नमन करूनि पुढें जावें ॥३९॥ घंटाकुंडीं स्नान करीं ॥ व्यासेश्वरातें अर्चन करीं ॥ कंदुकेश्वरातें अवधारीं ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ २४० ॥ ज्येष्ठवापीं स्नान करणें ॥ ज्येष्ठेश्वरातें पूजणें ॥ सर्वांचि तुवां पुढें जाणें ॥ स्नान सप्तसागरांत ॥ ४१ ॥ तेथोनि वाल्मीकेश्वरासी ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ भीमलोटा जाऊनि हर्षीं ॥ भीमेश्वर पूजावा ॥ ४२ ॥ मातृ-पितृकुंडेंसी ॥ करणें श्राद्धविधीसी ॥ पिशाचमोचन तीर्थंसी ॥ पुढें जावें अवधारा ॥ ४३ ॥ पुढें कपर्देश्वरासी ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥

कर्कोटकवापीसी ॥ स्नान करीं गा बाळका ॥ ४४ ॥ कर्कोटकेश्वरासी ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ पुढें ईश्वरगंगेसी ॥ स्नान दान करावें ॥ ४५ ॥ अग्नीश्वराचे पूजेसी ॥ चक्रकुंडीं स्नानासी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ श्राद्ध-कर्म करावें ॥ ४६ ॥ उत्तरार्क पूजोन ॥ मत्स्योदरीं करीं स्नान ॥ ओंका-रेश्वर अर्चोन ॥ कपिलेश्वर पूजीं मग ॥ ४७ ॥ ऋणमोचन तीर्थेंसी ॥ श्राद्धादि करावीं भक्तींसीं ॥ पापविमोचनतीर्थेंसी ॥ स्नानादि श्राद्धें करावीं ॥ ४८ ॥ तीर्थ कपालमोचन ॥ स्नान श्राद्ध तर्पण ॥ कुलस्तंभा-प्रती जाऊन ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ ४९ ॥ असे तीर्थ वैतरणी ॥ श्राद्ध करावें तेथें स्नानीं ॥ विधिपूर्वक गोदानीं ॥ देतां पुण्य बहुत असे ॥ २५० ॥ मग जावें कपिलाधारा ॥ स्नान श्राद्ध तुम्ही करा ॥ सवत्सेसी द्विजवरा ॥ गोदान द्यावें परियेसा ॥ ५१ ॥ वृषभध्वजातें पूजोन ॥ मग निघावें तेथून ॥ ज्वालानृसिंह वंदोन ॥ वरुणासंगमीं तुम्हीं जावें ॥ ५२ ॥

स्नान श्राद्ध करोनि ॥ केशवादित्य पूजोनि ॥ आदिकेशव अर्चोनि ॥ पुढें जावें परियेसा ॥ ५३ ॥ प्रऱ्हादतीर्थ असे बरवें ॥ स्नान श्राद्ध तुवां करावें ॥ प्रऱ्हादेश्वरातें पूजावें ॥ एकभावें परियेसीं ॥ ५४ ॥ कपिलाधारा तीर्थ थोर ॥ स्नान करावें मनोहर ॥ पूजोनि त्रिलोचनेश्वर ॥ असंख्यातेश्वरा पूजिजे ॥ ५५ ॥ पुढें जावें महादेवासीं ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ द्रुपदेश्वर सादरेंसीं ॥ एक भावें अर्चावा ॥ ५६ ॥ गंगायमुनासरस्वतींशीं ॥ तिन्ही लिंगें विशेषीं ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ काम्यतीर्थ पाहें मग ॥ ५७ ॥ कामेश्वरातें पूजोनि ॥ गोप्रतारतीर्थ स्नानीं ॥ पंचगंगेसीं जाउनि ॥ स्नान मागुतीं करावें ॥ ५८ ॥ मणिकर्णिकास्नान करणें ॥ जलशायीतें पूजणें ॥ हनुमंतातें नमन करणें ॥ मोदादि पंच विनायकांसी ॥ ५९ ॥ पूजा अन्नपूर्णेसीं ॥ धुंडिराज परियेसीं ॥ दानवापीं

स्नानेंसीं ॥ ज्ञानेश्वर पूजावा ॥ २६० ॥ पूजीं दंडपाणीसी ॥ मोक्षलक्ष्मीविलासासी ॥ पूजा पंचपांडवासी ॥ द्रौपदीद्रुपदविनायका ॥ ६१ ॥ पूजा आनंदभैरवासी ॥ अविमुक्तेश्वर हर्षी ॥ पूजोनियां संभ्रमेंसीं ॥ विश्वनाथ सन्मुख सांगें ॥ ६२ ॥ श्लोक ॥ उत्तरमानसयात्रेयं यथावद्या मया कृता ॥ न्यूनातिरिक्तया शंभुः प्रीयतामनया विभुः ॥ ६३ ॥ ऐसा मंत्र जपोनि ॥ साष्टांगें नमस्कारूनि ॥ मग निघावें तेथोनि ॥ पंचक्रोशयात्रेसी ॥ ६४ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गुरुचरित्र ऐकतां संतोषीं ॥ येणेंचि तूं पावशी ॥ चारी पुरुषार्थ इह सौख्य ॥ ६५ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधर ॥ सांगे गुरुचरित्राविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ सकळाभीष्टें साधिजे ॥ ६६ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ काशीखंडीं यात्रा निरोपित ॥ कथा असती पुराणविख्यात ॥ एकचत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥२६७॥ इति श्रीगुरुचरित्रे श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे काशीमहायात्रा-

निरूपणं नाम एकचत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ४१ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पित-
मस्तु ॥ ओंवीसंख्या ॥२६७॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ संकल्प करोनियां मनीं ॥ जावें स्वर्गद्वाराभुवनीं ॥
गंगाकेशव पूजोनि ॥ हरिश्चंद्र मंडपा जावें ॥ १ ॥ स्वर्गद्वार असे जाण ॥
मणिकर्णिकातीर्थ विस्तीर्ण ॥ तुवां तेथें जावोन ॥ संकल्पावें विधीनें ॥२॥
हविष्यान्न पूर्व दिवशीं ॥ करोनि असावें शुचींसीं ॥ प्रातःकाळीं गंगेसी ॥
स्नान आपण करावें ॥३॥ धुंडिराजातें प्रार्थोनि ॥ मागावें करुणावचनीं ॥
पुनर्दर्शन दे म्हणोनि ॥ विनवावें परियेसा ॥ ४ ॥ मग गंगेतें नमोनि ॥
जावें विश्वनाथभुवनीं ॥ मग तयातें पूजोनि ॥ भवानीशंकर पूजावा ॥५॥
मग जावें मुक्तिमंडपासी ॥ नमोनि निघावें संतोषीं ॥ धुंडिराजाचे पूजेसी ॥
पुनरपि जावें परियेसा ॥ ६ ॥ मागुती यावें महाद्वारा ॥ विश्वेश्वर-पूजा
करा ॥ मोदादि पंच विघ्नेश्वरा ॥ नमन करावें दंडपाणीसी ॥ ७ ॥ पूजा
आनंदभैरवासी ॥ मागुतीं यावें मणिकर्णिकेसी ॥ पूजोनियां ईश्वरासी ॥
सिद्धिविनायक पूजावा ॥ ८ ॥ गंगाकेशव पूजोनि ॥ ललितादेवीसी

नमोनि ॥ राजसिद्धेश्वर आणा ध्यानीं ॥ दुर्लभेश्वर पूजावा ॥ ९ ॥ सोमनाथपूजा करीं ॥ पुढें शूलटंकेश्वरी ॥ मग पूजा वाराहेश्वरी ॥ दशाश्वमेध पूजीं मग ॥ १० ॥ बंदी देवीतें पूजोनि ॥ सर्वेश्वरातें नमोनि ॥ केदारेश्वर धरा ध्यानीं ॥ हनुमंतेश्वर पूजावा ॥ ११ ॥ मग पूजावा संगमेश्वरी ॥ लोलार्कातें अवधारीं ॥ अर्कविनायका पूजा करीं ॥ दुर्गाकुंडीं स्नान मग ॥ १२ ॥ आर्यादुर्गा देवी पूजोनि ॥ दुर्गा गणेश ध्याऊनि ॥ पुनर्दर्शन दे म्हणोनि ॥ प्रार्थावें तयासी ॥ १३ ॥ विश्वकूपेंत ईश्वरासी ॥ कर्दमतीर्थीं स्नान हर्षीं ॥ कर्दमेश्वरपूजेसी ॥ तुवां जावें बाळका ॥ १४ ॥ जावें कर्दमकूपासी ॥ पूजीं मग सोमनाथासी ॥ मग विरूपालिंगासी ॥ पूजा करीं ब्रह्मचारी ॥ १५ ॥ पुढें जावें नीलकंठासी ॥ पूजा करीं गा भावेंसीं ॥ कर जोडोनि भक्तींसीं ॥ कर्दमेश्वर पूजावा ॥ १६ ॥ पुनर्दर्शन आम्हांसी ॥ दे म्हणावें भक्तींसीं ॥ मग निघावें वेगेंसीं ॥ नागनाथाचे पूजेतें ॥ १७ ॥

पुढें पूजीं चामुंडेसी ॥ मोक्षेश्वरा परियेसीं ॥ वरुणेश्वर भक्तींसीं ॥ पूजा करीं गा बाळका ॥ १८ ॥ वीरभद्रपूजेसी ॥ जावोनि द्वितीय दुर्गेसी ॥ अर्चावें विकटाक्षा देवीसी ॥ पूजा करीं मनोभावें ॥ १९ ॥ पूजीं भैरव उन्मत्त ॥ विमळाअर्जुन प्रख्यात ॥ काळकूटदेवाप्रत ॥ पूजा करीं गा बाळका ॥२०॥ पूजा करीं महादेवासी ॥ नंदिकेश्वर भैरवासी ॥ भृंगेश्वर विशेषीं ॥ पूजा करीं मनोहर ॥ २१ ॥ गणप्रियासी पूजोनि ॥ विरूपाक्षातें नमोनि ॥ यक्षेश्वर अर्चोनि ॥ विमलेश्वर पूजीं मग ॥ २२ ॥ भीमचंडी शक्तीसी ॥ पूजीं चंडीविनायकासी ॥ रविरक्ताक्ष गंधर्वासी ॥ पूजा करीं मनोभावें ॥ २३ ॥ ज्ञानेश्वर असे थोर ॥ पूजा पुढें अमृतेश्वर ॥ गंधर्वसागर मनोहर ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ २४ ॥ नरकार्णव तरावयासी ॥ पूजीं भीमचंडीसी ॥ विनवावें तुम्हीं त्यासी ॥ पुनर्दर्शन दे म्हणावें ॥ २५ ॥ एकपादविनायकासी ॥ पुढें पूजीं भैरवासी ॥ संगमेश्वरा भरंवसीं ॥ पूजा

करीं गा ब्रह्मचारी ॥२६॥ भूतनाथ सोमनाथ ॥ कालनाथ असे विख्यात ॥
पूजा करीं गा त्वरित ॥ कपर्देश्वरलिंगाची ॥ २७ ॥ नागेश्वर कामेश्वर ॥
पुढें पूजीं गणेश्वर ॥ पूजा करीं विश्वेश्वर ॥ चतुर्मुख विनायका ॥ २८ ॥
पूजीं देहलीविनायकासी ॥ पूजीं गणेश षोडशीं ॥ उदंडगणेश षोडशीं ॥
पूजा करीं मनोहर ॥ २९ ॥ उत्कलेश्वर महाथोर ॥ असे लिंग मनोहर ॥
पुढें एकादश रुद्र ॥ तयांचें पूजन करावें ॥ ३० ॥ जावें तपोभूमीसी ॥
पूजा करीं गा भक्तींसीं ॥ रामेश्वर महाहर्षीं ॥ पूजीं मग सोमनाथ ॥३१॥
भरतेश्वर असे थोर ॥ लक्ष्मणेश्वर मनोहर ॥ पूजीं मग शत्रुघ्नेश्वर ॥ भूमि-
देवी अर्चीं मग ॥३२॥ नकुळेश्वर पूजोन ॥ करीं रामेश्वरध्यान ॥ पुनर्दर्शन दे
म्हणोन ॥ विनवावें परियेसा ॥ ३३ ॥ असंख्यात तीर्थ वरुण ॥ तेथें करा
तुम्ही नमन ॥ असंख्यात लिंगें जाण ॥ पूजा करावी भक्तींसीं ॥ ३४ ॥
पुढें असे लिंग थोर ॥ नामें देव सिद्धेश्वर ॥ पूजा करीं गा मनोहर ॥

पशुपाणि विनायक ॥ ३५ ॥ याची पूजा करोनि ॥ पृथ्वीश्वरातें नमोनि ॥ शरयूकूपीं स्नान करोनि ॥ कपिलधारा स्नान करीं ॥ ३६ ॥ वृषभध्वजा पूजोनि ॥ ज्वालानृसिंहाचे वंदीं चरणीं ॥ वरुणासंगमीं स्नान करोनि ॥ श्राद्धादि कर्मे करावीं ॥ ३७ ॥ संगमेश्वर पूजावा ॥ सर्वविनायक बरवा ॥ पुढें पूजीं तूं केशवा ॥ भावेंकरूनि ब्रह्मचारी ॥ ३८ ॥ पूजा प्रऱ्हादे-श्वरासी ॥ स्नान कपिलातीर्थासी ॥ त्रिलोचनेश्वरासी ॥ पूजा करीं गा भक्तीनें ॥ ३९ ॥ पुढें असे महादेव ॥ पंचगंगातीर ठाव ॥ पूजा करीं गा भक्तिभावें ॥ तया बिंदुमाधवासी ॥ ४० ॥ पूजीं मंगळागौरीसी ॥ गभस्ते-श्वरा परियेसीं ॥ वसिष्ठ वामदेवासी ॥ पर्वतेश्वर पूजावा ॥ ४१ ॥ महे-श्वराचे पूजेसी ॥ पुढें सिद्धिविनायकासी ॥ पूजा सप्तवर्णेश्वरासी ॥ सर्वग-णेश पूजावा ॥ ४२ ॥ मग जावें मणिकर्णिके ॥ स्नान करावें विवेकें ॥ विश्वेश्वरातें स्मरोनि निकें ॥ महादेव पूजावा ॥ ४३ ॥ मग जावें मुक्ति-

मंडपासी ॥ नमन करावें विष्णूसी ॥ पूजीं दंडपाणीसी ॥ धुंडिराज अर्चावा ॥ ४४ ॥ आनंदभैरव पूजोनि ॥ आदित्येशा नमोनि ॥ पूजा करीं गा भक्तींसीं ॥ मोदादि पंचविनायका ॥ ४५ ॥ पूजा करीं गा विश्वे-श्वरासी ॥ मोक्षलक्ष्मीविलासासी ॥ नमोनि देवा सन्मुखेसी ॥ मंत्र म्हणावा येणेंपरी ॥ ४६ ॥ श्लोक ॥ जय विश्वेश विश्वात्मन् काशीनाथ जगत्पते ॥ त्वत्प्रसादान्महादेव कृता क्षेत्रप्रदक्षिणा ॥ ४७ ॥ अनेकजन्म-पापानि कृतानि मम शंकर ॥ गतानि पंचक्रोशात्मा कृता लिंगप्रदक्षिणा ॥ ४८ ॥ ऐसा मंत्र जपोन ॥ पुढें करावें शिवध्यान ॥ मुक्तिमंडपायेवोन ॥ आठां ठायीं वंदावें ॥ ४९ ॥ प्रथम मुक्तिमंडपासी ॥ नमन करावें परि-येसीं ॥ वंदोनि स्वर्गमंडपासी ॥ जावें ऐश्वर्यमंडपा ॥ ५० ॥ ज्ञानमंडपा नमोनि ॥ मोक्षलक्ष्मीविलासस्थानीं ॥ मुक्तिमंडपा वंदोनि ॥ आनंदमंडपा जावें तुवा ॥ ५१ ॥ पुढें वैराग्यमंडपासी ॥ तुवां जावें भक्तींसीं ॥ येणेंपरी

यात्रेसी ॥ करीं गा बाळा ब्रह्मचारी ॥ ५२ ॥ आणिक एक प्रकार ॥ सांगेन ऐक विचार ॥ नित्ययात्रा मनोहर ॥ ऐक बाळका गुरुदासा ॥५३॥ सचैल शुचि होवोनि ॥ चक्रपुष्करणीं स्नान करोनि ॥ देवपितर तर्पोनि ॥ ब्राह्मण-पूजा करावी ॥ ५४ ॥ मग निघावें तेथोनि ॥ द्रुपदादित्येश्वर पूजोनि ॥ दंपत्येश्वर नमोनि ॥ श्रीविष्णूतें पूजावें ॥ ५५ ॥ मग नमावा दंडपाणि ॥ महेश्वरातें पूजोनि ॥ मग निघावें तेथोनि ॥ धुंडिराज अर्चिजे ॥ ५६ ॥ ज्ञानवापीं करीं स्नान ॥ नंदिकेश्वर अर्चोन ॥ तारकेश्वर पूजोन ॥ पुढें जावें मग तुवां ॥ ५७ ॥ महाकाळेश्वर देखा ॥ पूजा करीं भावें एका ॥ दंडपाणि विनायका ॥ पूजा करीं मनोहर ॥ ५८ ॥ मग यात्रा विश्वेश्वर ॥ करीं गा बाळका मनोहर ॥ लिंग असे ओंकारेश्वर ॥ प्रतिपदेसी पूजावा ॥ ५९ ॥ मत्स्योदरी तीर्थासी ॥ स्नान करावें प्रतिपदेसी ॥ त्रिलोचन महादेवासी ॥ दोन्ही लिंगें असतीं जाण ॥ ६० ॥

तेथें बीजातिजेसी ॥ जावें तुवां यात्रेसी ॥ यात्रा जाण चतुर्थीसी ॥ कांचीवास लिंग जाणा ॥ ६१ ॥ रत्नेश्वर पंचमीसी ॥ चंद्रेश्वरपूजेसी ॥ षष्ठीसी जावें परियेसीं ॥ ऐक शिष्या एकचित्तें ॥ ६२ ॥ सप्तमीसी केदारेश्वर ॥ अष्टमीसीं लिंग धूमेश्वर ॥ विश्वेश्वर लिंग थोर ॥ नवमी यात्रा महापुण्य ॥ ६३ ॥ कामेश्वर दशमीसी ॥ एकादशीसी विश्वेश्वरासी ॥ द्वादशीसी मणिकर्णिकेसी ॥ मणिकेश्वर पूजावा ॥ ६४ ॥ त्रयोदशी प्रदोषेसी ॥ पूजा अविमुक्तेश्वरासी ॥ चतुर्दशीसी विशेषीं ॥ विश्वेश्वर पूजावा ॥ ६५ ॥ जे कोणी काशीवासी ॥ असती नर परियेसीं ॥ त्यांणीं करावी यात्रा ऐसी ॥ नाहींतरी विघ्न घडे ॥ ६६ ॥ शुक्लपक्षीं येणेंपरी ॥ यात्रा करीं मनोहरी ॥ कृष्णपक्ष आलियावरी ॥ यात्रा करा सांगेन ॥ ६७ ॥ चतुर्दशी धरोनि ॥ यात्रा करा प्रतिदिनीं ॥ सांगेन ऐका विधानीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ६८ ॥ वरुणानदीं करा स्नान ॥ करा शैलेश्वरदर्शन ॥ संगमेश्वर पूजोन ॥ संगमीं

स्नान तये दिनीं ॥ ६९ ॥ स्वर्गतीर्थस्नानेंसीं ॥ स्वर्गेश्वर पूजा हर्षीं ॥ मंदाकिनी येरे दिवसीं ॥ मध्यमेश्वर पूजावा ॥ ७० ॥ मणिकर्णिका स्नानेंसीं ॥ पूजा ईशानेश्वरासी ॥ हिरण्यगर्भ परियेसीं ॥ दोनी लिंगें पूजिजे ॥ ७१ ॥ स्नान धर्मकूपेसी ॥ करीं पूजा गोपद्मेश्वरासी ॥ पूजा करा तया दिवसीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ७२ ॥ कपिलधारा तीर्थासी ॥ स्नान करा भक्तींसीं ॥ वृषभध्वज लिंगासी ॥ सप्तमीचे दिवसीं पूजीं पैं ॥ ७३ ॥ उपशांतिकूपेसी ॥ स्नान करा भक्तींसीं ॥ उपशांतेश्वरासी ॥ पूजा करीं तया दिनीं ॥ ७४ ॥ पंचचूडडोहांत ॥ स्नान करा शिव ध्यात ॥ ज्येष्ठेश्वरा त्वरित ॥ पूजावें तया दिनीं ॥ ७५ ॥ चतुःसमुद्रकूपासी ॥ स्नान करीं भावेंसीं ॥ समुद्रेश्वर हर्षीं ॥ पूजा करीं तया दिनीं ॥ ७६ ॥ देवापुढें कूप असे ॥ स्नान करावें संतोषें ॥ शुक्रेश्वर पूजा हर्षें ॥ पूजा करीं तया दिनीं ॥ ७७ ॥ दंडखात तीर्थेंसी ॥ स्नान करोनि देवासी ॥ व्याघ्रेश्वरपूजेसी ॥

तुवां जावें तया दिनीं ॥ ७८ ॥ शौनकेश्वरतीर्थेसी ॥ स्नान तुम्ही करा हर्षी ॥ तीर्थनामें लिंगासी ॥ पूजा करा मनोहर ॥ ७९ ॥ जंबुतीर्थ मनोहर स्नान करा शुभाचार ॥ पूजावा भावें जंबुकेश्वर ॥ चतुर्दश लिंगें येणेंपरी ॥ ८० ॥ शुक्लपक्षकृष्णेसी ॥ अष्टमी तिथि विशेषीं ॥ पूजावें तुम्हीं लिंगासी ॥ सांगेन ऐका महापुण्य ॥ ८१ ॥ मोक्षेपर पर्वतेश्वर ॥ तिसरा पशुपतेश्वर ॥ गंगेश्वर नर्मदेश्वर ॥ पूजा करीं मनोभावें ॥ ८२ ॥ आणिक भक्तेश्वर गभस्तीश्वर ॥ मध्यमेश्वर असे थोर ॥ तारकेश्वरनामें निर्धार ॥ नव लिंगें पूजावीं ॥८३॥ आणिक लिंगें एकादश ॥ नित्ययात्रा विशेष ॥ लिंग असे अग्निध्रुवेश ॥ यात्रा तुम्हीं करावी ॥ ८४ ॥ दुसरा असे उर्वशीश्वर ॥ नकुलेश्वर मनोहर ॥ चौथा असे आषाढेश्वर ॥ भारभूतेश्वर पंचम ॥८५॥ लांगूलेश्वरीं करा पूजा ॥ करा त्रिपुरांतका ओजा ॥ मनःप्रकामेश्वर-काजा ॥ तुम्हीं जावें परियेसा ॥ ८६ ॥ प्रीतेश्वर असे देखा ॥ मंदालिके-

श्वर ऐका ॥ तिलपर्णेश्वर निका ॥ पूजा करीं भावेंसीं ॥ ८७ ॥ आतां शक्तियात्रेसी ॥ सांगेन ऐका विधीसी ॥ शुक्लपक्षतृतीयेसी ॥ आठ यात्रा कराव्या ॥ ८८ ॥ गोप्रेक्षतीर्थ देखा ॥ स्नान करोनि ऐका ॥ पूजा मुख्य भाळनेत्रिका ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ८९ ॥ ज्येष्ठवापीं स्नानेंसीं ॥ ज्येष्ठा-गौरी पूजा हर्षीं ॥ स्नान पान करा वापीसीं ॥ शृंगार सौभाग्य गौरीपूजा ॥ ९० ॥ विशाळगंगास्नानासी ॥ पूजा विशाळगौरीसी ॥ ललितातीर्थ-स्नानेंसीं ॥ ललिता देवी पूजावी ॥ ९१ ॥ स्नान भवानीतीर्थेंसी ॥ पूजा करा भवानीसी ॥ बिंदुतीर्थ स्नानासी ॥ मंगळागौरी पूजावी ॥ ९२ ॥ पूजा इतुके शक्तींसी ॥ मग पूजिजे लक्ष्मीसी ॥ येणें विधीं भक्तींसीं ॥ यात्रा करीं मनोहर ॥ ९३ ॥ यात्रातीर्थ चतुर्थीसी ॥ पूजा सर्वगणेशासी ॥ मोदक द्यावें गौरीपुत्रासी ॥ विघ्न न करी तीर्थवासियांतें ॥ ९४ ॥ मंगळ अथवा रविवारेसी ॥ यात्रा करीं भैरवासी ॥ षष्ठी तिथि परियेसीं ॥ जावें तुम्हीं

मनोहर ॥ ९५ ॥ रविवारीं सप्तमीसी ॥ यात्रा रविदेवासी ॥ नवमी अष्टमी चंडीसी ॥ यात्रा तुम्हीं करावी ॥ ९६ ॥ अंतर्गृहयात्रेसी ॥ करावी तुम्हीं प्रतिदिवसीं ॥ विस्तारकाशीखंडासी ॥ ऐक शिष्या ब्रह्मचारी ॥ ९७ ॥ ऐशी काशीविश्वेश्वर ॥ यात्रा करावी तुम्हीं परिकर ॥ आपुल्या नामीं सोमेश्वर ॥ लिंगप्रतिष्ठा करावी ॥ ९८ ॥ इतुकें ब्रह्मचारियासी ॥ यात्रा सांगितली परियेसीं ॥ आचरण करीं येणें विधीसीं ॥ तुझी वासना पुरेल ॥ ९९ ॥ तुझे चित्तीं असे गुरु ॥ प्रसन्न होईल शंकरु ॥ मनीं धरीं गा निर्धारु ॥ गुरुस्मरण करीं निरंतर ॥ १०० ॥ इतकें सांगोनि तापसी ॥ अदृश्य झाला परियेसीं ॥ ब्रह्मचारी म्हणे हर्षी ॥ हाचि माझा गुरु सत्य ॥ १ ॥ अथवा होईल ईश्वर ॥ मज कृपाळू झाला सत्वर ॥ कार्य लाधेल निर्धार ॥ म्हणोनि मनीं धरियेलें ॥ २ ॥ न आराधितां आपोआप ॥ भेटला मातें मायबाप ॥ गुरुभक्तीनें अमूप ॥ सकळाभीष्टें पाविजे ॥ ३ ॥



[ अ० ४२ ] यात्रा करितां भक्तांसां । प्रसन्न झाला व्योमकेशी । निजस्वरूप सन्मुखेसी । उभा राहिला शंकर ॥ १०७ ॥

समस्त देवा ऐशी गति ॥ दिल्यावाचून न देती ॥ ईश्वर भोळा चक्रवर्ती ॥ गुरुप्रसादें भेटला ॥ ४ ॥ यज्ञ दान तप सायास ॥ कांहीं न करितां सायास ॥ भेटला मज विशेष ॥ गुरुकृपेंकरोनियां ॥ ५ ॥ ऐसें गुरुस्मरण करीत ॥ ब्रह्मचारी जाय त्वरित ॥ विधिपूर्वक आचरत ॥ यात्रा केली भक्तीनें ॥ ६ ॥ यात्रा करितां भक्तींसीं ॥ प्रसन्न झाला व्योमकेशी ॥ निज-स्वरूपें सन्मुखेसीं ॥ उभा राहिला शंकर ॥ ७ ॥ प्रसन्न होवोनि शंकर ॥ म्हणे दिधला मग वर ॥ संतोषोनि त्वष्टकुमार ॥ निवेदिता झाला वृत्तांत ॥ ८ ॥ जें जें मागितलें गुरुवर्यें ॥ आणिक त्याचे कन्याकुमारें ॥ सांगता झाला विस्तारें ॥ शंकराजवळी देखा ॥ ९ ॥ संतोषोनि ईश्वर ॥ देता झाला अखिल वर ॥ म्हणे बाळा माझा कुमार ॥ सकळ विद्याकुशल होसी ॥ १० ॥ तुवां केली गुरुभक्ति ॥ तेणें झाली आपणा तृप्ति ॥ अखिल विद्या

तुज होती ॥ विश्वकर्मा तूंचि होसी ॥ ११ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ लाधला तुज परमार्थ ॥ सृष्टि रचावया समर्थ ॥ होसी जाण त्वष्टपुत्रा ॥ १२ ॥ ऐसा वर लाधोन ॥ त्वष्टा ब्रह्मानंदन ॥ केलें लिंग स्थापन ॥ आपुले नामीं परियेसा ॥ १३ ॥ मग निघाला तेथोनि ॥ केलीं आयती तत्क्षणीं ॥ प्रसन्न होतां शूलपाणि ॥ काय नोहे तयासी ॥ १४ ॥ जें जें मागितलें श्रीगुरुवरें ॥ सकळ वस्तु केल्या चतुरें ॥ घेऊनियां सत्वरें ॥ आला श्रीगुरुसन्मुख ॥ १५ ॥ सकळ वस्तु देऊनि ॥ लागतसे श्रीगुरुचरणीं ॥ अनुक्रमें गुरुमणि ॥ पुत्र-कन्येंसी वंदिलें ॥ १६ ॥ उल्हास झाला श्रीगुरूसी ॥ आलिंगितसे महाहर्षी ॥ शिष्य ताता ज्ञानराशि ॥ तुष्टलों तुझे भक्तीनें ॥ १७ ॥ सकल विद्याकुशल होसी ॥ अष्टैश्वर्यें नांदसी ॥ त्रैमूर्ति तुझिया वंशीं ॥ होतील ऐक शिष्योत्तमा ॥ १८ ॥ घर केलें तुवां आम्हांसी ॥ आणिक वस्तु विचित्रेंसी ॥ चिरंजीव तूंचि होसी ॥ आचंद्रार्क तुझें नाम ॥ १९ ॥

स्वर्गमृत्युपाताळासी ॥ पसरवीं तुझे चातुर्यासी ॥ रचिसी तूंचि सृष्टीसी ॥ विद्या चौसष्टी तूंचि ज्ञाता ॥१२०॥ तुज वश्य अष्ट सिद्धि ॥ होतील जाण नव निधि ॥ चिंता कष्ट न होती कधीं ॥ म्हणोनि वर देतसे ॥ २१ ॥ ऐसा वर लाधोनि ॥ गेला शिष्य महाज्ञानी ॥ येणेंपरी विस्तारोनि ॥ सांगे ईश्वर पार्वतीसी ॥ २२ ॥ ईश्वर म्हणे गिरिजेसी ॥ गुरुभक्ति आहे ऐसी ॥ एकभाव असे ज्यासी ॥ सकळाभीष्टें पावती ॥ २३ ॥ भव म्हणिजे सागर ॥ उतरावया पैल पार ॥ समर्थ असे एक गुरुवर ॥ त्रैमूर्तीचा अवतार ॥ २४ ॥ या कारणें त्रैमूर्ति ॥ गुरुचरणीं भजती ॥ वेदशास्त्रें बोलती ॥ गुरूविणें सिद्धि नाहीं ॥२५॥ श्लोक ॥ यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥ २६ ॥ ऐसें ईश्वर पार्वतीसी ॥ सांगता झाला विस्तारेंसीं ॥ म्हणोनि श्रीगुरु प्रीतीसी ॥ निरोपिलें द्विजातें ॥२७॥ इतुकें होतां रजनीसी ॥ उदय झाला दिनकरासी ॥ चिंता अंधकारासी ॥

गुरुकृपा ज्योती जाणा ॥ २८ ॥ संतोषोनि द्विजवर ॥ करिता झाला नम-
स्कार ॥ ऐसी बुद्धि देणार ॥ तूंचि स्वामी कृपानिधि ॥ २९ ॥ नमन
करूनि श्रीगुरूसी ॥ विनवीतसे भावेंसी ॥ स्वामी कथा निरोपिलीसी ॥
अपूर्व मातें वाटलें ॥ १३० ॥ काशीयात्राविधान ॥ निरोपिलें मज विस्ता-
रोन ॥ तया वेळीं होतों आपण ॥ तुम्हांसहित तेथंची ॥ ३१ ॥ पाहिलें
आपण दृष्टांतीं ॥ स्वामी काशीपुरीं असती ॥ जागृतीं कीं सुषुप्तीं ॥
नकळे मातें स्वामिया ॥ ३२ ॥ म्हणोनि विप्र तये वेळीं ॥ वंदी श्रीगुरु-
चरणकमळीं ॥ विनवीतसे करुणा बाहळी ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ३३ ॥
जय जया परमपुरुषा ॥ परात्परा परमहंसा ॥ भक्तजनमानसहंसा ॥ श्रीनृ-
सिंहसरस्वती ॥ ३४ ॥ ऐसें तया अवसरीं ॥ पूर्वज तुझा स्तोत्र करी ॥
सांगेन तुज अवधारीं ॥ एकचित्तेंकरूनिया ॥ ३५ ॥ श्लोक ॥ आदौ ब्रह्म-
त्वमेकमेव जगतां वेदात्ममूर्तिं विभो पश्चात् क्षोणितले विनाशि दितिजे

कृत्वाऽवतारं प्रभो ॥ हत्वा दैत्यमनेकधर्मराचता भूत्वाऽत्मजोऽत्रेर्गृहे वंदेऽहं नरकेसरी सरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ३६ ॥ भूदेवाखिलमानुषं विदुर्जना बाधायमानः कलिं वेदायुष्यमनेकवर्णमनुजा भेदादि भूतोन्नतिम् ॥ छेत्ताऽधर्मतमांधकारहरणज्ञानप्रदीपोज्ज्वलं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ३७ ॥ ध्यातस्त्वं हरिमनेकयातिगुरवो जाताग्रजन्मा विभो हेतुः सर्वविभोजनाय हरणं ज्योतिःस्वरूपं जगत् ॥ चातुर्थाश्रमस्थापितं क्षितितले पातुःसदा सेव्ययं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम्॥३८॥ चरितं चित्रमनंतकीर्तिमतुलं परिभूतभूमंडले मूकं वाक्यादिवांधकस्य नयनं वंध्या च पुत्रं ददत् ॥ सौभाग्यं विधवा च दायकश्रियं धत्वा च भक्तं जनं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ३९ ॥ दुरिताघोरदरिद्रदावतिमिरहरणं जगज्जोतिषं सुरधेनुसुरपादपारतजनाकरुणादिभक्तार्तिहा ॥ नरसिंहसरस्वतीश विभो शरणागतं रक्षणं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्री-

पादयुग्मांबुजम् ॥१४०॥ गुरुमूर्तिचरणारविंदयुगलस्मरणं कृते नित्यं सौचरिते क्षेत्रमनेकतीर्थं सफलं सरिदादि भागीरथी ॥ तुरगादि मेधसहस्रगोविदुर्जनाः सम्यक् ददंस्तत्फलं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ४१ ॥ नो शक्यं तव नाममंगलस्तवं वेदागमागोचरं पादद्वंद्वहृदयज्वरांतरजलं निधाय त्वयि प्राकृतं ॥ भूयो भूयःस्मरन्नमामि मनसा श्रीसद्गुरुं पाहि मां वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ४२ ॥ भक्तानां तारणाय सर्वं जगतां दीक्षां ददन्योगिनां सुक्षेत्रं सुरगाणगस्थित प्रमोदत्त्वा चतुष्कामदा ॥ स्तुत्वा भक्तिसरस्वतीगुरुपदं जित्वाऽघ घोषादिकं वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ४३ ॥ एवं श्रीगुरुनाथमष्टकमिदं स्तोत्रं पठेन्नित्यशस्तेजोवर्चबलोन्नतिश्रियकरमानंदवर्धं वपुः ॥ पुत्रापत्यमनेकसंपदलभं दीर्घायुरारोग्यता वंदेऽहं नरकेसरीसरस्वतीश्रीपादयुग्मांबुजम् ॥ ९ ॥ ४४ ॥ येणेंपरी स्तोत्र करीत ॥ मागुती करी दंडवत ॥ सद्गदित

कंठ होत ॥ रोमांच अंगीं उठियेले ॥ ४५ ॥ म्हणे त्रैमूर्ति अवतारु ॥ तूंचि देवा जगद्गुरु ॥ आम्हां दिसतोसी नरु ॥ कृपानिधि स्वामिया ॥ ४६ ॥ मज दाविला परमार्थ ॥ लाधलों चारी पुरुषार्थ ॥ तूंचि सत्य विश्वनाथ ॥ काशीपुर तुजपाशीं ॥ ४७ ॥ ऐसेंपरी श्रीगुरूसी ॥ विनवीतसे परियेसीं ॥ संतोषोनि महाहर्षी ॥ निरोप देती तये वेळीं ॥ ४८ ॥ श्रीगुरु म्हणती द्विजासी ॥ दाखविली तुज काशी ॥ पुढें तुझ्या वंशीं एकविसांसी ॥ यात्रा फळ तयां असे ॥४९॥ तूंचि आमुचा निजभक्त ॥ दाखविला तुज दृष्टांत ॥ आम्हांपासीं सेवा करीत ॥ राहें भक्ता म्हणती तया ॥ ५० ॥ जरी राहसी आम्हापासीं ॥ तरी त्वां न वंदिजे म्लेंछासी ॥ आणोनियां स्त्रीपुत्रांसी ॥ भेटी करीं आम्हांतें ॥ ५१ ॥ निरोप देऊनि द्विजासी ॥ गेले गुरु मठासी ॥ आनंद झाला मनासी ॥ श्रीगुरुदर्शनीं भक्तजना ॥ ५२ ॥ नामधारक शिष्यराणा ॥ लागे सिद्धाचिया चरणां ॥ विनवीतसे कर

जोडोनि जाणा ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥५३॥ मागें कथानक निरोपिलें ॥ सायंदेव शिष्य भले ॥ श्रीगुरूंनीं त्यातें निरोपिलें ॥ कलत्रपुत्र आणीं म्हणत ॥ ५४ ॥ पुढें तरग काय झालें ॥ विस्तारोनि सांगा वहिलें ॥ पाहिजे आतां अनुग्रहिलें ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ५५ ॥ संतोषोनि सिद्ध मुनि ॥ सांगतसे विस्तारोनि ॥ सायंदेव महाज्ञानीं ॥ गेला श्रीगुरु-निरोपें ॥ ५६ ॥ जाऊनि आपुले स्त्रियेसी ॥ सांगता झाला पुत्रासी ॥ आमुचा गुरु परियेसीं ॥ असे गाणगापुरांत ॥ ५७ ॥ आम्हीं जावें भेटीसी ॥ समस्त कन्यापुत्रांसीं ॥ म्हणोनि निघाला वेगेंसीं ॥ महानंदेंकरोनियां ॥ ५८ ॥ पावला गाणगापुरासी ॥ भेटी जहाली श्रीगुरूसी ॥ नमन करी भक्तींसीं ॥ साष्टांगीं तये वेळीं ॥ ५९ ॥ कर जोडुनी तये वेळीं ॥ स्तोत्र करी वेळो-वेळीं ॥ ओं नमोजी चंद्रमौळि ॥ त्रैमूर्ति तूंचि होसी ॥१६०॥ तूं त्रैमूर्तीचा अवतार ॥ अज्ञानदृष्टीं दिससी नर ॥ वर्णावया न दिसे पार ॥ तुझा

महिमा स्वामिया ॥ ६१ ॥ तुझा महिमा वर्णावयासी ॥ शक्ति कैंची आम्हांसी ॥ आदिपुरुष भेटलासी ॥ कृपानिधि स्वामिया ॥ ६२ ॥ जैसा चंद्र चकोरासी ॥ उदय होतां संतोष त्यासी ॥ तैसा आनंद आम्हांसी ॥ तुझे चरण लक्षितां ॥ ६३ ॥ पूर्वजन्मीं पापराशि ॥ केल्या होत्या बहुवशी ॥ श्रीगुरूचे दर्शनेंसीं ॥ पुनीत झालों म्हणतसे ॥ ६४ ॥ जैसा चिंतामणि स्पर्शीं ॥ हेमत्व होय लोहासी ॥ मृत्तिका पडतां जंबूनदीसी ॥ उत्तम सुवर्ण होतसे ॥ ६५ ॥ जातां मानससरोवरासी ॥ हंसत्व येई वायसासी ॥ तैसें तुझे दर्शनेंसीं ॥ पुनीत झालों स्वामिया ॥ ६६ ॥ श्लोक ॥ गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा ॥ पापं तापं च हरति दैन्यं च गुरुदर्शनम् ॥ १ ॥ टीका ॥ गंगा स्नानानें पापें नाशी ॥ ताप निवारी देखा शशी ॥ कल्पवृक्षछायेसी ॥ कल्पिलें फळ पाविजे ॥ ६७ ॥ एकेकाचे एकेक गुणें ॥ असतीं ऐसीं हीं लक्षणें ॥ दर्शन होतां श्रीगुरुचरणें ॥ तिन्ही फळें पाविजे

॥ ६८ ॥ पापें हरतीं तात्काळीं ॥ तापचिंता जातीं सकळी ॥ दैन्यकानन समूळ जाळी ॥ श्रीगुरुचरणदर्शनें ॥ ६९ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ देता होय गुरुनाथ ॥ ऐसा बोले वेदसिद्धांत ॥ तोचि आम्हीं देखिला ॥ १७० ॥ म्हणोनियां आनंदेंसीं ॥ गायन करी संतोषीं ॥ अनेक रागें परियेसीं ॥ कर्नाटक भाषेंकरोनि ॥ ७१ ॥ राग श्रीराग ॥ कंडेनिंदुभक्तजनराभाग्य-निधियभूमंडलदोळगेनारसिंहसरस्वतीयां ॥ ७२ ॥ कंडेनिंदुउंडेनिंदुवारिजा-दोळपादवाराजाकमळांदोळदंतध्यानिसी ॥ ७३ ॥ सुखसुवाजनारुगळा ॥ भोरगेलान्नेकामिफळफळा ॥ नित्यसकळाहूवा ॥ श्रीनारसिंहसरस्वतीवराननना ॥ ७४ ॥ वाक्यकरुणानेनसुवा ॥ जगदोळगदंडकमंडलुधराशी ॥ सगुणाने-नीशीसुजनारिगे ॥ वगादुनीवासश्रीगुरुयतिवरांन ॥ ७५ ॥ धारगेगाणगा-पुरडोलकेलाशीहरी ॥ दासिसोनुनादयाकरुणादली ॥ वरावीतुंगमुनाहोरा-वनुअनुबिना ॥ नारसिंहसरस्वतीगुरुचरणवन्न ॥ ७६ ॥ राजगखंडीकंडी-

नेननमा ॥ इंदुकडेनेनमा ॥ मंडलादोळगेयती कुलराये ॥ चंद्रमन्ना ॥७७॥ तत्त्वबोधायाउपनिषद्तत्त्वचरित नाव्यक्तवादपरब्रह्ममूर्तीयनायना ॥ शेषशयनापरवेशकायना ॥ लेशकृपयनीवनेवभवासौपालकाना ॥ ७८ ॥ गंधपरिमळादिशोभितानंदासररसाछंदालयोगेंद्रेगोपीवृंदवल्लभना ॥ ७९ ॥ करीयनीयानांपापगुरु ॥ नवरसगुसायन्नीं ॥ नरसिंहसरस्वत्यन्ना ॥ नादपुरुषवादना ॥ १८० ॥ यापरी स्तोत्रें श्रीगुरूसी ॥ स्तुति केली बहुवसीं ॥ संतोषोनि महाहर्षी ॥ आश्वासिताती तये वेळीं ॥ ८१ ॥ प्रेमभावें समस्तांसी ॥ बैसा म्हणती समीपेसी ॥ जैसा लोभ मानसी ॥ या बाळकावरी परियेसा ॥ ८२ ॥ आज्ञा घेउनी सहज ॥ गेला तुमचा पूर्वज ॥ सकळ पुत्रांसहित द्विज ॥ आला श्रीगुरुदर्शना ॥ ८३ ॥ भाद्रपदचतुर्दशीसी ॥ शुक्लपक्ष परियेसीं ॥ आला शिष्य भेटीसी ॥ एका भावेंकरोनिया ॥ ८४ ॥ येती शिष्य लोटांगणीं ॥ एका भावें तनुमनीं ॥ येऊनि लागती चरणीं ॥ सद्ग-

दित कंठ झाला ॥ ८५ ॥ स्तोत्र करिती तिहीं काळीं ॥ कर जोडोनि तये वेळीं ॥ ओं नमोजी चंद्रमौळि ॥ त्रैमूर्ति तूंचि होसी ॥ ८६ ॥ त्रैमूर्तींचा अवतारु ॥ झालासी तूं जगद्गुरु ॥ येरां दिसतोसी नरु ॥ न कळे पार तुझा स्वामिया ॥ ८७ ॥ सिद्ध म्हणे नामकरणी ॥ काय सांगूं तये दिनीं ॥ कैशी कृपा अंतःकरणीं ॥ तया श्रीगुरु यतीचे ॥ ८८ ॥ आपुले पुत्रकलत्रेंसीं ॥ जैसा लोभ परियेसीं ॥ तैसा तुमचे पूर्वजासी ॥ प्रेमभावें पुसताती ॥ ८९ ॥ गृहवार्ता सुरसी ॥ क्षेम पुत्रकलत्रेंसी ॥ द्विज सांगे मनोहर्षीं ॥ सविस्तारीं परियेसा ॥१९०॥ पुत्रकलत्रेंसहित नमोन ॥ सांगे क्षेम समाधान ॥ होते पुत्र चौघेजण ॥ चरणावरी घातले ॥ ९१ ॥ ज्येष्ठ-सुत नागनाथ ॥ तयावरी कृपा बहुत ॥ कृपानिधि गुरुनाथ ॥ माथां हस्त ठेविती ॥ ९२ ॥ श्रीगुरु म्हणती द्विजासी ॥ तुझ्या ज्येष्ठसुतासी ॥ आयुष्य पूर्ण असे त्यासी ॥ संतति बहु याची वाढेल ॥९३॥ ह्याच भक्त आम्हांसी ॥

असेल श्रियायुक्तेसी ॥ तुवां आतां म्लेंच्छासी ॥ सेवा न करावी म्हणितलें ॥ ९४ ॥ आणिक तूतें असे नारी ॥ पुत्र होती तीस चारी ॥ नांदतील श्रेयस्करी ॥ तुवां सुखें असावें ॥ ९५ ॥ जया दिवसीं म्लेंच्छासी ॥ तुवां जावोनि वंदिसी ॥ हानि असे जीवासी ॥ म्हणोनि सांगती तये वेळीं ॥ ९६ ॥ तुझा असे वडील सुत ॥ तोचि आमुचा निज भक्त ॥ त्याची कीर्ति वाढेल बहुत ॥ म्हणती श्रीगुरु तये वेळीं ॥ ९७ ॥ मग म्हणती द्विजासी ॥ जावें त्वरित्त संगमासी ॥ स्नान करोनि त्वरितेसी ॥ यावें म्हणती तये वेळीं ॥ ९८ ॥ ग्रामलोक तया दिवसीं ॥ पूजा करितां अनंतासी ॥ येऊनियां श्रीगुरूसी ॥ पूजा करितो परियेसा ॥९९॥ पुत्रमित्रकलत्रेंसीं ॥ गेले स्नाना संगमासी ॥ विधिपूर्वक अश्वत्थासी ॥ पूजूनि आले मठातें ॥ २०० ॥ श्रीगुरु म्हणती द्विजासी ॥ आजि व्रतचतुर्दशी ॥ पूजा करीं अनंतासी ॥ समस्त द्विज मिळोनि ॥ १ ॥ ऐसें म्हणतां द्विजवरु ॥

करिता होय नमस्कारु ॥ आमुचा अनंत तूंचि गुरु ॥ व्रतसेवा तुमचे चरण ॥ २ ॥ तये वेळीं श्रीगुरु ॥ सांगता झाला विस्तारु ॥ कौंडिण्यमहाऋषीश्वरू ॥ केलें व्रत प्रख्यात ॥ ३ ॥ ऐसें म्हणतां द्विजवरु ॥ करिता होय नमस्कारु ॥ कैसें व्रत आचरावें साचारु ॥ पूर्वी कोणीं केलें असे ॥ ४ ॥ ऐसें व्रत प्रख्यात ॥ व्रत दैवत अनंत ॥ जेणें होय माझें हित ॥ कथामृत निरोपिजे ॥ ५ ॥ येणें पुण्य काय घडे ॥ काय लागतसे रोकडें ॥ ऐसें मनींचें साकडें ॥ फेडावें माझें स्वामिया ॥ ६ ॥ ऐसें विनवीतसे द्विज- ॥ वरु संतोषोनि गुरु दातारु ॥ सांगते झाले व्रताचारु ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ ७ ॥ म्हणोनि सरस्वती गंगाधरु ॥ सांगे गुरुचरित्राविस्तारु ॥ ऐकतां भवसागरु ॥ पैलपार पाववी श्रीगुरु ॥ ८ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ काशीयात्रा समस्त करीत ॥ श्रोत ऐकती आनंदित ॥ तेणें सफल जन्म होय ॥ ९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सांगतसे नामधारक

विख्यात ॥ जेणें होय मोक्ष प्राप्त ॥ २१० ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्यानेसिद्धनामधारकसंवादे काशीक्षेत्रमहिमावर्णनं नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओवीसंख्या ॥ २१० ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरु म्हणती द्विजासी ॥ या अनंतव्रतासी ॥ भक्तिपूर्वक निश्चयेंसीं ॥ पूर्वीं बहुतीं आराधिलें ॥ १ ॥ युधिष्ठिर पंडुसुत ॥ तयानें आचरिलें हें व्रत ॥ राज्य लाधला त्वरित ॥ ऐसें व्रत हें उत्तम ॥ २ ॥ ऐसें म्हणता द्विजवर ॥ करिता झाला नमस्कार ॥ पूवा राजा पंडुकुमार ॥ आणिक राज्य केवीं झालें ॥ ३ ॥ श्रीगुरु म्हणती द्विजांसी ॥ होतें राज्य पांडवांसी ॥ द्यूतकर्म कौरवांसीं ॥ करूनी राज्य हारविलें ॥४॥ मग निघाले वनांतरा ॥ कष्टत होते वर्षें बारा ॥ ऐसें तया युधिष्ठिरा ॥ राज्य त्यजिलें परियेसा ॥ ५ ॥ तया घोर अरण्यांत ॥ युधिष्ठिरबंधूंसहित ॥ असे चिंताव्याकुळित ॥ सदा ध्याय श्रीहरीसी ॥ ६ ॥ समस्त राज्य सांडूनि ॥ वास केला त्यांहीं वनीं ॥ कौरव कपट करोनि ॥ नानापरी विघ्नें करिती ॥ ७ ॥ सत्व यांचें टाळावयासी ॥

१ कुलीनतेचें ब्रीद.

पाठविलें दुर्वासासी ॥ त्यांसी सर्वां ठायीं हृषीकेशी ॥ रक्षीतसे सर्वदा ॥ ८ ॥ नाना तीर्थें नाना व्रतें ॥ आचरले तेथें बहुतें ॥ कष्टत होते वनीं ते ॥ निर्वाणरूप होऊनियां ॥ ९ ॥ भक्तवत्सल नारायण ॥ तयांचे कष्ट पाहून ॥ आला तेथें ठाकोन ॥ जेथें होते पंडुकुमार ॥ १० ॥ कृष्ण येतां देखोनि ॥ धर्म जाय लोटांगणीं ॥ दंड प्रणाम करूनी ॥ वंदीतसे तये वेळीं ॥ ११ ॥ केश आपुले मोकळी ॥ झाडी कृष्णचरणधुळी ॥ सर्वोपपस्कारपूजा तये वेळीं ॥ करीतसे विनयेंसीं ॥ १२ ॥ अर्घ्यपाद्य देवोनि ॥ गंधाक्षता लावूनि ॥ जीं कां पुष्पें होतीं रानीं ॥ त्यांहीं पूजा करीतसे ॥ १३ ॥ पूजोनियां भक्तींसीं ॥ विनवीतसे परियेसीं ॥ जय जया जी हृषीकेशी ॥ भक्तवत्सला कृष्णनाथा ॥ १४ ॥ जय जया अनंत नारायणा ॥ भवसागरउद्धारणा ॥ कृपाळुवा लक्ष्मीरमणा ॥ क्षीराब्धिवासा वासुदेवा ॥ १५ ॥

१ विरक्तपणानें निश्चयी.

परमात्मा परंज्योति ॥ तूंचि करिसी उत्पत्ति स्थिति ॥ लय करिसी तूंचि अंतीं ॥ त्रैमूर्ति तूंचि देवा ॥ १६ ॥ विश्वाचा जिव्हाळा ॥ होऊनि रक्षिसी सकळां ॥ वास तुझा सूक्ष्म स्थळा ॥ अणुरेणुतृणकाष्ठीं ॥ १७ ॥ नमन तुझे चरणासी ॥ त्रिगुणात्मक हृषीकेशी ॥ रजोगुणें सृष्टीसी ॥ तुवां रचियेली संयोगें ॥ १८ ॥ दुष्ट निग्रह करणें ॥ साधुजना संरक्षणें ॥ असें सामर्थ्य वेदपुराणें ॥ बोलताती प्रसिद्ध ॥ १९ ॥ फेडावयां[1] भूमिभार ॥ घेतला तुवां अवतार ॥ जड झाला युधिष्ठिर ॥ तरी कां तुवां ठेविला ॥ २० ॥ आपुले प्राण आम्हांसी ॥ म्हणवोनि जगीं वानिसी[2] ॥ पाठवूनि अरण्यासी कष्टविलें नानापरी ॥२१॥ तुझी कृपा होय जयासी ॥ तयासी तूं रक्षिसी ॥ उपेक्षूनि आम्हांसी ॥ अरण्यांत कां ठेविलें ॥ २२ ॥ तुजवांचोनि आम्हीं हृषीकेशी ॥ दुःख सांगावें कवणापासीं ॥ जरी आम्हा उपेक्षिसी ॥ काय

१ हरण करण्याकरितां. २ वाखाणतोस.

कांक्षा जीवातें ॥ २३ ॥ इतुकियावरी भीमसेन ॥ येऊनि धरी कृष्णचरण ॥ उपेक्षावया काय कारण ॥ कृपा करोनि सांगा म्हणे ॥ २४ ॥ धनंजय तये वेळीं ॥ वंदीतसे चरणकमळीं ॥ विनवीतसे करुणा बहाळी ॥ कृपाळुवा मुरारि ॥ २५ ॥ तुझे कृपादृष्टीसी ॥ होतों आम्ही अरण्यवासी ॥ घडले कष्ट सायासीं ॥ उबगेलों स्वामी बहुत ॥ २६ ॥ आतां आमुचें कष्टहरण ॥ पांडवांचा तूंचि प्राण ॥ ब्रीद राखें नारायण ॥ म्हणतसे तये वेळीं ॥ २७ ॥ माद्रीदेवीचे कुमार ॥ करोनियां नमस्कार ॥ द्रौपदी येऊनी सत्वर ॥ पाय वंदी तये वेळीं ॥ २८ ॥ तूं आमुचा कैवारी ॥ आम्ही असों अरण्यघोरीं ॥ आमुचा बंधु राज्य करी ॥ काय उपयोग आम्हांसी ॥ २९ ॥ तुजसारिखें छत्र असतां ॥ आम्हां कष्ट अपरमिता ॥ कवणें प्रकारें स्वस्थचित्तता ॥ राज्य-प्राप्ति आम्हांसी ॥ ३० ॥ असा उपाय आम्हांसी ॥ सांगा स्वामी हृषीकेशी ॥

१ आशा. २ कष्टी झालों.

ऐसें म्हणतां कृष्णासी ॥ कृपा उपजे मनांत ॥ ३१ ॥ कृष्ण म्हणे पंडुसुता ॥ सांगेन तुम्हां एकव्रता ॥ तात्काळिक तुम्हां प्रसन्नता ॥ राज्य होईल जाण पैं ॥ ३२ ॥ व्रतांमध्यें उत्तम व्रत ॥ अनंतनाम विख्यात ॥ आचारावें तुम्हीं त्वरित ॥ राज्य तुम्हां होईल ॥ ३३ ॥ आतां सांगेन तुम्हांसी ॥ अनंतव्रत म्हणसी ॥ सर्वां ठायीं आपण वासी ॥ अनंतनाम आम्हां असे ॥ ३४ ॥ कला काष्ठा मुहूर्त आपण ॥ दिन रात्रि शरीर जाण ॥ पक्ष मास वर्ष आपण ॥ युग कल्प आदि करोनि ॥३५॥ अवतरलों मी नारायण ॥ भूभार उतरावया लागोन ॥ दानव दुष्ट निर्दाळीन ॥ जन्मलों वसुदेवकुळीं ॥ ३६ ॥ अनंत मीच जाणसी ॥ संशय न धरीं गा मानसीं ॥ त्रैमूर्ति अवतरलों सर्वांशी ॥ ब्रह्माविष्णुमहेश्वर ॥ ३७ ॥ आपणची सूर्य शशी देखा ॥ चतुर्दश भुवनें मी ऐका ॥ अष्टवसु आहेत निका ॥ द्वादशार्कची ॥ ३८ ॥ रुद्र आपण असती

१ राक्षस.

एकादश ॥ सप्तसमुद्र परियेस ॥ ऋषि सप्त विशेष ॥ पर्वतादिक आपणची ॥ ३९ ॥ जितुके वृक्ष आहेती क्षितीं ॥ आकाशीं नक्षत्रें दिसतीं ॥ दश दिशा आहेती ख्याति ॥ भूमि आपण म्हणे देखा ॥ ४० ॥ असती सप्त पाताळ ॥ भूर्भुवादि लोक सकळ ॥ अणुरेणु तृण काष्ठ सकळ ॥ विश्वात्मा आपणची ॥४१॥ न धरीं संशय युधिष्ठिरा ॥ अनंत म्हणजे मी निर्धारा ॥ विधिपूर्वक पूजा करा ॥ व्रत तुम्हांसी बरवें असे ॥ ४२ ॥ विनवी युधिष्ठिर कर जोडोनि ॥ स्वामी सांगा विस्तारोनि ॥ व्रत करावें कवणें विधानीं ॥ कवण दान कवण पूजा ॥ ४३ ॥ करावें व्रत कवणे दिवशीं ॥ विस्तारोनि सांग आम्हांसी ॥ निरोपावें वेगेंसीं ॥ पूर्वीं कवणें आचारिलें ॥ ४४ ॥ कृष्ण म्हणे युधिष्ठिरासी ॥ तुवां पुसिलें आम्हांसी ॥ शुक्ल पक्ष भाद्रपद मासीं ॥ चतुर्दशी परियेसा ॥४५॥ आराधितां अनंतासी ॥ त्वरित

१ पृथ्वीवर

राज्य पावसी ॥ पूर्वीं कोणीं केलें म्हणसी ॥ सांगेन ऐका तत्पर ॥ ४६ ॥ असे पूर्वीं कृतयुगेसी ॥ सुमंतु नामें विप्र परियेसीं ॥ उत्पन्न झाला वसिष्ठ-गोत्रासी ॥ भृगुकन्या दीक्षा नामें ॥ ४७ ॥ तेचि झाली सुमंतूची भार्या ॥ पतिव्रता औदार्या ॥ कन्या तिसी झाली सुनतया ॥ नाम तिचें सुशीला ॥ ४८ ॥ सुशीला कन्या सुमंतुघरीं ॥ नित्य भक्ति सदाचारी ॥ करीतसे विचित्रपरी ॥ सर्वमंगळ स्वरूपें ॥ ४९ ॥ गृहशोभा करी बहुत ॥ नाना-पत्रें तोरणें करीत ॥ पंचवर्ण चूर्णयुक्त ॥ रंगमाळिकासहित देखा ॥ ५० ॥ स्वस्तिकादि शंख पद्म ॥ चक्रगदादि उत्तम ॥ नमस्कारादि मनोधर्म ॥ देव-तार्चन सोपस्कारीं ॥ ५१ ॥ वर्ततां ऐसें एके दिवशीं ॥ विचित्र घडलें दैववशीं ॥ सुमंतुपत्नी पंचत्वासी ॥ पावती झाली तये वेळीं ॥ ५२ ॥ सुमं-तूसी भार्याहीनत्व झालें ॥ समस्त कर्म राहिलें ॥ पुनः संधान पाहिजे

१ यथास्थितपणें.

केलें ॥ म्हणोनि नारी आणिक केली ॥ ५३ ॥ तिचें नांव असे कर्कशी ॥ दुःशीला[1] आचरणीं परियेसीं ॥ नित्य कलह[2] करी बहुवसीं ॥ कन्यापतिसवें देखा ॥ ५४ ॥ सुशीलाकन्या झाली उपवर ॥ सुमंतु चिंती वारंवार ॥ इशीं एखादा मिळतां वर ॥ कन्यादान करीन म्हणे ॥ ५५ ॥ ऐसें चिंततां एके दिवशीं ॥ तेथें आला कौंडिण्य ऋषि ॥ विचारिता कन्येसी ॥ सुमंतूनें अंगिकारिलें ॥ ५६ ॥ कन्यादान गृह्योक्तेंसीं ॥ देता झाला कौंडिण्यासी ॥ मिळोनि होती दोन मासीं ॥ आषाढ आणि श्रावण ॥ ५७ ॥ माता करी कन्येसीं वैर ॥ सापत्नपणाचा[3] हाचि प्रकार ॥ कौंडिण्य पुसे सुमंता विचार ॥ जाऊं आश्रमा आणिक ठायां ॥ ५८ ॥ सुमंत बहु दुःख करी ॥ म्हणे स्त्री नव्हे माझा वैरी ॥ कन्या जाईल आतां दूरी ॥ कैंची पापिणी वरिली मीं ॥ ५९ ॥ शांत पत्नी नाहीं ज्याचे घरीं ॥ तयासी

१ वाईट स्वभावाची. २ भांडण. ३ सावत्रपणाचा.

अरण्य नाहीं दूरी ॥ एक स्वामी त्रिपुरारि ॥ संसारसागरीं बुडालों ॥ ६० ॥
न चाले माझें कर्म तापस ॥ नायके हित बोले कर्कश ॥ कन्या असता
संतोष ॥ नित्यदर्शन जामाता ॥ ६१ ॥ ऐसा सुमंतु चिंता करी ॥ कौंडिण्य
ऋषि त्यासी वारी ॥ दोघे तापसी एके घरीं ॥ असूं नये धर्महानि ॥ ६२ ॥
जाऊं आम्ही आणिक स्थाना ॥ तप करोनि अनुष्ठाना ॥ भेटी होईल पुनः
पुनः ॥ जवळी करूं आश्रम ॥ ६३ ॥ सुमंतु म्हणे कौंडिण्यास ॥ आणिक
रहावें बारा दिवस ॥ सर्वसिद्धा त्रयोदशीस ॥ प्रस्थान तुम्हीं करावें ॥ ६४ ॥
सुमंतूची विनंति ऐकोन ॥ आणिक राहिले तेरा दिन ॥ सुमुहूर्त बरवा
पाहून ॥ येरे दिवशीं निघाला ॥ ६५ ॥ सुमंतु म्हणे कर्कशेसी ॥ कन्या
जाईल पतिसरसी ॥ भोजन घालावें जामातासी ॥ व्रीहि गोधूम दे म्हणे
॥ ६६ ॥ पति सांगतांची काय जहालें ॥ धांवत घरांत गमन केलें ॥ दृढ
कवाड लाविलें ॥ पाषाण लावी द्वारवंटा ॥ ६७ ॥ कांहीं केलिया न उघडी

१ उंबरठ्याला.

द्वार ॥ सुमंतु विनवी आपली शीर ॥ सुशीला कन्या धरी कर ॥ म्हणे जाऊं तैसींच ॥ ६८ ॥ पाहूं गेला स्वयंपाकघरा ॥ होता कोंडा गोधूम खरा ॥ देता झाला कन्यावरा ॥ निरोप दिधला दोघांसी ॥ ६९ ॥ दोघें बैसोनि रथावरी ॥ निघालीं कौंडिण्य संतोष करी ॥ माध्यान्हकाळीं नदी-तीरीं ॥ अनुष्ठानालागीं उतरले ॥ ७० ॥ ऋषि बैसला अनुष्ठाना ॥ सुशीला होती तये स्थाना ॥ तीरीं पाहतसे रम्य वना ॥ स्त्रीसमुदाय बहु असे ॥ ७१ ॥ रक्तांबर वस्त्रेंसीं ॥ परिधान केलें बहुवसीं ॥ व्रत म्हणती चतुर्दशी ॥ करिती पूजा पृथक् पृथक् ॥ ७२ ॥ पाहूनि सुशीला हळूहळू ॥ गेली तया सुवासिनीजवळू ॥ पुसती झाली वेल्हाळू ॥ काय व्रत करितां तुम्ही ॥ ७३ ॥ स्त्रिया म्हणती सुशीलेसी ॥ अनंतव्रत आहे परियेसीं ॥ पूजितां होय तात्काळेसी ॥ सकळाभीष्टें पावती ॥ ७४ ॥ सुशीला म्हणे नारींसी ॥ कवण विधान सांगा मजसी ॥ कृपा करोनि विस्तारेंसीं ॥

निरोपावें मजलागीं ॥ ७५ ॥ समस्त नारी मिळोनि ॥ सांगताती विस्ता-
रोनि ॥ ऐक सुशीले बैस म्हणोनि ॥ व्रत आद्यंतेंसीं निरोपिती ॥ ७६ ॥
भाद्रपद शुक्ल चतुर्दशीसी ॥ व्रत करावें परियेसीं ॥ सांगूं तुज विस्तारेंसीं ॥
ऐक सुशीले म्हणताती ॥७७॥ रक्तपट्टसूत्रेंसीं ॥ अनंत करावा परियेसीं ॥
घेवोनि जावें नदीसीं ॥ स्नान करावें विधीनें ॥ ७८ ॥ दिव्यांबर परिधा-
नूनि ॥ हळदीकुंकुम लावूनि ॥ आणावे कलश नूतन दोनी ॥ गंगा यमुना
म्हणोनियां ॥ ७९ ॥ उदक भरोनि तयांत ॥ पंचपल्लव-रत्नसहित ॥
घालोनि पूजावें त्वरित ॥ षोडशोपचारेंकरूनि ॥ ८० ॥ नाना प्रकारें
आरती ॥ कराव्या गंगायमुनांप्रती ॥ मग पूजावा दर्भग्रंथी ॥ शेषरूपें करो-
नियां ॥ ८१ ॥ दोनी कलशांवरी देखा ॥ नूतन वस्त्रें ठेवूनि निका ॥ पद्म
लिहूनि अष्टदलिका ॥ कलशांवरून ठेवावें ॥८२॥ तया कलशांपुढें देखा ॥
पंचवर्ण चूर्णें देखा ॥ शंखपद्मादि अनेका ॥ रंगमाळिका घालाव्या ॥ ८३ ॥

शेष पूजावा दर्भांचा ॥ षोडशोपचारीं बरवा, साचा ॥ ध्यानीं ध्यास विष्णूचा ॥ शेषशायी म्हणोनियां ॥ ८४ ॥ सप्तफणी शेषासी ॥ सदा विष्णु त्यापासी ॥ याचि कारणें नाम तयासी ॥ अनंत ऐसें ध्यान करावें ॥ ८५ ॥ पिंगलाक्ष चतुर्भुजेंसीं ॥ शंख पद्म सव्य करेसी ॥ चक्र गदा वाम हस्तेसी ॥ ऐसी मूर्ति त्वां ध्यावी ॥ ८६ ॥ ओं नमो भगवते मंत्रेंसीं ॥ षोडशोपचारें दर्भग्रंथीसी ॥ आणोनि नव्या दोरकासी ॥ ध्यान करावें मग तेथें ॥ ८७ ॥ अनंतगुणरत्नाय मंत्रेंसीं ॥ नव दोरक ठेवावे कलशांसी ॥ पूजा करावी पुरुषसूक्तेंसीं ॥ अतोदेवेति मंत्रेंसहित ॥ ८८ ॥ षोडशोप-चारें पूजोन ॥ संसारेति मंत्रें दक्षिण करीं बांधोन ॥ नमस्ते वासुदेव मंत्रें-करून ॥ जीर्ण दोरक विसर्जावे ॥ ८९ ॥ दाता च विष्णुर्भगवान् म्हणत ॥ वायन द्यावें गोधूम घृत ॥ प्रस्थ गोधूमाचें सघृत ॥ फळासह वायन द्यावें ॥ ९० ॥ अपूपादि पायसेंसीं ॥ सुदक्षिणा तांबूलेंसीं ॥ अर्धें द्यावें ब्राह्म-



[ अ० ४३ ] समस्त नारी मिळोनी तिसी । तंतु देती अनंतासी । ग्रंथी बांधोनि चतुर्दशी । पूजा करविती आपणांसवें ॥ ९५ ॥

णासी ॥ अर्धें आपण भक्षावें ॥ ९१ ॥ ऐसें चौदा वर्षें देखा ॥ व्रत आचरावें विशेखा ॥ उद्यापन करावें निका ॥ चतुर्दश कलश द्यावे ॥ ९२ ॥ ब्राह्मणभोजन करोन ॥ भक्तीनें करावें उद्यापन ॥ कामना होईल संपूर्ण ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ ९३ ॥ ऐसें सांगती सुशीलेसी ॥ व्रत आचरावें त्वरितेसी ॥ आजचि असे चतुर्दशी ॥ व्रत करीं आम्हांसवें ॥ ९४ ॥ समस्त नारी मिळोनि तिसी ॥ तंतु देती अनंतासी ॥ ग्रंथी बांधोनि चतुर्दशी ॥ पूजा करविती आपणांसवें ॥ ९५ ॥ कोंडा होता गोधूमाचा ॥ आणोनि देतसे अर्ध साचा ॥ वाण देऊनि सुवाचा ॥ निरोप स्त्रियांचा घेतला ॥ ९६ ॥ समस्त स्त्रियांसी वंदोनि भाळीं ॥ आली आपुले रथाजवळी ॥ अनुष्ठान सारूनि ऋषि तये वेळीं ॥ येता झाला झडकरी ॥ ९७ ॥ चला म्हणोनि पुढें जातीं ॥ दोघें बैसोनियां रथीं ॥ जातां पुढें देखती ॥ अमरावती ऐसें नगर ॥ ९८ ॥ नगरलोक सामोरे येती ॥ चला स्वामी ऐसें म्हणती ॥ तुम्ही या नगरीचे अधि-

पति ॥ तपोनिधि महाराजा ॥ ९९ ॥ नाना समारंभें देखा ॥ नगरीं प्रवेशलीं दंपती ऐका ॥ ऐश्वर्यें भोगिलीं बहुसुखा ॥ श्रीमदनंतप्रसादें ॥१००॥ ऐसें कितीएक दिवसांवरी ॥ होतां कौंडिण्य सहनारी ॥ बैसले असतां संतोषें करीं ॥ देखता झाला अनंता ॥ १ ॥ ऋषि पुसे स्त्रियेसी ॥ काय बांधिलें हस्तासी ॥ वशीकरण आम्हांसी ॥ रक्त दोर बांधिला ॥ २ ॥ सुशीला बोले भ्रतारासी ॥ अनंत दोरा परियेसीं ॥ याचिया प्रसादें तुम्हांसी ॥ अष्टैश्वर्य प्राप्त झालें ॥ ३ ॥ ज्यां जे दिवशीं व्रत केलें ॥ तेणें-करोनि दैव तुम्हां आलें ॥ पहा दैवत प्रसन्न झालें ॥ म्हणोनि बोले सुशीला ॥ ४ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ ऋषि कोपला बहु मनीं ॥ दोरक घेतला हिरोनि ॥ अग्नीमध्यें टाकिला ॥ ५ ॥ मग म्हणे कैंचा अनंत ॥ आपण केलें असे तप बहुत ॥ तेणेंकरोनि ऐश्वर्य अद्भुत ॥ प्राप्त झालें आम्हांसी ॥ ६ ॥ वशीकरण केलें आम्हांसी ॥ दोरा बांधूनि अनंत म्हणसी ॥ रागें

भरोनि कौंडिण्य तिसी ॥ हिरोनि अग्नींत टाकिला ॥ ७ ॥ हा हा सुशीला म्हणोनि ॥ धांवत गेली अग्निस्थानीं ॥ क्षीरांत घातला काढोनि ॥ विज्ञविती झाली दोरका ॥ ८ ॥ अनंत टाकिला अग्नीसी ॥ हानि झाली ऐश्वर्यासीं ॥ दरिद्री झाला परियेसीं ॥ द्विजवर कौंडिण्य तत्क्षणीं ॥९॥ नगरीं झाले सर्व शत्रु ॥ गोधनादि आभरण वस्तु ॥ समस्त नेते झाले तस्करु ॥ दरिद्र झालें तात्काळ ॥ ११० ॥ गृह दग्ध झालें देखा ॥ अवकृपा होतां रमानायका ॥ उरलें नाहीं वस्त्र एका ॥ सर्व गेलें तत्क्षणीं ॥ ११ ॥ मग विचारी मानसी ॥ म्हणे अनंत रुसला आम्हांसीं ॥ वायां घातलें अग्नीसी ॥ मदांधें वेष्टिलों ॥ १२ ॥ आतां करीन नेम एक ॥ जंव भेटेल लक्ष्मीनायक ॥ श्रीमदनंत देखेन मुख ॥ तंव अन्नोदक न घेई ॥ १३ ॥ म्हणोनि निर्वाण करोनिं ॥ निघता झाला घोर काननीं ॥ भार्येसहित कौंडिण्य मुनि ॥ निघता झाला परियेसा ॥ १४ ॥ हा हा अनंत अनंत

म्हणत ॥ शीघ्र जातसे अरण्यांत ॥ तंव देखिला वृक्ष चूत ॥ पुष्पीं फळीं भरला असे ॥ १५ ॥ कीटकादि पक्षिजाति ॥ कोणी त्यासी नातळती ॥ कौंडिण्य पुसे तयाप्रती ॥ अनंतासी देखिलें कीं ॥ १६ ॥ वृक्ष म्हणे ब्राह्मणासी ॥ दृष्टीं न पडेचि आम्हांसी ॥ तुवां जरी देखिला अससी ॥ तरी आम्हांसी सांगावें ॥ १७ ॥ ऐसें ऐकोनि पुढें जात ॥ धेनु देखिली वत्सासहित ॥ हिंडतसे तृणांत ॥ तोंडीं न ये भक्षावया ॥ १८ ॥ द्विज म्हणे धेनूसी ॥ जरी तुवां अनंत देखिलासी ॥ कृपा करोनि आम्हांसी ॥ सांग म्हणे द्विजवर ॥ १९ ॥ नाहीं देखिलें अनंतासी ॥ तुम्हां भेटला जरी तयासी ॥ मजविषयीं सांगा त्यासी ॥ अवस्था ऐसी धेनु म्हणे ॥ १२० ॥ ऐसें ऐकोनि द्विजवर ॥ पुढें जातां देखिला वृषभ थोर ॥ तयातें पुसे मुनीश्वर ॥ तुवां अनंतातें देखिलें कीं ॥ वृषभ म्हणे तयासी ॥ नेणों आम्ही अनंतासी ॥ जरी तुम्हीं देखिला त्यासी ॥ आम्हांविषयीं विनवावें ॥ २२ ॥

पुढें जातां देखे कौंडिण्य ॥ सरोवरें दोन रम्य ॥ उदक मिळालें अन्योन्य ॥ हंसादि पक्षी न सेविती ॥ २३ ॥ कमळ कुमुदादि पुष्पेंसीं ॥ मिराविती सरोवरें ऐसीं ॥ द्विज पुसे तयांसी ॥ अनंतातें देखिलें कीं ॥ २४ ॥ सरोवरें म्हणती तयासी ॥ नेणों कैंचा अनंतासी ॥ भेटी होईल जरी तुम्हांसी ॥ आम्हांविषयीं सागावें ॥ २५ ॥ पुढें जातां द्विजवर ॥ देखिले गर्दभ कुंजर ॥ पुसतसे तयां विचार ॥ ते न बोलती तयासी ॥ २६ ॥ निर्वाण झाला तो ब्राह्मण ॥ त्यजूं पाहे आपुला प्राण ॥ अनंत अनंत म्हणोन ॥ धरणीवरी पडियेला ॥ २७ ॥ इतुकिया अवसरीं ॥ वृद्धब्राह्मण वेषधारी ॥ जवळी येवोनि हांक मारी ॥ उठीं उठीं म्हणतसे ॥ २८ ॥ ऊठ विप्रा काय पुससी ॥ श्रीमदनंत कोठें असें विचारिसी ॥ दाखवीन चल आम्हांसरसी ॥ म्हणोनि धरिलें उजवे करीं ॥ २९ ॥ उठवूनियां कौंडिण्यासी ॥ घेऊनि जाई गव्ह-

रासी ॥ नगरी पाहे अपूर्व तैसी ॥ महदाश्चर्य पाहतसे ॥ १३० ॥ घेऊनि गेला नगरांत ॥ सिंहासन रत्नखचित ॥ नेऊनि तेथें बैसवित ॥ आपण दाखवी निजस्वरूप ॥ ३१ ॥ रूप देखोनि कौंडिण्य ॥ स्तोत्र करी अति-गहन ॥ चरणावरी माथा ठेवून ॥ कर जोडुनी विनवीतसे ॥ ३२ ॥ नमो नमस्ते गोविंदा ॥ श्रीवत्सला सच्चिदानंदा ॥ तुझे स्मरणमात्रें दुःखमदा ॥ हरोनि जाती सर्व पापें ॥३३॥ तूं वरेण्य यज्ञपुरुष ॥ ब्रह्मा विष्णु महेश ॥ तुझे दर्शनमात्रें समस्त दोष ॥ हरोनि जाती तात्काळीं ॥ ३४ ॥ नमो नमस्ते वैकुंठवासी ॥ नारायण लक्ष्मीनिवासी ॥ जगद्व्यापी प्रतिपाळिसी ॥ अनंतकोटि ब्रह्मांडें ॥ ३५ ॥ पापी आपण पापकर्मी ॥ नेणों तुझी भक्ति धर्मीं ॥ पापात्मा पापसंभव अधर्मी ॥ क्षमा करीं गा देवराया ॥ ३६ ॥ तुज-वांचोनि आपण ॥ अनाथ असें दीन ॥ याचि कारणें धरिले चरण ॥ शर-णागत मी तुम्हासी ॥ ३७ ॥ आजि माझा जन्म सफळ ॥ धन्य माझें

जिणें सकळ ॥ तुझें देखिलें चरणकमळ ॥ भ्रमर होवोनि वास घेतो ॥३८॥ ऐसें स्तवितां कौंडिण्य ॥ प्रसन्न झाला लक्ष्मीरमण ॥ भक्तजनचिंतामणि-रत्न ॥ वरत्रय देता झाला ॥ ३९ ॥ धर्मबुद्धि दारिद्र्यनाश ॥ शाश्वत वैकुं-ठनिवास ॥ वरत्रय देत हृषीकेश ॥ ऐक युधिष्ठिरा कृष्ण म्हणे ॥ १४० ॥ पुनरपि द्विज विनवी देव ॥ म्यां देखिलें आश्चर्य एक ॥ अरण्यांत वृक्ष एक ॥ महाफलित आम्र देखिला ॥ ४१ ॥ त्याचीं फळें पक्षिजाती ॥ कोणी प्राणी नातळती ॥ पुढें येतां मागुती ॥ देखिली धेनु सवत्सका ॥ ४२ ॥ तृण तेथें असे प्रबळ ॥ परी तिचे तोंडा नये कवळ ॥ आणिक देखिलीं निर्मळ ॥ सरोवरें दोनी तेथें ॥ ४३ ॥ अन्योन्यें एकमेकां ॥ मिस-ळती तेथें दोन्ही उदका ॥ पुढें पाहिलें अपूर्व ऐका ॥ वृषभ एक महाथोर ॥ ४४ ॥ त्याचे मुखा नये ग्रास ॥ सर्वकाळीं उपवास ॥ पुढें देखिला सुरस ॥ कुंजर एक मदोन्मत्त ॥ ४५ ॥ सवेंचि देखिलें गर्दभासी ॥ ऐका

स्वामी मार्गेसीं ॥ हिंडतसे वनासीं ॥ देखिला वृद्ध ब्राह्मण ॥ ४६ ॥ न कळे याचा अभिप्राय ॥ विस्तारोनि मज सांगा भाव ॥ जगन्नाथा केशव ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ४७ ॥ कृपानिधि नारायण ॥ सांगतसे विस्तारोन ॥ ऐकतसे भक्त कौंडिण्य ॥ वृक्ष तुवां जो देखिला ॥ ४८ ॥ पूर्वीं होता द्विजवर ॥ तयासी येती वेदशास्त्र ॥ उन्मत्तपणें गर्वें थोर ॥ शिष्यवर्गा न सांगेची ॥४९॥ तेणें पापें वृक्ष झाला ॥ तुवां देखिलें धेनुवत्साला ॥ पूर्वीं होती भूमि निष्फळा ॥ दिली होती ब्राह्मणासी ॥ ५० ॥ देखिला तुवां वृषभ एक ॥ पूर्वीं विप्र महाधनिक ॥ केलें नाहीं दानादिक ॥ तेणें पापें ऐशी गति ॥ ५१ ॥ सरोवरें तुवां दोनी ॥ म्हणसी देखिलीं नयनीं ॥ पूर्वीं होत्या दोघी बहिणी ॥ घेतलें दान आपआपणांत ॥ ५२ ॥ खर म्हणजे तुझा क्रोध ॥ कुंजर तो तुझा मद ॥ जहालें मन तुझें शुद्ध ॥ भेटलों ब्राह्मण आपणची ॥ ५३ ॥ जें जें तुवां देखिलें ॥ त्या त्या सम-

स्तातें मुक्त केलें ॥ अखिल ऐश्वर्य भोगीं वहिलें ॥ अंतीं जाय स्वर्गासी ॥ ५४ ॥ तुवां करावा तेथें वासू ॥ नक्षत्रांमाजी पुनर्वसू ॥ ऐसा वर देतां हर्षू ॥ जाहला तया कौंडिण्या ॥ ५५ ॥ ऐसा वर लाधोनि ॥ राज्य केलें बहुदिनीं ॥ अंतीं गेला स्वर्गभुवनीं ॥ ऐक राया युधिष्ठिरा ॥ ५६ ॥ ऐसी कथा धर्मासी ॥ सांगता झाला हृषीकेशी ॥ आचरिलें भक्तींसीं ॥ अनंत-व्रत तये वेळीं ॥ ५७ ॥ युधिष्ठिर दंपत्येंसीं ॥ व्रत आचरिला भक्तींसीं ॥ श्रीमदनंतप्रसादें त्वरितेसीं ॥ पांडव राज्य पावले ॥ ५८ ॥ आणिक हेंचि भूमीवरी ॥ व्रत केलें ऋषीश्वरीं ॥ आचरावें नरनारीं ॥ लाधे चारी पुरुषार्थ ॥ ५९ ॥ व्रतांमध्यें उत्तम व्रत ॥ प्रख्यात असे अनंत ॥ तुवां आचरावें सतत ॥ द्यावें तुझे ज्येष्ठ सुतासी ॥ १६० ॥ व्रत कौंडिण्य आचरला ॥ अखिल सौख्य लाधला ॥ आचरावें या व्रताला ॥ अनंत पुण्यफल असे ॥६१॥ अनंतव्रत महापुण्यें ॥ आमुचे निरोपें करणें ॥ व्रत करा एकभावपणें ॥

एकभक्तींकरोनियां ॥ ६२ ॥ ऐसें गुरुनिरोपेंसीं ॥ व्रत केलें संतोषीं ॥ पूजा केली श्रीगुरूसी ॥ नानापरी अवधारा ॥६३॥ नीरांजन बहुवसीं ॥ गीत वाद्य नृत्येंसीं ॥ पूजा करिती श्रीगुरूसी ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ ६४ ॥ समाराधना ब्राह्मणांसी ॥ भोजन करविलें श्रीगुरूसी ॥ आनंद झाला बहू-वसीं ॥ श्रीगुरुमूर्ति संतोषे ॥ ६५ ॥ येणेंपरी श्रीगुरूसी ॥ आराधोनि संतोषी ॥ गेला आपुले ग्रामासी ॥ ऐक शिष्या एकचित्तें ॥ ६६ ॥ विप्र जो कां सायंदेव ॥ कलत्रपुत्र पाठवी ठाव ॥ मागुती आला असे भाव ॥ श्रीगुरुचरणसेवेसीं ॥ ६७ ॥ राहोनियां श्रीगुरूपासीं ॥ सेवा केली बहु-वसीं ॥ ऐसे तुझे पूर्वजासी ॥ प्रसन्न झाले श्रीगुरु ॥ ६८ ॥ सिद्ध म्हणे शिष्यासी ॥ येणेंपरी तुम्हांसी ॥ निधान लाधलें परियेसीं ॥ श्रीनृसिंह-सरस्वती ॥६९॥ म्हणोनि सरस्वतीगंगाधर ॥ सांगे गुरुचरित्रविस्तार ॥ ऐकतां होय मनोहर ॥ लाधे चारी पुरुषार्थ ॥ १७० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृ‍त ॥

अनंतव्रतकथा विख्यात ॥ नामधारका सांगत ॥ त्रिचत्वारिंशोऽध्याय हा ॥ १७१ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे श्रीमदनंतकथानिरूपणं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४३ ॥ ओंवीसंख्या ॥ १७१ ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ पुढें चरित्रें झालीं कैसीं ॥ विस्तारावें आम्हांसी ॥ कृपा करीं गा दातारा ॥ १ ॥ समस्त भक्त सेवा करिती ॥ त्यांत एक विणकर तंती ॥ अत्यंत करीतसे भक्ति ॥ नित्य येवोनि नमस्कारी ॥२॥ तीन प्रहर संसारयात्रा ॥ करोनि येतसे पवित्रा ॥ राजांगणा झाडी विचित्रा ॥ नमस्कारी दुरोनि ॥३॥ ऐसे कित्येक दिवस क्रमिले ॥ शिवरात्रीचें व्रत आलें ॥ समस्त यात्रेसी निघाले ॥ मातापिता तंतुकाचे ॥ ४ ॥ त्यासी बोलाविती यात्रेसी ॥ तो म्हणतसे त्यांसी ॥ तुम्ही मूर्ख असा पिसीं ॥ माझा श्रीपर्वत येथेंचि असे ॥ ५ ॥ श्रीगुरु माझा मल्लिकार्जुन ॥ पर्वत म्हणजे श्रीगुरुभुवन ॥ आपण न येंचि येथून ॥ चरण सोडोनि श्रीगुरूचे ॥ ६ ॥ समस्त लोक त्यासी हासती ॥ पिसें लागलें यासी म्हणती ॥ चला जाऊं म्हणोनि निघती ॥ भ्राता माता पिता

त्याचे ॥ ७ ॥ नरलोक समस्त गेला ॥ आपण एकला राहिला ॥ श्रीगु-
रूचे मठासी आला ॥ दर्शनालागीं परियेसा ॥८॥ श्रीगुरु म्हणती तयासी
कां गा यात्रेसी न जासी ॥ तंतुक म्हणे स्वामीसी ॥ माझी यात्रा तुमचे
चरण ॥ ९ ॥ नानातीर्थें यात्रा देखा ॥ तुमचे चरणीं असती ऐका ॥ वायां
जाती मूर्ख देखा ॥ पाषाणदर्शन करावया ॥ १० ॥ ऐसें म्हणोनि तंतुक ॥
नमस्कारी नित्य देख ॥ पावली शिवरात्र ऐक ॥ माघवद्यचतुर्दशी ॥११॥
श्रीगुरु होते संगमासी ॥ दोन प्रहर होतां परियेसीं ॥ आपण गेला
स्नानासी ॥ उपवास असे शिवरात्रीचा ॥ १२ ॥ संगमीं स्नान करोनि ॥
श्रीगुरूतें नमस्कारोनि ॥ उभा ठेला कर जोडोनि ॥ भक्तिपूर्वक एकभावें
॥ १३ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ तुझे समस्त गेले यात्रेसी ॥ तूं एक-
लाचि राहिलासी ॥ पहासी विनोद[1] श्रीपर्वताचा ॥ १४ ॥ पुसिलें कधीं

[1] चमत्कार.

आहे देखिलेंसी ॥ म्हणे स्वामी नेणें कैसी ॥ तुमचे चरण आम्हांसी ॥ पर्वत-यात्रा सदा असती ॥ १५ ॥ त्याचा भाव पाहोनि ॥ जवळ बोलाविती श्रीगुरुमुनि ॥ बैस म्हणति कृपा करोनि ॥ तुज दाखवूं श्रीपर्वत ॥ १६ ॥ नयन झांकोनि पादुकेसी ॥ दृढ धरीं गा वेगेंसीं ॥ ऐसें म्हणोनि तयासी ॥ मनोवेगें घेवोनि गेले ॥ १७ ॥ क्षण न लागतां श्रीगिरीसी ॥ घेऊनि गेले भक्तासी ॥ तीरीं बैसले पाताळगंगेसी ॥ नयन उघडीं म्हणती श्रीगुरु ॥ १८ ॥ क्षण एक त्यासी निद्रावस्था ॥ म्हणतां झाला जागृता ॥ अव-लोकितां दिसे पर्वता ॥ स्वप्न किंवा सत्य म्हणे ॥ १९ ॥ श्रीगुरु निरोपिती तयासी ॥ कां गा भ्रांतपणें[1] पाहसी वेगीं जाईं दर्शनासी ॥ स्नाना क्षौर करोनियां ॥ २० ॥ श्रीगुरु निरोप देतां ॥ शीघ्र गेला स्नानाकरितां ॥ तेथें देखिले माता पिता ॥ भ्राता ग्रामलोक सकळ ॥ २१ ॥ ते पुसती

१ बावळ्यासारखा.

तयासी ॥ तूं कवणें मार्गें आलासी ॥ आमुची भेट कां गा न घेसी ॥
लपून येणें कोण धर्म ॥ २२ ॥ विनवीतसे मातापितयांसी ॥ आम्ही
निघालों आजि दोन प्रहरेसी ॥ एक घटिका लागली वाटेसी ॥ आतां
आलों गुरुसमागमें ॥ २३ ॥ एक हांसती मिथ्या म्हणत ॥ आम्हांसवेंचि
आला लपत ॥ ऐसें बाडिवारें बोलत ॥ लब्धप्रतिष्ठ म्हणतात ॥ २४ ॥
तो कोणासवें न बोले ॥ शीघ्र स्नान क्षौर केलें ॥ पुष्पें अक्षता बिल्वदळें ॥
घेऊनि गेला पूजेसी ॥ २५ ॥ पूजा करितां लिंगस्थानीं ॥ तेथें देखिले
श्रीगुरुमुनि ॥ मनीं विस्मय करोनि ॥ पूजा केली मनोभावें ॥ २६ ॥
समस्त लोक पूजा करिती ॥ श्रीगुरु सर्व पूजा घेती ॥ तंतुकार म्हणतसे
चित्तीं ॥ श्रीगुरुमूर्तीच आपण शंकर ॥ २७ ॥ ऐसा निर्धार करोनि ॥
पाविजे प्रसाद-खूण म्हणोनि ॥ मग तो आला गुरुसान्निधानीं ॥ एकचित्तें

१ टोलानें.

परियेसा ॥ २८ ॥ श्रीगुरु पुसती तयासी ॥ आतां राहसी किंवा जासी ॥ तंतुक विनवी स्वामियासी ॥ एक देखिलें नवल आजी ॥ २९ ॥ समस्त लोक जाउनि ॥ देवालयाभीतरीं बैसोनि ॥ पूजा करिती तुमचे चरणीं ॥ लिंग न देखें तुम्हीच तेथें ॥ ३० ॥ श्रीगुरु जवळी असतां ॥ इतुके दुरी कां कष्ट करितां ॥ लोक येताती बहुता ॥ काय कारण स्थानासी ॥ ३१ ॥ तूं तरी केवळ परमेश्वर ॥ दिसतोसि आम्हां नर ॥ न कळे तुझा महिमा अपार ॥ गौप्यरूपी गुरुनाथा ॥३२॥ सर्व जन मूढ होउनी ॥ नेणती तुझा महिमा कोणी ॥ कां हो येती या स्थानीं ॥ विस्तारोनि सांगा मज ॥३३॥ श्रीगुरु म्हणती ऐक भक्ता ॥ सर्वत्र ईश्वरपूर्णता ॥ स्थानमहिमा असे पूज्यता ॥ जे अपार त्रिभुवनीं ॥ ३४ ॥ तंतुक म्हणे स्वामियासी ॥ तूं पूर्ण ब्रह्म होसी ॥ हा स्थानमहिमा वानिसी ॥ विस्तारोनि सांगा आम्हां ॥३५॥ श्रीगुरु निरोपिती भक्तासी ॥ येथील महिमा पुससी ॥ सांगेन ऐक

विस्तारेंसीं ॥ स्कंदपुराणीं असे कथा ॥ ३६ ॥ माघवद्यचतुर्दशी अपार महिमा पर्वतासी ॥ सांगेन ऐक विस्तारेंसीं ॥ म्हणोनि श्रीगुरु सांगतसे ॥ ३७ ॥ पूर्वीं विख्यात किरातदेशीं ॥ विमर्षण राजा परियेसीं॥शूर असे पराक्रमेंसीं ॥ समस्त शत्रु जिंकिले तेणें ॥ ३८ ॥ आणिक त्या एक बुद्धि असे ॥ पारधी करी बहुवसें ॥ बलाढ्य असे विशेषें ॥ चंचल सकळ [1]शरीरत ॥ ३९ ॥ सर्वमांस भक्षण करी ॥ [2]ग्राह्य अग्राह्य न विचारी ॥ ऐसावर्तें दुराचारी ॥ ईश्वर पूजी भक्तिभावें ॥ ४० ॥ नित्य पूजा करी अपार ॥ शिवरात्र आलिया हर्ष-निर्भर ॥ गीत नृत्य वाद्यपरिकर ॥ भक्तिपूर्वक करी पूजा ॥ ४१ ॥ आचार तरी बरवा नसे ॥ शिवपूजा करी बहुवसें ॥ पत्नी एक त्यासी असे ॥ सुल-क्षण नाम कुमुद्वती ॥ ४२ ॥ सुशील सुगुणी पतिव्रता ॥ मनीं करी बहु चिंता ॥ पुरुष आपुला परदारा[3]रता ॥ ईश्वरभक्ति करीतसे ॥ ४३ ॥ ऐसें

१ वरें. २ वाईट. ३ व्यभिचारी.

क्रमितां एके दिवसीं ॥ पुसों लागली स्त्री भरतासी ॥ म्हणे प्राणेश्वरा परि-
येसीं ॥ विनंति माझी एक असे ॥४४॥ क्षमा करावे माझे बोल ॥ विस्ता-
रोनि सागा सकळ ॥ तूं दुराचारी भक्षिसी सकळ ॥ परदारी निरंतर
॥४५॥ तुज ईश्वरावरी ॥ भक्ति उपजली कवणेंपरी ॥ सांगावें मज विस्तारीं ॥
कोप न धरीं प्राणनाथा ॥ ४६ ॥ राजा म्हणे स्त्रियेसी ॥ बरवें पुसिलें
आम्हांसी ॥ ज्ञान झालें आता मानसीं ॥ पूर्व जन्म माझे सागेन ॥ ४७ ॥
पूर्वी धनगरा घरीं आपण ॥ श्वानयोनीं जन्मोन ॥ होतों तेथें काळ क्रमोन ॥
शिवरात्रि आली एके दिवशीं ॥ ४८ ॥ त्या नगरीं होतें शिवालय ॥
समस्त लोक आले पूजावया ॥ आपण हिंडत गेलों तया ठाया ॥ भक्षण
कांहीं मिळेल म्हणोनि ॥ ४९ ॥ उत्साहें लोक पूजा करिती ॥ नाना वाद्यें
वाजविती ॥ गर्भगृहीं प्रदक्षिणा करिती ॥ धरोनि आरती ही सकळिक

॥ ५० ॥ आपण गेलों द्वारांत ॥ विनोद पाहीन म्हणत ॥ मज देखोनि आले धांवत ॥ काष्ठ पाषाण घेवोनि ॥ ५१ ॥ आपण पौळीमध्यें होता ॥ द्वार घातलें मारूं म्हणतां ॥ धरा धरा मारा त्वरितां ॥ मारूं लागले पाषाणीं ॥ ५२ ॥ वाट नाहीं बाहेर जावयासी ॥ सांभाळीतसें जिवासी ॥ पळतसें देवालयासी ॥ मार्ग नाहीं कोठें देखों ॥ ५३ ॥ बाहेर जाईन म्हणत ॥ द्वाराकडे मागुती येत ॥ सर्व लोक पाठीं लागत ॥ सव्य प्रदक्षिणा करी-तसें ॥ ५४ ॥ लपावया ठाव नाहीं ॥ वेष्टिलों पौळी न दिसे कांहीं ॥ पाठी लागले सकळिकही ॥ मागुती पळतसें तैसाचि ॥ ५५ ॥ उच्छिष्ट मिळेल म्हणोनि ॥ देउळांत गेलों भामिनी ॥ काकुळती बहु मनीं ॥ प्राण वांचवीन म्हणतसें ॥ ५६ ॥ ऐसा तीन वेळां पळालों ॥ मारतील म्हणोनि भ्यालों ॥ अंतरगृहीं रिघालों ॥ पूजा देखिली शिवाची ॥ ५७ ॥ द्वार

१ द्वारामध्यें. २ लावून टाकिलें.

धरोनि समस्त लोक ॥ शस्त्रें मारिती मज अनेक ॥ ओढोनि टाकिती सकाळिक ॥ शिवालयाबाहेरी ॥ ५८ ॥ मज पुण्य घडलें प्रदक्षिणीं ॥ पूजा देखिली नयनीं ॥ तेणें पुण्यें राजा होउनी ॥ जन्मलों ऐक प्राणेश्वरी ॥ ५९ ॥ शिवरात्री होती ते दिवशीं ॥ न मिळे उच्छिष्ट भुक्तीसी ॥ प्राण त्यजिला उपवासी ॥ तेणें पुण्य मज घडलें ॥ ६० ॥ आणिक घडलें पुण्य-एक ॥ दीपमाळीस उजळले दीपक ॥ ते म्यां डोळां देखिले अनेक ॥ प्राण त्यजिला शिवद्वारीं ॥ ६१ ॥ तेणें पुण्यें झालें ज्ञान ॥ ऐक शिवरात्रीचें महिमान ॥ म्हणसी दुराचारी आपण ॥ त्याचा संदेह सांगेन ॥ ६२ ॥ पूर्वजन्मीं झालों श्वान ॥ त्या स्वभावें सर्वभक्षण ॥ सर्वां ठायीं जाय मन ॥ तोचि स्वभाव मज असे ॥ ६३ ॥ ऐसें स्त्रियेसी सांगितलें ॥ पुन्हा तिणें विचारिलें ॥ म्हणे स्वामी जें सांगितलें ॥ आपुलें जन्म पुरातन ॥ ६४ ॥

१ पूर्वजन्म.

तूं असती सर्वज्ञानी ॥ माझा जन्म सांगा विस्तारोनि ॥ म्हणोनि लागतसे चरणीं ॥ कृपा करीं गा प्राणेश्वरा ॥ ६५ ॥ ऐकें वधू ज्ञान सती ॥ तुझा पूर्व जन्म कपोती ॥ करीत होतीस उदरपूर्ती ॥ एके दिवसीं अवधारीं ॥ ६६ ॥ पडला होता मांसगोळा ॥ तो तुवां चोंचीं धरियेला ॥ उडत होतीस आकाशमंडळा ॥ तें देखिलें घारीनें ॥६७॥ कवेंळ घेईन म्हणोनि ॥ घार आली धांवोनि ॥ तूं गेलीस पळोनि ॥ महाअरण्य क्रमित ऐका ॥ ६८ ॥ पाठीं लागली ते घारी ॥ मागें पुढें न विचारी ॥ तूं पळत वनांतरीं ॥ श्रीगिरीपर्वतावरी गेलीस ॥ ६९ ॥ सवेंचि आली ते घारी ॥ तूं गेलीस देवालयावरी ॥ भोंवों लागलीस प्रदक्षिणाकारी ॥ श्रम पावलीस तये वेळां ॥ ७० ॥ ढुरोनि आलीस धांवत ॥ प्राण होता कंठगत ॥ श्रमोनि तूं शिखरीं बैसत ॥ घारीनें येऊनि मारिलें चोंचीं ॥ ७१ ॥

१ कवड्याची मादी. २ घांस.

घेऊनि गेली मांसगोळा ॥ तुझा देह पंचत्व पावला ॥ प्रदक्षिणा पुण्यफळा ॥ झालीस वो राजपत्नी ॥ ७२ ॥ इतुकिया अवसरीं ॥ पुनः पतीस प्रश्न करी ॥ आतां तुझे निरोपावरी ॥ ईश्वरपूजा करीन ॥ ७३ ॥ पुढें माझें काय होईल ॥ तुम्हीं कवणें स्थाना असाल ॥ तें भविष्य सांगा सकळ ॥ प्राणप्रिया राजेंद्रा ॥ ७४ ॥ राजा सांगे सतीसी ॥ पुढील जन्म मज पुससी ॥ आपण राजा सिंधुदेशीं ॥ जन्म पावेन अवधारीं ॥ ७५ ॥ माझी भार्या तूंचि होसी ॥ जन्म होईल सृंजयदेशीं ॥ तेथील राजा पवित्र-वंशी ॥ त्याची कन्या होशील ॥ ७६ ॥ तिसरा जन्म आपणासी ॥ राजा होईन सौराष्ट्रदेशीं ॥ तूं उपजशील कलिंगराजवंशीं ॥ माझी पत्नी होशील ॥७७॥ चवथा जन्म आपणासी ॥ राजा होईन गंगाधर देशीं ॥ तूं उपजशील माधव-कुळेसी ॥ तैं माझी होशील प्राणेश्वरी ॥ ७८ ॥ पांचवा जन्म आपणासी ॥ राजा होईन अवंतिदेशीं ॥ तूं दशार्णराजकुळीं जन्मसी ॥ माझी भार्या होशील

तूं ॥ ७९ ॥ सहावा जन्म आपणासी ॥ अनंत नाम राजा परियेसीं ॥ ययातिराजकन्या होसी ॥ तें माझी तूंचि प्राणेश्वरी ॥ ८० ॥ सातवा जन्म आपणासी ॥ राजा होईन पांड्यदेशीं ॥ रूप लावण्य मजसरसीं ॥ न देखे कवण संसारीं ॥ ८१ ॥ ज्ञानी सर्वगुणी होईन ॥ सूर्यकांति चंदन ॥ जैसा रूपें असे मदन ॥ नाम माझें पद्मवर्ण ॥ ८२ ॥ तूं जन्मशील वैदर्भकुळीं ॥ रूपें सौंदर्यें आगळी ॥ जैसी सुवर्णाची पुतळी ॥ अतिलावण्य मुख सुरस ॥ ८३ ॥ सुमती असें नांव पावसी ॥ तुज वरीन मी स्वयंवरेंसीं ॥ दमयंती नळा जैसी ॥ स्वयंवर होईल तुज मज ॥८४॥ राज्य करीन बहुत दिवसीं ॥ यज्ञ करीन सहस्रेशी ॥ जिंकीन समस्त देशांसी ॥ मंत्रशास्त्र शिकेन बहुत ॥ ८५ ॥ देवद्विजार्चन करीन ॥ नाना अग्रहारें दान देईन ॥ ऐसें वार्धक्य पावोन ॥ राज्यीं स्थापीन पुत्रासी ॥ ८६ ॥ मग आश्रम घेईन ॥ अगस्त्य-

१ इनामें.

ऋषीपासीं जाईन ॥ ब्रह्मज्ञान शिकोन ॥ अंतीं होईल मोक्षप्राप्ति ॥ ८७ ॥ देहावसान समय ॥ येतां तुज घेईन सांगाता ॥ दिव्य विमानीं बैसोनि तत्त्वता ॥ स्वर्गाप्रती जाऊं मग ॥ ८८ ॥ ईश्वर पूजेचा महिमा ॥ शिवरात्रीव्रत उत्तमा ॥ श्रीशैल्यपर्वताचा महिमा ॥ विशेष पुण्य कोण वर्णी ॥ ८९ ॥ यापरी सांगोनि स्त्रियेतें ॥ आतां पाहूं श्रीशैल्यपर्वतातें ॥ म्हणोनि राजा घेउनी स्त्रीतें ॥ यात्रा करी शिवरात्री ॥ ९० ॥ श्रीगुरु म्हणती तंतुकासी ॥ शिवरात्रीमहिमा आहे ऐसी ॥ ऐसा तो राजा राणी परियेसीं ॥ सप्तजन्मीं राज्य पावलीं ॥९१॥ अंतीं पावला स्वर्गलोक ॥ पर्वतमहिमा यापरी एक ॥ तुज जाहलें गुरुमुख ॥ ईश्वरा पूजा करीं गा बरवी ॥ ९२ ॥ गाणगाग्रामीं भीमातीर ॥ तेथें असे कल्लेश्वर ॥ पूजा करीं निरंतर ॥ मल्लिकार्जुनासमान ॥ ९३ ॥ मग संगमेश्वर संगमेसी ॥ पूजा करीं अहर्निशीं ॥ मल्लिकार्जुन

१ मरणाचा काल.

तोचि परियेसीं ॥ न धरीं संदेह मनांत ॥९४॥ तंतुक म्हणे स्वामियासी ॥
किमर्थ मातें चाळविसी ॥ पूजायासि गेलों मल्लिकार्जुनासी ॥ लिंगस्थानीं
तुम्हां देखिलें ॥ ९५ ॥ सर्वां ठायीं तूंचि एक ॥ झाला अससी व्यापक ॥
कल्लेश्वर संगम नामक ॥ हें काय सांगसी मजपुढें ॥ ९६ ॥ ऐकोनि श्रीगुरु
हांसती ॥ मग पादुका धरीं म्हणती ॥ नयन तयाचे झांकिती ॥ संगमा
आले तात्काळीं ॥ ९७ ॥ इतुकिया अवसरीं ॥ मागें भक्त गाणगापुरीं ॥
श्रीगुरूसी पाहती गंगातीरीं ॥ कोठें गेले म्हणोनि ॥ ९८ ॥ एक म्हणती
संगमीं होते ॥ एक म्हणती नाहींत तेथें ॥ कोठें गेले पहा म्हणत ॥ चुकर
होती भक्तजन ॥९९॥ श्रीगुरु आले संगमासी ॥ तंतुका पाठविलें मठासी ॥
बोलावया शिष्यांसी ॥ आपण राहिले संगमीं ॥ १०० ॥ तंतुक आला
गांवांत ॥ लोक समस्त पहात ॥ कां रे क्षौर केलें म्हणत ॥ श्रीपर्वतासी
गेलों होतों ॥ १ ॥ दवणा प्रसाद विभूति ॥ नानापरींचे हार दाविती ॥



[ अ० ४४ ] दवणां प्रसाद विभूति । नानापरीं हार दाविती । लोक विस्मय मनीं करिती । म्हणती दोनप्रहरीं घरीं होता ॥१०२॥

लोक विस्मय मनीं करिती ॥ म्हणती दोन प्रहरीं घरीं होता ॥ २ ॥ एक म्हणती सत्य मिथ्या ॥ त्यासी म्हणती सांग सत्या ॥ तंतुक म्हणे सर्वे गुरु-नाथा ॥ गेलों होतों वायुवेगें ॥ ३ ॥ श्रीगुरु आले संगमासी ॥ मज पाठ-विलें मठासी ॥ बोलाविलें शिष्यांसी ॥ राहूं म्हणती आजि संगमीं ॥ ४ ॥ एक म्हणती होईल सत्य ॥ मूर्ख म्हणती नव्हे मिथ्या ॥ तंतुक गेला त्वरित ॥ शिष्यवर्गा जाणविलें ॥ ५ ॥ सांगितला सर्व वृत्तांत ॥ समस्त गेले संगमा त्वरित ॥ पूजा झाली संगमीं बहुत ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ ६ ॥ मिथ्या म्हणती जे जे लोक ॥ त्यांसी होईल महापातक ॥ पंधरा दिवसीं यात्रिक ॥ लोक आले ग्रामासी ॥७॥ मग पुसती तयांसी ॥ तींहीं सांगतां भरंवसीं ॥ आनंद झाला भक्तांसी ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ ८ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ तें मी सांगतसें परियेसीं ॥ श्रीगुरुमहिमा अपारेसी ॥ अमृत सेविता निरंतर ॥ ९ ॥ यापरी सरस्वतीगंगाधर ॥ सांगे

श्रीगुरुचरित्रविस्तार॥ भावें ऐके जो नर ॥ अमृत निरंतर सेवितसे॥११०॥
इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ कथा वर्णिली अद्भुत ॥ सिद्ध नामधारका सांगत ॥
श्रीशैल्यगमनमहिमाऽध्याय हा ॥ १११ ॥ इति श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने
सिद्धनामधारकसंवादे श्रीशैलशिवरात्रिमाहिमावर्णनं नाम चतुश्चत्वारिंशो-
ऽध्यायः ॥ ४४ ॥ ओंवीसंख्या ॥ १११ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ७ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशायनमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ श्रीगुरुचरित्र देखिलें दृष्टींसीं ॥ तुमचें भाग्य बहुवसीं ॥ परब्रह्म देखिलें असें ॥ १ ॥ तुमचेनि प्रसादेंसीं ॥ अमृतपान झालें आम्हांसी ॥ आतां कष्ट आम्हां कासयासी ॥ सकळाभीष्ट लाधलों ॥ २ ॥ तूं भेटलासी मज तारक ॥ दैन्य गेलें सकळिक ॥ सर्वाभीष्ट लाधलें सुख ॥ गुरुचरित्र ऐकतां ॥ ३ ॥ मागें कथानक सांगितलें ॥ श्रीगुरु संगमीं राहिले ॥ पुढें काय वर्तलें ॥ तें सांगावें दातारा ॥ ४ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ ऐक वत्सा विस्तारेंसीं ॥ विचित्र झालें येरे दिवसीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५ ॥ नंदिनामा एक ब्राह्मण ॥ सर्वांगीं श्वेत कुष्ठ जाण ॥ अंबा तुळजापुरा जाऊन ॥ वर्षें तीन आराधिली ॥ ६ ॥ संवत्सर तीन उपवास ॥ द्विज कष्टला बहुवस ॥ निरोप झाला स्वप्नीं त्यास ॥ जाय चंदलापरमेश्वरीसी ॥ ७ ॥ जगदंबेचा निरोप घेउनी ॥ आला चंदलापरमेश्वरीस्थानीं ॥ मास सात पुरश्चरणीं ॥ पुनरपि

केले उपवास ॥ ८ ॥ नानापरी कष्टत ॥ स्वप्न झालें अवचित ॥ तुवां जावें त्वरित ॥ गाणगापुर ग्रामासी ॥ ९ ॥ तेथें असे श्रीसद्गुरु ॥ त्रयमूर्तींचा अवतारु ॥ वेष धरिला असे नरु ॥ तेथें होसी उत्तमांगी ॥ १० ॥ ऐसें देवीनें निरोपिलें ॥ विप्र म्हणे भलें झालें ॥ सहा मास कां कष्टविलें ॥ जरी तुझे हातीं नोहेचि ॥ ११ ॥ जगन्माता तुळजा भवानी ॥ तिचा निरोप घेउनी ॥ आलों तुजपासीं ठांकोनि ॥ तूं दैवत म्हणोनियां ॥ १२ ॥ देव-पण ठाऊकें झालें ॥ आम्हांसी निरोप दिधलें ॥ मनुष्यापासीं जा म्हणितलें ॥ तुझेनि नोहे कांहींच ॥ १३ ॥ विश्वासें पातलों तुजपासीं ॥ तूं मनुष्यास-न्निध धाडिसी ॥ सीमा झाली देवपणासी ॥ भाग्य माझें म्हणतसे ॥ १४ ॥ मनुष्यापासीं जा म्हणावयासी ॥ लाज नये तुम्हां कैसी ॥ वळखिलें म्यां देवपणासी ॥ उपवासी सात महिने ॥ १५ ॥ पहिलेंच जरी निरोप देत ॥

इतुके कष्ट कासया होत ॥ दुराशा धरिली चित्त ॥ परमेश्वरी म्हणोनि ॥ १६ ॥ ऐसें अनेक प्रकारें कष्टोन ॥ दुःख करीतसे ब्राह्मण ॥ मागुती पुरश्चरण ॥ करीन म्हणे तो द्विज ॥ १७ ॥ म्हणे मज बरवें होणें ॥ अथवा आपुला प्राण देणें ॥ ऐसें बोलोनि निर्वाणें ॥ विप्र धरणें बैसला ॥ १८ ॥ पुनरपि स्वप्न तयासी ॥ तैसेंचि होय परियेसीं ॥ आणिक समस्त भोपियांसी ॥ तेणेंचि परी निरोप होय ॥ १९ ॥ समस्त भोपी म्हणती तयासी ॥ आजि स्वप्न झालें आम्हांसी ॥ छळ न करीं गा देवीसी ॥ निरोपासरसा जाय वेगें ॥ २० ॥ तूं जरी आतां न जासी ॥ आम्हां आज्ञा झाली ऐसी ॥ बाहेर घालवूं तुजसी ॥ देवालयांत येऊं न देऊं ॥ २१ ॥ इतुकें झालिया-वरी ॥ पारणें केलें द्विजवरीं ॥ पूजा करोनि नानापरी ॥ निरोप घेऊनि निघाला ॥ २२ ॥ गाणगाग्रामासी आला ॥ मठांत पुसूं लागला ॥ भक्त-

१ व्यर्थ इच्छा. २ अनुष्ठान. ३ पुजाऱ्यांना.

जन सांगती त्याला ॥ संगमीं आहेती श्रीगुरु ॥ २३ ॥ भक्त म्हणती तयासी ॥ श्रीगुरु येतील पारणेसी ॥ काल शिवरात्री उपवासी ॥ आतां येतील परियेसीं ॥ २४ ॥ इतुकिया अवसरीं ॥ श्रीगुरु आले साक्षात्कारी ॥ ग्रामलोक द्विजातें वारी ॥ दूर राहे सन्मुख ॥ २५ ॥ श्रीगुरु आले मठांत ॥ द्विज उभा होता तेथ ॥ भक्तजन सांगती मात ॥ विप्र एक आला असे ॥ २६ ॥ सर्वांगी कुष्ठ असे श्वेत ॥ स्वामिदर्शना आलों म्हणत ॥ श्रीगुरु म्हणती आपण जाणत ॥ संदेहरूपें आला असे ॥ २७ ॥ म्हणती बोलवा मठांत ॥ भक्त गेला धांवत ॥ तया द्विजातें पाचारित ॥ आला विप्र आंगणीं ॥ २८ ॥ दुरोनि देखिलें श्रीगुरूसी ॥ नमस्कार करीत लोळे भूमीसी ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ संदेहरूपें आलासी कां ॥ २९ ॥ देवीपासीं कां न गेलासी ॥ मनुष्यापासीं येणें कायसीं ॥ संदेह धरितां मानसीं ॥ काय होय कार्यसिद्धि

॥ ३० ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ साक्ष आली आपुले मनीं ॥ क्षमा करणें स्वासी म्हणोनि ॥ लोटांगणीं येतसे ॥३१॥ म्हणे स्वामी आपण तमांध ॥ स्वामीचे दर्शनें झालों शुद्ध ॥ अज्ञानें वेष्टिलों मतिमंद ॥ नेणें सोय पर-ब्रह्मीं ॥ ३२ ॥ तूं साक्षात् वस्तु म्हणोनि ॥ नेणों आपण तमोगुणी ॥ आजि दिवस माझा सुदिनी ॥ दर्शनें झालों पुनीत ॥ ३३ ॥ पापकर्मे पापी आपण ॥ पापात्मा नेणें खूण ॥ पापें संभवलों निर्गुण ॥ शरण आलों तुजपासीं ॥ ३४ ॥ तूं भक्तजनांचा आधार ॥ शरणागता वज्रपंजर ॥ ब्रीद वानिती सचराचर ॥ हे नृसिंहसरस्वती ॥ ३५ ॥ आजि माझें कर्म गेलें ॥ परब्रह्म डोळां देखिलें ॥ मनोरथ माझे पुरले ॥ कृपासागरा यतिराया ॥ ३६ ॥ तूं भक्तजनकामधेनु ॥ मनुष्यदेहीं अवतरोनू ॥ तुझा पार जाणे कवणू ॥ त्रैमूर्ति तूंचि होसी ॥ ३७ ॥ जैशी सगरांकारणें गंगा ॥ पावन

१ मूर्ख.

करावया आली जगा ॥ तैसे भक्तसेवकवर्गा ॥ तारावया अवतरलासी ॥ ३८ ॥ कां अहिल्या झाली पाषाण ॥ दिव्यदेही झाली लागतां चरण ॥ तैसा मी आजि देखोनि दीन ॥ केलें तुवां गुरुनाथा ॥३९॥ व्रतबंध विवाह झालियावरी ॥ उद्भवली व्याधि आपुले शरीरीं ॥ स्त्री राहिली माहेरीं ॥ स्पर्शूं नये शरीर म्हणे ॥ ४० ॥ आपुले असती मातापिता ॥ सकळ म्हणती जाईं परता ॥ दुःख झालें अपरिमिता ॥ संसार त्यजूनि निघालों ॥ ४१ ॥ गेलों होतों तुळजापुरीं ॥ उपवासीं कष्टलों अपारीं ॥ मज म्हणती तूं पापी भारी ॥ न होय बरवें तुज आतां ॥ ४२ ॥ निरोपी तुळजादेवी प्रीतीं ॥ जेथें चंदलापरमेश्वरी वसती ॥ तेथें होय पापनिवृत्ति ॥ जाईल रोग म्हणोनियां ॥ ४३ ॥ तेथें कष्ट केले बहुत ॥ न होयचि काय उपगंत ॥ निरोप झाला जा म्हणत ॥ कृपामूर्ति तुजपासीं ॥ ४४ ॥ ऐसें माझें दैव

१ रोग. २ अत्यंत. ३ गुण.

हीन ॥ उबगतातो देव आपण ॥ मज देखोनि निर्वाण ॥ बाहेर घाला म्हणतातीं ॥ ४५ ॥ देव मातें उबगतातीं ॥ मनुष्य कैसे मज देखती ॥ निर्वाणीं आलों तुम्हांप्रती ॥ निर्धार केला मरणासी ॥ ४६ ॥ ऐसा पापी असोनि आपण ॥ आतां काय करावें अंगहीन ॥ तोंड न पाहती कुष्ठी म्हणोन ॥ मरण बरवें यापरतें ॥ ४७ ॥ आतां असे एक विनंती ॥ होय अथवा न होय निश्चिती ॥ शीघ्र निरोपावें ये रीतीं ॥ आशापाशीं न गोंविजे ॥ ४८ ॥ मज चाड नाहीं या देहाची ॥ प्राण देईन साक्ष तुमची ॥ तूं रक्षक माउली शरणागताची ॥ निरोपावें दातारा ॥ ४९ ॥ जैसें देवीं चाळविलें ॥ आशाबद्धते गोंविलें ॥ निदानीं मज सोडिलें ॥ तैसें न करीं दातारा ॥ ५० ॥ ऐसें करुणावचन ऐकोन ॥ गुरु बोलती हांसोन ॥ बोलाविला सोमनाथ ब्राह्मण ॥ निरोप देती यातें न्या संगमासी ॥ ५१ ॥ त्वरेनें

१ कंटाळतात. २ अगदीं शेवटीं ३ शेवटीं.

संकल्प सांगोनि ॥ स्नान करावें पुष्करजीवनीं ॥ अश्वत्थप्रदक्षिणा[1] कर-वोनि ॥ वस्त्रें टाका दूर त्याचीं ॥ ५२ ॥ नवीं वस्त्रें द्यावीं यासी ॥ शीघ्र आणा पारणेसी ॥ ऐसा निरोप देती त्यांसी ॥ दोघे गेले झडकरी ॥५३॥ स्नान करोनि बाहेर आला ॥ शरीरवर्ण पालटला ॥ अश्वत्थप्रदक्षिणा केल्या ॥ ॥ सुवर्ण झालें सर्वांग ॥ ५४ ॥ वस्त्रें देती ब्राह्मणासी ॥ जीर्ण वस्त्रें टाकिती दूरेसी ॥ जेथें टाकिलीं भूमीसी ॥ क्षार भूमि होय त्वरित ॥ ५५ ॥ सांगातें घेऊनि द्विजासी ॥ सोमनाथ आला मठासी ॥ चरणा-वरी घातलें तयासी ॥ लोक सर्व विस्मित ॥ ५६ ॥ नंदीनामें केला नम-स्कार ॥ संतोषें स्तोत्र करी अपार ॥ हर्षें झाला असे निर्भर ॥ लोळत असे पादुकावरी ॥ ५७ ॥ श्रीगुरु पुसती तयासी ॥ तुझी मनकामना झाली परियेसीं ॥ सर्वांग आहे कैसें त्यासी ॥ अवलोकोनि पाहें म्हणती

[1] दिव्य.



[अ० ४५ ] श्रीगुरु म्हणती त्या द्विजासी । मुख उघडीं काढीं जिव्हेसी । विभूति प्रोक्षितां तयासी । ज्ञान उपजलें ब्राह्मणातें ॥६५॥

॥ ५८ ॥ सर्वांग पाहतां बरवें झालें ॥ तावन्मात्र जंघेसी राहिलें ॥ पाहतां मन त्याचें भ्यालें ॥ म्हणे स्वामी असे कीं थोडें ॥ ५९ ॥ तुझी कृपादृष्टी झाली असतां ॥ थोडें राहिलें केवीं अर्था ॥ करीतसे दंडवता ॥ कृपा करीं गा महात्म्या ॥ ६० ॥ गुरुमूर्ति निरोपिती त्यासी ॥ तूं संशय धरोनि आलासी ॥ मनुष्य काय देईल म्हणती ॥ तेणें गुणें राहिलें शेष ॥ ६१ ॥ यासी असे एक प्रकार ॥ तुवां कवित्व करावें अपार ॥ आमुची स्तुति करीं निरंतर ॥ जाईल त्वरित निश्चयें ॥ ६२ ॥ नंदीनामा म्हणे स्वामियासी ॥ लिखिन नेणें वाचायासी ॥ कैसें करूं कवित्वासी ॥ मंदमति आपण ॥ ६२ ॥ काय जाणें कवित्वरीति ॥ नाहीं मज काव्यव्युत्पत्ति ॥ स्वामी ऐसा निरोप देती ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ६४ ॥ श्रीगुरु म्हणती त्या द्विजासी ॥ मुख उघडीं काढीं जिव्हेसी ॥ विभूति प्रोक्षितां

१ थोडेसें. २ पोटरीवर. ३ ज्ञान.

तयासी ॥ ज्ञान उपजलें ब्राह्मणातें ॥ ६५ ॥ चरणांवरी ठेविला माथा ॥ उभा केला स्तोत्र करितां ॥ म्हणे स्वामी मी नेणता ॥ सेवेसी नव्हें आरा-णुक ॥ ६६ ॥ मायापाशीं वेष्टोनि ॥ बुडत होतों संसारगहनीं ॥ आठवण न करीं कधीं मनीं ॥ तुझे चरण विसरलों ॥ ६७ ॥ संसार म्हणजे माया-जाळ ॥ योनीं जन्मोनि चौऱ्यायशी कुळ ॥ न आठवलें तुझें नाम केवळ ॥ मंदमति झाली स्वामिया ॥ ६८ ॥ स्वेदज अंडज उद्भिज्जेंशीं ॥ जन्म पावलों पशुयोनीसी ॥ ज्ञान कैंचें आम्हासीं ॥ स्थावर जंगम जैं होतों ॥ ६९ ॥ नानायोनि मनुष्य विशेष ॥ शूद्रादि याती बहुवस ॥ जरी होतों त्या जन्मास ॥ काय जाणें तुझी सोय ॥ ७० ॥ समस्त जन्मांमध्यें एक ॥ ब्राह्मणजन्म विशेष ॥ काय करावें होऊनि मूर्ख ॥ गुरुसोय नेणता नर ॥ ७१ ॥ मातेचें शोणित पित्याचें रेत ॥ संपर्क झाला जननीगर्भांत ॥ जैसें

१ संबंध.

सुवर्ण असे कढत ॥ दिवस पांच बुद्बुदाकार ॥ ७२ ॥ पंधरा दिवस होय थोर ॥ एक रस होऊनि निर्धार ॥ तधीं मी काय जाणें पामर ॥ नाहीं पंचतत्त्वें झालीं मज ॥ ७३ ॥ मासें एक पिंड होय ॥ द्वय मासीं शिर पादद्वय ॥ त्रयमासीं सर्व अवयव ॥ नवद्वारें झालीं मग ॥ ७४ ॥ पंचतत्त्वें होतीं एक ॥ पृथ्वी वायु तेज आकाश उदक ॥ प्राण आला तत्काळिक ॥ तधीं स्मरण कैचें मज ॥ ७५ ॥ पांचवे मासीं त्वचा रोम ॥ सहावे मासीं उच्छ्वासस्तोम ॥ सातवे मासीं श्रोत्र जिव्हा घ्राण ॥ मेद मज्जा दृढ झालीं ॥ ७६ ॥ ऐसा नव मास कष्टत ॥ होतों जननीगर्भांत ॥ रुधिर विष्ठा मूत्रांत ॥ कष्टलों फार स्वामिया ॥ ७७ ॥ माता भक्षी उष्ण क्षार ॥ कटु तीक्ष्ण असे अपार ॥ पडे लोळे अनेक प्रकार ॥ दुःख कोणा सांगूं तेव्हां ॥ ७८ ॥ मनास आलें भक्षण करी ॥ दुःख होय मज अपारी ॥ ऐसें नवमासांवरी ॥ मातागर्भीं

१ बुडबुड्यासारखें. २ नऊ इंद्रियें.

कष्टलों ॥७९॥ तधीं कैचें तुझें स्मरण ॥ वेष्टिलों होतों मायेंकरून ॥ देखिले नाहीं तुझे चरण ॥ मग योनिद्वारें जन्मलों ॥ ८० ॥ उपजतांची आपणासी ॥ आयुष्य लिहिलें ललाटेसी ॥ अर्ध गेलें वृथा निद्रेसीं ॥ रात्रीं निद्रा मानवा ॥ ८१ ॥ उरल्या आयुष्यांत देखा ॥ तीन भाग केले ऐका ॥ बाल यौवन वृद्धपण निका ॥ निर्वाण केलें तये वेळीं ॥ ८२ ॥ बाळपणीं आपणासी ॥ कष्ट झाले बहुवसीं ॥ मज घालिती पाळण्यासी ॥ मळमूत्रांत लोळतसें ॥ ८३ ॥ बाळपणींचें दुःख आठवितां ॥ हृदयस्फोट होय आतां ॥ काय सांगूं गुरुनाथा ॥ नाना आपदा भोगिल्या ॥ ८४ ॥ शयनस्थळीं मळ-मूत्रांत ॥ निरंतर असें लोळत ॥ आपली विष्ठा आपण खात ॥ अज्ञान-तिमिरें वेष्टिलों ॥ ८५ ॥ एखादे समयीं आपणासी ॥ पोट दुखे बहुवसीं ॥ रुदन करितां परियेसीं ॥ स्तनपान करविती ॥ ८६ ॥ क्षुधाक्रांत होय

बहुत ॥ मग म्हणती पोट याचें दुखत ॥ अंगुली घालूनियां मुखांत ॥ औषध मज पाजिती ॥ ८७ ॥ ऐसें क्षुधेनें पीडित बहुत ॥ मज घालिती पाळण्यांत ॥ हालविती पर्यंदें गात ॥ क्षुधाक्रांत रुदन करीं ॥ ८८ ॥ म्हणती रुदन करितें बाळ ॥ मुखीं शिंपिती कांजीतेल ॥ रक्षा बांधिती मंत्रवोनी केवळ ॥ नेणें माता भूक माझी ॥ ८९ ॥ पाळण्या घालिती कौतुक ॥ प्रावरणांत असता वृश्चिकें ॥ मारीतसे पाठीसी डंख ॥ प्रलाप मी करीतसें ॥ ९० ॥ आणिक पाळण्या घालिती ॥ राहें राहें उगा म्हणती ॥ स्तनपान मज करविती ॥ वृश्चिकविष नेणतां ॥ ९१ ॥ तेणें दुःखें स्तनपान न करीं ॥ मागुती घालिती पाळण्याभीतरीं ॥ वृश्चिक मज डंख मारी ॥ प्राणांतिक मज होय ॥ ९२ ॥ माता खाय आम्ल तीक्ष्ण खार ॥ स्तनपान करविती मज अपार ॥ क्षीर आंबट आणि मधुर ॥

---

१ गाणीं. २ विंचू. ३ रडणें.

आपण खोके सर्वकाळीं ॥ ९३ ॥ नाना औषधें मज देती ॥ तेणें माझे डोळे दुखती ॥ कुंकूं लवणक्षार घालिती ॥ डोळे आले म्हणोनि ॥ ९४ ॥ ऐसे कष्ट धुरंधर ॥ बाळपणीं साहिले अपार ॥ वाढलों कष्ट करितां फार ॥ वर्षें बारा लोटलीं ॥ ९५ ॥ तधीं कैंचें तुझें चरणस्मरण ॥ मजला कैंची आठवण ॥ कष्टलों मी याचि गुणें ॥ पूर्वजन्म नाठवेची ॥ ९६ ॥ दोन भाग उरले आयुष्यासी ॥ मदनें व्यापिलें शरीरासी ॥ जैसा पतंग दीपासी ॥ भ्रमितें तैसा उन्मत्त ॥ ९७ ॥ नेणें गुरु माता पिता ॥ समस्तांतें निंदा करितां ॥ परस्त्रीवरी करीं चित्ता ॥ कुळाकुळ न विचारीं ॥ ९८ ॥ ब्राह्मण-निंदा परोपरी ॥ वृद्ध देखोनि विनोद करीं ॥ मदें व्यापिलों असें भारी ॥ मग नाठवे तुझे चरण ॥ ९९ ॥ मांसाचे कवळाकारणें ॥ मत्स्य जाय जेवीं प्राणें ॥ तैसा आपण मदनबाणें ॥ वश्य झालों इंद्रियांस ॥ १०० ॥

१ वेडा. २ वर्गानें.

नानवर्ण स्त्रियांतें अंगिकारिलें ॥ परद्रव्य अपहारिलें ॥ सिद्धमहंतां निंदिलें ॥ दृष्टीं न दिसे माझें कांहीं ॥ १ ॥ ऐसा मदनें व्यापूनि ॥ पुढें मागें न पाहें नयनीं ॥ पतंग जाय धांवोनि ॥ दीपावरी पुढें जैसा ॥ २ ॥ ऐसा वेष्टोनि मदनबाणीं ॥ नायकें सुबुद्धि श्रवणीं ॥ सोय न धरीं तुझे चरणीं ॥ यौवनपण ऐसें गेलें ॥ ३ ॥ वृद्धपण आलें शरीरासी ॥ उबग होय स्त्रीपुत्रांसी ॥ श्वासोच्छ्वास कफेसीं ॥ सदा खोकला होय मज ॥ ४ ॥ अवयव सर्व कांपती ॥ कृष्ण केश पांढरे होती ॥ दंत-हीन भक्ष्यें न चावती ॥ श्रवणीं नायकें दृष्टि नाहीं ॥ ५ ॥ ऐसा नाना-परी कष्टितां ॥ तुमची सेवा न घडे आतां ॥ स्वामी तारका गुरुनाथा ॥ संसारसागराकडे[3] करीं ॥ ६ ॥ ऐसा मंदमति आपण ॥ न ओळखेंचि तुझे चरण ॥ तूंचि केवळ नारायण ॥ अवतार श्रीगुरुमूर्ति ॥ ७ ॥ तूंचि

१ साधूंना. २ कंटाळा ३ पार.

विश्वाचा तारक ॥ धरोनियां नरवेष देख ॥ त्रयमूर्ति तूंचि एक ॥ परब्रह्म गुरुनाथा ॥ ८ ॥ दिवांध नेणती तुज लोक ॥ तूंचि विश्वाचा पाळक ॥ मी किंकर तुझा सेवक ॥ संसारसागरीं तारीं मज ॥ ९ ॥ ऐसें नानापरी स्तोत्र ॥ करीतसे नंदिनामा पवित्र ॥ जन पाहती विचित्र ॥ त्यांसी म्हणे नंदिनामा ॥११०॥ ऐका हो जन समस्त ॥ श्रीगुरु परब्रह्मवस्तु ॥ आपण पाप केलें बहुत ॥ दर्शनमात्रेंसर्व गेलें ॥ ११ ॥ जैसें तृणाचे बेणवीसी ॥ अग्नि पडत्तां गति जैसी ॥ गुरुकृपा होय जयासी ॥ पाप जळे येणेंपरी ॥ १२ ॥ चरणं पवित्रं विततं पुराणं ॥ ऐसें बोले वेद पुराण ॥ सेवा सेवा हो गुरुचरण ॥ गुरुवेगळा देव नाहीं ॥ १३ ॥ ब्रह्मदेवें आपण देखा ॥ दुष्टाक्षरें लिहिलीं ऐका ॥ तैसें हें होय निका ॥ श्रीगुरुचरणीं लागता ॥ १४ ॥ जवळी असतां निधान ॥ कां न ओळखा तुम्ही जन ॥ नृसिंह-

१ राशीला.

सरस्वती कामधेनु ॥ भजा भजा हो म्हणतसे ॥ १५ ॥ इह सौख्यदाता अनेक ॥ अंतीं पावे वैकुंठलोक ॥ संदेह नाहीं होईल सुख ॥ सत्य सत्य बोल माझे ॥ १६ ॥ नंदिनामा स्तोत्र करीत ॥ श्रीगुरु संतोष अत्यंत ॥ भक्तांतें निरोप देत ॥ कवीश्वर म्हणायासी ॥ १७ ॥ कवीश्वर नाम तयासी ॥ निर्धार केला भरंवसीं ॥ ऐसें कृपेनें बोलती त्यासी ॥ ऐकोनि चरणी लागला ॥ १८ ॥ शेष होतें जंघेवरी ॥ तात्काळ गेलें दूरी ॥ नंदिनामा आनंद करी ॥ राहिला सेवा करित देखा ॥ १९ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ गुरुचरित्र परियेसीं ॥ कवि नृसिंह नामेंसीं ॥ तोहि राहिला गुरुसेवे ॥ १२० ॥ नामधारक म्हणे सिद्धमुनि ॥ दुसरा कवि नृसिंह म्हणोनि ॥ केवीं झाला श्रीगुरुभुवनीं ॥ कवीश्वर सांगा मज ॥ २१ ॥ तें विस्तारोनि आम्हांसी ॥ सांगा स्वामी कृपेंसीं ॥ वांछा असे मानसीं ॥ गुरुचरित्र ऐकावया ॥ २२ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ पुढील कथेचा विस्तार ॥

ऐकतां होय मनोहर ॥ नामस्मरण कामधेनु ॥ २३ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्ध मुनि संवादत ॥ कवीश्वराख्यान येथ ॥ निरोपिलें प्रेमळ ॥ २४ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे द्विजकुष्टपरिहारो नाम पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४५ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ओंवीसंख्या ॥ १२४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशायनमः ॥ नामधारक विनवि सिद्धासी ॥ मागें कथा निरोपीलीसी ॥ नंदिनामा कवि ऐसी ॥ दुसरा कवि आला म्हणोनि ॥ १ ॥ कवणेंपरी झाला शिष्य ॥ तें सांगावें जी आम्हांस ॥ विस्तारावें आदि सुरस ॥ कृपा करोनि दातारा ॥ २ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ सांगेन विचित्र ऐका ॥ आश्चर्य झालें असे देखा ॥ श्रीगुरुचरित्र अलौकिक ॥ ३ ॥ गाणगापुरीं असतां गुरु ॥ ख्याति झाली अपरंपारू ॥ लोक येती थोरथोरू ॥ भक्तजन बहु झाले ॥ ४ ॥ नंदीनामा कवि होता ॥ कवित्व केलें अपरिमिता ॥ समस्त लोक शिकतां ॥ प्रकाश झाला चहूं राष्ट्रीं ॥ ५ ॥ ऐसें असतां एके दिवसीं देखा ॥ श्रीगुरु नेले भक्तें एका ॥ आपुले घरीं शोभनदायका ॥ म्हणोनि नेले आपुले ग्रामा ॥ ६ ॥ हिपरगी नाम ग्रामासी ॥ नेलें आमुचे श्रीगुरूसी ॥ पूजा केली बहुवसी ॥ संमारंभ थोर केला

१ ख्याति. २ कल्याणदायक.

॥ ७ ॥ तया ग्रामीं शिवालय एक ॥ नाम कल्लेश्वर ऐक ॥ गृहस्थ प्रख्यात असे नीक ॥ तेथें एक द्विज सेवा करी ॥ ८ ॥ तया नाम नरकेसरी ॥ लिंगसेवा बहु करी ॥ नित्य पांच कवित्वें करी ॥ आणिक नवीं निरंतर ॥ ९ ॥ कल्लेश्वरावांचून ॥ आणिक नाणी कदा वचन ॥ एकचित्तें एक-वचन ॥ शिवसेवा करीतसे ॥ १० ॥ समस्त लोक त्यासी म्हणती ॥ तुझे कवित्वाची असे ख्याति ॥ श्रीगुरूची कवित्वावरी प्रीति ॥ गुरुस्मरण करीं एक ॥ ११ ॥ तयांसी म्हणे तो नर ॥ कल्लेश्वरासी विकिलें जिव्हार[1] ॥ अन्यत्र देवपूजें अपार ॥ नरस्तुति न करीं म्हणे ॥ १२ ॥ ऐसें बोलोनियां आपण ॥ गेला[2] देवपूजेकारण ॥ पूजा करितां तत्क्षण ॥ निद्रा आली तया द्विजा ॥ १३ ॥ नित्य पूजा करोनि आपण ॥ कवित्वें करी शिव-स्मरण ॥ ते दिवसीं सर्व विसरोन ॥ निद्रा आली तया द्विजा ॥ १४ ॥ निद्रा

१ जिव्हेंद्रिय. २ दुसरीकडे.



[ अ० ४६ ] निद्रा केली देवालयांत । विचित्र देखिलें स्वप्नांत । लिंगावरी श्रीगुरु बैसत । आपण पूजा करीतसे ॥ १५ ॥

केली देवालयांत ॥ विचित्र देखिले स्वप्नांत ॥ लिंगावरी श्रीगुरू बैसत ॥ आपण पूजा करीतसे ॥ १५ ॥ लींग न दिसे श्रीगुरूचि दिसे ॥ आपण त्यासी पुसती हर्षें ॥ नरावरी तुझी भक्ती न असे ॥ कां गा आमुतें पूजितोसी ॥ १६ ॥ षोडशोपचारें आपण ॥ पूजा करी थिर मन ॥ ऐसें देखोनियां स्वप्न ॥ जागृत झाला तो द्विज ॥ १७ ॥ विस्मय करी आपुले मनीं ॥ ह्मणे नृसिंहसरस्वती मुनी ॥ आला असे अवतरोनि ॥ आपण पूजा त्याची केली ॥ १८ ॥ हाचि होय श्रीजगद्गुरु ॥ त्रयमूर्तींचा अवतारु भेट घ्यावी हा निर्धारु ॥ धरूनि आला गुरुपासीं ॥ १९ ॥ आला विप्र लोटांगणेसीं ॥ विनवूं लागला चरणापासीं ॥ कृपा करीं गा अज्ञानासी ॥ नेणों तुझें स्वरूप आपण ॥ २० ॥ प्रपंचमायेनें[1] वेष्टोन ॥ न ओळखूं आपण अज्ञान ॥ तूंचि साक्षात् शिव निर्गुण ॥ निर्धार झाला आजि मज ॥ २१ ॥ कल्ले-

[1] संसाराच्या मोहानें.

श्वर कर्पूरगौरु ॥ तूंचि होसी श्रीजगद्गुरु ॥ माझें मन झालें स्थिरु ॥ तुझे चरणीं विनटलों ॥२२॥ तूंचि विश्वाचा आधार ॥ शरणागता वज्रपंजर ॥ चरणकमळीं मी भ्रमर ॥ ठाकोनि आलों स्वामिया ॥२३॥ जवळी असतां निधानु ॥ कां हिंडावें रानोरानु ॥ घरा आलिया कामधेनु ॥ दैन्य काय आम्हांसी ॥ २४ ॥ पूर्वी समस्त ऋषि देखा ॥ तप करिती नसे लेखा ॥ तूं न पावसी तयासन्मुखा ॥ अनेक कष्ट करितांही ॥ २५ ॥ न करितां तप अनुष्ठान ॥ आम्हां भेटलासी निधान ॥ झाली आमुची कामना पूर्ण ॥ कल्लेश्वर प्रसन्न झाला ॥ २६ ॥ तूंचि सत्य कल्लेश्वरू ॥ ऐसा माझे मनीं निर्धारु ॥ कृपा करीं गा जगद्गुरु ॥ म्हणोनि चरणीं लागला॥२७॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ नित्य आमुची निंदा करिसी ॥ आजि कैसी तुझे मानसीं ॥ भक्ति उपजोनि आलासी ॥२८॥ विप्र म्हणे स्वामियासी ॥ अज्ञा·

१ माळलों. २ गमती.

नांधकारीं आम्हांसी ॥ कैसा भेटलासी परियेसीं ॥ ज्योतिर्मय आनंदमूर्ति ॥ २९ ॥ म्यां कल्लेश्वराची पूजा केली ॥ तेणें पुण्यें तुम्हां भेटी झाली ॥ आजि आपुली पूजा केली ॥ लिंगस्थानीं तुम्हां देखिलें ॥ ३० ॥ स्वप्ना-मध्यें लिंगस्थानीं आपण ॥ प्रत्यक्ष देखिले तुझे चरण ॥ स्थिर झालें अंतः-करण ॥ मिळवावें शिष्यवर्गांत ॥ ३१ ॥ ऐसें विनवी द्विजवर ॥ स्तोत्र करीतसे अपार ॥ स्वामीची पूजा षोडशोपचार ॥ कैचें कवित्व केलें देखा ॥ ३२ ॥ मानसपूजेचें विधान ॥ पूजा व्यक्त केली जाण ॥ श्रीगुरु म्हणती तत्क्षण ॥ आइका स्वप्न लोकांसी ॥ ३३ ॥ प्रत्यक्ष आम्ही असतां देखा ॥ स्वप्न अवस्थें कवित्व ऐका ॥ त्यानें केलें बरकड निका ॥ स्वप्नीं भेटलों म्हणोनि ॥ ३४ ॥ ऐसें सांगोनि समस्तांसी ॥ वस्त्रें देवविती त्या कवीसी ॥ लागला श्रीगुरुचरणासी ॥ म्हणे आपण शिष्य होईन ॥ ३५ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ कल्लेश्वर श्रेष्ठ आम्हांसी ॥ पूजा करीं गा नित्य त्यासी ॥

आम्ही तेथें दासों ॥ ३६ ॥ विप्र म्हणे स्वामीसी ॥ प्रत्यक्ष सांडोनि तुम्हांसी ॥ काय पूजूं कल्लेश्वरासी ॥ तेथें तुम्हांसी म्यां देखिलें ॥ ३७ ॥ तूंचि स्वामी कल्लेश्वर ॥ त्रयमूर्तींचा अवतार ॥ हाचि माझा सत्य निर्धार ॥ न सोडीं आतां तुझे चरण ॥ ३८ ॥ ऐसें विनवी स्वामियासी ॥ आला सवें गाणगापुरासी ॥ कवित्व केलें बहुवसीं ॥ सेवा करीत राहिला ॥ ३९ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ कवीश्वर दोघे शिष्य गुरुपासीं ॥ आले येणें रीतीसीं ॥ भक्ति करीत राहिले ॥ ४० ॥ म्हणे सरस्वतगिंगाधरु ॥ ज्यासी प्रसन्न होय गुरु ॥ तयाचे घरीं कल्पतरु ॥ चिंतिलें फळ देतसे ॥ ४१ ॥ कथा कवीश्वराची ऐसी ॥ सिद्ध सांगे नामधारकासी ॥ पुढील कथा विस्तारेंसीं ॥ एकचित्तें परियेसा ॥ ४२ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्धमुनिसंवाद होत ॥ भक्त ज्ञानी परिसोत ॥ नरहरिकवि

१ निश्चय.

उद्धारण ॥ ४३ ॥ इति श्रीगुरुचरित्रे श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे कल्लेश्वरमाहिमा नाम षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥
ओंवीसंख्या ॥ ४३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ ते विस्तारोनि आम्हांसी ॥ कृपा करोनि सांगावी ॥ १ ॥ नामधारका श्रीमंता ॥ ऐकेन म्हणसी गुरुचरित्रा ॥ तुज होतील पुत्रपौत्रा ॥ सदा स्त्रिया युक्त होती ॥ २ ॥ सांगेन कथा एक विचित्र ॥ जेणें होती पतित[1] पवित्र ॥ ऐसें श्रीगुरुचारित्र ॥ तत्परेंसीं परियेसा ॥ ३ ॥ गाणगापुरीं असतां गुरू ॥ सण दिपवाळी आला थोरू ॥ शिष्य आले पाचोरूं ॥ आपले घरीं यावें भिक्षेसी ॥ ४ ॥ सप्त शिष्य बोलाविती[2] ॥ एकाहूनि एक अधिक प्रीतीं ॥ सातही जण पायां पडती ॥ यावें आपुल्या घरासी ॥ ५ ॥ एकेक ग्राम एकेक देशीं ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ समस्तां घरीं यावें कैसी ॥ तुम्ही मनीं विचार करा ॥ ६ ॥ तुम्हीं वाटावें आपणातें ॥ कोठें आधीं यावें निरूपा[3] तें ॥ तेथें जाऊं निश्चितें ॥ शिष्याधीन

१ पापी. २ बोलावूं. ३ सांगा.

आम्ही असों ॥ ७ ॥ आपणांत आपण पुसती ॥ समस्त आधीं नेऊं म्हणती ॥ एकमेकां झगडती ॥ आपुला स्वामी म्हणोनियां ॥ ८ ॥ श्रीगुरु वारिती तयांसी ॥ तुम्ही भांडतां[1] कासयासी ॥ आम्ही गुरु सातांसी ॥ एका घरीं येऊं आम्ही ॥ ९ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ समस्त विनविती कर जोडोनि ॥ स्वामी प्रपंचे[2] न पाहावा मनीं ॥ समर्थ दुर्बळ म्हणूं नये ॥ १० ॥ समस्तांसी पहावें समान ॥ न विचारावें न्यून पूर्ण ॥ उपेक्षिसी दुर्बळ म्हणोन ॥ गंगाप्रवेश करूं आम्ही ॥ ११ ॥ विदुराचिया घरासी ॥ श्रीकृष्ण जाय भक्तींसीं ॥ कौरवराजमंदिरासी ॥ न वचे[3] भक्तवत्सल ॥ १२ ॥ आम्ही समस्त तुझे दास ॥ कोणासी न करावें उदास ॥ जो निरोप घाल आम्हांस ॥ तेंचि करूं आपण म्हणती ॥ १३ ॥ ऐसें म्हणोनियां समस्त ॥ करिती साष्टांग दंडवत ॥ समस्त आम्हां पहा हो म्हणत ॥ ऐसें विनविती

१ भांडतात. २ भेदाभेद. ३ जाई.

श्रीगुरूसी ॥ १४ ॥ श्रीगुरु म्हणती समस्तांसी ॥ येऊं तुमचे घरासी ॥ चिंता न धरा हो मानसीं ॥ भाक आमुची घ्या म्हणती ॥ १५ ॥ ऐसें ऐकोनि गुरुवचन ॥ विनविताती सातही जण ॥ समस्तांसी म्हणतां येईन ॥ कोणी करावा भरंवसा ॥ १६ ॥ श्रीगुरु मुनी विचारिती ॥ अज्ञान लोक हे नेणती ॥ आतां सांगूं एकांतीं ॥ एक एकातें बोलावून ॥ १७ ॥ जवळी बोलावोनि एकासी ॥ कानीं सांगती तयासी ॥ आम्ही येतों तुझे ग्रामासी ॥ कोणाजवळी न सांगावें ॥ १८ ॥ ऐसी भाक त्यासी देती ॥ उठोनि गांवा जा म्हणती ॥ येऊं तुझ्या ग्रामाप्रती ॥ संशय मनीं न धरावा ॥ १९ ॥ ऐसें सांगोनि तयासी ॥ पाठविलें ग्रामासी ॥ बोलावून दुसऱ्यासी ॥ येणेंचि रीतीं सांगितलें ॥ २० ॥ ऐसें सातही जणां देखा ॥ समजावोनि गुरुनायका ॥ पाठविलें तुम्ही ऐका ॥ महदाश्चर्य वर्तलें ॥ २१ ॥

१ वचन.

एकमेका न सांगत ॥ गेले सातही भक्त ॥ श्रीगुरु आले मठांत ॥ अतिविनोद प्रवर्तला ॥२२॥ ग्रामांतील भक्तजन ॥ ऐसें कौतुक ऐकोन ॥ विनविताती कर जोडोन ॥ आम्हां सांडोनि जातां स्वामी ॥ २३ ॥ तयांसी म्हणती श्रीगुरुनाथ ॥ राहूं आम्ही नाहीं जात ॥ न करा चिंता मनांत ॥ आम्ही येथेंचि असों देखा ॥ २४ ॥ ऐशा संधीस श्रीगुरूसी ॥ होऊं आली जवळी निशी ॥ दिपवाळीची त्रयोदशी ॥ रात्रीं मंगळस्नान करावें ॥२५॥ आठरूप झाले आपण ॥ अपारमहिमा नारायण ॥ सात ठाईंतही गेले जाण ॥ गाणगापुरीं होतेची ॥२६॥ ऐसी दिपवाळी झाली ॥ समस्तां ठायीं पूजा घेतली ॥ पुनः एकचि मूर्ति[1] ठेली[2] ॥ गौप्यरूपें कोणी नेणें ॥ २७ ॥ कार्तिकमासीं पौर्णिमेसी ॥ करावया दीपाराधनेसी ॥ समस्त आले परियेसीं ॥ गाणगापुरीं गुरूजवळी ॥ २८ ॥ समस्तही नमस्कारिती ॥ भेटी दहावे दिवसीं

---

१ मोठी. २ झाली.



[ अ० ४७ ] समस्तही नमस्कारिती । भेटों दद्यावे दिवशीं म्हणती । एकमेकांतें झगडती । म्हणती अपुलें घरीं गुरु होते ॥ २९ ॥

म्हणती ॥ एकमेकांतें झगडती ॥ म्हणती आपुले घरीं गुरु होते ॥ २९ ॥
एक सत्य मिथ्या म्हणत ॥ समस्त शिष्य खुणा दाखवित ॥ आपण दिल्हे तें
हें वस्त्र ॥ श्रीगुरुजवळीं असे ॥ ३० ॥ समस्त राहिले तटस्थ ॥ ग्रामस्थ लोक
असत्य म्हणत ॥ आम्हांजवळी गुरु असत ॥ दिपवाळी येथेंची केली ॥ ३१ ॥
विस्मय करिती सकळ जन ॥ म्हणती त्रैमूर्ति हाचि आपण ॥ अपार महिमा
नारायण ॥ अवतार असे श्रीहरीचा ॥ ३२ ॥ ऐसे मिळोनि भक्त समस्ती ॥
नानापरी स्तोत्रें करिती ॥ न कळे महिमा तुमचा म्हणती ॥ वेदमूर्ति गुरु-
नाथा ॥ ३३ ॥ तूंचि विश्वव्यापक होसी ॥ महिमा न कळे आम्हांसी ॥ काय
वर्णूं चरणासी ॥ त्रैमूर्ति तूंचि एक ॥ ३४ ॥ नानापरी स्तुति करिती ॥
दीपाराधना अतिप्रीती ॥ ब्राम्हणभोजन अतिभक्ती ॥ करिते झाले भक्तजन
॥ ३५ ॥ श्रीगुरुमहिमा झाली जगतीं ॥ सिद्ध सांगे नामधारकाप्रती ॥ भू-

मंडळीं झाली ख्याति ॥ श्रीनृसिंहसरस्वतीची ॥ ३६ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधरु ॥ जवळी असतां कल्पतरु ॥ न ओळखिती अंध बधिरु ॥ वायां कष्टती दैन्यरीतीं ॥ ३७ ॥ भजा भजा हो श्रीगुरूसी ॥ जें जें काम्य तुमचे मानसीं ॥ सिद्ध होईल त्वरितेसी ॥ आम्हां प्रचीति आली असे ॥ ३८ ॥ अमृत मिळतां पानासी ॥ क्षार कटु आवडे मूर्खासी ॥ ज्ञानवंत भक्तजनांसी ॥ नामामृत गुरूचें ॥ ३९ ॥ श्रीगुरुसेवा तुम्ही करा ॥ ऐसा पिटीं मी डांगोरा ॥ सांगती शास्त्र अपारा ॥ गुरु तोचि त्रैमूर्ति ॥ ४० ॥ गुरूवेगळी गति नाहीं ॥ जें निंदिती नर देहीं ॥ वेदशास्त्रें बोलती पाहीं ॥ सूकरयोनींत जन्मती ॥ ४१ ॥ तुम्ही म्हणाल मज ऐसें ॥ आपुले इच्छे लिहिलें कैसें ॥ वेदशास्त्रीं सांगितलें ऐसें ॥ असे तरी अंगिकारा ॥ ४२ ॥ संसारसागर धुरंधर ॥ उतरावया पैलपार ॥ गुरुविणें निर्धार ॥ तारक कोण त्रिजगीं ॥ ४३ ॥ निर्जळ संसार अरण्यांत ॥ पवई घालणें असे

अमृत ॥ सेवा सेवा हो तुम्ही समस्त ॥ अमरत्व तुम्हां होईल ॥ ४४ ॥
श्रीगुरुनृसिंहसरस्वती ॥ अवतार असे त्रिमूर्ति ॥ गाणगाग्रामीं असे
ख्याति ॥ आतां असे प्रत्यक्ष ॥ ४५ ॥ जे जाती तया स्थाना ॥ तात्काळ
होती मनकामना ॥ काहीं न करा हो अनुमाना ॥ प्रत्यक्ष देव तेथें असे
॥ ४६ ॥ आम्ही सांगतों तुम्हां हित ॥ प्रशस्त झालिया तुमचें चित्त ॥
गाणगापुरीं जावें त्वरित ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ ४७ ॥ इति श्रीगुरु-
त्रामृत ॥ सिद्धमुनि संवादत ॥ अष्टरूपें श्रीगुरु चरित ॥ सप्तचत्वारिंशो-
ध्याय हा ॥ ४७ ॥ इति श्रीगुरुचरित्रे श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्ध-
नामधारकसंवादे अनेकस्वरूपधारणं नाम सप्तचत्वारिंशोध्यायः ॥ ४७ ॥
ओंवीसंख्या ॥ ४८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ अपूर्व झालें परियेसीं ॥ गुरुचरित्र विस्तारेंसीं ॥ सांगतां संतोष होतसे ॥ १ ॥ गाणगापुरीं असतां गुरू ॥ ख्याति झाली अपरंपारू ॥ भक्त होता एक शूद्रू ॥ तयाची कथा ऐक पां ॥ २ ॥ श्रीगुरु नित्य संगमासी ॥ जात असतां अनुष्ठानासी ॥ मार्गीं तो शूद्र परियेसीं ॥ आपुले शेतीं उभा असे ॥ ३ ॥ श्रीगुरूतें नित्य देखोनि ॥ धांवत येऊनि शेतांतुनी ॥ आपण साष्टांगीं नमोनि ॥ पुनरपि जात आपुले स्थाना ॥ ४ ॥ माध्यान्हकाळीं मठासी येतां ॥ पुनरपि चरणीं ठेवी माथा ॥ ऐसें कितीएक दिवस होतां ॥ शूद्राची भक्ति वाढली ॥ ५ ॥ श्रीगुरु तयासी न बोलती ॥ नमन केलिया उभे असती ॥ येणें विधीं बहु काळ क्रमिती ॥ आला शूद्र नमस्कारा ॥ ६ ॥ नमस्कारितां शूद्रासी ॥ श्रीगुरु पुसती संतोषीं ॥ कां गा नित्य तूं कष्टतोसी ॥ नमन करिसी येऊनियां ॥ ७ ॥ तुझे मनीं काय वासना ॥ सांग त्वरित आम्हां

जाणा ॥ शूद्र म्हणे आवड मना ॥ शेत अधिक पिकावें ॥ ८ ॥ तयासी पुसती गुरुनाथ ॥ काय पेरिलें शेतांत ॥ शूद्र म्हणे यावनाळ बहुत ॥ पीक आलें तुझे धर्मीं ॥ ९ ॥ नमस्कारितां तुम्हां नित्य ॥ पीक आलें असे अत्यंत ॥ पोटरीं येतील त्वरित ॥ आतां तुझेनि धर्मीं जेवूं ॥ १० ॥ स्वामी यावें शेतापासीं ॥ पहावें अमृतदृष्टीसीं ॥ तूं समस्तां प्रतिपाळिसी ॥ शूद्र म्हणोनि न उपेक्षावें ॥ ११ ॥ श्रीगुरु गेले शेतापासीं ॥ पाहूनि म्हणाति त्या शूद्रासी ॥ सांगेन एक ऐकसी ॥ विश्वास होईल बोलाचा ॥ १२ ॥ जें सांगेन मी तुजसी ॥ जरी भक्तीनें अंगिकारिसी ॥ तरीच सांगूं परियेसीं ॥ एकभावें त्वां करावें ॥ १३ ॥ शूद्र विनवी स्वामियासी ॥ गुरुवाक्य कारण आम्हांसी ॥ दुसरा भाव आम्हांसी ॥ नाहीं स्वामी म्हणे तो ॥ १४ ॥ मग निरोपिती श्रीगुरु तयासी ॥ आम्ही जातों संगमासी ॥ परतोनि येऊं माध्यान्हासी ॥ तंव कापावें सर्व पीक ॥ १५ ॥ ऐसें सांगोनि



[ अ० ४८ ] श्रीगुरु गेले शेतापासीं । पाहूनि म्हणती त्या शूद्रासी । सांगेन एक ऐकसी । विश्वास होईल बोलाचा ॥ १२ ॥

शूद्रासी ॥ श्रीगुरु गेले संगमासीं ॥ शूद्र विचारी मानसी ॥ गुरुवाक्य आपणा कारण ॥ १६ ॥ शीघ्र आला ग्रामांत ॥ अधिकारियासी विनवीत ॥ खंडोनि द्यावें मला शेत ॥ गत संवत्सराप्रमाणें धान्य देईन ॥ १७ ॥ अधिकारी म्हणती तयासी ॥ पीक झालें असे बहुवसीं ॥ या कारणें उक्तें मागसी ॥ अंगिकार न करिती ॥ १८ ॥ नानाप्रकारें विनवी त्यांसी ॥ द्विगुण देईन गतसंवत्सरेसी ॥ अंगिकारिलें संतोषीं ॥ वचनपत्र लिहून घेती ॥ १९ ॥ आपण अभयपत्र घेऊनि ॥ लोक मिळवोनि तत्क्षणीं ॥ गेला शेतांत संतोषोनि ॥ म्हणे कापा तयांसी ॥ २० ॥ कापूं लागतां शेतासी ॥ स्त्री-पुत्र वर्जितीं तयासी ॥ पाषाण घेऊनि स्त्रियेसी ॥ मारूं आला तो शूद्र ॥ २१ ॥ पुत्रातें मारी येणेंपरी ॥ पळत आले गांवाभीतरी ॥ आड पडतां राजद्वारा ॥ पिसें लागलें पतीसी ॥ २२ ॥ पीक असे बहुवसीं ॥ कापून टाकितो मूर्खपणेंसीं ॥ वर्जितां पहा आम्हांसी ॥

पाषाणघाईं मारिलें ॥ २३ ॥ संन्याशाचें माहात्म्य वाचें बोले ॥ पीक सर्व कोमळ कापिलें ॥ आमुचें जीवित्वप्राणास गेलें ॥ आणिक भक्षितों एक मास आम्ही ॥२४॥ अधिकारी म्हणती तयांसी ॥ कापीना कां आपुल्या शेतासी ॥ पत्र असे आम्हांपासी ॥ गतसंवत्सरा द्विगुण धान्य द्यावें ॥ २५ ॥ वर्जावया माणसें पाठविती ॥ शूद्र न ऐके कवणें गतीं ॥ शूद्र म्हणे अधिकारी भीतीं ॥ पेंवींचें कण आतां देईन ॥ २६ ॥ दूत सांगती अधिकारियासी ॥ आम्हीं सांगितलें शूद्रासी ॥ सांगोनि पाठविलें तुम्हांसी ॥ विनोद असे परियेसा ॥ २७ ॥ जरी भितील अधिकारी ॥ तरी देईन आतांचि घरीं ॥ गुरें बांधीन तयांचे द्वारीं ॥ पत्र आपण दिलें असे ॥२८॥ दूत सांगती ऐशी रीतीं ॥ पुढें वर्तली काय स्थिति ॥ राजा अधिकारी तयाप्रती ॥ काय उत्तर बोलतसे ॥ २९ ॥ अधिकारी म्हणती तयासी ॥ आम्हां चिंता कायसीं ॥ पेंव ठाऊकें आहे आम्हांसी ॥ धान्य आहे अपार ॥३०॥ इतुकें होतां

शूद्र देखा ॥ पीक कापिलें मनःपूर्वका ॥ उभा असे मार्गी ऐका ॥ श्रीगुरु आले परतोनि ॥३१॥ नमन करोनि श्रीगुरूसी ॥ शेत दाखविलें कापिलें ऐसी ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ वायां कापिलें म्हणोनि ॥ ३२ ॥ विनोदें तुज सांगितलें ॥ तुवां निर्धारें कापिलें ॥ शूद्र म्हणे तुमचें वाक्य भलें ॥ तेंचि मज कामधेनु ॥३३॥ ऐसें ऐकोनि श्रीगुरु म्हणती ॥ निर्धार असे तुझे चित्तीं ॥ होईल अत्यंत फळप्राप्ति ॥ चिंता न करीं मानसीं ॥ ३४ ॥ ऐसें सांगोनि श्रीगुरुनाथ ॥ आले आपण ग्रामांत ॥ सवें शूद्र असे येत ॥ आपुले घराप्रती गेला ॥ ३५ ॥ पुसावया येती समस्त ॥ तयाचे घरीं होतो आकांत ॥ स्त्री-पुत्र सर्व रुदन करीत ॥ म्हणती आपुला ग्रास गेला ॥ ३६ ॥ शूद्र समस्तांतें संबोखी ॥ न करीं चिंता रहा सुखी ॥ गुरुसोय नेणती मूर्खी ॥ कामधेनु वाक्य तयांचें ॥३७॥ एकेकाचे सहस्रगुण ॥ अधिक लाभ तुम्हां जाण ॥ स्थिर करा अंतःकरण ॥ हानि नव्हे निर्धार पैं

॥३८॥ गुरुकृपा होय ज्यासी ॥ दैन्य कैंचें होय त्यासी ॥ निधान जोडलें आम्हांसी ॥ म्हणोनि शूद्र सांगतसे ॥ ३९ ॥ नर म्हणूं नये श्रीगुरूसी ॥ शिवस्वरूप जाणा भरंवसीं ॥ असे कारण पुढें आम्हांसी ॥ म्हणोनि निरोपिलें असे मज ॥ ४० ॥ नानापरी स्त्री-पुत्रासी ॥ संबोधित असे शूद्र अति हर्षी ॥ इष्टजन बंधुवर्गासी ॥ येणेंचि रीतीं सांगतसे ॥ ४१ ॥ समस्त राहिले निवांत ॥ ऐसे आठ दिवस क्रमित ॥ वायु झाला आत शीत ॥ समस्त पिकें नासलीं ॥ ४२ ॥ समस्त ग्रामींचीं पिकें देखा ॥ शीतें नासलीं सकळिका ॥ पर्जन्य पडला अकाळिका ॥ मूळ नक्षत्रीं परियेसा ॥ ४३ ॥ ग्राम राहिला पिकावीण ॥ शूद्रशेत वाढलें शतगुणं ॥ वाढला यावनाळ सगुण ॥ एकेका अकरा फरगडेंसीं[1] ॥ ४४ ॥ तैं शूद्र-स्त्री संतोषोनि ॥ शेता आली पूजा घेऊनि ॥ अवलोकितसे आपुले नयनीं ॥ महा-

[1] फांटा

नंद करितसे ॥४५॥ पीक झालें अत्यंत ॥ देखोनियां समस्त ॥ येऊनि जन समस्त तेथ ॥ महदाश्चर्य करीत देखा ॥ ४६ ॥ येऊनि लागे पतिचरणीं ॥ विनवीतसे कर.जोडोनि ॥ बोले मधुर करुणावचनीं ॥ क्षमा करीं म्हणतसे ॥ ४७ ॥ अज्ञानमदें अति वेष्टिलें ॥ नेणतां तुम्हांतें निंदिलें ॥ गुरु कैंचा काय म्हणितलें ॥ क्षमा करणें प्राणनाथ ॥४८॥ ऐसें पतीसी संबोधोनि ॥ शेंतींचा देव पूजोनि ॥ विचार केला दोघांनीं ॥ गुरुदर्शना जावें आतां ॥ ४९ ॥ म्हणोनि सांगे स्त्रियेसी ॥ पूजों आलीं श्रीगुरूसी ॥ स्वामी पुसती तयांसी ॥ काय वर्तमान म्हणोनियां ॥ ५० ॥ चरणीं लागलीं तेव्हां दोन्ही ॥ हस्तद्वय जोडोनि ॥ स्वामीदर्शन उल्हासोनि ॥ उभीं ठाकलीं सन्मुख ॥ ५१ ॥ दोघेंजणें स्तोत्र करिती ॥ जय जयाजी श्रीगुरु-मूर्ती ॥ कामधेनु कुळदैवत म्हणती ॥ तूंचि आमुचा गुरुराया ॥ ५२ ॥

तुझें अमृतवच आम्हां ॥ चिंतामणिप्रकार महिमा ॥ पूर्ण केलें आमुच्या कामा ॥ शरण आलों तुज आम्ही ॥ ५३ ॥ भक्तवत्सल श्रीदख्याति ॥ ऐसें जगीं तुज वानिती ॥ आम्हीं देखिलें दृष्टांतीं ॥ म्हणोनि चरणीं लागलीं ॥ ५४ ॥ नाना प्रकारें पूजा आरती ॥ शूद्र-स्त्री करितसे भक्ती ॥ श्रीगुरु बोलती अतिप्रीतीं ॥ लक्ष्मी अखंड तुझे घरीं ॥ ५५ ॥ निरोप घेऊनि दोघेंजण ॥ गेलीं आपुले आश्रमीं जाण ॥ करितां मास काळक्रमण ॥ पीक आलें अपार ॥ ५६ ॥ गतसंवत्सराहूनि देखा ॥ शतगुणी झालें धान्य अधिका ॥ शूद्र म्हणतसे ऐका ॥ अधिकारियातें बोलावोनि ॥ ५७ ॥ शूद्र म्हणे अधिकारियासी ॥ पीक गेलें सर्व गांवासी ॥ वोस दिसे कोठारासी ॥ आपण देऊं अर्धा भाग ॥ ५८ ॥ गतवर्षी द्विगुण तुम्हांसी ॥ अंगीकारिलें मीं परियेसीं ॥ धान्य झालें बहुवसीं ॥ शतगुणें अधिक देखा ॥ ५९ ॥ परी देईन अर्ध संतोषीं ॥ संदेह न धरा हो

मानसां ॥ अधिकारी म्हणती तयासी ॥ धर्महानि केंवी करूं ॥ ६० ॥
गुरुकृपा होतां तुजवरी ॥ पीक झालें बहुतांपरी ॥ नेऊनियां आमुलें घरीं ॥
राज्य करीं म्हणती तया ॥ ६१ ॥ संतोषोनि शूद्र देखा ॥ विप्रांसी वांटी
धान्य अनेका ॥ घेऊनि गेला सकळिका ॥ राजधान्य देऊनि ॥ ६२ ॥
सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ श्रीगुरुचरित्र-महिमा परियेसीं ॥ दृढ भक्ति
असे ज्यासी ॥ दैन्य कैंचें तया घरीं ॥ ६३ ॥ सकळाभीष्टें त्यासी होती ॥
लक्ष्मी राहे अखंडिती ॥ गुरु सेवा हो निश्चिती ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर
॥ ६४ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ गुरुशिष्यसंवाद विख्यात ॥ भक्ता
शूद्रावर प्राप्त ॥ अष्टचत्वारिंशोऽध्याय हा ॥ ६५ ॥ इति श्रीगुरुचरित्रे
श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे शूद्रवरप्रदानं नाम अष्ट-
चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४८ ॥ ओंवीसंख्या ॥ ६५ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥

॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक शिष्य सगुण ॥ सिद्धमुनीतें नमन करून ॥ विनवीतसे कर जोडून ॥ भक्तिभावेंकरोनियां ॥ १ ॥ त्रैमूर्तींचा अवतार ॥ झाला वेषधारी नर ॥ राहिला प्रीतीं गाणगापुर ॥ कवण क्षेत्र म्हणोनियां ॥ २ ॥ भूमीवरी प्रख्यात ॥ तीर्थें असती असंख्यात ॥ समस्त सांडोनियां येथ ॥ काय कारण वास केला ॥ ३ ॥ या स्थानाचें महिमान ॥ सांगा स्वामी विस्तारोन ॥ म्हणोनि धरी सिद्धाचे चरण ॥ नामधारक तये वेळीं ॥ ४ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ सिद्धमुनि संतोषोन ॥ सांगतसे विस्तारोन ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥५॥ आश्विन वद्य चतुर्दशीसीं ॥ दिपवाळी पर्वणीसी ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ स्नान करावें त्रिस्थळीचें ॥ ६ ॥ गया-प्रयाग-वाराणशीसीं ॥ चला यात्रे पुत्रकलत्रेंसीं ॥ विप्र म्हणती श्रीगुरूसी ॥ आइती करणें म्हणोनियां ॥ ७ ॥ ऐकोनि श्रीगुरु

१ तयारी.

हांसती ॥ ग्रामाजवळी तीर्थें असती ॥ करणें न लागे तुम्हां आइती ॥ चला नेईन तुम्हांसी ॥ ८ ॥ ऐसें म्हणोनि भक्तांसी ॥ गेले अमरजासंगमासी ॥ स्नान केलें महाहर्षी ॥ शिष्यांसहित श्रीगुरूंनीं ॥ ९ ॥ गुरु म्हणती शिष्यांसी ॥ महिमा अपार संगमासी ॥ प्रयागसमान परियेसीं ॥ षट्कुळामध्यें स्नान करणें ॥ १० ॥ विशेष नदी भीमातीर ॥ अमरजासंगम थोर ॥ गंगा यमुना वाहे निर्धार ॥ तीर्थ बरवें परियेसा ॥ ११ ॥ विशेषें आपण उत्तरे वाहे ॥ याचें पुण्य अपार आहे ॥ शताधिक पुण्य पाहे ॥ काशीहून परियेसा ॥ १२ ॥ आणिक अष्ट तीर्थें असती ॥ तयांचा महिमा विख्यात जगतीं ॥ सांगेन ऐका एकचित्तीं ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ १३ ॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥ विनविताती भक्तजन ॥ अमरजानदी नाम कोण ॥ कोणापासाव उत्पत्ति ॥ १४ ॥ श्रीगुरु म्हणती भक्तांसी ॥ बरवें पुसिलें आम्हांसी ॥ जालंधर पुराणासी ॥ असे कथा

प्रख्यात ॥ १५ ॥ जालंधर नामें निशाचर ॥ समस्त जिंकिले सुरवर ॥ आपुलें केलें इंद्रपुर ॥ समस्त देव पळाले ॥ १६ ॥ देवां दैत्यां झालें युद्ध ॥ सुरवर मारिले बहुविध ॥ इंद्रें जाऊनि प्रबोध ॥ ईश्वराप्रती सांगितला ॥ १७ ॥ इंद्र ह्मणे ऐक शिवा ॥ दैत्यें मारिलें असे देवां ॥ शीघ्र प्रतिकार करावा ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ १८ ॥ आम्ही मारितों दैत्यांसी ॥ रक्त पडतसे भूमीसी ॥ अखिल दैत्यबिंदूंसी ॥ अधिक उपजवी भूमीवरी ॥ १९ ॥ स्वर्ग मृत्यु पाताळ ॥ सर्वत्र मारिलें दैत्यकुळ ॥ मारिले आमुचे देव सकळ ॥ म्हणोनि आलों तुम्हांपासीं ॥ २० ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ ईश्वर प्रज्वा-ळला मनीं ॥ निघाला रुद्र होऊनि ॥ दैत्यनिर्दाळण करावया ॥ २१ ॥ इंद्र विनवी ईश्वरासी ॥ वधावया दैत्यांसी ॥ जीवन आणावया देवांसी ॥ ऐसा प्रतिकार करावा ॥ २२ ॥ संतोषोनि गिरिजारमण ॥ अमृतमंत्र

१ राक्षस. २ शत्रूचा उलट नाश. ३ कोपाला.

उच्चरोन ॥ घट दिधला तत्क्षण ॥ संजीवनी उदक देखा ॥ २३ ॥ तें उदक घेवोनि इंद्रराव ॥ शिंपतांचि समस्त देव ॥ उठोनियां अमर सर्व ॥ स्वर्गास जाती तये वेळीं ॥ २४ ॥ उरलें अमृत घटीं होतें ॥ घेऊनि जातां अमरनाथें ॥ पडिलें भूमीं अवचितें ॥ प्रवाह आला क्षितीवरी ॥ २५ ॥ ते संजीवनी नामें नदी ॥ उद्भवली भूमीं प्रसिद्धी ॥ अमरजानाम याचि विधीं ॥ प्रख्यात झाली अवधारा ॥ २६ ॥ या कारणें या नदीसी ॥ जे स्नान करिती भक्तींसीं ॥ काळमृत्यु न बाधे त्यांसी ॥ अपमृत्यु घडे केवीं ॥ २७ ॥ शतायुषी पुरुष होती ॥ रोगराई न पीडिती ॥ अपस्मारादि रोग जाती ॥ ब्रह्महत्यादि पातकें ॥ २८ ॥ अमृतनदी नाम तियेसी ॥ संगम झाला भीमरथीसी ॥ तीर्थ झालें प्रयागसरसी ॥ त्रिवेणीचा संगम ॥ २९ ॥ कार्तिकादि माघमासीं ॥ स्नान करिती भक्तींसीं ॥ इह सौख्य

१ देव. २ महामृत्यु.

परलोकासी ॥ मोक्षस्थाना पावती ॥३०॥ सोम-सूर्य ग्रहणासी ॥ संक्रमण सोम-अमावास्येसी ॥ पुण्यतिथि एकादशीसी ॥ स्नान करावें अनंत पुण्य ॥ ३१ ॥ साधितां प्रतिदिवस जरी ॥ सदा करावें मनोहरी ॥ समस्त दोष जाती दूरी ॥ शतायुषी श्रियायुक्त होय ॥ ३२ ॥ ऐसा संगममहिमा ऐका ॥ पुढें सांगतसें तीर्थ विशेखा ॥ दिसे अश्वत्थ सन्मुखा ॥ मनोहर तीर्थ असे ॥ ३३ ॥ या तीर्थी स्नान केलिया ॥ मनोहर पाविजे काया ॥ कल्पवृक्षस्थानीं अनुपम्या ॥ कल्पिलें फळ पाविजे ॥ ३४ ॥ अश्वत्थ नव्हे हा कल्पतरु ॥ जाणावें तुम्हीं निर्धारु ॥ जें जें चिंतिती मनीं नरु ॥ पावती कांम्यें अवधारा ॥३५॥ ऐसें मनोहर तीर्थ ॥ ठावें असे प्रख्यात ॥ सन्मुख असे अश्वत्थ ॥ सदा असो याचिया गुणें ॥ ३६ ॥ जे जन येऊनि सेवा करिती ॥ तयांचे मनोरथ पुरती ॥ न धरावा संदेह आतां चित्तीं ॥

१ ज्याला उपमा नाहीं असें. २ इच्छा.

ऐसें म्हणती श्रीगुरुनाथ ॥ ३७ ॥ आम्ही वसतों सदा येथें ॥ ऐसें जाणा तुम्ही निरुतें ॥ दृष्टीं पडतां मुक्ति होते ॥ खूण तुम्हां सांगेन ॥ ३८ ॥ कल्पवृक्षातें पूजोनि ॥ मग जावें शंकरभुवनीं ॥ संगमेश्वर असे त्रिनयनी ॥ पूजा करावी मनोभावें ॥ ३९ ॥ जैसा पर्वतीं मल्लिकार्जुन ॥ तैसा संगमीं रुद्र आपण ॥ भक्तिपूर्वक प्रदक्षिण ॥ करावी तुम्ही अवधारा ॥४०॥ नंदिकेश्वरातें नमोनि ॥ नमन करावें चंडस्थानीं ॥ पूर्ण नदी सव्य करोनि ॥ मग जावें सोमसूत्रासी ॥ ४१ ॥ सवेंचि परतोनि वृषभासी ॥ नमोनि जावें चंडापासीं ॥ पुनः जावें सोमसूत्रासी ॥ येणें विधीं प्रदक्षिणा ॥ ४२ ॥ ऐसी प्रदक्षिणा देखा ॥ तीन वेळां करोनि ऐका ॥ वृषभस्थानीं येऊनि निका ॥ अवलोकावें शिवासी ॥ ४३ ॥ वामहस्तीं वृषण धरोनि ॥ तर्जनी अंगुष्ठ शृंगीं ठेवोनि ॥ पूजा पहावी दोनी नयनीं ॥ इंद्रासमान होय नर ॥ ४४ ॥ धनधान्यादि संपत्ति ॥ लक्ष्मी राहे अखंडिती ॥ पुत्र पौत्र त्यासी होती ॥

संगमेश्वर पूजिलिया ॥ ४५ ॥ पुढें तीर्थ वाराणशी ॥ अर्ध कोश परियेसीं ॥ ग्राम असे नागेशी ॥ तेथोनि उद्भव असे जाण ॥४६॥ याचें असे आख्यान ॥ कथा नव्हे प्रत्यक्ष जाण ॥ होता एक ब्राह्मण ॥ भारद्वाज गोत्राचा ॥ ४७ ॥ विरक्त¹ असे ईश्वरभक्त ॥ सर्वसंग त्याग करीत ॥ आपण रत अनुष्ठानांत ॥ सदा ध्याई शिवासी ॥ ४८ ॥ प्रसन्न झाला चंद्रमौळी ॥ सदाशिव दिसे जवळी ॥ विप्रा आल्हाद सर्व काळीं ॥ देहभाव² विसरोनि हिंडत ॥ ४९ ॥ लोक म्हणती पिसा त्यासी ॥ निंदा करिती बहुवसीं ॥ दोघे बंधु असती तयासी ॥ नामें त्यांचीं अवधारा ॥ ५० ॥ एका नाम असे ईश्वर ॥ दुसरा नामें असे पांडुरंगेश्वर ॥ बंधु एकला करोनि अव्हेर³ ॥ आपण निघाले काशीसी ॥ ५१ ॥ करोनियां सर्व आइती ॥ सर्व निघाले त्वरिती ॥ तया पिशातें पाचारिती ॥ चला जाऊं म्हणोनियां ॥ ५२ ॥

१ निरिच्छ. २ देहमान. ३ हेळसांड.

ब्रह्मज्ञानी द्विज निका ॥ पिसा म्हणती मूर्ख लोका ॥ बंधूंसि म्हणे द्विज ऐका ॥ नका जाऊं काशीसी ॥ ५३ ॥ विश्वेश्वर असे मजजवळी ॥ दावीन तुम्हां तात्काळीं ॥ आश्चर्य करिती सकळी ॥ दावीं म्हणती बंधुजन ॥ ५४ ॥ काशीस जावें अति प्रयास ॥ येथें भेटे तरी कां सायास ॥ म्हणोनि बोलताती हर्ष ॥ तये वेळीं अवधारा ॥ ५५ ॥ इतुकिया अवसरीं ॥ विप्र गंगास्नान करी ॥ ध्यानस्थ होतां साक्षात्कारी ॥ ईश्वर आला तयाजवळी ॥ ५६ ॥ विनवीतसे शिवासी ॥ आम्हां नित्य पाहिजे काशी ॥ दर्शन होय विश्वेश्वरासी ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ५७ ॥ ईश्वर भोळा चक्रवर्ति ॥ प्रसन्न झाला अतिप्रीतीं ॥ दिसे तीच काशी त्वरितीं ॥ मणिकर्णिका कुंड झालें ॥ ५८ ॥ विश्वेश्वराची मूर्ति एक ॥ निघाली कुंडीं विशेख ॥ नदी उत्तरे दिसे निक ॥ एकबाणप्रमाण असे ॥ ५९ ॥ उदक निघालें कुंडांतून ॥ जैसें भागीरथी गहन ॥ ज्या ज्या असती काशींत

१ श्रम. २ बाण सोडला असतां जातो तितक्या अंतरावर.

खुणा ॥ सळस्त असती तयासी ॥ ६० ॥ संगम झाला नदी भीमा ॥ तीर्थ असे काशी उत्तमा ॥ आचार करिती सप्रेमा ॥ बंधु ज्ञानी म्हणती मग ॥ ६१ ॥ म्हणे ब्राह्मण बंधूंसी ॥ काशीस न जावें आमुचे वंशीं ॥ समस्तें आचरावें ही काशी ॥ आम्हां शंकरें सांगितलें ॥ ६२ ॥ आपुलें नाम ऐसें जाणा ॥ गोसावी नाम निर्धारीं खुणा ॥ तुम्हीं बंधू दोघेजणां ॥ आधारावें ऐसें निरोपिलें ॥ ६३ ॥ दोघीं जावें पंढरपुरा ॥ तेथें असे पुंडलीकवरा ॥ सदा तुम्ही पूजा करा ॥ आराध्या नामें विख्यात ॥ ६४ ॥ प्रतिवर्षीं कार्तिकीसी ॥ येथें यावें निर्धारेंसीं ॥ तीर्थ असे विशेषीं ॥ ऐसें म्हणे ब्राह्मण ॥ ६५ ॥ श्रीगुरु म्हणती भक्तासी ॥ काशीतीर्थ प्रगटलें ऐसी ॥ न धरावा संशय तुम्हीं मानसीं ॥ वाराणसी प्रत्यक्ष ही ॥ ६६ ॥ ऐकोनि समस्त द्विजवर ॥ करिती स्नान निर्मळ आचार ॥ तेथोनि पुढें येती गुरुवर ॥ सिद्ध सांगे नामधारका ॥ ६७ ॥ श्रीगुरु म्हणती सक-

ळिकांसी ॥ तीर्थ दाविती पापविनाशी ॥ स्नानमात्रें पाप नाशी ॥ जैसा तृणा अग्नि लागे ॥ ६८ ॥ आघुले भगिनी रत्नाईसी ॥ दोष असे बहुवर्शी ॥ बोलावोनि त्या समयासी ॥ पुसताती श्रीगुरुमूर्ति ॥ ६९ ॥ ऐक पूर्वदोष भगिनी ॥ तूं आलीस आमुचे दर्शनीं ॥ पाप तुझें असे गहेंनी ॥ आठवणें करीं मनांत ॥ ७० ॥ ऐकोनि श्रीगुरुच्या बोला ॥ पायां पडे वेळोवेळां ॥ अज्ञान आपण मूढ केवळा ॥ इतुकें कैचें ज्ञान मज ॥ ७१ ॥ तूं जगदात्मा विश्वव्यापक ॥ तूंचि ज्ञानज्योतिप्रकाशक ॥ सर्व जाणसी तूंचि एक ॥ विस्तारोनि सांग मज ॥ ७२ ॥ श्रीगुरु म्हणती तियेसी ॥ आपुलें पाप मज पुससी ॥ वधिलें पांच मार्जारांसी ॥ नेणसी खूण धरीं आपुली ॥ ७३ ॥ होती मार्जारी गर्भिणी ॥ प्रसूति झाली भांड्यामधुनी ॥ न पाहतां उदक घालुनि ॥ झांकोनि ठेविली अग्नीवरी ॥ ७४ ॥ पांच

१ मोठें.

मार्जारांचा घात ॥ लागला दोष बहुत ॥ ऐसें ऐकोनियां त्वरित ॥ श्वेत-कुष्ठ झालें तिसी ॥ ७५ ॥ देखोनियां भयाभीत झाली ॥ श्रीगुरुचरणा येऊनि लागली ॥ विनवीतसे करुणा बाहळी ॥ कृपा करीं गा गुरुमूर्ति ॥ ७६ ॥ करोनि समस्तपापराशि ॥ तीर्थी जातां वाराणशी ॥ मी आलें तुझे दर्शनासी ॥ पापावेगळी होईन म्हणोनि ॥ ७७ ॥ श्रीगुरु पुसती तियेसी ॥ तुज राहे पापराशि ॥ पुढिले जन्मीं जरी भोगिसी ॥ तरी कुष्ठ जाईल आतां ॥ ७८ ॥ रत्नाई विनवी स्वामियासी ॥ उबगलें बहुत जन्मासी ॥ याचि कारणें तुझे दर्शनासी ॥ पापावेगळें होऊं म्हणतसें ॥ ७९ ॥ आतां पुरे जन्म आपणा ॥ म्हणोनि धरिले तुझे चरणा ॥ याचि जन्मीं भोगीन जाणा ॥ पापाचें फळ म्हणतसे ॥ ८० ॥ इतुकें ऐकोनि गुरुमूर्ति ॥ रत्नाईस निरोप देती ॥ पापविनाश तीर्थी जाय त्वरिती ॥

१ निष्पाप. २ कंटाळलें.

स्नानमात्रें जाईल कुष्ठ ॥ ८१ ॥ नित्य करीं हो येथें स्नान ॥ सप्तजन्मींचे दोष दहन ॥ संदेह न करितां होय अनुमान ॥ म्हणोनि सांगती श्रीगुरु ॥ ८२ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ आम्हीं देखिलें दृष्टींसीं ॥ स्नान करितां त्रिरात्रीसी ॥ कुष्ठ तिचें परिहारिलें ॥ ८३ ॥ ऐसें प्रख्यात तीर्थ देखा ॥ नाम पापविनाशी ऐका ॥ जे करिती स्नान भक्तिपूर्वका ॥ सप्त-जन्मींचीं पापें जातीं ॥ ८४ ॥ तीर्थमहिमा देखोन ॥ रत्नाबाई संतोषोन ॥ राहिली मठ बांधोन ॥ तीर्थासन्निध अवधारा ॥ ८५ ॥ पुढें कोटितीर्थ देखा ॥ श्रीगुरु दाविती सकळिकां ॥ स्नानमात्रें होय निका ॥ यांचें आख्यान बहु असे ॥ ८६ ॥ जंबुद्वीपीं जितकीं तीर्थें ॥ एकेक महिमा अपरिमितें ॥ इतुकिया वास कोटितीर्थें ॥ विस्तार असे सांगतां ॥ ८७ ॥ सोम-सूर्य-ग्रहणासी ॥ अथवा संक्रांतिपर्वणीसी ॥ अमोपौर्णिमा प्रतिपदेसी ॥

१ अतिशय. २ अमावास्या.



[अ० ४९] नित्य करां हो येथें स्नान । सप्त जन्मांचें दहन । संदेहं नं करितां होय अनुमान । म्हणोनि सांगती श्रीगुरु ॥ ८२ ॥

स्नान तेथें करावें ॥८८॥ सवत्सेसी धेनु देखा ॥ सालंकृत करोनि ऐका ॥ दान द्यावें द्विजा निका ॥ एकेक दान कोटिसरसें ॥ ८९ ॥ तीर्थ महिमा आहे कैसी ॥ स्नान केलिया अनंत फळ पावसी ॥ एकेक दान कोटी-सरसी ॥ दोन तीर्थीं करावें ॥ ९० ॥ पुढें तीर्थ रुद्रपद ॥ कथा असे अति-विनोद ॥ गयातीर्थ समप्रद ॥ तेथें असे अवधारा ॥ ९१ ॥ जे जे आचार गयेसी ॥ करावें तेथें परियेसीं ॥ पूजा करा रुद्रपदाची ॥ कोटि जन्मींच्यीं पापें जाती ॥ ९२ ॥ पुढें असे चक्रतीर्थ ॥ अतिविशेष पवित्र ॥ केशव देव सन्निध तत्र ॥ पुण्यराशिस्थान असे ॥ ९३ ॥ या तीर्थीं स्नान करितां ॥ ज्ञान होय पतितां ॥ अस्थि होती चक्रांकिता ॥ द्वारावतीसमान देखा ॥ ९४ ॥ या तीर्थीं स्नान करोनि ॥ पूजा करावी केशवचरणीं ॥ द्वारा-वती चतुर्गुणी ॥ पुण्य असे अवधारा ॥९५॥ ऐकोनि श्रीगुरूचें वचन ॥

१ पापांना.

समस्त करिती स्नान दान ॥ पुढें असे मन्मथदहन ॥ तीर्थ सांगती श्रीगुरु ॥ ९६ ॥ ग्रामपूर्वभागेसी ॥ कल्लेश्वर देव परियेसीं ॥ जैसें गोकर्णमहाबळे-श्वरासी ॥ समान क्षेत्र परियेसा ॥ ९७ ॥ मन्मथ तीर्थी स्नान करावें ॥ कल्लेश्वरातें पूजावें ॥ प्रजावृद्धि होय बरवें ॥ अष्टैश्वर्यें पाविजे ॥ ९८ ॥ आषाढ श्रावण मासीं ॥ अभिषेक करावा देवासी ॥ दीपाराधना कार्तिक-मासीं ॥ अनंत पुण्य अवधारा ॥ ९९ ॥ ऐसा अष्टतीर्थमहिमा ॥ सांगती श्रीगुरु पुरुषोत्तमा ॥ संतोषोनि भक्त उत्तमा ॥ अति उदास करिताती ॥ १०० ॥ म्हणती समस्त भक्तजन ॥ नेणों तीर्थाचें महिमान ॥ स्वामीं निरोपिलें कृपेनें ॥ पुनीत केलें आम्हांसी ॥ १ ॥ जवळी असतां समस्त तीर्थें ॥ कां जावें दूर यात्रे ॥ स्थान असे हें पवित्र ॥ म्हणोनि समस्त आचरती ॥ २ ॥ अष्टतीर्थें सांगत ॥ श्रीगुरु गेले मठांत ॥ समाराधना करिती भक्त ॥ महानंद प्रवर्तला ॥ ३ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥

तीर्थमहिमा आहे ऐसी ॥ श्रीगुरु सांगती आम्हांसी ॥ म्हणोनि तुज निरोपिलें ॥ ४ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर क्षेत्र थोर गाणगापुर ॥ तीर्थें असती अपरंपार ॥ आचरा तुम्ही भक्तीनें ॥ ५ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्धमुनि-शिष्यसंवाद बहुत ॥ गाणगापुरमाहात्म्य विख्यात ॥ एकुणपन्नासाव्यांत कथियेलें ॥१०६॥ इति श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनाधारक संवादे अमरजासंगमगाणगापुरक्षेत्रमहिमावर्णनं नाम एकोनपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ४९ ॥ ओंवीसंख्या ॥ १०६ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ पुढें अपूर्व झालें ऐका ॥ पूर्वी रंजक-कथानका ॥ तूतें आपण निरोपिलें ॥ १ ॥ तयानें मागितला वर ॥ राज्यपद धुरंधर ॥ प्रसन्न झाले तयासी गुरुवर ॥ दिधला वर परियेसा ॥ २ ॥ उपजला तो म्लेंच्छ जातींत ॥ वैदुरीनगरीं राज्य करीत ॥ पुत्रपौत्रीं नांदत ॥ महानंदें परियेसा ॥ ३ ॥ ऐसा राजा तो यवन ॥ होता आपण संतोषोन ॥ अश्व गज अपार धन ॥ पायभाँरा मिति नाहीं ॥ ४ ॥ आपण तरी याँतिहीन ॥ पुण्यवासना अंतःकरण ॥ दानधर्म करी जाण ॥ समस्त यातीं एकभावें ॥ ५ ॥ विशेष भक्ति विप्रांवरी ॥ ती असे पूर्वसंस्कारीं ॥ असती देवालयें भूमीवरी ॥ उपद्रव नेदी तयांसी ॥ ६ ॥ तया घरचे पुरोहित ॥ तया रायातें शिकवीत ॥ आपण होऊन म्लेंच्छ जात ॥ देवद्विज निंदावे ॥ ७ ॥ तयांतें तुम्ही सेवितां देख ॥ तेणें होय अपार

१ परीट. २ बेदरास. ३ पायदळास. ४ जातीहीन.

पातक ॥ यातिधर्म करणें सुख ॥ अनंत पुण्य असे जाणा ॥ ८ ॥ मंदमति द्विजजाती ॥ देखा पाषाणपूजा करिती ॥ समस्तांतें देव म्हणती ॥ काष्ठ-वृक्षपाषाणासी ॥ ९ ॥ धेनूसी म्हणती देवता होय ॥ पृथ्वी सोम अग्नि सूर्य ॥ तीर्थयात्रा नदीतोयें ॥ समस्ता देव म्हणताती ॥ १० ॥ ऐसे विप्र मंदमती ॥ निराकारा साकार म्हणती ॥ तयांतें म्लेंच्छ जे भजती ॥ ते पावती अधःपात ॥ ११ ॥ ऐसे यवनेंपुरोहित ॥ रायापुढें सांगती हित ॥ ऐकोनि राजा उत्तर देत ॥ कोपेंकरोनि परियेसा ॥ १२ ॥ राजा म्हणे पुरोहितांसी ॥ निरोपिलें तुम्हीं आम्हांसी ॥ अणुरेणुतृणकाष्ठेंसी ॥ सर्वेश्वर पूर्ण असे ॥ १३ ॥ समस्त सृष्टि ईश्वराची ॥ स्थावर जंगम रचिली साची ॥ सर्वत्र देव असे साची ॥ तर्कभेद असंख्य ॥ १४ ॥ समस्त जातींची उत्पत्ति ॥ जाणावी तुम्हीं पंचभूतीं ॥ पृथ्वी आप तेज वायु निगुती ॥ आकाशापा-

१ नदीचें पाणी. २ काजी.

साव परियेसा ॥ १५ ॥ समस्तांची वृद्धि एक ॥ जाणती मृत्तिका कुलालें[1] लोक ॥ नानापरीचीं करिती अनेक ॥ भांडीं भेद परोपरी ॥ १६ ॥ नानापरीच्या धेनु असती ॥ क्षीर असे एकचि रीतीं ॥ सुवर्ण जाण तेंचि रीतीं ॥ परोपरीचे अलंकार ॥ १७ ॥ तैसा देह भिन्न जाण ॥ परमात्मा एकचि पूर्ण ॥ जैसीं नभा मृगलांछनें[2] ॥ नाना घटीं दिसतसे ॥ १८ ॥ दीप असे एक घरीं ॥ वाती लाविल्या सहस्र जरी ॥ समस्त होती दीपापरी ॥ भिन्नभाव कोठें असे ॥१९॥ एकचि सूत्र आणोनि ॥ नानापरीचे ओंविती मणि ॥ सूत्र एकचि जाणोनि ॥ न पाविजे भाव भिन्न ॥ २० ॥ तैशा जाति नानापरी ॥ असताती वसुंधरीं ॥ समस्तांसी एकचि हरी ॥ भिन्न भाव करूं नये ॥ २१ ॥ आणिक तुम्हीं म्हणाल ऐसें ॥ पूजिती पाषाण देव कैसे ॥ सर्वां ठायीं पूर्ण भासे ॥ विश्वात्मा आहेचि ॥ २२ ॥ प्रतिमां-[3]

१ कुंभार. २ चंद्र. ३ मूर्तिपूजा.

पूजा स्वल्पबुद्धि ॥ म्हणोनि सांगती प्रसिद्धीं ॥ आत्माराम पूजिती विधीं ॥ त्यांचे मतीं ऐसें असे ॥ २३ ॥ स्थिर नव्हे अंतःकरण ॥ म्हणोनि करिती प्रतिमा खूण ॥ नाम ठेवोनि नारायण ॥ तया नामें पूजिताती ॥ २४ ॥ तयांतें तुम्ही निंदा करितां ॥ तरी सर्वां ठायीं पूर्ण कां म्हणतां ॥ प्रतिष्ठाव्या आपुले मता ॥ द्वेष आम्हीं न करावा ॥ २५ ॥ या कारणें ज्ञानवंतीं ॥ करूं नये निंदास्तुति ॥ असती नानापरी जाती ॥ आपुले रहाटीं रहाटती ॥ २६ ॥ ऐशापरी पुरोहितांसी ॥ सांगे राजा विस्तारेंसीं ॥ करी पुण्य बहुवसीं ॥ विश्वास देवद्विजांवरी ॥ २७ ॥ राजा देखा येणेंपरी ॥ होता तया वैदुरीनगरीं ॥ पुढें त्याचे मांडीवरी ॥ स्फोटक एक उद्भवला ॥ २८ ॥ नानापरीचे वैद्य येती ॥ तया स्फोटकासी लेप करिती ॥ शमन न होय कवणें रीतीं ॥ महादुःखें कष्टतसे ॥ २९ ॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥

१ रीतीप्रमाणें. २ वागतात. ३ फोड.

श्रीगुरु असतां गाणगाभुवनीं ॥ विचार करिती आपुले मनीं ॥ राजा येईल म्हणोनियां ॥ ३० ॥ येथें येतां म्लेंच्छ लोक ॥ होईल द्विजां उपबाधक ॥ प्रगट झालों आतां ऐक ॥ आम्हीं येथें असूं नये ॥ ३१ ॥ प्रगट जहाली महिमाख्याति ॥ पहावया येती म्लेंच्छ जाति ॥ आतां रहावें आम्हीं गुप्तीं ॥ लौकिकार्थ परियेसा ॥३२॥ आला ईश्वरनाम संवत्सरु ॥ सिंहासी आला असे गुरु ॥ गौतमी तीर्थ थोरु ॥ यात्राप्रसंगें जावें आतां ॥ ३३ ॥ म्हणती समस्त शिष्यांसी ॥ करा आयती वेगेंसीं ॥ येतो राजा बोलवावयासी ॥ जावें त्वरित गंगेला ॥ ३४ ॥ ऐसें ऐकोनि शिष्यजन ॥ विचार करिती आपआपण ॥ जरी येईल राजा यवन ॥ कैंवीं होय म्हणताती ॥ ३५ ॥ ऐसा मनीं विचार करिती ॥ काय होईल पहा म्हणती ॥ असे नरसिंह सरस्वती ॥ तोचि रक्षील आपणांतें ॥ ३६ ॥ येणेंपरी श्रीगुरुमूर्ति ॥ असतां गाणगापुरीं ख्याति ॥ राजा यवना झाली

मति ॥ पूर्वसंस्कारीं[1] परियेसा ॥ ३७ ॥ स्फोटकाचे दुःखें राजा ॥ अपार कष्टला सहजा ॥ नानापरी औषधें वोजा ॥ करितां न होय तया बरवें ॥ ३८ ॥ मग मनीं विचार करी ॥ स्फोटकें व्यापिलें अपरंपारी ॥ वैद्याचेनि नोहे दूरी ॥ काय करावें म्हणतसे ॥ ३९ ॥ बोलावुनि विप्रांसी ॥ पुसे काय उपाय यासी ॥ विप्र म्हणती रायासी ॥ सांगतों ऐका एकचित्तें ॥ ४० ॥ पूर्वजन्मीं पापें करिती ॥ व्याधिरूपें होऊनि पीडिती ॥ दानधर्में तीर्थीं देवतीं ॥ व्याधि जाय परियेसा ॥ ४१ ॥ अथवा भल्या सत्पुरुषासी ॥ भजा आपण भावेंसीं ॥ तयाचे दृष्टीसुधारसीं ॥ बरवें होईल परियेसा ॥ ४२ ॥ सत्पुरुषाचे कृपादृष्टीं ॥ पापें जाती जन्म साठीं ॥ मग रोग कैंचा पोटीं ॥ स्फोटकादि त्वरित जाय ॥ ४३ ॥ ऐकोनियां विप्रवचन ॥ राजा करीतसे नमन ॥ मातें तुम्ही न म्हणा यवन ॥ दास

१ पूर्वजन्मींच्या संस्कारामुळें.

आपण विप्रांचा ॥ ४४ ॥ पूर्वजन्मीं आपण ॥ केली सेवा गुरुचरण ॥ पापास्तव झालों जाण ॥ यवनाचे कुळीं देखा ॥ ४५ ॥ एखादा पूर्व-वृत्तांत ॥ मातें निरोपावा त्वरित ॥ महानुभावदर्शन होत ॥ कवणाचा रोग गेला असे ॥४६॥ रायाचें वचन ऐकोनि ॥ विचार करिती विप्र मनीं ॥ सांगूं नये या स्थानीं ॥ एकांतस्थळ पाहिजे ॥ ४७ ॥ तुम्ही राव म्लेंच्छ-जाती ॥ समस्त तुम्हां निंदा करिती ॥ आम्ही असों द्विजजाती ॥ कैंवी करावें म्हणताती ॥ ४८ ॥ विप्रवचन ऐकोन ॥ विनवीतसे तो यवन ॥ चाड नाहीं जातीवीण ॥ आपणास तुम्हीं उद्धरावें ॥ ४९ ॥ ऐसें रायाचें अंतःकरण ॥ अनुतप्त झालें असे जाण ॥ मग निरोपिती ब्राह्मण ॥ तया रायातें परियेसा ॥ ५० ॥ विप्र म्हणती रायासी ॥ स्थान बरवें पाप-विनाशी ॥ जावें तुम्हीं सहजेंसी ॥ विनोदार्थ परियेसा ॥ ५१ ॥ तेथें असे

१ महात्म्याची भेट. २ पश्चात्तापयुक्त.

स्थळ बरवें ॥ एकांतस्थान पहावें ॥ स्नान करावें मनोभावें ॥ एकचित्तें परियेसा ॥ ५२ ॥ ऐकोनियां विप्रवचन ॥ संतोषला राजा आपण ॥ निघाला त्वरित तेथोन ॥ आला पापविनाश तीर्थासी ॥ ५३ ॥ समस्तांतें राहवूनि ॥ एकला गेला तया स्थानीं ॥ स्नान करितां तये क्षणीं ॥ आला एक यति तेथें ॥ ५४ ॥ राजा देखोनि यतीसी ॥ नमन करी भावेंसीं ॥ दावीतसे स्फोटकासी ॥ म्हणे उपशमन केवीं होय ॥ ५५ ॥ ऐकोनि तयाचें वचन ॥ सांगता झाला विस्तारोन ॥ महानुभावाच्या दर्शनें ॥ तूतें बरवें होय जाणा ॥ ५६ ॥ पूर्वीं याचें आख्यान ॥ सांगेन ऐक विस्तारोन ॥ एकचित्त-करोनि मन ॥ ऐक म्हणती तये वेळीं ॥ ५७ ॥ अवंती म्हणिजे थोर नगरी ॥ तेथें होता एक दुराचारी ॥ जन्मोनियां विप्र उदरीं ॥ अन्य रहाटीं रहातसे ॥ ५८ ॥ आपण असे मदोन्मत्त ॥ समस्त स्त्रियांसवें रमत ॥ स्नानसंध्या त्यजूनि निश्चित ॥ अन्यमार्गें वागतसे ॥ ५९ ॥ ऐसें दुरा-

१ संन्यासी. २ बरेपणा. ३ उज्जनी. ४ पापी.



[अ० ५०] राजा देखोनी यतीसी । नमन करी भावेंसी । दावीतसे स्फोटकासी । म्हणे उपशमन केवीं होय ॥ ५५ ॥

चारीपणें ॥ रहाटतसे तो ब्राह्मण ॥ पिंगला म्हणिजे वेश्या जाण ॥ तये-
सवें वर्ततसे ॥ ६० ॥ न करी कर्म संध्यास्नान ॥ रात्रंदिवस वेश्यागमन ॥
तिचे घरीं भक्षी अन्न ॥ येणेंपरी दोष केले ॥६१॥ ऐसें असतां वर्तमानीं ॥
ब्राह्मण होता वेश्यासदनीं ॥ तेथें आला एक मुनि ॥ वृषभनामा महायोगी
॥ ६२ ॥ तया देखोनि दोघें जाण ॥ करिती साष्टांग नमन ॥ भक्तिभावें-
करोन ॥ घेवोनि आलीं मंदिरांत ॥ ६३ ॥ बैसवोनियां पीठावरी ॥ पूजा
करिती षोडशोपचारीं ॥ अर्घ्यपाद्य देवोनि पुढारी ॥ गंधाक्षता लाविती
॥ ६४ ॥ नाना परिमळ पुष्पजाती ॥ तया योगियासी समर्पिती ॥ परि-
मळ द्रव्यें अनेक रीतीं ॥ समर्पिलीं तया योगेश्वरा ॥ ६५ ॥ चरणतीर्थ
घेऊन ॥ पान करिती दोघेंजण ॥ त्यातें करविती भोजन ॥ नानापरी
पक्कान्नेंसीं ॥ ६६ ॥ करवूनियां भोजन ॥ केलें हस्तप्रक्षालन ॥ बरवा
पलंग आणोन ॥ देती तया योगियासी ॥६७॥ तया मंचकीं निजवोन ॥

तांबूल देती आणोन ॥ करिती पादसंवाहनें ॥ भक्तिभावें दोघेंही ॥ ६८ ॥ निद्रिस्त झाला योगेश्वर ॥ दोघें करिती नमस्कार ॥ उभें राहोनि चारी प्रहर ॥ सेवा केली भावेंसीं ॥ ६९ ॥ उदय झाला दिनकरासी ॥ संतोषला तो तापसी ॥ निरोप घेऊनि संतोषीं ॥ गेला आपुल्या स्थानाप्रती ॥ ७० ॥ ऐसें विप्रें वेश्याघरीं ॥ क्रमितां कित् दिवसांवरी ॥ तारुण्य जाउनी शरीरीं ॥ वार्धक्य पातलें तयासी ॥ ७१ ॥ पुढें तया विप्रासी ॥ मरण आलें परियेसीं ॥ पिंगला नाम वेश्येसी ॥ दोघें पंचत्व पावलीं ॥७२॥ पूर्वकर्मानुबंधेंसीं ॥ जन्म झाला राजवंशीं ॥ दशार्णवाधिपतिकुशीं ॥ वज्रबाहूचे उदरांत ॥७३॥ तया वज्रबाहुपत्नी ॥ नाम तिचें वसुमती ॥ जन्मा आला तिचे पोटीं ॥ तो विप्र परियेसा ॥ ७४ ॥ तया वज्रबाहुसी ॥ ज्येष्ठ राणीच्या गर्भेसी ॥ उद्भवला विप्र परियेसीं ॥ राजा समारंभ करीतसे

१ पाय चेपणें. २ वपत्नी.

॥ ७५ ॥ देखोनि तिचे सवतीसी ॥ क्रोध आला बहु मानसीं ॥ गर्भ झाला सपत्नीसी ॥ म्हणोनि द्वेष मनीं धरी ॥७६॥ सर्पगरळ आणोनि ॥ दिल्हें सवतीस नाना यत्नीं ॥ गरळें भेदिलें अतिगहनीं ॥ तया राजज्येष्ठ स्त्रियेसी ॥ ७७ ॥ दैवयोगें न ये मरण ॥ सर्व शरीरीं झाले व्रण ॥ चिंता करी अतिगहन ॥ महाकष्ट भोगीतसे ॥ ७८ ॥ ऐशापरी राजयुवती ॥ कष्टें झाली प्रसूति ॥ उपजतां बाळका मातेप्रती ॥ सर्वांग स्फोट वाहत ॥७९॥ विषें व्यापिलें सर्वांगासी ॥ म्हणोनि आक्रंदती दिवानिशीं ॥ दुःख करी राजा क्लेशीं ॥ म्हणे काय करूं आतां ॥ ८० ॥ देशोदेशींच्या वैद्यांसी ॥ बोलाविती चिकित्सेसी ॥ वेंचिती द्रव्य अपारेंसीं ॥ कांहीं केलिया बरवें नोहे ॥ ८१ ॥ तया माता बाळकासी ॥ व्रण झाले बहुवसीं ॥ निद्रा नाहीं रात्रीसी ॥ सर्वांगीं कृमि पडले असती ॥ ८२ ॥ त्यांतें देखोनि

१ सापाचें विष. २ ओरडतात.

रायासी ॥ दुःख झालें बहुवसीं ॥ निद्रा नाहीं दिवानिशीं ॥ त्याचे कष्ट देखोनियां ॥ ८३ ॥ व्यथेंकरोनि मातासुत ॥ अन्न उदक न वंचे कचित ॥ शरीरीं सर्व क्लेश होत ॥ क्षीण झालें येणेंपरी ॥ ८४ ॥ राजा येऊनि एके दिवसीं ॥ पाहे आपुले स्त्री-सुतासी ॥ देखो-नियां महाक्लेशी ॥ दुःख करीतसे परियेसा ॥ ८५ ॥ म्हणे आतां काय करूं ॥ केवीं करणें प्रतिकारू ॥ नाना औषधें उपचारू ॥ करितां स्वस्थ नव्हेचि ॥ ८६ ॥ स्त्री-पुत्राची ऐशी गति ॥ जिवंत शव झालीं असती ॥ यांच्या रोगासी न होय शांति ॥ केवीं पाहूं म्हणतसे ॥ ८७ ॥ आतां यांतें पहावयासी ॥ कंटाळा येतो आम्हांसी ॥ बरवें नव्हे सत्य यांसी ॥ काय करणें म्हणतसे ॥ ८८ ॥ यांतें देखतां आम्हांसी ॥ श्रम होती देहासी ॥ नेवोनियां अरण्यासी ॥ त्यांतें त्यजूं म्हणतसे ॥ ८९ ॥ जे जे असती पापीजन ॥ त्यांतें जीवन अथवा मरण ॥ भोगिल्यावांचोनि न सुटे जाण ॥

१ जाई. २ भेद.

आपुले आपण भोगिजे ॥ ९० ॥ विचार करोनि मानसीं ॥ बोलाविलें कोळियासी ॥ सांगतसे विस्तारेंसीं ॥ ऐका श्रोते एकचित्तें ॥ ९१ ॥ राजा म्हणे सूतासी ॥ माझे बोल परियेसीं ॥ नेऊनि आपुले स्त्री-पुत्रांसी ॥ अरण्यांत ठेवावें ॥९२॥ मनुष्यांचा संचार ॥ जेथें नसेल निर्धार ॥ तेथें ठेवी वेगवक्र ॥ म्हणे राजा सूतासी ॥९३॥ येणेंपरी सूतासि ॥ राजा सांगे विस्तारेंसीं ॥ रथ दिधला संजोगेंसीं ॥ घेऊनि गेला झडकरी ॥ ९४ ॥ तिचे दासदासी सकळ ॥ दुःख करिती महाप्रबळ ॥ माता पिता बंधु सकळ ॥ समस्त प्रलापें करितार्ता ॥ ९५ ॥ दुःख करिती नर नारी ॥ हा हा पापी दुराचारी ॥ स्त्री-सुतांसी कैसेपरी ॥ केवी यांतें मारवितो ॥ ९६ ॥ रथावरी बैसवोनि ॥ घेवोनि गेला महारानीं ॥ जेथें नसती मनुष्य कोणी ॥ तेथं ठेविलीं परियेसा ॥ ९७ ॥ सूत आला परतोनि ॥ सांगे रायासी विस्तारोनि ॥ महाअरण्य दुर्गम वनीं ॥

१ सर्व साहित्यासह. २ शोक.

तेथें ठेविलीं म्हणतसे ॥ ९८ ॥ ऐकोनि राजा संतोषला ॥ दुसरे स्त्रियेसी वृत्तांत सांगितला ॥ दोघांसी आनंद जाहला ॥ वनीं राहिलीं मातासुत ॥ ९९ ॥ मातापुत्र दोघेंजण ॥ पीडताति दुःखेंकरून ॥ कष्टती अन्न-उदकावीण ॥ महाघोर वनांत ॥ १०० ॥ राजपत्नी सुकुमार ॥ तिये शरीरीं व्रण थोर ॥ चालूं न शके पृथ्वीवर ॥ महाकंटक भूमीवरी ॥ १ ॥ कडिये घेवोनि बाळकासी ॥ जाय ती मंदगमनेंसीं ॥ आठवी आपुले कर्मासी ॥ म्हणे आतां काय करूं ॥ २ ॥ तया वनीं मृगजाति ॥ व्याघ्र सिंहादिक असती ॥ सर्प थोर अपरिमिती ॥ हिंडताती वनांत ॥ ३ ॥ मातें जरी व्याघ्र मारी ॥ पापापासून होईन दुरी ॥ पुरे आतां जन्म संसारीं ॥ वांचोनि काय व्यर्थ जिणें ॥ ४ ॥ म्हणोनि जाय पुढें रडत ॥ क्षणोक्षणीं असे पडत ॥ पुत्रासहित चिंता करीत ॥ जात असे वनामाजी

॥ ५ ॥ उदकाविणें तृषाक्रांत ॥ देह श्रमें असे पीडित ॥ व्याघ्रसर्पादि देखत ॥ भयें चकित होतसे ॥ ६ ॥ देखे वेताळ ब्रह्मराक्षस ॥ वनगज भालुका बहुवस ॥ केश मोकळे पायांस ॥ कांटे धोंडे लागताती ॥ ७ ॥ ऐसे महाअरण्यांत ॥ राजस्त्री असे हिंडत ॥ पुढें जातां देखिलें वनांत ॥ गुरें चरती वाणियांची ॥ ८ ॥ तयांपासीं जावोनि ॥ पुसतसे करुणावचनीं ॥ गोरक्षकांतें विनवोनि ॥ मागे उदक कुमारासी ॥ ९ ॥ गोरक्षक म्हणती तियेसी ॥ जावें तुवां मंदिरासी ॥ तेथें उदक बहुवसी ॥ अन्न तूतें मिळेल ॥ ११० ॥ म्हणोनि मार्ग दाखविती ॥ हळुहळू जाय म्हणती ॥ राजपत्नी मार्ग क्रमिती ॥ गेली तया ग्रामांत ॥ ११ ॥ तया ग्रामीं नरनारी ॥ दिसताती अपरंपारी ॥ ऐकोन आली मनोहरी ॥ पुसे तयां स्त्रियांसी ॥ १२ ॥ म्हणे कवण येथें राजा ॥ संतोषी दिसे समस्त प्रजा ॥

१ गुराख्यांना.

ऐकोनि सांगती वैश्यराजा ॥ महाधनिक पुण्यात्मा ॥ १३ ॥ त्याचें नांव पद्माकर ॥ पुण्यवंत असे थोर ॥ तूतें रक्षील साचार ॥ म्हणोनि सांगती तियेसी ॥ १४ ॥ इतुकिया अवसरीं ॥ तया वैश्याचे घरीं ॥ दासी होत्या मनोहरी ॥ त्याही आल्या तियेजवळी ॥ १५ ॥ येवोनि पुसती वृत्तांत ॥ घेवोनि गेल्या मंदिरांत ॥ आपल्या स्वामीसी सांगत ॥ आद्यंतेंसीं विस्तारें ॥ १६ ॥ तीस देखोनियां वैश्यनाथ ॥ कृपा करी अत्यंत ॥ नेऊनियां मंदि-रांत ॥ दिल्हें एक गृह तिसी ॥ १७ ॥ पुसोनियां वृत्तांत ॥ वाणी होय कृपावंत ॥ दिल्हें अन्नवस्त्र बहुत ॥ नित्य तिसीं रक्षीतसे ॥ १८ ॥ ऐशी तया वैश्याघरीं ॥ होती रायाची अंतुरी ॥ वर्धतसे पीडा भारी ॥ व्रण न वचे परियेसा ॥ १९ ॥ येणेंपरी राजसती ॥ तया वैश्याचे घरीं होती ॥ वाढले व्रण तयांसी बहुती ॥ प्राणांतक होतसे ॥ १२० ॥ वर्ततां ऐसें एके

१ पहिल्यापासून सर्व. २ ती.

दिवसीं ॥ मरण आलें कुमारकासी ॥ प्रलाप करी बहुवसी ॥ राजपत्नी तये वेळीं ॥ २१ ॥ मूर्च्छा येऊनि तये क्षणीं ॥ राजपत्नी पडे धरणीं ॥ आपुलें कर्म आठवोनि ॥ महाशोक करीतसे ॥ २२ ॥ त्या वाणियाच्या स्त्रिया देखा ॥ संबोखितांति[1] ती बाळिका ॥ कवणेंपरी तिचे दुःखा ॥ शमन नोहे परियेसा ॥ २३ ॥ नानापरी दुःख करी ॥ आठवीतसे पूर्वापारी ॥ म्हणे ताता माझ्या सौरी[2] ॥ कोठें गेलासी बाळका ॥ २४ ॥ राजकुमारा पूर्णचंद्रा ॥ माझ्या आनंदसमुद्रा ॥ मातें धरिसी मौनमुद्रा ॥ तूतें काय बरवें असे ॥ २५ ॥ मातापिताबंधुजन ॥ सोडोनि आल्यें सकळ जाण ॥ तुझा भरंवसा होता पूर्ण ॥ मातें रक्षिसी म्हणोनिया ॥ २६ ॥ मातें अनाथ करोनि ॥ तूं जातोसि सोडोनि ॥ मज रक्षिता नसे कोणी ॥ प्राण त्यजीन म्हणतसे ॥२७॥ येणेंपरी राजनारी ॥ दीर्घस्वरें रुदन करी ॥

१ समजतात. २ भास्करा.

देखोनियां नरनारी ॥ दुःख करिती परियेसा ॥ २८ ॥ समस्तही दुःखाहुनी ॥ पुत्रशोक केवळ वन्हि ॥ मातापितरांतें दाहोनि ॥ भस्म करी परियेसा ॥ २९ ॥ येणेंपरी दुःख करितां ॥ ऋषभ योगी आला त्वरिता ॥ पूर्वजन्मींच्या उपकारार्था ॥ पातला तेथें महाज्ञानी ॥ १३० ॥ योगियातें देखोनि ॥ वंदिता झाला तो वाणी ॥ अर्घ्यपाद्य देवोनि ॥ उत्तमस्थानीं बैसविला ॥ ३१ ॥ योगी तया अवसरीं ॥ पुसे कवण दीर्घस्वरीं ॥ शोक करितसे अपारीं ॥ कवण असे म्हणतसे ॥ ३२ ॥ सविस्तर वैश्यनाथ ॥ सांगता जाहला वृत्तांत ॥ योगीश्वर कृपावंत ॥ आला तिये जवळीक ॥ ३३ ॥ म्हणे योगी तियेसी ॥ मूढपणें दुःख करिसी ॥ कवण जन्मला भूमीसी ॥ कवण मेला सांग मज ॥ ३४ ॥ देह म्हणिजे विनाशी जाण ॥ जैसा गंगेंत दिसे फेण ॥ व्यक्ताव्यक्त सर्वेचि होय जाण ॥ जलबुद्बुदापरी देखा ॥ ३५ ॥

१ पति. २ नागवंत. ३ पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें.

पृथ्वी तेज वायु आप ॥ आकाश मिळोनि सर्वव्याप ॥ पंच गोठलीं शरीर-
रूप ॥ दिसत असे परियेसा ॥ ३६ ॥ पंच भूतें पांचांठायीं ॥ निघोन
जातां शून्य पाहीं ॥ दुःख करितां अवकाश नाहीं ॥ वृथा कां तूं दुःख
करिसी ॥ ३७ ॥ गुणापासाव उत्पत्ति ॥ निज कर्में होय निरुती ॥ काळ
नाचवी दृष्टिविकृतीं ॥ वासना तयापरी जाणा ॥ ३८ ॥ मायेपासोनि
माया उपजे ॥ होय गुणें सत्त्वरजें ॥ तमोगुणें तेथें सहजें ॥ देहलक्षण
येणेंपरी ॥ ३९ ॥ या तीन गुणांपासाव ॥ उपजताती मनुष्यभाव ॥ सत्त्व-
गुणें असती देव ॥ रजोगुण मनुष्याचा ॥ १४० ॥ तामस तोचि राक्षस ॥
जैसा गुण असे त्यास ॥ तैसा जन्मे पिंडाभास ॥ कधीं स्थिर नव्हेचि
॥ ४१ ॥ या संसारवर्तमानीं ॥ उपजती नर कर्मानुगुणीं ॥ जैसें अर्जित
असे पूर्वपुण्यीं ॥ सुखदुःखें घडती देखा ॥ ४२ ॥ कल्पकोटिवर्षांवरी ॥

१ देव.

जिवंत असती सुर जरी ॥ तेही न राहती स्थिरी ॥ मनुष्यांचा काय पाड ॥ ४३ ॥ या कारणें ज्ञानीजनें ॥ उपजतां संतोष न करणें ॥ मेलिया दुःख न करणें ॥ स्थिर नव्हे देह जाणा ॥ ४४ ॥ गर्भ संभवे जिये काळीं ॥ विनाश म्हणोनि जाणती सकळी ॥ कोणी मरती ॥ यौवनकाळीं ॥ काचि-द्वार्द्धक्यपणीं जाणा ॥ ४५ ॥ जैसें कर्म पूर्वार्जित ॥ तेणेंपरी असे घडत ॥ मायामोहें म्हणत ॥ सुत नरदेही हे ॥ ४६ ॥ जैसें लिखित ललाटेसी ॥ ब्रह्मदेवें लिहिलें परियेसीं ॥ कालकर्म उल्लंघावयासी ॥ शक्ति न होय कवणा जाणा ॥४७॥ ऐसे अनित्य देहासी ॥ कां वो माते दुःख करिसी ॥ तुझी पूर्वपरंपरा कैसी ॥ सांग आम्हां म्हणतसे ॥ ४८ ॥ तूं जन्मांतरीं जाणा ॥ कवणा होतीस अंगना ॥ किंवा झालीसी जननी कोणा ॥ भगिनी कोणाची सांग पां ॥ ४९ ॥ ऐसें जाणोनि मानसी ॥ वायां कां हो दुःख

१ देव. २ बायको.

करिसी ॥ जरी बरवें तूं इच्छिसी ॥ शरण जाईं शंकरा ॥ १५० ॥ ऐसें ऐकोनि राजयुवति ॥ करी ऋषभयोगिया विनंति ॥ आपणासी झाली ऐसी गति ॥ राज्यभ्रष्ट होऊनि आल्यें ॥ ५१ ॥ मातापिता बंधुजन ॥ सोडोनि आलें मी रान ॥ पुत्र होता माझा प्राण ॥ भरंवसा मज तयाचा ॥ ५२ ॥ तया जहाली ऐशी गति ॥ आपण वांचोनि काय प्रीति ॥ मरण व्हावें मज निश्चिती[1] ॥ म्हणोनि चरणीं लागली ॥ ५३ ॥ ऐसें निर्वाण देखोनि ॥ कृपा उपजली योगियामनीं ॥ पूर्व उपकार स्मरोनि ॥ प्रसन्न झाला तये वेळीं ॥५४॥ भस्म काढोनि तये वेळीं ॥ लाविलें प्रेताचे कपाळीं ॥ घालितां त्याचे मुखकमळीं ॥ प्राण आला परियेसा ॥५५॥ बाळ बैसला उठोनि ॥ सर्वांग झालें सुवर्णवर्णी ॥ मातेचे व्रणही तेच क्षणीं ॥ जाते झाले तात्काळ ॥ ५६ ॥ राजपत्नी पुत्रासहित ॥ करी योगियासी दंडवत ॥ ऋषभयोगी

[1] निश्चय.

कृपावंत ॥ आणीक भस्म प्रोक्षीतसे ॥ ५७ ॥ तात्काळ तया दोघांसी ॥ शरीर होय सुवर्णसंकाशी ॥ शोभायमान दिसे कैसी ॥ दिव्य काया उभयतांची ॥ ५८ ॥ प्रसन्न झाला योगेश्वर ॥ तये वेळीं दिधला वर ॥ तुम्हां न होय जराजर्जर ॥ तारुण्यरूप चिरंजीवी ॥ ५९ ॥ तुझा सुत भद्रायुषी ॥ कीर्ति वरील बहुवशी ॥ राज्य करील परियेसीं ॥ पित्याहुनि अधिक जाणा ॥ १६० ॥ ऐसा वर देऊनि ॥ योगी गेला तेथोनि ॥ एक राजा एकमनीं ॥ सत्पुरुषाचें महिमान ॥ ६१ ॥ सत्पुरुषाची सेवा करितां ॥ तुझा स्फोटक जाईल त्वरिता ॥ तुवां न करावी कांहीं चिंता ॥ दृढ धरीं भाव एक ॥ ६२ ॥ ऐसें यतीचें वचन ऐकोनि ॥ राजा नमन करी तये क्षणीं ॥ विनवीतसे कर जोडोनि ॥ कोठें असे सत्पुरुष ॥ ६३ ॥ मातें निरोपावें आतां ॥ जाईन आपण तेथें तत्त्वतां ॥ मजला त्याचें दर्शन होतां ॥ होईल

१ सुवर्णाप्रमाणें शुद्ध. २ तेजस्वी.

बरवें म्हणतसे ॥ ६४ ॥ ऐकोनि राजाचें वचन ॥ सांगतसे मुनि आपण ॥ भीमातीरीं गाणगाभुवन ॥ असे तेथें परमपुरुष ॥ ६५ ॥ तयापासीं तुवां जावें ॥ दर्शनमात्रें होईल बरवें ॥ ऐकोनि राजा एकभावें ॥ निघता झाला तये वेळीं ॥ ६६ ॥ एकभावें राजा आपण ॥ घ्यावया श्रीगुरुदर्शन ॥ प्रयाणीवरी करी प्रयाण ॥ आला गाणगापुरासी ॥ ६७ ॥ ग्रामीं पुसे सकळिकांसी ॥ कोण येथें एक तापसी ॥ रूप धरिलें संन्यासी ॥ कोठें आहे म्हणतसे ॥ ६८ ॥ भयभीत झाले सकळिक ॥ म्हणती आतां नव्हे निक ॥ श्रीगुरूसी पुसतो ऐक ॥ काय करील न कळे म्हणती ॥ ६९ ॥ कोणी न बोलती तयासी ॥ राजा कोपला बहुवसी ॥ म्हणे आलों भेटीसी ॥ दावा आपणा म्हणतसे ॥ १७० ॥ मग म्हणती समस्त लोक ॥ श्रीगुरु अनुष्ठानस्थान असे निक ॥ अमरजासंगमीं माध्यान्हिक ॥ करोनि येती ग्रामातें

१ महात्मा. २ मजल दरमजल.

॥ ७१ ॥ ऐसें ऐकोनि म्लेंच्छ देखा ॥ समस्तां वर्जूनि आपण एका ॥ बैसोनियां आंदोलिका ॥ गेला तया स्थानासी ॥ ७२ ॥ दुरोनि देखतां श्रीगुरूसी ॥ चरणीं चाले म्लेंच्छ परियेसीं ॥ जवळी गेला पहावयासी नमन करूनि उभा राहे ॥ ७३ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ कां रे रजका कोठें असती ॥ बहुत दिवशीं भेटलासी ॥ आमचा दास होवोनियां ॥ ७४ ॥ ऐसें वचन ऐकोनि ॥ म्लेंछ झाला महाज्ञानी ॥ पूर्वजन्म स्मरला मनीं ॥ करी साष्टांग दंडवत ॥ ७५ ॥ पादुकांवरी लोळे आपण ॥ सद्गदित अंतः-करण ॥ अंगीं रोमांच उठोन ॥ आनंदबाष्पें रुदन करी ॥ ७६ ॥ पूर्व-जन्म आठवोन देखा ॥ रुदन करी अति दुःखा ॥ कर जोडूनि विनवी ऐका ॥ नानापरी स्तोत्र करी ॥ ७७ ॥ राजा म्हणे श्रीगुरूसी ॥ कां उपेक्षिलें आम्हांसी ॥ झालों आपण परदेशी ॥ चरणावेगळें केलें मज ॥ ७८ ॥ अंधकारसागरांत ॥ कां घातलें मज येथ ॥ मी होऊनि मदो-

न्मत्त ॥ विसरलों चरण तुझे ॥ ७९ ॥ संसारसागरमायाजळीं ॥ बुडालों आपण दुर्मति केवळीं ॥ सेवा न करीं चरणकमळीं ॥ दिवांध झालों आपण ॥ १८० ॥ होतासि तूं जवळी निधान ॥ न ओळखें आपण मतिहीन ॥ तमांधकारीं वेष्टोन ॥ तुझे चरण विसरलों ॥ ८१ ॥ तूं भक्तजनां नुपेक्षिसी ॥ निर्धार होता माझे मानसीं ॥ अज्ञानसागरीं आम्हांसी ॥ कां घातलें स्वामिया ॥८२॥ उद्धरावें आतां मज ॥ आलों आपण हेंचि काज ॥ सेवोनि तुझे चरणरज ॥ असेन आता राज्य पुरे ॥ ८३ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ स्तुति करी राजा ऐका ॥ श्रीगुरु म्हणती भक्त निका ॥ तुझी वासना पुरेल ॥ ८४ ॥ राजा म्हणे श्रीगुरूसी ॥ झाला स्फोटक आपणासी ॥ व्यथा होतसे प्रयासी ॥ कृपादृष्टीं पहावें ॥ ८५ ॥ ऐसें वचन ऐकोन ॥ श्रीगुरु करिती हास्यवदन ॥ स्फोटक नाहीं म्हणोन ॥ पुसताती यवनासी ॥ ८६ ॥ राजा पाहे स्फोटकासी ॥ न दिसे स्फोटक अंगासी ॥ विस्मय करीतसे

मानसीं ॥ पुनरपि चरणीं माथा ठेवी ॥ ८७ ॥ राजा म्हणे स्वामियासी ॥ तुझें प्रसन्नत्व आम्हांसी ॥ राज्य पावलों संतोषीं ॥ अष्टैश्वर्यें भोगिलीं ॥८८॥ पुत्रपौत्र देखिले नयनीं ॥ पूर्ण जहालों अंतःकरणीं ॥ संकल्प असे माझे मनीं ॥ अष्टैश्वर्य माझें अवलोकावें ॥८९॥भक्तवत्सल ब्रीद तुझें ॥ वासना अर्थ पुरवीं माझे ॥ इंद्रियसंसार उतरीं ओझें ॥ लीन होईन तुझे चरणीं ॥ १९० ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ आम्ही तापसी संन्यासी ॥ येऊं नये तुझे नगरासी ॥ महापातकें होती तेथें ॥ ९१ ॥ नगरीं नित्य धेनुहत्या ॥ यवनजाति तुम्ही सत्या ॥ जीवहिंसा मद्यपी कृत्या ॥ वर्जावें आतां निर्धारें ॥ ९२ ॥ सर्व अंगीकार करोनि ॥ राजा लागे दोन्ही चरणीं ॥ म्हणे मी दास पुरातनीं ॥ पूर्वापारीं दृष्टि देणें ॥ ९३ ॥ पूर्वीं माझें जन्म रजक ॥ स्वामीवचनें राज्य विशेख ॥ पावोनि देखिलें नाना सुख ॥ उणें एक म्लेंच्छजाति ॥ ९४ ॥ दर्शन होतां तुझे चरण ॥ संतुष्ट झालें अंतःकरण ॥ पुत्रपौत्र हर्षी पाहोन ॥

मग मी राहीन तुझे सेवे ॥ ९५ ॥ ऐसें नानापरी देखा ॥ राजा विनवी विशेखा ॥ पायां पडे क्षणक्षणिका ॥ अतिकाकुळती येतसे ॥९६॥ श्रीगुरु मनीं विचार करिती ॥ पुढें होणार ऐसी गति ॥ कलियुगीं असे दुर्जन-जाति ॥ गौप्य असतां पुढें बरवें ॥ ९७ ॥ सहज जावें सिंहस्थासी ॥ महा-तीर्थ गौतमीसी ॥ जावें हें अंरवसीं ॥ आतां आम्हीं गुप्त व्हावें ॥ ९८ ॥ ऐसें मनीं विचारुनि ॥ श्रीगुरु निघाले संगमाहूनि ॥ राजा आपुले सुखासनीं ॥ बेसवी प्रीतीकरोनियां ॥ ९९ ॥ पादुका घेतल्या आपुले करीं ॥ सांगातें येतसे पादचारीं ॥ श्रीगुरु म्हणती आरोहण करीं ॥ लोक निंदा तुज करिती ॥ २०० ॥ राष्ट्राधिपति तुज म्हणती ॥ जन्म तुझा म्लेंच्छजाती ॥ ब्राह्मणसेवें तुज हांसती ॥ जाति दूषण करितील ॥ १ ॥ राजा म्हणे स्वामी ऐका ॥ कैंचा राजा मी रजका ॥ तुझे दृष्टीं असे निका ॥ लोह सुवर्ण होतसे ॥ २ ॥ समस्तांसी राजा आपण सत्य ॥ मी रजक तुझा भक्त ॥ पूर्ण झाले

मनोरथ ॥ तुझें झालें दर्शन मज ॥ ३ ॥ इतुकिया अवसरीं ॥ समस्त दळ मिळालें भारी ॥ मदोन्मत्त अतिकुंजरी ॥ वारू नाना वर्णाचे ॥ ४ ॥ उभा राहोनि राजा देखा ॥ समस्त दाखवी सैन्यका ॥ संतोष मनीं अति हरिखी ॥ आपुलें ऐश्वर्य दाखवीतसे ॥५॥ श्रीगुरु निरोपिती यवनासी ॥ आरोहण करीं वारुवेसी ॥ दूर जाणें असे नगराशी ॥ निरोप आमुचा नको मोडूं ॥ ६ ॥ श्रीगुरुवचन ऐकोन ॥ समस्त शिष्यांतें आरोहण ॥ देता झाला तो यवन ॥ आपण वाजी आरूढला ॥ ७ ॥ आनंद बहु यवनाचे मनीं ॥ हर्षनिर्भर न माये गगनीं ॥ श्रीगुरुभेटी झाली म्हणोनि ॥ अति उल्हास करीतसे ॥ ८ ॥ श्रीगुरुमूर्त्ति बोलाविती यवनासी ॥ म्हणती झालों अतिसंतोषी ॥ तूं भक्त केवळ गुणराशी ॥ संतुष्ट झालों आपण आजी ॥ ९ ॥ आम्ही संन्यासी तापसी ॥ नित्य करावें अनुष्ठानासी ॥ तुम्हांसमागमें मार्गासी ॥ न घडे वेळीं संध्यादिक ॥ २१० ॥ यासी उपाय सांगेन ॥

अंगिकार करावा जाण ॥ पुढें जाऊं आम्ही त्वरेन ॥ स्थिर यावें तुम्हीं मागें ॥११॥ पापविनाशी तीर्थासी ॥ भेटी होईल तुम्हांसी ॥ ऐसें म्हणोनि रायासी ॥ अदृश्य झाले गुरुमूर्ति ॥ १२ ॥ समस्त शिष्यांसहित ॥ श्रीगुरु गुप्त झाले त्वरित ॥ मनोवेगें मार्ग क्रमित ॥ गेले वैदूरपुरासी ॥ १३ ॥ पापविनाशीतीर्थासी ॥ श्रीगुरु पातले त्वरितेंसीं ॥ राहिले तेथें अनुष्ठानासी ॥ समस्त येती भेटावया ॥ १४ ॥ साखरे सायंदेवाचा सुत ॥ भेटीस आला तेथें नागनाथ ॥ नानापरी पूजा करीत ॥ समाराधना आरंभिली ॥ १५ ॥ श्रीगुरु नेऊनि आपुले घरा ॥ पूजा केली षोडशोपचारा ॥ आरती करोनि एक सहस्रा ॥ समाराधना करी बहुत ॥ १६ ॥ इतुकें होतां झाली निशी ॥ श्रीगुरु म्हणती नागनाथासी ॥ सांगोनि आलों म्लेंच्छासी ॥ पापविनाशीं भेटूं म्हणोनि ॥ १७ ॥ जाऊं आतां तया

स्थानासी ॥ राहतां यवन येईल परियेसीं ॥ उपद्रव होईल ब्राह्मणांसी ॥ विप्रघरा म्लेंच्छ येती ॥ १८ ॥ ऐसें सांगोनि आपण ॥ गेले पापविनाशीं जाण ॥ शुभासनीं बैसोन ॥ अनुष्ठान करीत होते ॥ १९ ॥ इतुकिया अवसरीं ॥ राजा इकडे काय करी ॥ गुरुनाथ न दिसती दळभारीं ॥ मनीं चिंता बहु वर्तली ॥ २२० ॥ म्हणे कटकटा काय झालें ॥ गुरुनाथें मज उपेक्षिलें ॥ काय सेवे अंतर पडलें ॥ तेणें गेले निघोनियां ॥२१॥ मागुती मनीं विचारी ॥ पुढें जातों म्हणोनि येरी ॥ पापविनाशीतीर्थातीरीं ॥ भेटी देतों म्हणितलें ॥ २२ ॥ न कळे महिमान श्रीगुरूचें ॥ कोण जाणे मनोगत त्यांचें ॥ दैव बरवें होतें आमुचें ॥ म्हणोनि चरणांचें दर्शन झालें ॥ २३ ॥ राजस्फोटक होता मज ॥ आलों होतों याचि काज ॥ कृपानिधि श्रीगुरुराज ॥ भेटी झाली पुण्य माझें ॥ २४ ॥ पुढें गेले निश्चित ॥ म्हणोनि मनीं विचार करित ॥ दिव्य अश्वावरी आरूढोनि त्वरित ॥

निघाला राजा परियेसा ॥ २५ ॥ चतुश्चत्वारिंशत क्रोश देखा ॥ राजा पातला दिवसें एका ॥ पापविनाशी तीर्थीं देखा ॥ अवलोकितसे श्रीगुरूसी ॥ २६ ॥ विस्मय करी अति मानसीं ॥ येऊनि लागला चरणासीं ॥ विनवीतसे भक्तींसीं ॥ गृहाप्रति यावें म्हणतसे ॥ २७ ॥ नगर सर्व शृंगारिलें ॥ प्रवाळ-मोतियां तोरण केलें ॥ गुडिया मखर उभारविलें ॥ समारंभ थोर नगरांत ॥ २८ ॥ बैसवोनियां पालखींत ॥ आपण चरणचालीं येत ॥ नवरत्न असे ओंवाळित ॥ नगर लोक आरत्या आणिती ॥२९॥ ऐशा समारंभें राजा देखा ॥ घेऊनि गेला गुरुनायका ॥ विस्मय झाला सकळ लोकां ॥ महदाश्चर्य म्हणताती ॥ २३० ॥ लोक म्हणती म्लेंच्छजाती ॥ पहा हो विप्रपूजा करिती ॥ राजा अनाचारी म्हणती ॥ जातिधर्म सांडिला आजी ॥ ३१ ॥ ज्याचें पाहूं नये मुख ॥ त्याची सेवा करी देख ॥ राजा नष्ट म्हणोनि सकळिक ॥ म्लेंच्छजाती बोलती ॥ ३२ ॥ विप्र-

कुळ समस्त देख ॥ संतोष करिती अतिकौतुक ॥ राजा झाला विप्र-
सेवक ॥ आतां बरवें राज्यासी ॥ ३३ ॥ ऐसा राव असतां ॥ महाराष्ट्र-
धर्मी वर्तता ॥ आपुला द्वेष तत्त्वतां ॥ न करील जाण पां ॥ ३४ ॥ ऐसा
राजा असतां बरवें ॥ ज्ञानवंत असे स्वभावें ॥ ब्रह्मद्वेषी नव्हे पहावें ॥
पुण्यश्लोक म्हणती ऐसा ॥ ३५ ॥ नगरलोक पहावया येती ॥ नमस्का-
रिती अतिप्रीतीं ॥ राजे चरणचालीं येती ॥ लोक म्हणती आश्चर्य ॥ ३६ ॥
एक म्हणती हा होय देव ॥ म्हणोनि भजतो म्लेंच्छराव ॥ या कलियुगीं
अभिनव ॥ देखिलें म्हणताती सकळिक ॥ ३७ ॥ सवें वाजंत्र्यांचे गजर ॥
बंदिजन वाखाणिती अपार ॥ राजा हर्षे निर्भर ॥ घेऊनि जातो गुरूसी
॥ ३८ ॥ नानापरीचीं दिव्यवस्त्रें ॥ वांटीतसे राजा पवित्रें ॥ द्रव्य ओंवा-
ळुनि टाकी पात्रें ॥ भिक्षुक तुष्टले बहुत देखा ॥ ३९ ॥ ऐशा समारंभें
देखा ॥ घेऊनि गेला राजा ऐका ॥ महाद्वारीं पातले सुखा ॥ पायघड्या

अंथरती ॥ २४० ॥ नानापरीचीं दिव्यांबरें ॥ मार्गीं अंथरती अपारें ॥ वाजती भेरी वाजंत्रें ॥ राजगृहा पातले ॥४१॥ महासिंहासनस्थानीं ॥ श्रृंगार केला अतिगहनीं ॥ जगद्गुरूतें नेऊनि ॥ सिंहासनीं बैसविलें ॥ ४२ ॥ राजमंदिरींच्या नारी ॥ आरत्या घेऊनियां करीं ॥ ओवाळिती हर्षनिर्भरीं ॥ अनन्यभावें करोनियां ॥ ४३ ॥ समस्त लोक बाहेर ठेवोन ॥ श्रीगुरु होते एकले आपण ॥ सवें शिष्य चवघेजण ॥ जवळी होते परियेसा ॥ ४४ ॥ अंतःपुरींचे कुलस्त्रियांसी ॥ पुत्रपौत्रीं सहोदरासी ॥ भेटविलें राजें परियेसीं ॥ साष्टांगीं नमन करिती ते ॥ ४५ ॥ राजा विनवी स्वामियासी ॥ पुण्यें देखिलें चरणांसी ॥ न्याहाळावें कृपादृष्टीसी ॥ म्हणोनि चरणीं लागला ॥ ४६ ॥ संतोषले श्रीगुरुमूर्ति ॥ तयांसी आशिर्वाद देती ॥ राजयातें बोलाविती ॥ पुसताती गृहवार्ता ॥ ४७ ॥ श्रीगुरु म्हणती तयासी ॥ संतुष्ट झालास कीं मानसीं ॥ अजूनि व्हावें कांहीं भावेंसीं ॥ विस्तारोनि

सांग म्हणती ॥४८॥ राजा विनवी स्वामियासी ॥ अंतर पडतें चरणांसी ॥ राज्य केलें बहुवसीं ॥ आतां द्यावी चरणसेवा ॥ ४९ ॥ ऐसें ऐकोनि श्रीगुरु म्हणती ॥ आमुची भेटी श्रीपर्वतीं ॥ तुझे पुत्र राज्य करिती ॥ तुवां यावें भेटीसी ॥२५०॥ ऐसा निरोप देऊनि ॥ श्रीगुरु निघाले तेथोनि ॥ राजा विनवी चरण धरोनि ॥ ज्ञान मजला असावें ॥ ५१ ॥ कृपासिंधु गुरुनाथ ॥ ज्ञान होईल ऐसें म्हणत ॥ आपण निघाले त्वरित ॥ गेले गौतमी-तीरासी ॥ ५२ ॥ स्नान करोनि गौतमीसी ॥ आले गाणगा-पुरासी ॥ आनंद झाला समस्तांसी ॥ श्रीगुरुचरणदर्शनें ॥ ५३ ॥ संतुष्ट झाले समस्त लोक ॥ पहावया येती कौतुक ॥ वंदिताती सकळिक ॥ आरती करिती मनोभावें ॥ ५४ ॥ समस्त शिष्यांतें बोलाविती ॥ श्रीगुरु त्यांसी निरोपिती ॥ प्रगट झाली बहु ख्याति ॥ आतां रहावें गुप्तरूपें ॥ ५५ ॥ यात्रारूपें श्रीपर्वतासी ॥ निघावें आतां परियेसीं ॥ प्रगट बोले

हेंचि स्वभावेंसीं ॥ गुप्तरूपें राहूं तेथें ॥५६॥ स्थान आपुलें गाणगापुरीं ॥ येथूनि न वेचे निर्धारीं ॥ लौकिकमतें अवधारीं ॥ बोल करितों श्रीशैल-यात्रा ॥५७॥ प्रगट करोनियां यात्रेसी ॥ वास निरंतर गाणगाभुवनासी ॥ भक्तजन तारावयासी ॥ राहूं येथें निर्धार ॥ ५८ ॥ कठिण दिवस युग-धर्म ॥ म्लेंच्छराजा क्रूरकर्म ॥ प्रगटरूपें असतां धर्म ॥ समस्त म्लेंच्छ येती ॥ ५९ ॥ राजा आला म्हणोनि ॥ समस्त यवन ऐकोनि ॥ सकळ येती मनकामनी ॥ म्हणोनि गुप्त असावें ॥ २६० ॥ ऐसें म्हणोनि शिष्यांतें ॥ सांगितलें श्रीगुरुनाथें ॥ सिद्ध सांगे नामधारकातें ॥ चरित्र ऐसें श्रीगु-रूचें ॥ ६१ ॥ पुढें येतील दुर्दिन ॥ कारण राज्य यवन ॥ समस्त येती करावया भजन ॥ म्हणोनि गुप्त राहिले ॥ ६२ ॥ लौकिकार्थ दाखवा-वयासी ॥ निघाले आपण श्रीशैल्यासी ॥ कथा असे विशेषी ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ ६३ ॥ गंगाधराचा सुत ॥ सरस्वती असे विनवीत ॥ प्रत्यक्ष

असे श्रीगुरुनाथ ॥ देखिलें असे गाणगापुरीं ॥ ६४ ॥ सद्भावें भजनी-भक्तजन ॥ त्यांची कामना होईल पूर्ण ॥ संदेह न धरीं अनुमान ॥ त्वरित सिद्धि असे जाणा ॥ ६५ ॥ न लागतां कष्ट सायास ॥ कामना पुरती गाणगापुरास ॥ भक्तिभावें विशेष ॥ कल्पवृक्ष तेथें असे ॥ ६६ ॥ जें जें कल्पिलें फळ ॥ त्वरित पावती सकळ ॥ धनधान्यादि विपुळ ॥ पुत्रपौत्रादि शीघ्र होती ॥ ६७ ॥ सिद्ध म्हणे नामधारकासी ॥ हें गुरुचरित्र दिनीं निशीं ॥ मनोभावें वाचनेंसीं ॥ सकळ कामना पुरतील ॥ ६८ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्ध नामधारका सांगत ॥ यवनाचा उद्धार येथ ॥ तुम्हांकारणें सांगितला ॥ २६९ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते सिद्धनामधारक-संवादे सार्वभौमस्फोटकशमने ऐश्वर्यावलोकने वैदुराप्रवेशो नाम पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५० ॥ ओंवीसंख्या ॥ २६९ ॥ श्रीदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ ७ ॥ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक विनवी सिद्धासी ॥ कथा सांगितली आम्हांसी ॥ म्लेंच्छराजें श्रीगुरूसी ॥ होतें नगरासी नेलें ॥ १ ॥ तेथून आले गाणगाभुवना ॥ पुढील वर्तल्यां निरूपणा ॥ सांगा स्वामी कृपाघना ॥ गुरुचरित्र आम्हांसी ॥ २ ॥ सिद्ध म्हणे ऐक वत्सा ॥ कथा असे अतिविशेषा ॥ ऐकतां जाती सकळ दोषा ॥ चिंतिलें काम्य पाविजे ॥३॥ राजाची भेट घेऊनि ॥ श्रीगुरु आले गाणगाभुवनीं ॥ योजना करिती आपुल्या मनीं ॥ गुप्त रहावें म्हणोनियां ॥ ४ ॥ प्रगट झालों बहुवसी ॥ राजा आला भेटीसी ॥ उपजली भक्ति म्लेंच्छासी ॥ नाना जाती येतील ॥ ५ ॥ म्हणोनि आतां गुप्त व्हावें ॥ लोकमतें निघोनि जावें ॥ पर्वतयात्रा म्हणोनि भावें ॥ निघाले श्रीगुरु परियेसीं ॥ ६ ॥ गुप्त राहिले गाणगापुरीं ॥ प्रगट दाविलें लोकाचारीं ॥ निघाले स्वामी पर्वतागिरी ॥ शिष्यां-

१ झालेल्या. २ वत.

सहित अवधारा ॥ ७ ॥ भक्तजन बोळेवित[1] ॥ चिंता करीत अत्यंत ॥
श्रीगुरु संबोखिती[2] समस्त ॥ रहावविती अतिप्रीतीनें ॥ ८ ॥ दुःख करिती
सकळ जन ॥ लागताती श्रीगुरुचरण ॥ स्वामी आम्हांतें सोडून ॥ केवीं
जातां यतिराया ॥ ९ ॥ भक्तजनांची तूं कामधेनु ॥ आम्ही बाळक
अज्ञानु ॥ होतासी आम्हां निधानु ॥ सोडूनि जातां श्रीगुरु ॥ १० ॥ नित्य
तुझें करितां दर्शन ॥ दुरितें[3] जाती निरसून ॥ जी जी कामना इच्छी मन ॥
त्वरित पावे स्वामिया ॥ ११ ॥ बाळकांतें सोडूनि माता ॥ केवीं जाय
अव्हेरिता ॥ तूं आमुचा मातापिता ॥ नको अव्हेरूं म्हणताती ॥ १२ ॥
ऐकोनि नानापरी विनंति ॥ हांसते झाले श्रीगुरुमूर्ति ॥ संबोखिती अति-
प्रीतीं ॥ न करा चिंता म्हणोनि ॥ १३ ॥ आम्ही असतों याचि ग्रामीं ॥
नित्य स्नान अमरजासंगमीं ॥ वसों माध्यान्हीं मठधामीं ॥ गुप्तरूपें अव-

१ निरोप देत. २ समाधान करितात. ३ पापें.

धारा ॥ १४ ॥ जे भक्त असती माझ्या प्रेमीं ॥ त्यांतें प्रत्यक्ष दिसों आम्ही ॥ लौकिकमतें अविद्याधर्मीं ॥ बोल करितों श्रीशैलयात्रा ॥ १५ ॥ प्रातःस्नान कृष्णातीरीं ॥ पंचनदी वृक्ष औदुंबरीं ॥ अनुष्ठाना बिंदुक्षेत्रीं ॥ माध्यान्हीं येतों भीमातटीं ॥ १६ ॥ अमरजासंगमीं स्नान करोनि ॥ पूजा घेऊं मठीं निर्गुणीं ॥ चिंता न करा अंतःकरणीं ॥ म्हणोनि सांगती श्रीगुरु ॥ १७ ॥ ऐसें सांगती समस्तांसी ॥ संदेह न धरावा मानसीं ॥ गाणगा-भुवनीं अहर्निशीं[1] ॥ वसों आम्ही त्रिवाचा ॥ १८ ॥ जे जे जन भक्ति करिती ॥ त्यांसी आमुची अतिप्रीति ॥ मनकामना पावती ॥ सिद्धवाक्य असे आमुचें ॥ १९ ॥ अश्वत्थ नव्हे कल्पवृक्ष ॥ संगमीं असे प्रत्यक्ष ॥ तुमच्या मनीं जें अपेक्षें[2] ॥ त्वरित होय पूजितां ॥ २० ॥ कल्पवृक्षातें पूजोनि ॥ मग यावें आमुचे स्थानीं ॥ पादुका ठेवितों निर्गुणी ॥ पूजा

१ रात्रदिवस. २ इच्छित.

करा मनोभावें ॥ २१ ॥ विघ्नहर चिंतामणी ॥ त्यातें पूजितां एकमनीं ॥ चिंतिलें फळ तत्क्षणीं ॥ लाभे तुम्हां अवधारा ॥ २२ ॥ समस्त विघ्नांचा अंतक ॥ पूजा तुम्हीं विनायक ॥ अष्टतीर्थें असती विशेख ॥ आचरावीं मनोभावें ॥ २३ ॥ संतोषकारक आम्हांप्रती ॥ त्रिकाळ करावी आरती ॥ भक्तजन जें इच्छिती ॥ त्वरित होय अवधारा ॥ २४ ॥ ऐसें सांगोनि तयांसी ॥ निघाले स्वामी परियेसीं ॥ भक्त परतोनि मठासी ॥ आले चिंतित पायांतें ॥ २५ ॥ चिंतित निघती मठांत ॥ तेथें दिसती श्रीगुरु-नाथ ॥ लोक झाले विस्मित ॥ म्हणती वस्तु त्रैमूर्ति ॥ २६ ॥ यासी म्हणती जे नर ॥ ते पावती यमपूर ॥ सत्य बोलिले निर्धार ॥ न कळे महिमा आम्हांसी ॥ २७ ॥ सर्वेचि पाहतां न दिसे कोणी ॥ प्रेमळ भक्त देखती नयनीं ॥ यापरी गौप्यरूप धरोनि ॥ राहिले श्रीगुरु मठांत ॥ २८ ॥ दृष्टांत दाखविला भक्तांसी ॥ पातले आपण श्रीपर्वतासी ॥ पाताळगंगा-



[ अ० ५१ ] ऐसें भक्ता संबोखोनां । उठले श्रीगुरु तेथोनीं । पुष्पासनीं बैसोनी । निरोप देती भक्तांसी ॥ ३५ ॥

तीरासी ॥ राहिले स्वामी परियेसा ॥ २९ ॥ शिष्यांतें निरोपिती अवधारा ॥ पुष्पांचें आसन त्वरित करा ॥ जाणें असे पैलतीरा ॥ ऐक्य होऊं मल्लिकार्जुनीं ॥ ३० ॥ निरोप देतां श्रीगुरुमूर्ति ॥ आणिलीं पुष्पें सेवंती ॥ कुमुदें कल्हारें मालती ॥ कर्दळीपर्णें वेष्टोनि ॥ ३१ ॥ आसन केलें अतिविचित्र ॥ घातलें गंगेमध्यें पात्र ॥ शिष्यां सांगती वेगवक्त्र ॥ जावें तुम्हीं गृहासी ॥ ३२ ॥ दुःख करीत येत सकळी ॥ यांसी सांगती श्रीगुरु चंद्रमौळी ॥ गाणगाग्रामीं असों जवळी ॥ भाव न धरावा दुजा तुम्हीं ॥३३॥ लौकिकमतें आम्ही जातों ॥ ऐसें दृष्टांतीं दिसतों ॥ भक्तजनां घरीं वसतों ॥ निर्धार धरा मानसीं ॥ ३४ ॥ ऐसें भक्तां संबोखोनि ॥ उठले श्रीगुरु तेथोनि ॥ पुष्पासनीं बैसोनि ॥ निरोप देती भक्तांसी ॥ ३५ ॥ कन्यागतीं बृहस्पति ॥ बहुधान्य संवत्सरीं ख्याति ॥ सूर्य चाले उत्तर दिगंतीं ॥ संक्रांति कुंभ परियेसा ॥ ३६ ॥ शिशिर ऋतु माघमासीं ॥ असितपक्ष

१ तेव्हांच. २ वस.

प्रतिपदेसी ॥ शुक्रवारीं पुण्यदिवसीं ॥ श्रीगुरु बैसले निजानंदीं ॥ ३७ ॥ श्रीगुरु म्हणती शिष्यांसी ॥ जातों आम्ही निज मठासी ॥ पावतां खूण तुम्हांसी ॥ प्रसादपुष्पें पाठवितों ॥ ३८ ॥ घेतील पुष्पें जाती शेवंती ॥ घ्यावा प्रसाद तुम्हीं भक्तीं ॥ पूजा करावी अखंड रीतीं ॥ लक्ष्मी वसो तुम्हां घरीं ॥ ३९ ॥ आणिक सांगेन एक खूण ॥ गायनीं करी जो माझें स्मरण ॥ त्याचे घरीं असें जाण ॥ गायनप्रीति आम्हांसी ॥ ४० ॥ नित्य जे जन गायन करिती ॥ त्यांवरी माझी अतिप्रीति ॥ तयांचे घरीं अखं-डिती ॥ आपण असों अवधारा ॥ ४१ ॥ व्याधि न होय त्यांचे घरीं ॥ दरिद्र जाय त्वरित दूरी ॥ पुत्रपौत्र श्रियाकरीं ॥ शतायुषी नांदतील ॥ ४२ ॥ ऐकतील चरित्र माझें जरी ॥ वाचितील नर निरंतरीं[1] ॥ लक्ष्मी राहे त्यांचें घरीं ॥ संदेह न धरावा मनांत ॥४३॥ ऐसें सांगोनि भक्तांसी ॥

१ निरंतर.

श्रीगुरु जहाले अदृश्शी ॥ चिंता करिती बहुवशी ॥ अवलोकिती गंगेंत ॥ ४४ ॥ ऐशी चिंता करितां थोर ॥ तटाकीं पातले नावेकर ॥ तिहीं सांगितला विचार ॥ श्रीगुरु आम्हीं देखिले ॥ ४५ ॥ शिष्यवर्गासी मनोहर ॥ व्यवस्था सांगती नावेकर ॥ होतों आम्हीं पैलतीर ॥ तेथें देखिले मुनीश्वर ॥ ४६ ॥ संन्यास वेष दंड हातीं ॥ नामें श्रीनृसिंहसरस्वती ॥ निरोप दिधला आम्हांप्रती ॥ तुम्हां सांगा म्हणोनि ॥ ४७ ॥ आम्हांस आज्ञापिती मुनि ॥ आपण जातों कलि पाहोनि ॥ सदा वसों गाणगाभुवनीं ॥ ऐसें सांगा म्हणितलें ॥ ४८ ॥ भ्रांतपणें दुःख करितां ॥ आम्हीं देखिलें दृष्टांता ॥ जात असतां श्रीगुरुनाथा ॥ सुवर्णपादुका त्यांचें चरणीं ॥ ४९ ॥ निरोप सांगितला तुम्हांसी ॥ जावें आपुल्या स्थानासी ॥ सुखी असावें वंशोवंशीं ॥ माझी भक्ति करोनि ॥ ५० ॥ प्रसादपुष्पें आलिया ॥

१ गुप्त. २ नावाडी.

घ्यावीं शिष्यें काढोनियां ॥ ऐसें आम्हां सांगोनियां ॥ श्रीगुरु गेले अवधारा ॥ ५१ ॥ ऐसें सांगती नावकर ॥ समस्त राहिले स्थिर ॥ हर्षें असती निर्भर ॥ प्रसादपुष्पें पहाती ॥ ५२ ॥ इतुकिया अवसरीं ॥ आलीं प्रसादपुष्पें चारी ॥ मुख्य शिष्यें प्रीतीकरीं ॥ काढोनि घेतलीं अवधारा ॥ ५३ ॥ नामधारक म्हणे सिद्धासी ॥ मुख्य शिष्य कोण उपदेशीं ॥ विस्तारोनियां आम्हांसी ॥ पुष्पें कोणा लाभलीं ॥ ५४ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ शिष्य बहुत गुरुनायका ॥ असती गाणगापुरीं ऐका ॥ गेले शिष्य आश्रमा ॥ ५५ ॥ आश्रम घेती संन्यासी ॥ त्यांसी पाठविलें तीर्थांसी ॥ तयांचीं नामें परियेसीं ॥ सांगेन ऐका विस्तारोन ॥ ५६ ॥ बाळकृष्णसरस्वती ॥ उपेंद्रमाधवसरस्वती ॥ पाठविते झाले प्रीतीं ॥ आपण राहिले संगमीं ॥ ५७ ॥ गृहस्थधर्म शिष्य बहुत ॥ समस्त आपुले

नांदत ॥ त्रिवर्ग आले श्रीपर्वताप्रत ॥ चवथा होतों आपण ॥ ५८ ॥ साखरे नाम सायंदेव ॥ कवीश्वर-युग्में पूर्वभाव ॥ नंदी नामें नरहरी देव ॥ पुष्पें घेतलीं चतुर्वर्गीं ॥ ५९ ॥ गुरुप्रसाद घेऊन ॥ आले शिष्य चौघेजण ॥ तींच पुष्पें मज पूजन ॥ म्हणोनि पुष्पें दाखविती ॥ ६० ॥ ऐसा श्रीगुरूचा महिमा ॥ सांगतसे अनुपमा ॥ थोडें सांगितलें तुम्हां ॥ अपार असे सांगता ॥ ६१ ॥ श्रीगुरुचरित्र कामधेनु ॥ सांगितलें तुज विस्तारोनु ॥ दुःख दरिद्र गेलें पळोनु ॥ ऐसें जाण निर्धारीं ॥ ६२ ॥ ऐसें श्रीगुरुचरित्र ॥ श्रवणीं कीर्तनीं अतिपवित्र ॥ सुखें नांदती पुत्रपौत्र ॥ लक्ष्मीवंत होती जाण ॥ ६३ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष ॥ तयांसी लाभे प्रत्यक्ष ॥ महा आनंद उभयपक्षीं ॥ पुस्तक लिहितां सर्वसिद्धि ॥ ६४ ॥ ऐसें सिद्धें सांगितलें ॥ नामधारक संतोषले ॥ सकळाभीष्ट लाधलें ॥ तात्काळिक

१ तिघेजण. २ दोघे. ३ इहपर.

अवधारा ॥ ६५ ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ श्रीगुरुचरित्र अतिमनोहर ॥ ऐकतां पावती पैलपार ॥ संसारसागरा तरोनियां ॥ ६६ ॥ श्रीगुरुचरित्र ऐकतां ॥ सकळाभीष्टें तत्त्वतां ॥ लाधती म्हणोनि समस्तां ॥ ऐका म्हणे नामधारक ॥ ६७ ॥ अमृताची असे मोथणी । स्वीकारितां भाविक जनीं ॥ धर्मार्थ काम मोक्ष साधनीं ॥ हेचि कथा ऐकावी ॥ ६८ ॥ पुत्र-पौत्रां ज्यासी चौंड ॥ त्यासी हे कथा असे गोड ॥ राहे लक्ष्मी स्थिर अखंड ॥ श्रवणमात्रें घरीं नांदे ॥ ६९ ॥ चतुर्विध पुरुषार्थ ॥ लाधती श्रवणें परमार्थ ॥ श्रीनृसिंहसरस्वती गुरुनाथ ॥ रक्षी त्यांचे वंशोवंशीं ॥ ७० ॥ म्हणे सरस्वतीगंगाधर ॥ श्रोतयासी करी नमस्कार ॥ कथा ऐका मनोहर ॥ सकळाभीष्टें साधती ॥ ७१ ॥ मुख्य भाव कारण ॥ प्रेमें करितां श्रवण पठण ॥ निजध्यास आणि मनन ॥ प्रेमेंकरोनि साधिजे

१ खरोखरी. २ डेरा. ३ इच्छा.

॥ ७२ ॥ श्रीनृसिंहसरस्वती शंकर ॥ त्याचे चरणीं अर्पण साग्र ॥ त्याचेचि प्रसादें समग्र ॥ समस्त प्रजा सुखी असती ॥ ७३ ॥ ग्रंथ ठेवावा शुद्ध स्थानीं ॥ शुद्ध वस्त्रीं शुद्ध मनीं ॥ नित्य पूजा करोनि ॥ ग्रंथ गृहामाजीं ठेवावा ॥ ७४ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्धनामधारकसंवाद अमृत ॥ गुरुसमाधि नाम विख्यात ॥ एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ७५ ॥ इति श्रीगुरुचरित्रकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे श्रीगुरुसमाधिगमनं नाम एकपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५१ ॥ ओंवीसंख्या ॥७५॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नामधारक विनवी सिद्धासी ॥ श्रीगुरु निघाले शैल्य-यात्रेसी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ तें विस्तारेंसी मज सांगावें ॥ ॥ सिद्ध म्हणे शिष्योत्तमा ॥ काय सांगूं सद्गुरूची महिमा ॥ आतां वर्णनाचा झाला सीमा ॥ पशी गुरुभक्तिप्रेमा नावरे ॥ २ ॥ श्रीगुरु सिद्ध झाले जावयासी ॥ श्रीपर्वतीं यात्राउद्देशीं ॥ हा वृत्तांत नागरिक जनांसी ॥ कळला परियेसीं तात्काळ ॥ ३ ॥ समस्त जन आले धांवत ॥ नरनारी सर्व मिळाल्या बहुत ॥ गुरूसी प्रार्थित अनेक भक्त ॥ श्रीपर्वतासी स्वामी कां जातां ॥ ४ ॥ आम्हांसी भासतें व्यक्त ॥ तुम्ही अवतार करितां समाप्त ॥ निरंतर आपण असा अव्यक्त ॥ परिजनांसी सुव्यक्त दिसत होतां ॥ ५ ॥ तुमचे चरणांचें होतां दर्शन ॥ पातकांचें होतसे दहन ॥ आतां कैसें करतील जन ॥ म्हणोनि लोटांगणें घालिती ॥ ६ ॥ पुढें आम्हांस काय गति ॥ आम्हीं तरावें कैशा रीतीं ॥ स्वामीचे चरण नौका होतीं ॥ तेणें

पार उतरत होतों ॥ ७ ॥ तुम्ही भक्तास कामधेनूपरी ॥ कामना पुरवीत होतां बरी ॥ म्हणोनि जगळे आजवरी । याउपरी आम्हीं काय करावें ॥ ८ ॥ स्वामीकारितां गाणगापुर ॥ झालें होतें वैकुंठपुर ॥ आतां दीपाविणें जैसें मंदीर ॥ तैसें साचार होईल हें ॥ ९ ॥ माउलीविणें तान्हें बाळ ॥ कीं देवाविणें देऊळ ॥ जळाविणें जैसें कमळ ॥ तैसें सकळ तुम्हांविणें ॥ १० ॥ माता पिता सकळ गोत ॥ इष्टमित्र कुळदैवत ॥ सर्वही आमुचा गुरुनाथ ॥ म्हणोनि काळ क्रमित होतों ॥ ११ ॥ आपुल्या बाळकासी अव्हेरुनी ॥ कैसें जातां स्वामी येथुनि ॥ अश्रुधारा लागल्या लोचनीं ॥ तळमळती सकळ जन ॥ १२ ॥ तंव्हा गुरु समस्त जनांप्रती ॥ हास्यवदन करोनि बोलती ॥ तुम्ही जनहो मानूं नका खंती ॥ सांगतों यथास्थित तें ऐका ॥ १३ ॥ आम्ही असतों याचि ग्रामीं ॥ स्नान पान करूं अमरजासंगमीं ॥ गौप्यरूपें रहातां नियमीं ॥ चिंता कांहीं तुम्हीं न करावी ॥ १४ ॥ राज्य

झालें म्लेंच्छाक्रांत ॥ आम्ही भूमंडळीं विख्यात ॥ आमुचे दर्शनास बहु येथ ॥ यवन सतत येतील पैं ॥ १५ ॥ तेणें प्रजेस होईल उपद्रव ॥ आम्ही अदृश्य रहातों यास्तव ॥ ज्यास असे दृढ भक्तिभाव ॥ त्यास दृश्य स्वभावें होऊं ॥ १६ ॥ लौकिकामध्यें कळावयासी ॥ आम्ही जातों श्रीशैल्यपर्वतासी ॥ चिंता न करावी मानसीं ॥ ऐसें समस्तांसी संबोधिलें ॥ १७ ॥ मठीं आमुच्या ठेवितों पादुका ॥ पुरवितील कामना ऐका ॥ अश्वत्थवृक्ष आहे निका ॥ तो सकळिकांचा कल्पतरु ॥ १८ ॥ कामना पुरवील समस्त ॥ संदेह न धरावा मनांत ॥ मनोरथ प्राप्त होती त्वरित ॥ ही मात आमुची सत्य जाणा ॥ १९ ॥ संगमीं करूनियां स्नान ॥ पूजोनि अश्वत्थनारायण ॥ मग करावें पादुकांचें अर्चन ॥ मनकामना पूर्ण होतील ॥ २० ॥ विघ्नहर्ता विनायक ॥ आहे तेथें वरदायक ॥ तीर्थें असती अनेक ॥ पावाल तुम्ही सुख अपार ॥ २१ ॥ पादुकांची करूनि पूजा ॥

त्रिकाळ आरती करूनि ओजा ॥ आमुचें वचन यथार्थ समजा ॥ म्हणोनि द्विजांसी गुरु सांगती ॥ २२ ॥ आम्ही येथेंच राहतों मठांत ॥ हें वचन जाणावें निश्चित ॥ ऐसें संबोधूनि जना आद्यंत ॥ निघाले त्वरित गुरुराज पैं ॥ २३ ॥ समागमें जे धांवले जन ॥ त्यांचें करून समाधान ॥ शिष्यां-सहित त्वरित गतीनें ॥ गेले निघून श्रीगुरु ॥ २४ ॥ लोक माघारे पर-तले ॥ समस्त गुरूच्या मठासी आले ॥ तेथें समस्तांनीं गुरु देखिले ॥ बैसले होते निजासनीं ॥ २५ ॥ सर्वेचि पहातां झाले गुप्त ॥ जन मनीं परम विस्मित ॥ आम्ही सोडूनि आलों मार्गांत ॥ येथें गुरुनाथ देखिले ॥ २६ ॥ सर्वव्यापी नारायण ॥ त्रैमूर्ति अवतार पूर्ण ॥ चराचरीं श्रीगुरु आपण ॥ भक्तांकारणें रूप धरिती ॥२७॥ ऐसा दृष्टांत दावूनि जनांसी ॥ आपण गेले श्रीशैल्यासी ॥ पावले पाताळगंगेसी ॥ राहिले त्या दिवसीं तेथें ॥ २८ ॥ श्रीगुरु शिष्यांसी म्हणती ॥ मल्लिकार्जुनासी जावोनि शीघ्र

गतीं ॥ पुष्पांचें आसन यथास्थितीं ॥ करोनि निगुती आणावें ॥ २९ ॥ शिष्य धांवले अति शीघ्र ॥ पुन्नागादि कंद कल्हार ॥ करवीर बकुळ चंपक मंदार ॥ पुष्पें अपार आणिलीं ॥ ३० ॥ त्या पुष्पांचें केलें दिव्यासन ॥ तें गंगाप्रवाहावरी केलें स्थापन ॥ त्यावरी श्रीगुरु आपण ॥ बैसले ते क्षणीं परमानंदें ॥ ३१ ॥ बहुधान्य संवत्सर माघमास ॥ कृष्णप्रतिपदा शुभ दिवस ॥ बृहस्पति होता सिंहराशीस ॥ उत्तर दिशे होता सूर्य पैं ॥ ३२ ॥ शिशिर ऋतु कुंभ संक्रमण ॥ लग्नघटिका सुलक्षण ॥ ऐसे शुभ-मुहूर्तीं गुरु आपण ॥ आनंदें प्रयाण करिते झाले ॥ ३३ ॥ मध्यें प्रवाहांत पुष्पासनीं ॥ बैसोनि शिष्यांस संबोधोनि ॥ आमुचा वियोग झाला म्हणोनि ॥ तुम्हीं मनीं खेद न मानावा ॥ ३४ ॥ त्या गाणगापुरांत ॥ आम्ही असोंच पूर्ववत ॥ भावना दृढ धरा मनांत ॥ तुम्हां दृष्टांत तेथें होईल ॥ ३५ ॥ आम्ही जातों आनंदस्थानासी ॥ तेथें पावलों याची खूण

तुम्हांसी ॥ फुलें येतील जिनसजिनसीं ॥ तुम्हांस तो प्रसाद ॥ ३६ ॥ पुष्पांचें करितां पूजन ॥ तुम्हां होईल देव प्रसन्न ॥ भक्तिभावें करावी जतन ॥ प्राणासमान मानुनी ॥ ३७ ॥ आणिक एक ऐका युक्ति ॥ जे कोणी माझें चरित्र गाती ॥ प्रीतीनें नामसंकीर्तन करिती ॥ ते मज प्रिय गमती फार ॥ ३८ ॥ मजपुढें करितील गायन ॥ जाणोनि रागरागिणी तानमान ॥ चित्तीं भक्तिभाव धरून ॥ करिती ते मज कीर्तन परमानंदें ॥ ३९ ॥ भक्त मज फार आवडती ॥ जे माझें कथामृत पान करिती ॥ त्यांचे घरीं मी श्रीपती ॥ वसतों प्रीतीनें अखंडित ॥ ४० ॥ आमुचें चरित्र जो पठण करी ॥ त्यास लाभती पुरुषार्थ चारी ॥ सिद्धि सर्वही त्याच्या द्वारीं ॥ दासीपरी तिष्ठतील ॥ ४१ ॥ त्यासी नाहीं यमाचें भय ॥ त्यास लाभ लाभे निश्चय ॥ पुत्रपौत्रांसहित अष्टैश्वर्य ॥ अनुभवोनि निर्भय पावे मुक्ति ॥४२॥ हें वचन मानी अप्रमाण ॥ तो भोगील नरक दारुण ॥

तो गुरुद्रोही जाण जन्ममरण ॥ दुःख अनुभवणें न सुटे त्यासी ॥ ४३ ॥
या कारणें असूं द्या विश्वास ॥ सुख पावाल बहुवस ॥ ऐसें सांगोनि
शिष्यांस ॥ श्रीगुरु तेथूनि अदृश्य झाले ॥ ४४ ॥ शिष्य अवलोकिती
गंगेंत ॥ तों दृष्टीं न दिसती श्रीगुरुनाथ ॥ बहुत होवोनि चिंताक्रांत ॥
तेथें उभे तटस्थ झाले ॥ ४५ ॥ इतुकियात आला नावाडी तेथ ॥ तो
शिष्यां सांगे वृत्तांत ॥ गंगेचे पूर्वतीरीं श्रीगुरुनाथ ॥ जात असतां म्या
देखिले ॥४६॥ आहे वेष संन्यासी दंडधारी ॥ काषायांबर वेष्टिलें शिरीं ॥
सुवर्णपादुका चरणामाझारीं ॥ कांति अंगावरी फांकतसे ॥ ४७ ॥ तुम्हांस
सांगा म्हणोनि ॥ गोष्टी सांगितली आहे त्यांनीं ॥ त्यांचें नांवें श्रीनृसिंह-
मुनि ॥ ते गोष्टी कानीं आइका ॥ ४८ ॥ कळिकाळास्तव तप्त होउनि ॥
आपण असतों गाणगाभुवनीं ॥ तुम्हीं तत्पर असावें भजनीं ॥ ऐसें सांगा
म्हणोनि कथिलें ॥ ४९ ॥ प्रत्यक्ष पाहिले मार्गांत ॥ तुम्ही कां झालेत

चिंताक्रांत ॥ पुष्पें येतील जळांत ॥ घेऊनि निवांत रमावें ॥ ५० ॥ नावाडी यानें ऐसें कथिलें ॥ त्यावरूनि शिष्य हर्षले ॥ इतुकियांत गुरुप्रसाद फुलें ॥ आलीं प्रवाहांत वाहत ॥ ५१ ॥ तीं परमप्रसादसुमनें ॥ काढोनि घेतलीं शिष्यवर्गानें ॥ मग परतले आनंदानें ॥ गुरुध्यान मनीं करित ॥ ५२ ॥ सिद्धासी म्हणे नामधारक ॥ पुष्पें किती आलीं प्रासादिक ॥ शिष्य किती होते प्रमुख ॥ तें मज साद्यंत सांगावें ॥ ५३ ॥ सिद्ध म्हणे नामधारका ॥ तुवा भली घेतली आशंका ॥ धन्य बा तुझ्या विवेका ॥ होसी साधक समर्थ ॥५४॥ खूण सांगतों ऐक आतां ॥ श्रीगुरु गाणगापुरीं असतां ॥ बहुत शिष्य होते गणितां ॥ नाठवती ते ये समयीं ॥ ५५ ॥ ज्याणीं केला आश्रमस्वीकार ॥ ते संन्यासी थोर थोर ॥ तीर्थें हिंडावया गेले फार ॥ कृष्णबाळसरस्वतीप्रमुख ते ॥५६॥ जे शिष्य झाले गृहस्थ केवळ ॥ ते आपुल्या गृहीं नांदती सकळ ॥ तारक होते श्रीगुरु-




[ अ० ५२ ] तो परत प्रसाद सुमनें । काढोनि घेतलों शिष्यवर्गानें । मग परतले आनंदानें । गुरुध्यान मनीं करीत ॥ ५२ ॥

नाथ प्रबळ ॥ भक्त अपरमित तारिले ॥५७॥ श्रीजगद्गुरूच्या समागमीं ॥ चारीजण होतों आम्ही ॥ सायंदेव नंदी नरहरी मी ॥ श्रीगुरूची सेवा करित होतों ॥ ५८ ॥ चौघांनीं घेतलीं पुष्पें चारी ॥ गुरुप्रसाद वंदिला शिरीं ॥ हीं पहा म्हणोनि पुष्पें करीं ॥ घेऊनि झडकरी दिधलीं ॥ ५९ ॥ चौघांनीं चारी पुष्पांसी ॥ मस्तकीं धरिलीं भावेंसी ॥ आनंद झाला नामधारकासी ॥ गुरुप्रसाद त्याचे दृष्टीं पडला ॥ ६० ॥ इति श्रीगुरुचरित्रामृत ॥ सिद्ध नामधारकासी सांगत ॥ श्रीगुरुप्रसाद झाला प्राप्त ॥ द्विपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ६१ ॥ इति श्रीगुरुचरित्रपरमकथाकल्पतरौ श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे प्रसादप्राप्तिर्नाम द्विपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५२ ॥ ओंवीसंख्या ॥ ६१ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥




[ अ० ५३ ] देखोनी सिद्ध सुखावती । समाधि लागली यासी म्हणती । सावध कराया मागुती । लोकोपकाराकारणें ॥ ५ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुदेवदत्तात्रेयचरणारविंदाभ्यां नमः ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुरेव परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ श्रोते व्हावें सावधान ॥ गुरुचरित्राध्याय बावन्न ॥ ऐकोनि नामधारकाचें मन ॥ ब्रह्मानंदीं निमग्न पैं ॥ १ ॥ सेवूनि गुरुचरित्रामृत ॥ नामधारक तटस्थ होत ॥ अंगीं घर्मपुलकांकित ॥ रोमांचही ऊठती ॥ २ ॥ कंठ झाला सद्गदित ॥ गात्रें झालीं सकंपित ॥ विवर्ण भासे लोकांत ॥ नेत्रीं वहाती प्रेमधारा ॥ ३ ॥ समाधिसुखें न बोले ॥ देह अणुमात्र न हाले ॥ सात्त्विक अष्टभाव उदेले ॥ नामधारक शिष्याचे ॥ ४ ॥ देखोनि सिद्ध सुखावती ॥ समाधि लागली यासी म्हणती ॥ सावध करावा मागुती ॥ लोकोपकाराकारणें ॥ ५ ॥ म्हणोनि हस्तें कुरवाळिती ॥ प्रेमभावें आलिंगिती ॥ देहावरी ये ये म्हणती ॥ ऐकबाळा शिष्योत्तमा ॥ ६ ॥ तूं तरलासी भव-

१ मुळींच. २ शुद्धींवर.

सागरीं ॥ रहासी ऐसा समाधिस्थ जरी ॥ ज्ञान राहील तुझ्या उदरीं ॥ लोक तरती कैसे मग ॥ ७ ॥ याकारणें अंतःकरणीं ॥ दृढता असावी श्रीगुरुचरणीं ॥ बाह्य देहाची रहाटणी ॥ शास्त्राधारें करावी ॥ ८ ॥ तुवां विचारिलें म्हणोनि ॥ आम्हां आठवली अमृताची वाणी ॥ तापत्रयातें करी हानि ॥ ऐशी अनुपम्या प्रगटली ॥ ९ ॥ तुजमुळें आम्हां आठवलें ॥ तुवां आम्हां बरवें केलें ॥ त्वांही एकाग्रत्वें ऐकिलें ॥ आतां हेंच विस्तारीं ॥ १० ॥ नामधारका ऐशिया परी ॥ सिद्ध सांगती परोपरी ॥ मग तो नेत्रोन्मीलन[1] करी ॥ कर जोडोनि उभा ठाके ॥ ११ ॥ म्हणे कृपेचें तारूं ॥ तूंचि या विश्वास आधारू ॥ भवसागर पैलपारू ॥ ॥ तूंचि करिसी श्रीगुरु-राया ॥ १२ ॥ ऐसें नामधारक विनवीत ॥ सिद्धाचे चरणीं लागत ॥ म्हणे श्रीगुरुचरित्रामृत ॥ अवतरणिका[2] मज सांगा ॥ १३ ॥ या श्रीगुरु-

१ डोळे उघडणें. २ अनुक्रमणिका.

चरितामृतीं ॥ अमृताहूनि परमामृतीं ॥ भक्तजनाची मनोवृत्ति ॥ बुडी देवोनि स्थिरावली ॥ १४ ॥ अतृप्त आहें अजूनि ॥ हेचि कथा पुनः सुववोनि ॥ अक्षयामृत पाजूनि ॥ आनंदसागरीं मज ठेवा ॥ १५ ॥ बहु औषधींचें सार काढोन ॥ त्रैलोक्यचिंतामणी रसायणं ॥ संग्रह करिती विचक्षण ॥ तैसें सार मज सांगा ॥ १६ ॥ ऐकोनि शिष्याची प्रार्थना ॥ आनंद सिद्धाचिया मना ॥ म्हणती बाळका तुझी वासना ॥ अखंड राहो श्रीगुरुचरित्रीं ॥ १७ ॥ श्रीगुरुचरित्राची ऐका ॥ सांगेन आतां अवतरणिका ॥ प्रथमपासूनि सारांश निका ॥ बावन्नाध्यायपर्यंत ॥ १८ ॥ प्रथमाध्यायीं मंगळाचरण ॥ मुख्य देवताचें असे स्मरण ॥ श्रीगुरुमूर्तीचें दर्शन ॥ भक्तांप्रती जाहलें ॥ १९ ॥ द्वितीयाध्यायीं ब्रह्मोत्पत्ति ॥ चारी युगांचे भावें कथिती ॥ श्रीगुरुसेवा दीपकाप्रती ॥ घडली ऐसें कथियेलें ॥ २० ॥ नाम-

धारका अमरजासंगमा ॥ श्रीगुरु नेती आपुले धामा ॥ अंबरीष दुर्वास यांचा महिमा ॥ तृतीयाध्यायीं कथियेला ॥ २१ ॥ चतुर्थाध्यायीं अनसूयेप्रती ॥ छळावया त्रैमूर्ति येती ॥ परी तियेचे पुत्र होती ॥ स्तनपान करिती आनंदें ॥ २२ ॥ पंचमीं श्रीदत्तात्रेय धरी ॥ स्वयें अवतार पीठापुरीं ॥ श्रीपादश्रियावल्लभधारी ॥ तीर्थयात्रेसी निघाले ॥ २३ ॥ सह्याद्र्यांत लिंग घेउनि ॥ रावण जातां गोकर्णीं ॥ विघ्नेश्वरें विघ्न करुनी ॥ स्थापना केली तयाची ॥ २४ ॥ गोकर्णमहिमा असंख्यात ॥ रायाप्रती गौतम सांगत ॥ चांडाळी उद्धरली अकस्मात ॥ सातव्या अध्यायीं वर्णिती ॥ २५ ॥ माता पुत्र जीव देत होतीं ॥ तयाप्रती गुरु कथा सांगती ॥ शनिप्रदोष व्रत देती ॥ ज्ञानी करिती अष्टमीं ॥ २६ ॥ नवमाध्यायीं रजकाप्रती ॥ कृपाळू गुरु राज्य देती ॥ दर्शन देऊं म्हणती पुढती ॥ गुप्त झाले मग तेथें

१ गणपतीनें. २ परिटाला.

॥ २७ ॥ तस्करीं मारिला भक्त ब्राह्मण ॥ तस्करां वधिती श्रीगुरु येऊन ॥ ब्राह्मणाला प्राणदान ॥ देती दशमाध्यायांत ॥ २८ ॥ माधव ब्राह्मण करंजपुरीं ॥ अंबा नामें त्याची नारी ॥ नरसिंहसरस्वती तिचे उदरीं ॥ एकादशीं अवतरले ॥२९॥ द्वादशाध्यायीं मातेप्रती ॥ ज्ञान कथुनी पुत्र देती ॥ काशी क्षेत्रीं संन्यास घेती ॥ यात्रा करिती उत्तरेची ॥ ३० ॥ मातापित्यांतें करंजपुरीं ॥ भेटोनि येती गोदातीरीं ॥ कुक्षि॰व्यथे॰च्या विप्रावरी ॥ कृपा करिती त्रयोदशीं ॥ ३१ ॥ क्रूर यवनाचें करूनि शासन ॥ सायंदेवास वरदान ॥ देती श्रीगुरु कृपा करून ॥ चौदाविया अध्यायीं ॥ ३२ ॥ पंचदशीं श्रीगुरुमूर्ति ॥ तीर्थें सांगती शिष्यांप्रती ॥ यात्रे दवडूनि गुप्त होती ॥ वैजनाथीं श्रीगुरु ॥ ३३ ॥ षोडशीं ब्राह्मणा गुरुभक्ति ॥ कथूनि दीधली ज्ञानशक्ति ॥ श्रीगुरु आले भिल्लवडीप्रती ॥ भुवनेश्वरीसन्निध ॥ ३४ ॥ भुवनेश्वरीला मूर्ख ब्राह्मण ॥ जिव्हा छेदोनि करी अर्पण ॥ त्यास श्री-

१ तोडून.

गुरुंनीं विद्या देऊन ॥ धन्य केला सप्तदर्शी ॥ ३५ ॥ घेवडा उपटोनियां दरिद्रियाचा ॥ कुंभ दिधला हेमाचा¹ ॥ वर्णिला प्रताप श्रीगुरूचा ॥ अष्टादशाध्यायांत ॥ ३६ ॥ औदुंबराचें करूनि वर्णन ॥ योगिनींस देऊनि वरदान ॥ गाणगापुरास आपण ॥ एकोनविंशीं श्रीगुरु गेले ॥३७॥ स्त्रियेचा संबंध दवडून ॥ पुत्र दिधले तिजला दोन ॥ सिद्धरूपें विसाव्यांत ॥३८॥ तेचि कथा एकविंशीं ॥ प्रेत आणिलें औदुंबरापाशीं ॥ श्रीगुरु येऊनि तेथें निशीं² ॥ पुत्र उठविती कृपाळू ॥३९॥ भिक्षा दरिद्याघरीं घेती ॥ त्याची वंध्या³ महिषी होती ॥ तीस करून दुग्धवती ॥ बाविसाव्यांत वर दिधला ॥४०॥तेविसाव्यांत श्रीगुरूस ॥ राजा नेई गाणगापुरास ॥ तेथें उद्धरती राक्षस ॥ त्रिविक्रम करी श्रीगुरुनिंदा ॥४१॥ भेटों जाती त्रिविक्रमा ॥ दाविती विश्वरूपमाहिमा ॥ विप्र लागे गुरुपादपद्मा ॥ चोविसाव्यांत वर देती ॥ ४२ ॥ म्लेंच्छापुढें वेद

१ सोन्याचा. २ रात्रीं. ३ वांझ.

म्हणती ॥ विप्र ते त्रिविक्रमा छळती ॥ त्यांला घेऊनि सांगातीं ॥ गुरुपाशीं आला पंचविंशीं ॥ ४३ ॥ सव्विसाव्यांत तया ब्राह्मणां ॥ श्रीगुरु सांगती वेदरचना ॥ त्यागा म्हणती वादकल्पना ॥ परी ते उन्मत्त नायकती ॥ ४४ ॥ सत्ताविशीं आणोनि पतिता ॥ विप्रांसी वेदवाद करितां ॥ कुंठित करोनि शापग्रस्ता ॥ ब्रह्मराक्षस त्यां केलें ॥ ४५ ॥ अष्टाविंशीं तया पतिता ॥ धर्माधर्म सांगोनि कथा ॥ पुनरपि देऊनि पतितावस्था ॥ गृहाप्रती दवडिला ॥ ४६ ॥ एकोनत्रिंशीं भस्मप्रभाव ॥ त्रिविक्रमा कथितां गुरुराव ॥ राक्षसा उद्धरी वामदेव ॥ हा इतिहास तयांतची ॥४७॥ त्रिंशाध्यायीं पति मरतां ॥ तयाची स्त्री करी बहु आकांता ॥ तीस श्रीगुरु नाना कथा ॥ कथून शांतवूं पाहती ॥ ४८ ॥ एकतिंसाव्यांत तेचि कथा॥ पतिव्रतेचे धर्म सांगतां ॥ सहगमनप्रकार बोधितां ॥ ते स्त्रियेतें जगद्गुरु

१ धावि मावी.

॥ ४९ ॥ सहगमनीं निघतां सती ॥ श्रीगुरूस झाली नमस्कारिती ॥ आशीर्वाद देवोनि तिचा पति ॥ बत्तिसाव्यांत उठविला ॥ ५० ॥ तेतिसाव्यांत रुद्राक्षधारण ॥ कथा कुक्कुटमर्कट दोघेजण ॥ वैश्य-वेश्येचें कथन ॥ करिती रायातें परस्पर ॥ ५१ ॥ रुद्राध्यायमहिमा वर्णन ॥ चौतिसाव्यांत निरूपण ॥ राजपुत्र केला संजीवन ॥ नारद भेटले रायातें ॥ ५२ ॥ पंचत्रिंशत्प्रसंगांत ॥ कचदेवयानी कथा वर्तते ॥ आणिक सोमवारव्रत ॥ सीमंतिनीच्या प्रसंगें ॥ ५३ ॥ छत्तिशीं ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणा ॥ स्त्रियेनें नेलें परान्नभोजना ॥ कंटाळुनि धरिती श्रीगुरुचरणा ॥ त्याला कर्ममार्ग सांगती ॥ ५४ ॥ सप्तत्रिंशीं नाना धर्म ॥ विप्रा सांगोनि ब्रह्मकर्म ॥ प्रसन्न होवोनि वर उत्तम[1] ॥ देती श्रीगुरु तयातें ॥ ५५ ॥ अष्टत्रिंशीं भास्कर ब्राह्मण ॥ तिघांपुरतें आणिलें अन्न ॥ जेविले बहुत ब्राह्मण ॥ आणिक[2] गांवचे

१ जिवंत. २ आहे.

शूद्रादि ॥ ५६ ॥ सोमनाथाची गंगा युवती ॥ साठ वर्षांची वंध्या होती ॥ तीस दिधली पुत्रसंतती ॥ एकुणचाळिसावे अध्यायीं ॥ ५७ ॥ नरहरी-करवीं शुष्क काष्ठा ॥ अर्चवूनि दवडिलें त्याच्या कुष्ठा ॥ शबरकथा शिष्य-वरिष्ठां ॥ चाळिसाव्यांत सांगती ॥ ५८ ॥ एकेचाळिसीं सायंदेवा ॥ हस्तें घेती श्रीगुरु सेवा ॥ ईश्वरपार्वतीसंवाद बरवा ॥ काशीयात्रानिरूपणं ॥ ५९ ॥ पुत्रकलत्रेंसीं सायंदेव ॥ येऊनि करिती श्रीगुरुस्तव ॥ त्याला कथिती यात्राभाव ॥ वरही देती बेचाळिसीं ॥ ६० ॥ त्रेचाळिसीं अनंत-व्रत ॥ धर्मराया कृष्ण सांगत ॥ तेचि कथा सायंदेवाप्रत ॥ सांगोनि व्रत करविती ॥ ६१ ॥ चवेचाळिसीं तंतुकार भक्तासी ॥ श्रीपर्वत दावूनि क्षणेसी ॥ शिवरात्रीपुण्यकथा त्यासी ॥ विमर्षण राजाची कथियेली ॥ ६२ ॥ पंचेचाळिसीं कुष्ठी ब्राह्मण ॥ आला तुळजापुराहून ॥ त्याला करवूनि संगमीं

स्नान ॥ कुष्ठ नासूनि ज्ञान देती ॥ ६३ ॥ कल्लेश्वर हिपरगे ग्रामास ॥ श्रीगुरु भेटती नरहरी कवीस ॥ आपुला शिष्य करिती त्यास ॥ शेचाळिसाव्या अध्यायीं ॥ ६४ ॥ सत्तेचाळिसीं दिवाळी सण ॥ गुरूसी आमंत्रिती सातजण ॥ तितुकीं रूपें धरूनि आपण ॥ गेले मठींही राहिले ॥ ६५ ॥ अठ्ठेचाळिसीं शूद्रशेतीं ॥ त्याचा जोंधळा कापूनि टाकिती ॥ शतेगुणें पिकवूनि पुढती ॥ आनंदविलें तयातें ॥ ६६ ॥ एकोनपंचाशतीं श्रीगुरुमूर्ति ॥ अमरजासंगममाहात्म्य कथिती ॥ आणिकही तेथें सांगती ॥ कुष्ठ दैवार्जितीं रत्नाबाईचें ॥ ६७ ॥ म्लेंच्छाचा स्फोटक दवाडिती ॥ भक्तीस्तव त्याचे नगरा जाती ॥ पुढें श्रीपर्वतीं भेटों म्हणती ॥ पन्नासावे अध्यायीं ॥ ६८ ॥ एकावन्नबावन्नांत गुरुमूर्ति ॥ देखूनियां क्षितीं पापप्रवृत्ति ॥ उपद्रवितील नाना याती ॥ म्हणोनि गुप्तरूपें रहावें ॥६९॥ ऐसा

१ नाहींसें करून. २ शंभर पटीनें. ३ पृथ्वीवर. ४ पापाचार.

करूनि निर्धार ॥ शिष्यांसी सांगती गुरुवर ॥ आजि आम्ही जाऊं पर्व-
तावर ॥ मल्लिकार्जुनयात्रेसी ॥ ७० ॥ ऐसें ऐकूनि भक्तजन ॥ मनीं होती
अतिउद्विग्न ॥ शोक करिती आक्रंदोन ॥ श्रीगुरुचरणीं लोळती ॥ ७१ ॥
इतुकें पाहुनी गुरुमूर्ति ॥ वरद हस्तें तयां कुरवाळिती ॥ मद्भजनीं धरा
आसक्ति ॥ मठधामीं राहोनियां ॥ ७२ ॥ ऐसें बोधूनि शिष्यांसी ॥ गुरु
गेले कर्दळीवनासी ॥ नाविकमुखें सांगूनि गोष्टीसी ॥ निजानंदीं निमग्न
होती ॥ ७३ ॥ ऐसें अपार श्रीगुरुचरित्र ॥ अनंत कथा परम पवित्र ॥
त्यांतील बावन्न अध्यायमात्र ॥ प्रस्तुत कथिलें तुजलागीं ॥ ७४ ॥ सिद्ध
म्हणे नामधारका ॥ तुज कथिली अवतरणिका ॥ श्रीगुरु गेले वाटती
लोकां ॥ गुरु गुप्त असती गाणगापुरीं ॥ ७५ ॥ कलियुगीं अधर्म वृद्धि
पावले ॥ म्हणोनि श्रीगुरु गुप्त झाले ॥ भक्तजनाला जैसे पहिले ॥ तैसेच

भेटती अद्यापि ॥ ७६ ॥ हे अवतरणिका सिद्धमाला ॥ श्रीगुरु भेटती जपे त्याला ॥ जैसा भावार्थ असे आपुला ॥ तैशीं कार्यें संपादिती ॥ ७७॥ नामधारका शिष्य भला ॥ अवतरणिकेचा प्रश्न केला ॥ म्हणोनि इतिहाससारांशाला ॥ पुनः वदलों सत्‌शिष्या ॥ ७८ ॥ पूर्वीं ऐकिलें असेल कानीं ॥ त्यातें तात्काळ येईल ध्यानीं ॥ इतरां इच्छा होईल मनीं ॥ श्रीगुरुचरित्रश्रवणाची ॥ ७९ ॥ ऐसी ही अवतरणिका जाण ॥ तुज कथिली कथांची खूण ॥ इचें सतत करितां स्मरण ॥ कथा अनुक्रमें स्मरतसे ॥ ८० ॥ ऐसें वदे सिद्धमुनि ॥ नामधारक लागे चरणीं ॥ विनवीतसे कर जोडोनि ॥ तुझे वचनें सर्व सिद्धि ॥ ८१ ॥ आतां असे विनंवणी ॥ श्रीगुरुसप्ताहपारायणीं ॥ किती वाचावें प्रतिदिनीं ॥ हें मज सांगा श्रीगुरुराया ॥८२॥ सिद्ध म्हणती नामधारका ॥ तुवां प्रश्न केला निका ॥

१ विनंति.

परोपकार होईल लोकां ॥ तुझ्या प्रश्नेंकरूनिया ॥ ८३ ॥ अंतःकरण असतां पवित्र ॥ सदाकाळ वाचावें गुरुचरित्र ॥ सौख्य होय इहपरत्र ॥ दुसरा प्रकार सांगेन ॥ ८४ ॥ सप्ताह वाचावयाची पद्धति ॥ तुज सांगों यथास्थिति ॥ शुचिर्भूत होवोनि शास्त्ररीतीं ॥ सप्ताह करितां बहुपुण्य ॥ ८५ ॥ दिनशुद्धि बरवी पाहून ॥ आवश्यक स्नानसंध्या करून ॥ पुस्तक वाचावयाचें स्थान ॥ रंगवल्ल्यादि शोभा करावी ॥ ८६ ॥ देशकालादि संकल्प करून ॥ पुस्तकरूपीं श्रीगुरूचें पूजन ॥ यथोपचारें करून ॥ ब्राह्मणांसही पूजावे ॥ ८७ ॥ प्रथम दिवसापासोन ॥ बसावया असावें एक स्थान ॥ अतत्त्वार्थभाषणीं[1] धरावें मौन ॥ कामादि नियम राखावे ॥८८॥ दीप असावे शोभायमान ॥ देवब्राह्मणवडिलां वंदून ॥ पूर्वोत्तरमुख करून ॥ एकवाचनीं आरंभ करावा ॥ ८९ ॥ नवसंख्या अध्याय प्रथम दिनीं ॥ एक-

१ असत्य.

विंशतीपर्यंत द्वितीय दिनीं ॥ एकोनत्रिंश तृतीय दिनीं ॥ चतुर्थदिवशीं पसतीस ॥ ९० ॥ अडतीसपर्यंत पांचवे दिनीं ॥ त्रेचाळिसवरी सहावे दिनीं ॥ सप्तमीं बावन्न वाचोनि अवतरणिका वाचावी ॥ ९१ ॥ नित्य पाठ होतां पूर्ण ॥ करावें उत्तरांगपूजन ॥ श्रीगुरूतें नमस्कारून ॥ उपहार[1] कांहीं करावा ॥ ९२ ॥ या प्रकारें करावें सप्तदिन ॥ रात्रीं करावें भूमिशयन ॥ सारांश शास्त्राधारेंकरून ॥ शुचिर्भूत[2] असावें ॥ ९३ ॥ एवं होतां सप्तदिन ॥ ब्राह्मणसुवासिनीभोजन ॥ यथाशक्ति दक्षिणा देऊन ॥ सर्व संतुष्ट करावे ॥ ९४ ॥ ऐसें सप्ताह अनुष्ठान ॥ करितां होय श्रीगुरुदर्शन ॥ भूतप्रेतादि बाधा निरसन[3] ॥ होवोनि सौख्य होतसे ॥ ९५ ॥ ऐसें सिद्धांचें वचन ऐकोनी ॥ नामधारक लागे चरणीं ॥ म्हणे बाळाची ऑळी[4] पुरवोनी ॥ कृतकृत्य केलें गुरुराया ॥ ९६ ॥ श्रोते म्हणती वंदूनि

१ फलाहार. २ पवित्र. ३ नाश. ४ हेतु.

पायीं ॥ श्रीगुरु केली बहु नवलाई ॥ बाळका अमृत पाजी आई ॥ तैसें आम्हां पाजिलें ॥ ९७ ॥ प्रति अध्याय एक वोंवी ॥ ओंविली रत्नमाळा बरवी ॥ मनाचे कंठीं घालितां पदवी ॥ सर्वार्थाची पावती ॥९८॥ सिद्धांचें वचन रत्नखाणी ॥ त्यांतूनि नामधारक रत्नें आणी ॥ बावन्न भरोनि रांजणीं ॥ भक्तयाचकां तोषविलें ॥ ९९ ॥ किंवा सिद्ध हा कल्पतरु ॥ नामधारकें पसरिला करु ॥ यांचा करोनि परोपकारु ॥ भक्तांकरितां बहु केला ॥ १०० ॥ किंवा सिद्धमुनि बलाहक ॥ नामधारक शिष्य चातक ॥ मुख पसरोनि बिंदु एक ॥ मागतां अपार वर्षला ॥ १ ॥ तेणें भक्तां अभक्तां फुकाचा ॥ सकळां लाभ झाला अमृताचा ॥ हृदयकोशीं खळजनांचा ॥ पाषाण समयीं पाझरे ॥ २ ॥ श्रीगुरुरायाचे धरूं चरण ॥ सिद्धमुनीतें करूं वंदन ॥ नामधारका करूं नमन ॥ ऐसें करीं नारायण ॥ ३ ॥

श्रीगुरुरूपी नारायणा ॥ विश्वंभरा दीनोद्धारणा ॥ आपणा आपुली दावुनि खुणा ॥ गुरुशिष्यरूपें क्रीडसी ॥ ४ ॥ इति श्रीगुरुचरित्रामृते श्रीनृसिंहसरस्वत्युपाख्याने सिद्धनामधारकसंवादे द्विपंचाशदध्यायसारे अवतरणिका नाम त्रिपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५३ ॥ ओंवीसंख्या १०४ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥ श्रीगुरुचरित्रं समाप्तं ॥ एकंदर ग्रंथसंख्या ॥ ७३०० ॥

॥ ❁ ॥ ॥ ❁ ॥ ॥ ❁ ॥ ॥ ❁ ॥

---

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पितमस्तु ॥

## ॥ आरती श्रीगुरुदत्तात्रयाची ॥

त्रिगुणात्मक त्रैमूर्ति दत्त हा जाणा ॥ त्रिगुण अवतार त्रैलोक्यराणा ॥ नेति नेति शब्द नयें अनुमाना ॥ सुरवरमुनिजनयोगीं समाधिलें ध्याना ॥ जय देव जय देव जय सद्गुरुदत्ता ॥ आरति ओंवाळीतां हरसी भवचिंता ॥ जय० ॥ १ ॥ सबाह्यअभ्यंतरीं तूं एक दत्त ॥ अभाग्यासी कैसी न कळे ही मात ॥ पराही परतली कैंचा हा हेत ॥ जन्ममरणाचा पुरला असे अंत ॥ जय० ॥ २ ॥ दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान ॥ हरपलें मन झालें उन्मन ॥ मीतूंपणाची झाली ओसण ॥ एकाजनार्दनीं श्रीदत्तध्यान ॥ जय देव० ॥ ३ ॥ कृष्णापंचगंगासंगम निजस्थान ॥ चरित्र दावुनि केलें गाणगापुर गहन ॥ तेथें भक्तश्रेष्ठात्रिविक्रमयति जाण ॥ विश्वरूपें तया दिधलें दर्शन ॥ जय देव जय देव जय सद्गुरु दत्ता ॥ नृसिंहसरस्वाति नामें जय विश्वंभरिता ॥ जय० ॥ १ ॥ वंध्या साठी वर्षें पुत्रनिधान ॥ मृत ब्राह्मण उठविला तीर्थ शिंपून ॥ वांझ महिषी काढवी दुग्ध दोहून ॥ अंत्यजाचे मुखीं निगम संपूर्ण ॥ जय० ॥ शुष्ककाष्ठीं पल्लव दावुनि लवलाहीं ॥ कुष्ठी ब्राह्मण केला साधु निजदेहीं ॥ अभिनव लीला त्याची वर्णूं मी कायी ॥ म्लेंच्छराजा येउनि वंदी तव पायीं ॥ जय० ॥ ३ ॥ दिपवाळीचे दिवशीं भक्त येऊनी ॥ आठहि जण मस्तक ठेविति तव चरणीं ॥ आठहि ग्रामीं भिक्षा केली

ते दीनीं ॥ निमिषमात्रें तंतुक केला शिवचरणीं ॥ जय० ॥ ४ ॥ ऐसें चरित्र दावुनि जड मूढ उद्धरिले ॥ भक्तवत्सल ऐसें ब्रीद मिरविलें ॥ अगाधमहिमा म्हणुनि वेदश्रुति बोले ॥ गंगाधरतनय वंदी पाऊलें ॥ जय देव जय देव जय सद्गुरुदत्ता ॥ नृसिंहसरस्वति नामें जय विश्वंभरिता ॥ जय देव जय देव ॥ ५ ॥

हा ग्रंथ पुणें सदाशिवपेठ १०२६ येथें "चित्रशाळा" छापखान्यांत शंकर नरहर जोशी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

तपासणार व टीपा देणार प्रल्हाद अण्णाजी ऋषिशास्त्री.

ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं ॥
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ १ ॥



काषायवस्त्रं करदण्डधारिणम् ।
कमंडलुं पद्म करेण शंखम् ॥
चक्रं गदाभूषितभूषणाढ्यम् ॥
श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥ २ ॥

श्रीगुरु दत्तात्रेय.

